# मराठी वाङ्‌मयकोश

## खंड तिसरा

## ग्रंथपरिचय

इ. स. १८५८ ते १९६०

समन्वयक संपादक

प्रा. म. द. हातकणंगलेकर




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# मराठी वाङ्‌मयकोश

## खंड तिसरा

## ग्रंथपरिचय

समन्वयक संपादक

प्रा. म. द. हातकणंगलेकर




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : २०१०

प्रकाशक : सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
रविंद्र नाट्य मंदिर इमारत,
दुसरा मजला, सयानी रोड,
प्रभादेवी, मुंबई ४०० ०२५.

मुद्रक : व्यवस्थापक,
शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय,
चर्नी रोड स्टेशनजवळ,
मुंबई ४०० ००४.

किंमत : रु. ११५/-



# मराठी वाङ्मयकोश : खंड तिसरा

## ग्रंथपरिचय

समन्वयक संपादक

प्रा. म. द. हातकणंगलेकर

संपादक मंडळ

प्रा. वि. शं. चौधुले

डॉ. मोहन पाटील

श्री. यशवंत श्रीपाद रास्ते

एन ४०९८—२अ

## निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या विद्यमाने विविध वाङ्मयीन प्रकल्प हाती घेण्यात आलेले आहेत. त्यामध्ये 'मराठी वाङ्मयकोश' या प्रकल्पाचे महत्त्व विशेष आहे. या कोशाचे एकूण चार खंड संकल्पिलेले आहेत. त्यातील तिसऱ्या खंडामध्ये मराठीतील महत्त्वाच्या अशा ग्रंथांचा परिचय अधिकारी लेखकांकडून लिहवून घेण्यात आलेला आहे. हा खंड मराठी भाषेचे अभ्यासक आणि वाचक यांना उपयुक्त ठरेल अशी आशा आहे. मराठी वाङ्मयकोशाच्या या तिसऱ्या खंडाचे संपादन ज्येष्ठ समीक्षक प्रा. म. द. हातकणंगलेकर यांनी अतिशय परिश्रमपूर्वक पार पाडलेले आहे. त्याबद्दल मंडळातर्फे त्यांचे आभार मानतो. वाङ्मयकोशातील पुढील खंडांचे प्रकाशनही लवकरात लवकर पूर्ण करण्याचा मंडळाचा प्रयत्न आहे.

मधु मंगेश कर्णिक,

स्थळ : मुंबई,

अध्यक्ष,

दिनांक : ११ जानेवारी २०१०

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# मराठी वाङ्मयकोश

## खंड तिसरा

## ग्रंथपरिचय

**अकुलिना : भावे, पु. भा. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल बुक सर्व्हिस, पुणे, १९५०.** 'अकुलिना' ही पु. भा. भावे यांनी लिहिलेली पत्रात्मक कादंबरी आहे. मधूने गोप्या ह्या आपल्या मित्राला पत्र लिहून मेडिकल कॉलेजपासून डॉक्टर होईपर्यंतची आपली जीवन कहाणी सांगितली आहे. मधूच्या आयुष्यात आलेल्या सुरंगा, हिरा, पेरिन दारूवाला यांच्या संबंधांचे चित्रण कादंबरीत येते. एकाच वेळी वासनासक्त, बेछूट, स्वैराचारी निवेदकामध्ये आदर्शवादाचे रंग लेखकाने भरले आहेत. निवेदकाच्या संपर्कात आलेली सुरंगा शेवटी वेश्या बनते. त्यामुळे निर्माण झालेली आपली विमनस्कवृत्ती आणि स्वतःची अपराधीपणाची भावना मधू पत्रांतून व्यक्त करतो. पत्रलेखक निवेदकाला अस्वस्थ करणाऱ्या या भावुक अनुभवामुळे आणि अखेरच्या पत्रातील त्याच्या आर्त भावनेच्या प्रकटीकरणामुळे कादंबरीची वाचनीयता वाढते. लेखकाचा आवेगी स्वभाव आणि पत्रातील उत्कटतेची त्या स्वभावाला मिळालेली जोड यामुळे अकुलिना ही कादंबरी वाचकांच्या पसंतीस उतरली. मात्र एकाच व्यक्तीने दुसऱ्या एका व्यक्तीला सातत्याने पत्रे लिहिल्यामुळे कादंबरीत आलेली कृत्रिमता जाणवते. पत्रात्मक शैलीमुळे संवादही आकर्षक वाटत नाहीत. पु. भा. भावे यांच्या लेखनातील सामर्थ्य आणि मर्यादा 'अकुलिना' कादंबरीत दिसून येतात.

**वि. शं. चौघुले**

**अंगद शिष्टाई : संकलक—पोतदार, वासूदेव मोरेश्वर. प्रकाशक : श्री. कल्पतरू, मुंबई १८८८.** हरदास (किंवा हरिहरदास) हे अठराव्या शतकातील संत कवी. त्यांनी विपुल काव्यलेखन केलेले आहे अंगद शिष्टाई या काव्यात रामायणातील कथानक आलेले आहे. रावणाशी बोलणी करण्यासाठी अंगद, रामाचा दूत म्हणून जातो हा कथाभाग या काव्यात आलेला आहे. प्रत्यक्ष काव्यात दोन प्रसंग असून पहिल्या प्रसंगाची २५ आणि दुसऱ्या प्रसंगाची ३२ असे एकूण ५७ पदांचे हे काव्य आहे. या काव्यामध्ये सुंदरकांड संपले आणि युद्धकांडाला आरंभ होत आहे; अशा आशयाचा उल्लेख आलेला आहे. त्यावरून हरदासाने संपूर्ण रामायणाची रचना केली असावी असा तर्क करता येतो.

**चंद्रकांत धांडे**

**अठराशे सत्तावन्न सालचे बंडाची धामधूम किंवा हंबीरराव आणि पुतळाबाई : पटवर्धन, विष्णू जनार्दन. प्रकाशक : अमृत नागपूरकर, मुंबई, १८८५.** विष्णू जनार्दन पटवर्धन यांनी अठराशे सत्तावन्नच्या बंडानंतर केवळ अठरा महिन्यांतच लिहिलेली ऐतिहासिक कादंबरी. बंडवाल्यांचे नेते नानासाहेब पेशवे यांच्या संबंधीच्या ऐतिहासिक हकिकतीच्या पार्श्वभूमीवर त्यांच्या पदरच्या हंबीरराव व त्याची दुसऱ्या संबंधाची पत्नी पुतळाबाई यांच्या जीवनातील रम्याद्भुत घटनांचे चित्रण ही कादंबरी करते. हंबीररावाचा आपल्या पत्नीबद्दलचा संशय आणि त्यामुळे तिच्यावर आलेली संकटपरंपरा यांतून धीर न सोडता आपल्या पतीची मृत्यूच्या दाढेतून सुटका करून त्याच्या मनातील संशय ती दूर करते. बंडाच्या हकिकतीतील ऐतिहासिक घटनांचे धीटपणे आणि सावधपणे केलेले चित्रण हा या कादंबरीचा महत्त्वाचा विशेष. मुसलमानी पात्रांची हिंदी-उर्दू संभाषणे आणि सुभानराव नावाच्या पात्राच्या तोंडी वापरलेली कुणबाऊ भाषा लक्षात राहण्यासारखी आहे. मराठी कादंबरीच्या सुरुवातीच्या काळातील ही एक लक्षणीय साहित्यकृती आहे.

**भीमराव कुलकर्णी**

**अंताजी माणकेश्वराची बखर : माणकेश्वर अंताजी. प्रकाशक : राजवाडे संशोधन मंडळ, पुणे, कालनिर्देश नाही.** इ.स. १७७२ ते १७७३ ह्या कालखंडात हस्तिनापूर मुक्कामी, श्री. अंताजी माणकेश्वर यांनी लिहिलेल्या व हस्तलिखित स्वरूपात उपलब्ध असलेल्या या बखरीचे प्रकाशन धुळे येथील राजवाडे संशोधन मंडळाने केले आहे. या बखरीत पानिपतच्या युद्धप्रसंगाचे वर्णन आहे. सदर बखरीचा लेखक पेशवाईतील अंताजी माणकेश्वर हा सुप्रसिद्ध सरदार नसून कुणीतरी सामान्य कारकून असावा, असे मत इतिहास संशोधक मो. रा. जोशी यांनी व्यक्त केले आहे. उत्तरेकडून आलेल्या बातमीपत्रांच्या आधारे प्रस्तुत बखरीचे लेखन झाले असावे, असा अभिप्राय बापूजी संकपाळ यांनी 'बखर वाङ्मय-उद्गम आणि विकास' या आपल्या ग्रंथात प्रदर्शित केला आहे. 'अंताजी माणकेश्वराची बखर' ही पानिपतच्या युद्धाचे सविस्तर असे बातमीपत्र म्हणून मानता येईल.

उषा पुरोहित

**अद्वयशतक :** प्रस्तुत ग्रंथाचा कर्ता अद्वयबोध हा कवी इ.स. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेला. ह्याचे वास्तव्य कर्नाटक प्रांतात होते. हा मुडलगीच्या "स्वामी" परंपरेतील. मुडलगीची स्वामीपरंपरा म्हणजे आद्य मराठी कवी मुकुंदराज ह्यांचीच परंपरा होय.

देशिळचरित्रकाराने अद्वयबोधाच्या फक्त 'अद्वयशतक' याच ग्रंथाचा उल्लेख केलेला आहे. या कवीच्या रचनेपैकी 'अद्वयशतक' व 'श्रीरंगविलास' ही दोन प्रकरणे व काही पदे एवढेच वाङ्मय आज उपलब्ध आहे.

अद्वयबोधाचे गुरू रंगबोध, त्यांचा उपदेश व पंथीय तत्त्वज्ञानाचे सार या ग्रंथांत आलेले आहे. ह्या ग्रंथावर कवी मुकुंदराजांच्या 'विवेकसिधूं' ची छाप पडलेली स्पष्ट दिसून येते.

हे प्रकरण मुद्रित स्वरूपात उपलब्ध आहे.

तु. शं. कुलकर्णी

**अद्वैतसार :** चिदंबरदास राजारामांचे (इ.स. १७६८ ते १८४३) एक प्रकरण. त्याची ओवीसंख्या १५२ असून रचनाकाळ इ.स. १८३९ आहे. या प्रकरणात अद्वैतवेदान्त नित्य व्यवहारातील दृष्टान्तांच्या साहाय्याने समजावून देण्याचा प्रयत्न केला आहे. चिदंबरस्वामी या आपल्या गुरूची कृपा प्राप्त झाल्यावर याने ग्रंथरचनेला प्रारंभ केला. याने विपुल अभंग रचनाही केली आहे.

शिवाजीराव गऊळकर

**अद्वैतामृत :** आचार्यांच्या "स्वात्मानंद प्रकाश" या प्रकरणाच्या १५२ आर्यांवरील सुबोध व सरळ अशी निरंजन माधवकृत (इ. स. १७०२ ते १७९०) 'अद्वैतामृत' नावाची गद्य टीका आहे. "श्रीमच्छंकर भगवत्पूज्यपादाचार्यकृत स्वात्मानंद-प्रकाश कार्याप्रकरणाची टीका भाषेवरून अद्वैतामृत नामक योगी निरंजन माधव करीत आहे." असा या टीकेचा प्रारंभ आहे. टीकेचे स्वरूप असे.

"न क्लेशपंचकमिंद" भजते कृतकोश पंचविवेकः।
अतएव पंचकोशात्कुशलधियः संततं विचिन्वन्ति।।

टीका : पंचकोशविवेक ज्या पुरुषाने केला आहे त्यास पंचक्लेश होत नाहीत यास्तव कुशल बुद्धिवंत निरंतर पंचकोशविवेक करीत आहोत ।। ते पंचक्लेश कोणते।। अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश। पंचक्लेशाः। याचा अर्थ करितो। अविद्या म्हणजे मूलविद्या आत्म्याविषयी अज्ञान। अस्मिता म्हणजे देहादी अन्यात्म्याचे ठायी आत्मबुद्धी अहंदेही इत्यादी। देहानुकूल शब्दादिविषय याचे ठायी प्रीती तो राग। देहास प्रतिकूल प्रतिकूल शब्दादिविषयी अप्रीती तो द्वेष। रागद्वेषाचिठायी दुराग्रह म्हणजे अनुकूलच संपादावे प्रतिकूल सर्वथा नसावे ऐसा जो अभिनिवेश। हे पंचक्लेश महादुर्धर." तत्कालीन परमार्थपर मराठी गद्याचे स्वरूप समजून घेण्यास ही टीका उपयुक्त ठरावी. निरंजन माधव राजकारणात वावरत होते. पण मूलतः ते परमार्थ साधक होते. ते शांकरमतानुयायी होते व त्यांनी आपल्या वचनातून अद्वैत तत्त्वज्ञानाची व अनासक्तीयोगाची शिकवण दिली आहे.

शिवाजीराव गऊळकर

**अनेकविद्या मूलतत्त्व संग्रह : चिपळूणकर, कृष्णशास्त्री. प्रकाशक : दक्षिणा प्राइझ क़मिटी, मुंबई, १८६१ (प.आ.).** मुंबई इलाख्यातील सरकारी शाळा खात्याने अनेक इंग्रजी ग्रंथांच्या आधारे कृष्णशास्त्री चिपळूणकरांकडून लिहवून घेतलेले पाठ्यपुस्तक, या पाठ्यपुस्तकात यंत्रशास्त्र, रसायनशास्त्र, ज्योतिष आणि धर्मविषयक शास्त्र इत्यादी विषयांची माहिती सोप्या भाषेत सारांशरूपाने दिली आहे. पृथ्वीचा गोलाकार, हिरा, अभ्रक, चुनखडी, सोने, पारा धातू, गंधक, ऑक्सिजन, नायट्रोजन हे वायू गुरुत्वाकर्षण, पृथ्वी व चंद्र हे ग्रह, नद्या-सरोवरे, खलाशांचे होकायंत्र या विज्ञानाशी निगडित गोष्टींची माहिती पुस्तकात आहे. शास्त्रीय विषयाच्या माहितीप्रमाणेच अहिल्याबाई होळकर, आग्र्याचा ताजमहाल, वेरूळची लेणी, इंग्लंडमधील राज्यसंस्थेचे स्वरूप इत्यादींचा परिचयही लेखकाने थोडक्यात करून दिला आहे. याशिवाय, मराठी भाषेतील उपमा, अन्योक्ती, रूपक, श्लेष ह्या अलंकारांचा सोदाहरण परिचय लेखकाने करून दिला आहे. शास्त्रीय माहितीबरोबर इतर विषयांवरील काही उपयुक्त गोष्टींचे ज्ञान शालेय पातळीवरील विद्यार्थ्यांना व्हावे, हा 'अनेक विद्या मूलतत्त्व संग्रह' ह्या पुस्तकाचा हेतू होता. इंग्रजी राजवटीच्या आरंभकालातील गरजेनुसार प्राथमिक स्वरूपाची वैविध्यपूर्ण माहिती पुस्तकात येणे आवश्यक होते. पुस्तक निर्मितीचा तो हेतू सफल झाला आहे.

वि. शं. चौघुले

**अभिनव काव्यप्रकाश : जोग, रामचंद्र श्रीपाद. प्रकाशक : व्हीनस बुक स्टॉल, पुणे-२, १९३०.** प्रा. रा. श्री. जोग हे श्रेष्ठ समीक्षक त्यांनी संस्कृत काव्यशास्त्रातील तत्त्वे साररूपाने मराठीत आणली. या ग्रंथाला महाविद्यालयीन पाठ्यपुस्तकांत अग्रस्थान मिळाले. रा. श्री. जोग यांनी 'जोत्स्नागीत' (१९२६), 'निशागीत' (१९२८) हे काव्यसंग्रह , 'सौंदर्यशोध' आणि 'आनदबोध' (१९४३), हे समीक्षालेखन केले. ते तपशिलाविषयी दक्ष, साक्षेपी व समतोल समीक्षक मानले जातात.

प्रस्तुत ग्रंथात एकूण तेरा प्रकरणे आहेत. प्रथम काव्याचे शरीर व आत्मा याविषयी चर्चा करून काव्याची सर्व समावेशक व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे. अलंकार व वक्रोक्ती, रीती इत्यादी भारतीय तसेच पाश्चात्त्य काव्यलक्षणांचा विचार करून त्यापुढे काव्याचे प्रयोजन, काव्यकारणे, शब्दशक्ती यांचा आढावा घेतला आहे. रसाचे स्वरूप कार्य आणि रसनिर्मिती यांवर प्रकाश टाकून काव्यानंदमीमांसा केली आहे. रिचर्ड्‌सचा 'समधातता' सिन्ध्दात आणि अरिस्टॉटलच्या कॅथार्सिस या उपपत्तीचे स्पष्टीकरण केले आहे. काव्याचे वर्गीकरण, इतिहासानुसार काव्यप्रकार इत्यादींची चर्चा केली आहे.

काव्याच्या निर्मितीवर प्रकाश टाकणारा ग्रंथ आहे. काव्य-घटकांचा आणि काव्यपरिणामाचा तौलनिकदृष्ट्या विचार सांगणारा ग्रंथ उपयुक्त आहे.

**अंमलदार : देशपांडे, पुरुषोत्तम लक्ष्मण. प्रकाशक : श्री. ठाकूर, अमरावती, १९५३.** श्री. पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे एक सव्यसाची साहित्यिक. विनोदी लेखक आणि नाटककार. श्री. देशपांडे यांचे हे रूपांतरित नाटक आहे. या नाटकाचा मूळ लेखक रशियन नाटककार निकोलाय गोगोल याचे 'रेव्हिगॉर वै' हे मूळ रशियन नाटक. या नाटकाचे डी. जे. कॅम्बेल यांनी 'गव्हर्नमेंट इन्स्पेक्टर किंवा इन्स्पेक्टर जनरल' या नावाने इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध केले. श्री. पु. ल. देशपांडे यांनी मूळ कथानकाचा भाग तसाच ठेवून त्याचे महाराष्ट्रीयीकरण केले. "लाच घेणारे, निष्क्रिय, भ्रष्ट आणि मनमानी मराठी कारभार करणारे अधिकारी आणि त्यांचा गैरकारभार व भ्रष्टाचार" या विषयावर आधारलेले हे मूळ नाटक. श्री. ढेरे (सुरुंगवाड संस्थानचे दिवाण आणि आता कलेक्टर), माईसाहेब (यांची द्वितीय पत्नी), कुंदा (कन्या), श्री. ढगे (पोलीस अधिकारी), श्री. गोळे (हेडमास्तर), श्री. टुमणे (न्यायाधीश), डॉ. रोंगे, सर्जेराव (कोल्हापूरच्या इनामदारांचा उनाड मुलगा), श्री. डाके (पोस्टमास्तर) ही पात्रे.

"विलीन झालेले छोटे संस्थान सुरुंगवाड, हा जिल्हा होता. या जिल्ह्यात पूर्वीच्या संस्थानात काम करीत असलेले अधिकारी नव्या राजवटीत नवीन पदनामे स्वीकारतात, मूळचे हे अत्यंत भ्रष्ट अधिकारी त्यांचा कारभार पुढेही तसाच चालू राहतो. या शहरात जुगार आणि व्यसनापायी पैसे घालवलेला एक तरुण लॉजवर आपल्या नोकरासह राहण्यास येतो. दरम्यान बातमी येते की, 'भ्रष्ट कारभाऱ्यांची चौकशी करण्यासाठी दिल्लीहून एक अधिकारी येणार आहे.' या शहरात लॉजवर येऊन राहिलेल्या तरुण सर्जेरावालाच सर्व अधिकारी चौकशीसाठी आलेला अधिकारी समजतात आणि प्रत्येकजण आपली चौकशी होऊ नये म्हणून त्याची सरबराई करतात. त्याला 'अंमलदार साहेब' असे संबोधितात. कलेक्टर साहेबांच्या कन्येला अंमलदारसाहेब लग्नासाठी मागणी घालतात. इतक्यात पोस्टमास्तर साहेब हा अंमलदार तोतया असून खरे अंमलदार आता येणार आहेत असे जाहीर करतात." सर्जेराव हे या नाटकातले मध्यवर्ती पात्र आहे. पैसे न दिल्याने त्याला जेवायला खायला मिळत नाही या संदर्भात श्री. पु. लं. नी एक विडंबनात्मक स्वगत घातले आहे. विलीन झालेल्या छोट्या संस्थानचे वातावरण, नित्याच्या परिचयाची पात्रे, भ्रष्टाचाराचे मर्मभेदक चित्रण यामुळे मूळ परदेशी पेहराव असलेले हे नाटक विलक्षण लोकप्रिय झाले.

**अरुणोदय : बाबा पदमनजी. प्रकाशक : बॉम्बे ट्रक्ट ॲण्ड बुक सोसायटी, ॲंग्लो व्हर्नाक्युलर, मुंबई, १८८८, अरुणोदय : बाबा पदमनजी यांचे स्वलिखित चरित्र, आवृत्ती २ री, मुंबई, १९०८.** श्री. बाबा पदमनजी मराठी साहित्य विश्वात कोशकार, निबंधकार, कादंबरीकार या त्रिविध नात्याने ज्ञात आहेत. 'यमुना पर्यटन' ही त्यांची स्वतंत्र सामाजिक कादंबरी, ही मराठी भाषेतील पहिली कादंबरी. 'अरुणोदय' हे श्री. पदमनजींचे आत्मचरित्र. लेखकाने ग्रंथनाम पृष्ठावर आत्मचरित्र लेखनाचा हेतू सांगितला आहे. 'बाबा पदमनजी ह्यांचे स्वलिखित चरित्र' 'ह्यांत पुस्तककर्त्यांने आपले हिंदू धर्मसंबंधी जिणे व ख्रिस्ती होणे ह्या गोष्टीचे वर्णन केले आहे ?' मराठी भाषेमध्ये सुरुवातीला झालेल्या आत्मचरित्र लेखनामध्ये दादोबा पांडुरंग यांचे आत्मचरित्र आणि 'वेदोक्तधर्मप्रकाश' या ग्रंथात विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनी स्वतःसंबंधी लिहिलेला मजकूर आणि श्री. पदमनजींचे प्रस्तुत पुस्तक यांचे उल्लेख येतात. या कलाकृतींत श्री. पदमनजींच्या ग्रंथास फार वरचे स्थान मिळाले आहे. ग्रंथात एकूण २१ प्रकरणे असून सहा पुरवण्यांचा समावेश आहे. रेव्हरंड नारायण वामन टिळक यांनी या पुस्तकाच्या संदर्भात लिहिलेल्या लेखाचा अंतर्भाव असून रे. टिळकांनी श्री. पदमनजींना 'मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचे जनक' असे संबोधिले आहे. श्री. पदमनजींनी आपले शिक्षण, तत्कालीन हिंदू धर्मातील चालीरीती यांचे सविस्तर विवेचन केले आहे. व्यसनी गुरुजन, शाक्त पंथीयाचे आचरण, ब्राह्मण धर्म यांचेही सखोल वर्णन येते. हिंदू धर्मातील चालीरीती पसंत न आल्याने त्यांनी ख्रिस्ती धर्म का स्वीकारला याचे प्रांजल आणि सविस्तर निवेदन लेखकाने विस्ताराने दिले आहे. प्रस्तावनेत लेखकाने वापरलेल्या साधनसामग्रीचा उल्लेख दिला आहे. ज्यामध्ये दैनंदिनी, पत्रे, वर्तमानपत्रे येतात. आत्मचरित्राची भाषा साधी सोपी असून ग्रंथातील निवेदनात आत्मगौरवाची भाषा नाही. ग्रंथकर्त्याने आपल्या आयुष्यातील धार्मिक विचारांचा

आलेख परिपूर्ण शब्दांत मांडला आहे. मराठी साहित्यात अतिशय उल्लेखनीय अशी अभिजात कलाकृती असून आत्मचरित्र या वाङ्मय प्रकारांत हे पहिले उत्तम आत्मचरित्र असे अभिप्राय व्यक्त केले गेले आहेत, तर ' वाचण्याचे कारणच नाही असे आत्मवृत्त ' असाही उल्लेख आढळतो.

**ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र : करंदीकर, गो. वि. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, पहिली आवृत्ती, १९५७.** मुख्यत्वे कवी म्हणून परिचित असलेले विंदा करंदीकर समीक्षेच्या क्षेत्रातही ' परंपरा आणि नवता ' यासारख्या समीक्षाग्रंथाने तितक्याच अधिकारवाणीने लेखन करताना दिसतात. शेक्सपिअरकृत ' किंग लिअर ' चे ' राजा लिअर ' हे भाषांतरही करंदीकरांचे एक समर्थ अनुवादक म्हणून स्थान निश्चित करते.

ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र हा ग्रंथ म्हणजे ॲरिस्टॉटलच्या ' पोएटिक्स ' चा बुचरने केलेल्या इंग्रजी भाषांतराचे करंदीकरांनी केलेले मराठी भाषांतर आहे. या भाषांतरित ग्रंथाला करंदीकरांनी चौपन्न पानांची प्रदीर्घ प्रस्तावना लिहिली आहे. या प्रस्तावनेत काव्यशास्त्राकडे पाहण्याचा कोणता दृष्टिकोन असावा याची सुरुवातीला चर्चा करून अर्वाचीन भारतीय वाङ्मय हे पौर्वात्य व पाश्चात्त्य परंपरांच्या संगमावर उभे आहे, म्हणून त्याला भरताच्या नाट्यशास्त्राइतकीच ॲरिस्टॉटलच्या काव्यशास्त्राची गरज आहे, अशी भूमिका करंदीकरांनी मांडली आहे. या प्रस्तावनेत ग्रीक वाङ्मयाची परंपरा, प्लेटोची भूमिका, ॲरिस्टॉटलची विचारपद्धती, ॲरिस्टॉटलच्या उपलब्ध काव्यशास्त्राचे स्वरूप, अनुकृती या संकल्पनेचा विचार, काव्यानंदाचे स्वरूप, शोकांतिकेचे स्वरूप, कॅथार्सिस, काव्यशास्त्राचे सापेक्ष मूल्य या मुद्यांची चर्चा त्यांनी तपशिलाने केली आहे. या प्रस्तावनेनंतर ॲरिस्टॉटलच्या ' पोएटिक्स ' चे भाषांतर आणि शेवटी या काव्यशास्त्रावरील पाश्चात्त्य सौंदर्यशास्त्रज्ञांच्या भाष्याचे स्वरूप कोणते आहे याची चर्चा करंदीकरांनी केली आहे.

ग्रंथाच्या सुरुवातीला दुसऱ्या आवृत्तीच्या (मार्च, १९७८) निवेदनात या काव्यशास्त्राचे एकमेव मराठी भाषांतर असल्याचा करंदीकरांनी केलेला निर्देश हा या ग्रंथाचे महत्त्व सूचित करतो. काव्यशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या अभ्यासकांसाठी तसेच सामान्य वाचकांच्या दृष्टीने करंदीकरांच्या या ग्रंथाला अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे.

वि. दा. वासमकर

**अर्धचंद्र : सप्रे पंडित. प्रकाशक : दयार्णव कोपर्डेकर, पुणे, १९३८.** चार ते सहा ओळींच्या कविता असलेल्या मराठीतील पंडित सप्रे यांचा अशा प्रकारचा हा त्या काळातील एकमेव कवितासंग्रह आहे. आशयदृष्ट्या उपहासगर्भ, विनोदी, कल्पकतापूर्ण, मार्मिक चुटके या संग्रहात आहेत. जीवनातल्या व साहित्य क्षेत्रातल्या दोषांचा व दांभिकतेचा खट्याळपणे घेतलेला समाचार या चुटक्यात आढळतो. सांकेतिक प्रेमकल्पना आणि वास्तव संसारी जीवन याचे मर्मभेदी चित्रण करणारी सुभाषिते या संग्रहात आहेत.

गं. ना. जोगळेकर

**अर्वाचीन कविता अर्थात आधुनिक महाराष्ट्र कवींच्या काव्यातील वेचे : संपादक—गोऱ्हे, चंद्रशेखर शिवराम. प्रकाशक : दामोदर सावळाराम आणि मंडळी, मुंबई, १९०३ (दु.आ.).** परशुरामतात्या गोडबोले यांनी ' नवनीत ' प्रसिद्ध करून तत्कालीन मराठी रसिकाला जसा प्राचीन कवींच्या काव्याचा परिचय करून दिला तसाच अर्वाचीन मराठी काव्याचा परिचय करून देण्याच्या दृष्टीने चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे यांनी हा संग्रह संपादित केला आहे. ' हंसराज ' या कवीपासून वामन दाजी ओक या कवीपर्यंत एकूण सव्वीस कवींच्या निवडक कविता पहिल्या आवृत्तीत समाविष्ट असून दुसऱ्या आवृत्तीत आणखी चार कवींच्या काव्यांची भर घालून पूर्वार्ध अद्ययावत करण्याचा प्रयत्न केला आहे. गेल्या शतकातील अव्वल इंग्रजी अंमलातील बहुतेक पंडित कवी व भक्तिपर पदरचना व अभंगरचना करणारे कवी या संग्रहात आले आहेत. या काळातील काव्यातील वेगवेगळ्या प्रवाहांचे यातील दर्शन महत्त्वाचे आहे. निसर्ग-वर्णनपर कविता, आख्यानपर कविता, भक्तिपर कविता, बोधपर कविता, विलापिका, ऐतिहासिक कविता, उपहासपर कविता व इंग्रजीतून आणि संस्कृतमधून भाषांतरित केलेली कविता अशा अनेक प्रवाहांचे या संग्रहातून प्रदर्शन घडते. केशवसुत पूर्वकालीन कविता कशी होती याचे सम्यक व प्रातिनिधिक दर्शन घडविणारा संग्रह या दृष्टीने या संग्रहाचे महत्त्व. या संग्रहाचा उत्तरार्ध निघाला नाही.

म. ना. अदवंत

**अर्वाचीन मराठी काव्य (केशवसुत आणि नंतर) : जोग, रामचंद्र श्रीपाद. प्रकाशक : नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई, १९४६.** प्रस्तुत ग्रंथात १८८५ ते १९४५ या साठ वर्षांतील मराठी काव्याचा परामर्श घेतला आहे. केशवसुत पूर्वकालीन कविता, केशवसुतांच्या आगमनानंतर काव्यक्षेत्रात झालेले लक्षणीय बदल व आधुनिक कवितेतील त्यांचे स्थान स्पष्ट केले आहे. तांबे व चंद्रशेखर यांच्या काव्याची नोंद घेऊन पुढे रविकिरण मंडळाविषयी माहिती दिली आहे. माधव जूलियन, गिरीश इत्यादी कवींच्या कामगिरीचा आढावा घेऊन रविकिरण मंडळाने केलेले काव्यगानाचे प्रयोगाचे महत्त्व सांगितले आहे. १९२० ते १९३५ या काळात विविध प्रांतात झालेली काव्यरचना त्यांच्या वैशिष्ट्यांसकट मांडली आहे. यानंतर १९३५-१९४५ या काळातील कुसुमाग्रजांपासून माडगूळकर, मुक्तिबोधां-पर्यंतच्या काव्याचा आढावा व शेवटी आधुनिक काव्यावरील आक्षेपांचा विचार केला आहे.

केशवसुत व त्यानंतरच्या कवींचा आणि या काळातील काव्याचा सांगोपांग विचार करणारा हा ग्रंथ आहे.

**अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका : सरदार, गं. बा. प्रकाशक : गं. बा. सरदार विचार जागृतिमाला, पुणे, १९३७.** इ.स. १८०० ते १८७४ हा मराठी वाङ्मयातील बाल्यावस्थेचा व उपेक्षित कालखंड हा गंगाधर बाळकृष्ण सरदार यांच्या या ग्रंथाचा विषय लेखकाने विषयवार गट पाडून त्या त्या गटांतील ग्रंथांचा परिचय प्रस्तुत ग्रंथात करून दिला आहे. त्यांत कथात्मक वाङ्मय, नाटके, निबंध-भाषणे-संवाद, सामाजिक वाङ्मय, इतिहास-चरित्रे, व्याकरण-कोश, भाषा, धर्म-नीती-तत्त्वज्ञान, शास्त्र, व्यवसाय, कला, ख्रिस्ती वाङ्मय, संकीर्ण वाङ्मय, नियतकालिके इत्यादी विषय आले आहेत.

'सामान्य निरूपण' या पहिल्या प्रकरणात मुद्रण कलेचा आरंभ, डॉ. विल्यम केरी, पं. वैजनाथ शर्मा, सुरुवातीचे मराठीतील ग्रंथ प्रकाशन, ख्रिस्ती धर्मप्रसार व मराठी ग्रंथ प्रकाशन, बॉम्बे नेटिव एज्युकेशन सोसायटी, पुणे पाठशाला, दक्षिणा प्रेज कमिटी इत्यादीविषयी माहिती आहे. तत्कालीन भाषांतरे यथार्थ व कलापूर्ण नाहीत असा निष्कर्ष काढला आहे.

अन्य विषयवार प्रकरणांत महत्त्वाच्या ग्रंथांचा संक्षिप्त परिचय आणि परिशिष्टात उपलब्ध ग्रंथांची कालनिर्देशासह सूची दिली आहे.

उपेक्षित कालखंडातील वाङ्मय व वाङ्मयीन प्रवृत्तींकडे लक्ष वेधून घेणारा हा एक महत्त्वाचा ग्रंथ आहे.

सु. रा. चुनेकर

**अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक : संपादक—खानोलकर, गं. दे. प्रकाशक : स्वस्तिक पब्लिशिंग हाऊस, मुंबई, १९३१.** गं. दे. खानोलकर यांनी संपादित केलेल्या अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक या ग्रंथात अर्वाचीन काळातील दिवंगत वाङ्मयसेवकांची चरित्रे दिली आहेत आणि त्यांतून अर्वाचीन मराठी वाङ्मयाचे इतिहासाचे चित्र उभे केले आहे. १९३१ मध्ये त्याचा पहिला खंड प्रकाशित झाला आणि १९६७ मध्ये सातवा खंड प्रकाशित होऊन, त्याचे काम खंडित झाले. सातवा खंड वरेरकर भार्गवराम विठ्ठल येथपर्यंत आला आहे. या सात खंडांत मिळून एकूण ३८३ वाङ्मयसेवकांची चरित्रे आली आहेत. ब्रिटिश अंमल सुरू झाल्यापासून मराठी वाङ्मयाची ज्यांनी संस्मरणीय सेवा केली, अशा दिवंगत वाङ्मयसेवकांची चरित्रे यात असून त्यांच्या वाङ्मयाचाही परिचय करून देऊन परामर्श घेतला आहे. संदर्भाच्या सोयीसाठी चरित्रे कालानुक्रमाने न देता व्यक्तींच्या आडनावांच्या वर्णानुक्रमे दिली आहेत. प्रत्येक चरित्राच्या शेवटी त्या-त्या वाङ्मयसेवकाच्या वाङ्मयाची, तसेच त्याच्या संबंधीच्या चरित्र-चर्चा अभ्यासाच्या साधनांची सूची दिली आहे. अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासाला व इतिहासाला 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक' हे उपयुक्त असे महत्त्वाचे संदर्भसाधन आहे.

सु. रा. चुनेकर

**अश्रुफुले : वकील व्यंकटेश. प्रकाशक : कृ. श्री. जोशी, नागपूर, १९३३.** 'वागीश्वरी' या नियतकालिकाच्या तीन अंकांच्या मोबदल्यात प्रकाशकांनी अश्रुफुले हा व्यंकटेश शंकर वकील यांचा कथासंग्रह प्रकाशित केला. कुटुंबातील माणसामाणसांच्या नात्यांतील विशुद्ध प्रेमाच्या या भावपूर्ण कथा आहेत. आई-मुलगा, आई-मुलगी, बहीण-भाऊ, मानलेले बहीण-भाऊ यांच्यामधील सात्त्विक प्रेमाच्या या हळव्या कथा असून 'शैशव', 'राधाकृष्णाचे प्रेम' या कथा काहीशा वेगळ्या व वैशिष्टपूर्ण आहेत.

वसुंधरा बनहट्टी

**अश्रू : खांडेकर, वि. स. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, १९५४.** मध्यमवर्गातील प्रामाणिकपणे जीवन जगू इच्छिणाऱ्या एका सामान्य शाळामास्तराच्या मानसिक कुचंबणेवर प्रकाश टाकणारी कादंबरी.

शंकर हा साधा, सुशिक्षित व पापभीरू असा शिक्षक असून उमा ही त्याची पत्नीही त्याला सुखदु:खात साथ देणारी. मुलाचा लहानसा हट्ट पण तो पुरवू शकत नाही. बहीण सुमेत्रा एक श्रीमंत वकिलाच्या मुलाच्या, माधवच्या प्रेमात पडलेली. पण आर्थिक अडचणीमुळे ते लग्न होऊ शकत नाही. तेव्हा त्या प्रेमाचा ती समंजसपणे त्याग करते. भाऊ अरविंद कॉलेजमध्ये जाणारा, पण घराकडे दुर्लक्ष करणारा आहे.

एका मागोमाग येणाऱ्या संकटप्रसंगी बालपणीचा शंकरचा मित्र दिगंबर त्याच्या साहाय्याला धावून येतो. त्याच्या मदतीने संकट दूर होताना शंकर मात्र मोह टाकून त्यागाला व ध्येयवादाला चिकटून असतो. त्याच्या व्यक्तिमत्त्वातील तळमळ व ध्येयवाद यांचे समरसून केलेले चित्रण प्रत्ययकारी वाटते. खांडेकरांच्या लेखनाने सर्व विशेष कादंबरीत एकत्रितपणे व्यक्त होताना दिसतात.

दया वि. मित्रगोत्री

**अष्टावक्रगीता : कल्याणीकर, शिवरामस्वामी. प्रकाशक : वळेशास्त्री, न्यू पूना बुक डेपो, पुणे, १९४१.** हा ग्रंथ शिवरामस्वामी कल्याणीकर यांचा आहे. विविध व विपुल रचना करणारे शिवरामस्वामी हे संत एकनाथ महाराजांचे पणतू होते.

अष्टावक्रगीता ही मूळ संस्कृत ग्रंथाची समश्लोकी टीका आहे. यात एकंदर ३०२ श्लोक आहेत. अध्याय वीस आहेत. शिष्यांनी विचारलेल्या शंका व त्यांच्या निरसनार्थ गुरूंनी केलेला बोध असे या समश्लोकी टीकेचे स्वरूप आहे. या चर्चेतून अक्षोपदेश, लयोपदेश, बंधमोक्ष, निर्वेद ज्ञान, यथासुख, शांती, विशेष ज्ञान, शम आणि आप्तविश्रांती, तत्त्वोपदेश असे आध्यात्मिक ज्ञान गुरूंनी या ठिकाणी शिष्याला दिले आहे व शेवटी जीवन्मुक्तीचे विवेचन केले आहे.

गुरू शिष्याला सांगतात, "कर्ता व भोक्ता तू नसून तू अव्यक्त, मुक्त आहेस. मी एकटा विशाल आहे, अशी भावना

ठेऊन वागावे दैवाभिमान नको. साकार ते सर्व व्यर्थ आहे. निराकाराच्या बोधाने पुन: जन्म नाही. घरात व बाहेर आकाशच आहे. " असा अद्वैताचा मार्मिक उपदेश गुरूंच्या मुखाने येथे करण्यात आला आहे. सरळ भाषा व सुलभ उपमा दृष्टान्तादी अलंकाराने रचना चित्तवेधक झाली आहे. या आपल्या रचनेबद्दल शेवटी शिवराम म्हणतात, ' एकनाथदेवच मजकडून हे वदवीत आहेत. जगाला बोधावयास ही समश्लोकी करून त्यांच्या हाती देत आहे. कारण आर्त जनांना विवेक दीप दाखवून, आत्मा स्वयंपूर्ण आहे, हे दाखविण्याकरिता करूणा निधी अष्टावक्र गुरूंनी आपल्या सच्छिश्यांस, ऋषिजनांस व राजेलोकांना हा उपदेश केला आहे. म्हणून या टीकेस ' अष्टावक्रगीता ' असे म्हणतात.' मूळ संस्कृताच्या या समश्लोकीत शिवरामांनी मुळातील अर्थ मराठी श्लोकात नेमकेपणाने आणलेला आहे.

वि. पां. देऊळगांवकर

**अहिल्या आणि इतर कथा : जोगळेकर, स. आ. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९६०.** पाच दीर्घकथांचा संग्रह. या कथा म्हणजे एका भटक्या रसिकाला भेटलेल्या स्त्रियांच्या कहाण्या आहेत. इथल्या कथेत कधी पुरुष शिकारी होतो, तर कधी स्त्री एखाद्या पुरुषाची पारध करताना दिसते. लेखकाच्या शैलीत गोष्टीवेल्हाळपणा, मिस्किलपणा आणि संस्कृतप्राचुर्य हे गुण आढळून येतात. या कथा आधुनिक कथेपेक्षा पूर्वीच्या काळातील ' गोष्टी ' ला जवळच्या आहेत.

गो. वि. वैद्य

**अहेव लेणं : भोसले, म. भा. प्रकाशक : ग्रामीण प्रकाशन संस्था, सातारा, १९५१.** म. भा. भोसले यांच्या ग्रामीण कथांचा संग्रह. स्वातंत्र्योत्तर कालखंडातील ग्रामीण जीवनातील अनेकविध पैलूंचे, ताणतणावांचे, स्पृशास्पृश्य भेदांचे चित्रण कथांमध्ये आले आहे. मानवी संबंधांचे भावपूर्ण आणि आदर्शवादी चित्रण हा प्रस्तुत संग्रहातील कथांचा विशेष आहे.

दीपक घारे

**अक्षयबोध (सोहिरोबानाथ आंबिये) : पै/रायकर, भगवंत बाळकृष्ण. प्रकाशक : इंदुप्रकाश छापखाना, मुंबई, १९०५.** सोहिरोबानाथांनी (इ.स. १७१४-१७९२) अनेक स्फुट-पदरचनांबरोबरच काही बेताच्या ग्रंथरचनाही केल्या आहेत. आठ प्रकरणांत विभागलेल्या ' अक्षयबोध ' त्यांपैकी एक. या ग्रंथात अद्वैत, वैराग्य, ज्ञान, सद्विवेक, विवेक, बोधलक्षण हे विषय प्रकरणात चर्चिले आहेत. आपण अज्ञानी असूनही आपल्या करवी (सद्गुरूने) पूर्णज्ञान अनुभव वदवले आहेत. या कवीच्या वचनातील विनयाचा भाग वगळला तरी वस्तुत: अवघड अशा वेन्दाताने सुगम निरूपण या ग्रंथात आले आहे. विषय वेन्दातपर असल्याने भाषा संस्कृतप्रचुर असणे अपरिहार्य ठरते. ग्रंथात दुर्बोधता येणार नाही, याची दक्षता कवीने घेतली आहे.

सोहिरोबानाथांच्या स्फुटरचनांतून भक्ती दिसून येत असली तरी त्यांचा ओढा मात्र निर्गुण परब्रह्माचा उकल करून दाखवण्याकडे व त्याची अनुभूती प्रत्ययास यावी याकडे अधिक आहे. पूर्ण ज्ञानाच्या बाबतीत साधन या दृष्टीने हठयोगास कवीने वदलेले महत्त्व नाथसंप्रदायाच्या परंपरेस अनुरूप आहे. असेच मानावे लागेल. ' अक्षयबोधात ' पूर्णज्ञानप्राप्तीचे १८ ' योग ' सांगताना या ' योगांत ' हठयोग उतुस्फुट केलेला दिसतो.

श्री. रं. कुलकर्णी

**आई आहे शेतात : दिघे, र. वा. प्रकाशक : लेखन वाचन भांडार, पुणे, १९५६.** मध्यमवर्गीय जमिनदार कुटुंबातील भाऊबंदकीचे चित्रण या कादंबरीत आहे. गांधीवादी दादा सातपुते यांच्या कुटुंबाची वाताहात, कुटुंबातील हेवेदावे, कटकारस्थाने, कष्टप्रधानतेच्या कादंबरीतील चित्रणाला रेखीव निसर्ग वर्णने आणि प्रत्ययकारी वातावरण निर्मिती आणि सूक्ष्म व्यक्तिरेखाटन कौशल्याची जोड मिळाली आहे.

शरद दळवी

**आकाशगंगा : लाड, श्री. पु. मं. प्रकाशक : पॉप्युलर बुक डेपो, मुंबई, १९५७.** नियतकालिकांत वेळोवेळी प्रसिद्ध झालेल्या सोळा लेखांचा संग्रह. बौद्ध धर्म व त्यासंबंधीच्या सखोल अभ्यासाचा प्रत्यय लेखात येतो. वारकरी संतांची व बौद्ध धर्माची शिकवण यांचा तुलनात्मक परामर्श. लालित्य व वैचारिकतेच्या अंगाने हा एक महत्त्वाचा संग्रह आहे.

सुरेश वाळिंबे

**आगमप्रकाश : देशमुख, गोपाळ हरि ऊर्फ लोकहितवादी. भाषांतरकार : के. रघुनाथजी. प्रकाशक : फॅमिली प्रेस, मुंबई, १८८४.** तंत्रमार्गावर विदारक प्रकाश टाकण्यासाठी लोकहितवादींनी १८७४ साली गुजराती भाषेत लिहिलेल्या ग्रंथाचे के. रघुनाथजी यांनी मराठीत भाषांतर केले. या ग्रंथात शाक्तपंथातील निंदास्पद आचार, वशीकरण, जादूटोणा, यंत्रतंत्रे, अनुष्ठाने, शक्तिदेवतेला प्रसन्न करून सिद्धी प्राप्त करण्याचे प्रयत्न इत्यादींचा कठोर शब्दांत लेखकाने निषेध केला आहे. समाजविघातक किळसवाण्या तंत्रमार्गाचा उच्छेद करण्याचे महत्त्वाचे प्रबोधनपर सामाजिक कार्य या ग्रंथाने घडते.

भीमराव कुलकर्णी

**आगरकर लेखसंग्रह : संपादक—प्रधान, ग. प्र. प्रकाशक : साहित्य अकादमी, नवी दिल्ली, १९६०.** महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध समाजसुधारक गोपाळ गणेश आगरकर यांच्या त्रेसष्ट लेखांचे ग. प्र. प्रधान यांनी केलेले साक्षेपी संपादन. संपादकांनी सहा विभागात आगरकरांच्या निबंधांची मांडणी केली आहे. धर्मकल्पना, मुर्तिपूजा, सामाजिक सुधारणा, स्त्री शिक्षण, विवाह पद्धती, अर्थशास्त्र मिमांसा, वाचन, ज्ञान, कवी आणि काव्याचा आस्वाद इत्यादी विषयांवरील लेखांचा समावेश पुस्तकात आहे. वादास जागा राहू नये म्हणून केसरीत प्रसिद्ध झालेल्या लेखांचा

संपादकांनी पुस्तकात समावेश केलेला नाही. प्रस्तुत संग्रहातील निबंधांच्या वाचनाने तत्कालीन परिस्थितीचे ओझरते दर्शन घडावे आणि आगरकरांच्या विचारांची ओळख व्हावी, हा संपादनामागील हेतू सफल झाला आहे. महाराष्ट्रातील एका ध्येयनिष्ठ सुधारणावादी विचारवंताच्या विचारांचे दर्शन घडवणारे हे एक महत्त्वाचे संपादित पुस्तक आहे.

**वि. शं. चौघुले**

**आजकालचा महाराष्ट्र : पाध्ये, प्रभाकर; टिकेकर, श्री. रा. प्रकाशक : कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई, १९३५.** प्रस्तुत पुस्तकात एकूण अठरा प्रकरणे आहेत. महाराष्ट्र देश, महाराष्ट्र राज्याचा विकास, शिवपूर्वकालीन समाज, संतांच्या कार्याचे महत्त्व, या विषयांच्या चर्चेबरोबरच लेखकाने बाळशास्त्री जांभेकर, लोकहितवादी, जोतिबा फुले, विष्णुबुवा ब्रह्मचारी, लोकमान्य टिळक या मान्यवरांचा कार्याचा परिचय करून दिला आहे. याशिवाय, नव्या युगातील वैचारिक प्रवाह, गांधीवाद, नवमतवाद, मार्क्सवाद इत्यादी विचारप्रणालींचा परिचय करून देणाऱ्या या ग्रंथाचे महाराष्ट्राच्या सामाजिक, ऐतिहासिक व राजकीय अंगाच्या दृष्टीने महत्त्व आहे.

**सुधा कापरे**

**आडगावाचे चौधरी : बी. रघुनाथ. प्रकाशक : कुलकर्णी ग्रंथागार, पुणे, १९५४.** बी. रघुनाथ यांची 'आडगावाचे चौधरी' ही कादंबरी निजामी राजवटीतील मध्ययुगीन संस्थानी जीवनावर आधारलेली कादंबरी आहे. कादंबरीत 'वरवाडा' आणि 'उदयास्त' व 'चौधऱ्याचे हाड' अशा तीन भागांत चौधरी घराण्यातील पिढ्यांचे चित्रण आहे. जुलमी, क्रूर आणि भ्रष्ट संपत्तीची अनिवार लालसा असलेले आणि जहागिरीवर ऐषआरामी जीवन जगणारे रावसाहेब चौधरी आणि त्यांच्या कुटुंबीयांचे पतन व विनाश हा कादंबरीचा विषय आहे. गतकाळाविषयी सुक्त ओढ असलेल्या लेखकाने 'वाडासत्ते' च्या भ्रष्ट राजवटीचे केलेले चित्रण प्रत्ययकारी झाले आहे. वाड्यात असलेले गुप्त धन मिळवण्यासाठी चौधरी वाडा खणतात आणि त्यातच त्यांचा मृत्यू होतो. गावातल्या लोकांवर सूड उगविण्यासाठी, त्यांना पायाखाली चिरडण्यासाठी गावात आलेल्या शेवटच्या चौधरींचा भ्रमनिरास होतो; कारण ते येण्यापूर्वीच गावातले सर्व लोक गाव सोडून गेलेले असतात. प्रस्तुत कादंबरीत अनेक व्यक्तिरेखा आहेत; परंतु मध्यवर्ती व्यक्तिरेखा 'वरवाडा' हीच आहे. एका ऱ्हासशील समाजाच्या स्थितिगतीचे प्रत्ययकारी चित्रण बी. रघुनाथ यांनी लिहिलेल्या कादंबऱ्यांत घडते. 'आडगावाचे चौधरी' या त्यांच्या शेवटच्या कादंबरीतही ते घडले आहे.

**वि. शं. चौघुले**

**आडपडदा : बांदेकर, दत्तू. प्रकाशक : शेठ हिरजी मोहनजी, मुंबई, १९४७.** दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात लिहिलेल्या स्फुट विनोदी लेखांचा संग्रह. साहित्यिक, राजकीय, सामाजिक विषयावर उपहासगर्भ शैलीत लिहिलेल्या लेखांत शैलीतील ताजेपणा, नेमका भाव व्यक्त करणारी अल्पाक्षर रमणीय भाषा आणि वर्ण्य विषयावरील चपखळ आणि उपरोधपूर्ण भाषा हे लेखनाचे ठळक विशेष आहेत.

**शरद दळवी**

**आत्मविद्येची मुलतत्त्वे : भागवत, रा. स. प्रकाशक : मराठी थिऑसॉफिकल फेडरेशन, पुणे, १९२४.** मराठीत उत्तम धर्मग्रंथ प्रसिद्ध करण्याच्या हेतूने मराठी थिऑसॉफिकल फेडरेशनने धर्मजागृतिमाला या नावाने काढलेल्या पुस्तकमालेतील प्रस्तुत पुस्तक आहे. सी. डब्ल्यू लेडबीटर यांच्या 'ए टेक्स्ट बुक ऑफ थिऑसफी' या ग्रंथाचे प्रा. राजाराम सखाराम भागवत यांनी केलेले भाषांतर. धर्म हा अध्ययनाचा विषय असून अनुभवाचा नाही, या मताला उत्तर देण्याचा लेखकाचा प्रयत्न. भौतिकशास्त्रातील तपशील जसे तपासता येतात तसे धर्मसिद्धांत अनुभवांच्या आधारे तपासता येतात. या विषयीचे विवेचन प्रस्तुत पुस्तकात आहे. पाश्चिमात्यांचा प्रभाव भारतातील जनमानसावर असताना पौर्वात्य विचारसरणीचे महत्त्व विशद करणाऱ्या एका विदेशी विद्वानाचा भाषांतरित ग्रंथ म्हणून याचे महत्त्व आहे.

**वि. शं. चौघुले**

**आत्मवृत्त : कर्वे, धोंडो केशव. प्रकाशक : काशिनाथ रघुनाथ मित्र, मनोरंजन, मुंबई, पहिली आवृत्ती, १९१५, तिसरी आवृत्ती, १९५८.** कर्वे धोंडो केशव यांचे हे आत्मचरित्र पूर्वार्ध व उत्तरार्ध अशा दोन भागांत हे आत्मचरित्र असून त्याची एकूण प्रकरणे ८३ आहेत. पूर्वार्धात बालपण, शिक्षण, सार्वजनिक कार्याची सुरुवात, पुनर्विवाह, अनाथ-बालिकाश्रम, महिला विद्यालयाचा प्रारंभ, निष्काम-कर्ममठाची स्थापना, स्त्री शिक्षण विचार, वानप्रस्थाश्रम इत्यादी ६८ प्रकरणे आहेत. तर उत्तरार्धात कुटुंबाची सद्यःस्थिती, महिला विद्यापीठाची स्थापना-विस्तार, अशी १५ प्रकरणे आहेत. परिशिष्टात मुरुड गावाची हकिकत आहे.

या आत्मचरित्रात कर्वेनी स्त्रियांच्या विशेषतः विधवा स्त्रियांच्या शिक्षणासाठी केलेले कार्य व हे कार्य [illegible] असताना कोणकोणते बरेवाईट अनुभव आले याचा वृत्तांत दिला आहे. आपल्या कार्याला सुरुवात करून २० वर्षे झाल्यानंतर आपल्या कार्याची सामान्य जनतेस अधिक माहिती व्हावी व या कार्याचा परिचय व्हावा या उद्देशाने त्यांनी 'स्त्रियांच्या उन्नती प्रीत्यर्थ माझी वर्षे' हा निबंध पुस्तक रुपाने प्रसिद्ध केला होता. हा निबंधच या 'आत्मवृत्ताचे' मूळ केंद्र होय.

या आत्मचरित्राची तिसरी आवृत्ती, १९५८ मध्ये निघाली. त्यावेळी या आत्मवृत्ताला जोडून ना. म. पटवर्धन यांनी त्यांचे (कर्वे यांचे) लिहिलेले चरित्र जोडले आहे. या चरित्रात १९२८ ते १९५८ पर्यंतचा उर्वरित चरित्राचाच भाग आला आहे. या चरित्रात परदेश प्रवासाचा वृत्तांत सविस्तर दिला आहे.

हे मराठीतील पहिल्या प्रतीच्या आत्मचरित्रातील एक आत्मचरित्र मानण्यात येते.

**यशवंत चव्हाण**

**आदिनाथपुराण : महिश्चंद्र. प्रकाशक : जीनदास नारायण चवडे, नागपूर, १९०१.** ' आदिनाथपुराण ' हा ग्रंथ शके १६१८, माघ वद्य पंचमीस रविवारी आशापूर येथे शांतिनाथ चैत्यालयात पूर्ण झाला असे प्रशस्तीत नमूद केले गेले आहे. हा ग्रंथ ब्रह्मजिनदासाच्या ' आदिनाथरासा ' च्या आधारे लिहिला गेला आहे. प्रथम तीर्थकर - आदिनाथांचे चरित्र या ग्रंथात वर्णिले आहे. जैनपुराणात हे चरित्र विशेष महत्त्वाचे समजले जाते. या ग्रंथाची ओवी संख्या ३२५३ असून याचे १५ अध्याय आहेत.

चंद्रकांत देऊळगांवकर

**आद्यक्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांचे चरित्र : जोशी, विष्णू श्रीधर. प्रकाशक : वीर सावरकर प्रकाशन, मुंबई, १९४७.** आद्यक्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांचे रोमहर्षक कार्य, त्यांनी स्वातंत्र्यप्राप्तीसाठी केलेले अविस्मरणीय आत्मार्पण यांचा चित्तवेधक वृत्तांत प्रस्तुत पुस्तकात सांगितला आहे. पुस्तकातील कथनाला लेखकाच्या अभ्यासू वृत्तीचा आणि व्यासंगाचा आधार आहे. वासुदेव बळवंत यांच्या बंडाची परिणती अपयशात झाली असली तरी त्यांनी स्वातंत्र्यवाद्याची एक पिढी जन्माला घातली असा संदेश या पुस्तकातून मिळतो.

सुधा कापरे

**आंधळ्यांची शाळा : वर्तक, श्री. वि. प्रकाशक : श्री. वि. वर्तक, मुंबई, १९३३.** इब्सेनप्रणीत आधुनिक नाट्यतंत्राचा अंगीकार करणारे मराठी रंगभूमीवरील महत्त्वाचे नाटक. १९३० पर्यंत मराठी रंगभूमीवर शेक्सपीयरच्या नाट्यतंत्राचा प्रभाव होता. ब्यर्नसन या नार्वेजियन नाटककाराच्या A Guantlet या नाटकाचे मराठीत रूपांतर करून श्री. वि. वर्तक यांनी ते रंगभूमीवर आणले; आणि त्यामुळे मराठी रंगभूमीवर इब्सेन तंत्राचे आधुनिक युग अवतरले. प्रस्तुत नाटकाला रा. कृ. लागू यांची विस्तृत प्रस्तावना आहे. प्रस्तावनेत लागू यांनी मराठी रंगभूमीची वैशिष्ट्ये, इब्सेन तंत्राची महत्ता, मूळ नाटकाचा विषय, वर्तकांच्या रूपांतरातील मर्यादा यांचे साधार विवेचन केले आहे. लांबलचक स्वगते, कृत्रिम व अलंकारिक भाषेतील संवाद, अनावश्यक पात्रांची गर्दी व कथानकाची रहस्यमय गुंतागुंत हे दोष टाळून नाटक सुटसुटीत करण्याचे श्रेय प्रस्तावनाकार लागू यांनी वर्तकांना दिले आहे. ' आंधळ्यांची शाळा ' या नाटकाचा विषय स्त्री-पुरुष संबंधातील मुक्ततेचा समाजावर होणारा परिणाम हा आहे. नार्वेमध्ये खळबळजनक ठरलेल्या या नाटकाला श्री. वि. वर्तक यांनी भारतीय मनोरचनेला साजेल असे रूप दिले आहे. अण्णासाहेब, सुशीला, मनोहर, विश्वनाथ, बिंबा या पात्रांच्या आधारे नाटककाराने संविधानकाची उभारणी केली आहे. मराठीतील आधीच्या नाटकाप्रमाणे या नाटकात अनेक प्रवेश नाहीत. नाटकाचे चार अंक म्हणजे चार प्रवेश आहेत. विशेष म्हणजे नाटकाच्या प्रारंभी स्थल-काल आणि पात्रांच्या हालचालींची माहिती नाटककाराने दिली आहे. शिवाय, नटाने अभिनय कसा करावा व आवाज कसा बदलावा याविषयी काही सूचनाही दिल्या आहेत. संवादांची भाषा सहजस्वाभाविक आणि सुटसुटीत आहे. ' आंधळ्यांची शाळा ' हे श्री. वि. वर्तकांचे नाटक आधुनिक नाट्यपद्धतीचा एक नमुना आहे, ह्या शब्दात रा. कृ. लागू यांनी नाटकाचा गौरव केला आहे. आपल्या तरुण आणि पुरोगामी विचारसरणी असलेल्या मित्रांच्या सहकार्याने ' आंधळ्यांची शाळा ' चे प्रयोग ' नाट्यमन्वंतर ' या संस्थेतर्फे मराठी रंगभूमीवर सादर करण्यात आले. जुन्या धर्तीच्या नाटकांच्या पार्श्वभूमीवर झालेले प्रयोग तत्कालीन प्रेक्षकांच्या पसंतीस उतरले. कालांतराने ' नाट्यमन्वंतर ' ही नाट्यसंस्था बंद पडली. मात्र ' आंधळ्यांची शाळा ' या इब्सेन पद्धतीच्या नाटकाने मराठी रंगभूमीवर आधुनिक नाट्यपरंपरेला सुरुवात झाली.

वि. शं. चौघुले

**आधुनिक कविपंचक : माडखोलकर, ग. त्र्यं. प्रकाशक : भट आणि मंडळी, पुणे, १९२१.** केशवसुतांपासून मराठी कवितेत जो आधुनिक संप्रदाय सुरू झाला त्या संप्रदायातील रे. टिळक, केशवसुत, विनायक, गोविंदाग्रज, बालकवी या पहिल्या पिढीतील प्रमुख पाच कवींच्या काव्याचा परामर्श घेणारा ग. त्र्यं. माडखोलकरांचा लेखसंग्रह. यात प्रत्येक कवीवर स्वतंत्र विवेचक लेख आहे. प्रारंभी ' कवी आणि काव्य ' याविषयी तात्त्विक विचार करणारा निबंध आहे. या संग्रहास न. चिं. केळकरांची प्रस्तावना लाभली आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी ' संस्कृत कविपंचकातील ' निबंधात प्रमुख पाच कवींचा परामर्श घेऊन आधुनिक मराठी समीक्षेचा पाया घातला. त्याच दिशेने, मराठीतील आधुनिक कविपंचकाचा परामर्श घेणारे निबंध लिहून माडखोलकरांनी आधुनिक मराठी कवितेच्या समीक्षेचा पाया घातला. या पाच कवींच्या काव्यातील गुणदोषांची मार्मिक चर्चा या ग्रंथात आहे.

सु. रा. चुनेकर

**आधुनिक कामशास्त्र : कर्वे, र. धों. प्रकाशक : र. धों. कर्वे, राइट एजन्सी, मुंबई, १९३२.** कामशास्त्र या विषयावरील महाराष्ट्रात गाजलेले पुस्तक कामजीवन अश्लील, घाणेरडे असून धार्मिकता व पावित्र्याला बाधा आणते अशी समजूत सत्तर वर्षांपूर्वी महाराष्ट्रात दृढमूल झाली होती. त्यामुळे एका गोपनीय विषयावर वैज्ञानिक व तर्कशुद्ध भूमिकेतून हे पुस्तक र. धों. कर्वे यांनी लिहिले आहे. वात्स्यायनादी प्राचीन ग्रंथकारांपेक्षा आपली भूमिका आधुनिक आणि शास्त्रशुद्ध असल्याचा दावा लेखकाने केला आहे. स्त्रिया आणि पुरुष यांच्यासाठी या विषयावर वेगळी पुस्तके लिहिण्याचे कारण नसल्याचे र. धों. कर्वे यांनी प्रस्तावनेत नमूद करून लैंगिक जीवनाचा वाचकांना अत्यंत मोकळेपणाने परिचय करून दिला आहे. एकवीस प्रकरणांत विभागलेल्या या पुस्तकात कामवासनेचे स्वरूप, तिचे महत्त्व, रतिक्रिया, रतिक्रियेतील अडचणी, वधू-वरांची निवड, संततिनियमन, कामशास्त्रातील आसने, ब्रह्मचर्याबद्दलचे आधुनिक विचार, स्त्रियांचे व पुरुषांचे

धुपणी, रक्तप्रदर, गरमी, परमा हे आजार इत्यादींची माहिती आहे. स्त्री-पुरुषांच्या जननेंद्रियांची दिलेली सचित्र माहिती हा या पुस्तकाचा एक महत्त्वाचा विशेष आहे. शेवटी पुरवणीत दशांश पद्धतीची माहिती लेखकाने दिली आहे. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात कामजीवनाची शास्त्रीय माहिती देणारे पुस्तक म्हणून ' आधुनिक कामशास्त्र ' हे एक मौलिक पुस्तक समजले जाते.

वि. शं. चौघुले

**आधुनिक भारत : जावडेकर, शंकर दत्तात्रय (सुलभराष्ट्रीय ग्रंथमाला, पुष्प १९ वे). प्रकाशक : सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणे,१९३८.** श्री. शं. द. जावडेकर टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे राज्यशास्त्र व इतिहास या विषयांचे अध्यापक, स्वातंत्र्यसैनिक, थोर विचारवंत एका अनुवादित ग्रंथासह दहा ग्रंथांचे लेखक राज्यशास्त्र आणि इतिहास या विषयांवर हे लेखन आहे. महाराष्ट्रातील विचारवंत आणि लेखक पुढाऱ्यांमध्ये यांना मानाचे स्थान आहे. श्री. जावडेकर यांनी लिहिलेल्या ग्रंथामध्ये ' आधुनिक भारत ' हा एक उच्च दर्जाचा महत्त्वाचा ग्रंथ. या ग्रंथाची पहिली आवृत्ती, १९३८ साली प्रसिद्ध झाली. यानंतरच्या आवृत्त्यांमध्ये स्वतः लेखकाने नवीन माहितीचा समावेश करून आवृत्त्या अद्ययावत करण्याचा प्रयत्न केला आहे. सदर ग्रंथावर बरीच वैचारिक चर्चा झाली आणि जाणकार विद्वानांनी या ग्रंथास 'अत्यंत महत्त्वाचा वैचारिक ग्रंथ' असे गौरविले आहे. पहिली आवृत्ती पूर्वार्ध आणि उत्तरार्ध मिळून सातशे पृष्ठांची असून एकूण तेरा प्रकरणे यामध्ये समाविष्ट आहेत. आचार्य जावडेकरांचे स्वातंत्र्य चळवळीतील सहकारी आणि महाराष्ट्रातील आणखी एक विचारवंत आचार्य स. ज. भागवत यांची या ग्रंथास प्रस्तावना आहे. ग्रंथातील प्रकरणांची शीर्षकेच ग्रंथातील विचाराची दिशा व्यक्त करतात उदाहरणार्थ ' सर्वांगीण सुधारणेची आधुनिक ज्ञानज्योती ', ' हिंदी राजकारण आणि अर्थकारण ', ' भारतीय संस्कृतीचे तत्त्वमंथन ', ' क्रांतिवादी आध्यात्मिक राष्ट्रवाद ', ' भारतीय संस्कृतीचे अमृततत्त्व ' इत्यादी. ब्रिटिश अंमलापासून भारताच्या प्रजासत्ताक राज्यघटनेच्या अंमलापर्यंतचा इतिहास या ग्रंथात आहे. श्री. जावडेकर गांधीवाद मानणारे विचारवंत असल्याने या ग्रंथात मूळ पार्श्वभूमी गांधीवादाचीच आहे. श्री. जावडेकर यांचा तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र यांचा उत्तम व्यासंग होता. पौर्वात्य आणि पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाच्या पार्श्वभूमीवर भारतीय संस्कृतीचा विचारही या ग्रंथात आढळतो. या ग्रंथात गांधीवाद, भौतिक जडवाद किंवा मार्क्सवाद आणि अध्यात्मवाद यांच्यातील समन्वय दाखवून दिला आहे. गांधीवादात अध्यात्मवाद ही मूळ प्रेरणाच आहे. महाराष्ट्रात झालेल्या वैचारिक क्रांतीचा उहापोह करताना इतर राज्यातील म्हणजे बंगाल, पंजाब व मद्रास या प्रांतातील विचारांचा उल्लेख प्रस्तुत ग्रंथात आहे. न्यायमूर्ती रानडे, लोकहितवादी, नामदार गोखले, लोकमान्य टिळक, श्री. गोपाळ गणेश आगरकर यांच्या विचारांचा मागोवा घेत लोकमान्यांच्या राष्ट्रीय नेतृत्वानंतर पुढचे नेतृत्व महात्मा गांधींचेच होते यावर विवेचन आहे. भारतीय इतिहासाच्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील स्वातंत्र्य आंदोलन आणि महाराष्ट्रातील पुढारी व समाज यांच्या सहभागाची चर्चा प्रस्तुत ग्रंथात आहे. अर्थशास्त्रावर आधारित दादाभाई नौरोजींच्या कार्याचा विस्ताराने घेतलेला परामर्श आहे. न्यायमूर्ती रानडे यांच्या ' Rise of Maratha Power ' या ग्रंथाचा प्रभाव पुढील इतिहासविषयक लेखन करणाऱ्या व्यक्तींवर ज्याप्रमाणे आहे त्याप्रमाणे श्री. जावडेकर यांच्या या वैचारिक ग्रंथाचा पुढील इतिहासकारावर प्रभाव आहे. ' भारतीय संस्कृती आणि अध्यात्मवाद ' यावर आधारित विचार मांडणारा हा एक उत्कृष्ट ग्रंथ आहे.

तारा भवाळकर

**आधुनिक मराठी कविता : पंडित (डॉ.) भवानीशंकर श्रीधर. प्रकाशक : सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर, १९५२.** १८५२ ते १९५२ या काळातील मराठी कवितेचे सम्यक दर्शन घडविणारा ग्रंथ. आधुनिक मराठी कवितेने जे निरनिराळे काव्यप्रकार प्रचारात आणले त्याचे सोदाहरण विवेचन प्रस्तुत ग्रंथात आहे. केशवसुत, गोविंदाग्रज, बालकवी, तांबे, चंद्रशेखर आणि रविकिरण मंडळातील यशवंत, गिरीश, माधव ज्यूलियन कवी अशा मराठीतील कवींच्या काव्या वैशिष्ट्यांचा सोदाहरण परिचय लेखकाने करून दिला आहे. आधुनिक मराठी कवितेतील विविध प्रवाह आणि प्रवृत्तींचा साक्षेपी परामर्श घेणारा एक महत्त्वाचा समीक्षाग्रंथ म्हणून या ग्रंथाचे मोल निर्विवाद आहे.

रा. व्यं. जोशी

**आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती : कुलकर्णी, कृष्णाजी भिकाजी. प्रकाशक : कृ. भि. कुलकर्णी, दादर, मुंबई-२८, १९५६.** मराठी संशोधन मंडळ पुरस्कृत ग्रंथमालेतील पहिला ग्रंथ. १९व्या शतकातील मराठी शालेय वाङ्मयावर आधुनिक काळात कोणता आणि कसा परिणाम झाला याचे सोदाहरण विवेचन प्रस्तुत ग्रंथात लेखकाने केले आहे. तत्कालीन शालेय वाङ्मयातील व्याकरण, व्युत्पत्तिकोश, इतिहास, भूगोल, बखरी, चरित्रे, गणित, पदार्थ विज्ञान, अर्थ विज्ञान इत्यादी विषयांवरील पुस्तके, क्रमिकपुस्तके, कथावाङ्मय अशा विविध शाखांतील ग्रंथाची सोदाहरण माहिती पुस्तकांत दिली आहे. विविध शास्त्रातील ग्रंथाचे भाषिक स्वरूप तपासणे हा या पुस्तकाचा मूळ हेतू आहे. आधुनिक भाषा कशी घडत गेली, अनेक विद्वानांनी त्यासाठी कसे प्रयत्न केले, हे समजावून घेण्याच्या दृष्टीने हे पुस्तक महत्त्वाचे ठरले आहे.

प्रभा गणोरकर

**आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास : देशपांडे (डॉ.) अ. ना. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे (भाग पहिला-१९५४, भाग दुसरा-१९५९).** १८७४ ते १९५० या कालखंडातील आधुनिक मराठी वाङ्मयाचा तपशीलवार इतिहास लिहिण्याचा प्रयत्न म्हणजे प्रस्तुत ग्रंथ. १८७४ ते १९२० व १९२० ते १९५० अशी दोन खंडांत ग्रंथाची विभागणी लेखकाने केली आहे. वाङ्मयेतिहास लिहिण्याची लेखकाची भूमिका प्राधान्याने लेखक-कविंना महत्त्व देणारी असली तरी वाङ्मय प्रकारानुसार विवेचन करण्याची पद्धतही लेखकाने अंगीकारली आहे. त्यामुळे

काही प्रकरणांतून एकाच लेखकाच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा आढावा घेतला गेला आहे तर काही प्रकरणांत कथा, कादंबरी, नाटक, कविता इत्यादी वाङ्मयाचा तंत्रदृष्ट्या कसा विकास झाला हे स्पष्ट करण्याकडे लेखकाचा कल आहे. व्यक्तिगत आवडनिवड व दृष्टीला महत्त्व दिल्यामुळे काहीवेळा लेखनात अलिप्त वा तटस्थतेचा अभाव दिसून येतो. तरीही एकाच अभ्यासकाने लिहिलेला वाङ्मयाचा सविस्तर इतिहास म्हणून प्रस्तुत ग्रंथाचे महत्त्व आहे.

वासुदेव सावंत

**आधुनिक मराठीचे उच्चतर व्याकरण : सबनीस, म. पां. प्रकाशक : म. पां. सबनीस, मुंबई १९५१.** मोरो केशव दामले यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरणा' मधील दोष दिग्दर्शनावर भर देणारा मराठीतील व्याकरणविषयक ग्रंथ सबनीसांनी आपल्या उच्चतर व्याकरणाची सर्वस्वी नव्याने उभ .णी केली आहे. सबनीसांच्या व्याकरण ग्रंथातील पहिल्या 'प्राकृतेय' या भागात भाषेची अंतर्घटना व बाह्यघटना यांच्या संबंधीचे विवेचन आहे ; तर 'वाक्येय' या दुसऱ्या भागात शब्दांचे वर्गीकरण, विकरण पदयोजना आणि परिस्फोट (व्याकरण कथन) हे विषय आले आहेत. लेखकाने स्वतःच्या खास अर्थांनी काही नवीन पारिभाषिक संज्ञा योजल्या आहेत. तसेच व्याकरण-विषयक पारंपरिक कल्पनांना चांगलाच हादरा देणारे काही क्रांतिकारक विचारही मांडले आहेत. सबनीसांचे हे व्याकरण म्हणजे मराठी भाषेच्या व्याकरणविषयक विचारात नवी भर घालण्याचा महत्त्वाचा प्रयत्न होय.

वि. बा. प्रभुदेसाई

**आनंदभैरवी : बोरकर, बाळकृष्ण भगवंत. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९५०.** बोरकरांच्या प्रेम आणि निसर्ग यांचे दर्शन घडवणारा काव्यसंग्रह. 'जीवन संगीत' व 'दूधसागर' या काव्यसंग्रहातील कवितांचे साम्य प्रस्तुत काव्यसंग्रहात आढळून येते. तरी 'आनंदभैरवी'मधील कविता काही बाबतीत वेगळ्या आहेत. स्वातंत्र्य व समता या भावनांचा आविष्कार काही कवितांत होतो. तर काही कवितात कविचा वैचारिकतेकडे असलेला कल आढळून येतो. पण या दोन्ही प्रकारच्या कवितांत कविमन रंगून गेल्याची स्थळे मोजकीच आहेत. बोरकरांच्या काव्य प्रवासात वेगळी वाट सूचित करणारा काव्यसंग्रह म्हणून 'आनंदभैरवी'चे महत्त्व आहे.

कृ. ब. निकुम्ब

**आनंद लहरी : एकनाथ. प्रकाशक : ल. रा. पांगारकर, पुणे, १९२०.** गुरू जनार्दनस्वामी यांच्या कृपेमुळे एकनाथांना आत्मज्ञान झाले. या आनंदाचे वर्ण । १५४ ओव्यांच्या या प्रकरणात आहे. गुरुकृपा लाभलेला जीव मुक्त असतो आणि त्यास बंधन नसते हे या काव्यातील मुख्य प्रतिपादन आहे. गुरुकृपेमुळे देहाभिमान नष्ट होतो. वृक्ष तोडला तेव्हा तो ओला असला तरी ही ओल कालांतराने जाते व त्यास वाळलेल्या लाकडाचे रूप येते. हा वाळलेला वृक्ष अग्नीच्या संपर्काने भस्मरूप होतो त्याप्रमाणे सद्गुरुकृपा विवेकाचा घाव घालून देहवृक्ष पाडून टाकते. अनुभवाने संचिताचा ओलावा नाहीसा होऊन जीव मुक्त होतो. अशा अनेक समर्पक दृष्टांतांतून नाथांनी गुरुकृपेचा महिमा सांगितला आहे. मायेमुळे प्राणिमात्रांना भ्रम होतो. मायेचा सूत्रधार परमेश्वर आहे हे ज्ञान म्हणजेच मोक्ष. आत्मज्ञान झालेले गुरुभक्त संत आणि परमेश्वर हे वेगळे नाहीत हे ओळखणारे परमेश्वराशी एकरूप होऊन आनंदात रममाण होतात. प्रपंचात सुख आहे असे समजून वागणाऱ्या प्राण्यांना अज्ञानामुळे सत्य कळत नाही. म्हणून जन्ममरणाचा फेरा चुकविण्यासाठी सद्गुरूचे भजन हाच एकमेव उपाय आहे, असे नाथांनी 'आनंद लहरी'त सांगितले आहे. या काव्यात नाथांची उत्कट गुरुभक्ती प्रत्ययास येते.

चंद्रकांत धांडे

**आमची अकरा वर्षे : पटवर्धन, लीलाबाई. प्रकाशक : यशवंत गोपाळ जोशी, पुणे, १९४५.** मराठीतील प्रमुख कवी, कोशकार, छंद शास्त्राचे अभ्यासक, साहित्य-विमर्शक, भाषाशुद्धीचे तत्त्वनिष्ठ पुरस्कर्ते डॉ. माधवराव पटवर्धन (कवी माधव जूलियन) यांच्या पत्नी लीलाबाई यांनी पटवर्धनांच्या मृत्यूनंतर आपल्या व पटवर्धनांच्या अकरा वर्षांच्या (इ. स. १९२८-१९३९) वैवाहिक सहजीवनातील आठवणींचे केलेले भावपूर्ण निवेदन, पटवर्धनांच्या मनस्वी, उत्कट व्यक्तिमत्त्वाचे, संघर्षमय जीवनाचे दर्शन घडविण्याचा पुष्कळसा यशस्वी प्रयत्न. पटवर्धनांच्या जीवनातील भावनिक खळबळीचे, पुढे पुढे शांत होत गेलेल्या वृत्तीचे अनेक क्षण येथे जिवंत केले आहेत. या वैवाहिक जीवनाची पार्श्वभूमी म्हणून आरंभी त्यांच्या पूर्वायुष्याचे निवेदन, स्नेह्यांचे परिचय, पटवर्धनांच्या काही कवितांच्या जन्माचा हकिकतीचे कथन लीलाबाईंनी केले आहे. याच अकरा वर्षांच्या काळात त्यांच्या वाङ्मयीन कार्याला मान्यता प्राप्त होत होती. जीवनाला स्थैर्य येत चालले होते. याचा परिणाम त्यांच्या काव्यलेखनावरही होत होता. या सर्वांची ओळख या निवेदनातून होते. लीला-माधवांचा संसार सुरू झाला तेव्हा संसाराच्या प्रारंभी सुखक्षणांबरोबरच तणावाचाही भाग होता. या सहजीवनातील अनेक हर्षविषादाचे, तणावाचे, सामंजस्याचे उत्कट क्षण येथे वाचावयाला मिळतात.

सु. रा. चुनेकर

**आमच्या आयुष्यांतील काही आठवणी : रानडे, रमाबाई महादेव. मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, मुंबई, १९१० प्रकाशक : गो. कृ. देवधर, पुणे, आवृत्ती ६वी १९३५.** अर्वाचीन कालखंडात रमाबाई महादेव रानडे यांनी लिहिलेले हे पहिले आत्मचरित्र. या ग्रंथास नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांची प्रस्तावना असून आठवणींच्या स्वरूपातील, आत्मवृत्त स्वरूपातील स्त्रीने लिहिलेला हा पहिलाच ग्रंथ होय. या ग्रंथात एकूण बावीस भाग असून अर्पण पत्रिकेत हा ग्रंथ त्यांनी आपली

कन्या कै. सौ. सखूताई विद्वांस हिला अर्पण केला असून तिच्या आग्रहावरूनच त्यांनी या आठवणी लिहिल्या असल्याचे नमूद केले आहे. जुन्या काळातील स्त्रीप्रमाणे यांनी आपले जीवित न्यायमूर्तिंच्या सेवेत घालविले. घरातील वडील मंडळींचा कोणत्याही प्रकारे अधिक्षेप/अपमान न करता न्यायमूर्तिंनी आपले समाजसुधारणेचे काम चालविले त्याला सर्वतोपरी समर्थ साथ रमाबाईंनी परोपरीने केली. पतिच्या सूचनेप्रमाणे शिक्षण घेतले, इंग्रजी शिक्षणही घेतले सभेमध्ये प्रसंगी इंग्रजीतही भाषणे केली. घरातील बायकांच्याकडून होणारा त्रास सहन केला आणि अखेरपर्यंत न्यायमूर्तिची सेवा केली. पतिची सेवा हीच ईश्वरसेवा मानली. न्यायमूर्तिंच्या हळव्या, परोपकारी स्वभावाचे उत्कट दर्शन या ग्रंथात क्षणोक्षणी घडते. विवाहापूर्वीचे न्यायमूर्तिंचे जीवन, सहजीवनाचा कालखंड आणि त्यातील उत्कट प्रसंगाचे यथातथ्य वर्णन या ग्रंथात आहे. न्यायमूर्तिंच्या आयुष्यातील काही प्रसंगांचे विस्तृत वर्णनही या ग्रंथात आहे. ‘पंचहौद मिशनमधील चहा प्रकरण व ग्रामण्य आणि प्रायश्चित्त’ इत्यादी. न्यायमूर्तिंशी झालेल्या विवाह संबंधातील माहितीही बरीच विस्तृत अशी आहे. या काळात जी काही स्त्रियांनी लिहिलेली आत्मचरित्रे प्रसिद्ध झाली त्यामध्ये सर्वात महत्त्वाचे असे हे लक्षणीय आत्मचरित्र आहे. न्यायमूर्तिंच्या निधनानंतर त्यांनी पुण्यात वास्तव्य केले व ‘सेवासदन’ ही स्त्रियांच्या संदर्भातील प्रश्नांशी कार्य करणारी संस्था स्थापन केली.

बि. बा. प्रभुदेसाई

**आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास : ऋग्वेदी वामन मंगेश दुभाषी. प्रकाशक : व्ही. प्रभा आणि कंपनी, मुंबई, १९२४.** ‘आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास’ हा एका विशिष्ट दृष्टिकोनातून लिहिलेला अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ. या ग्रंथात माहिती अत्यंत समर्पकपणे, प्रसंगानुरुप अत्यंत व्यवस्थितपणे दिली आहे. कालगणनेनुसार महत्त्वाचे सण आणि उत्सव यांची माहिती महिन्यानुसार दिली आहे. दिवस, पक्ष, मास, ऋतू, नक्षत्र हे सर्व आधार एकादी घटना, प्रसंग, सण आणि उत्सव यांची माहिती देताना स्वीकारले आहेत. सात वार, पंचाग, तिथी आणि कालगणना यांची माहिती सविस्तर नमूद केली असून ऋतुंची संपूर्ण माहिती आणि त्यानुसार साजरे होणारे सण आणि उत्सव ही माहितीही अत्यंत उद्‌बोधक आहे. ऋतुंवरून प्रचारात आलेले सण उदा. विजयादशमी, दीपावली यांचे वर्णन करताना या सणांविषयीची वेदकालापासूनची माहिती एकत्रित दिली आहे. ऐतिहासिक सणांची माहिती देताना श्रीरामनवमी, कृष्णजन्माष्टमी याप्रमाणे वर्गीकरण असून यामध्येच शैव, वैष्णव इत्यादी पंथ आणि त्यांचे सण/उत्सव यांची सविस्तर माहिती दिली आहे. कौटुंबिक सणांच्या वर्गीकरणात देवी-नवरात्र, ललितापंचमी यांचा उल्लेख आणि माहिती आहे.

“जगातील सर्वच धर्मांत धार्मिक उत्सव, सण, धार्मिक भोजनसमारंभाना स्थान असून हे सर्व मानवी संस्कृतीचे अविभाज्य घटक आहेत. नित्य आणि नैमित्तिक आपत्तीतून बाहेर पडण्यासाठी निराशा व दुःख या प्रसंगी धीर खचू न देता आनंदाच्या प्रसंगी सण व उत्सव निर्माण झाले आहेत” हे प्रस्तावनाकार तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे मत सार्थ आहे. अत्यंत परिश्रमपूर्वक गोळा केलेली माहिती मांडणी आणि रचना उत्तम तऱ्हेने करून प्रसिद्ध केलेला हा ग्रंथ आहे.

**आवड-निवड : मालशे, स. गं. प्रकाशक : मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई, प्रथमावृत्ती, १९५९.** प्राचीन व अर्वाचीन साहित्याचा मधुकर वृत्तीने रसास्वाद घेणारे व्यासंगी आणि शैलीदार लेखक, चिकित्सक संपादक व समीक्षक म्हणून स. गं. मालशे ओळखले जातात.

‘आवड-निवड’ ही मालशे यांचा टीकालेखसंग्रह अभ्यासकांना मार्गदर्शक आहे. मालशे यांनी आपल्याला आवडतात ते लेखनप्रकार व लेखक विवेचनासाठी निवडलेले आहेत. त्यांनी या संग्रहात ‘विनोदाचे व्याकरण’ आणि ‘मराठी विनोदाची परंपरा’ हे विनोदावरील दोन लेख; ‘मराठी लघुकथा : कालची आणि आजची’, “पहिला मराठी ‘नव’ कथाकार,” ‘ग्रामीण कथाकार माडगूळकर’ हे लघुकथा या वाङ्मय प्रकारावरील तीन लेख ; सावरकर यांच्या कविता व वक्तृत्वावरील दोन लेख ; अनंत काणेकर यांच्या नाटक, लघुनिबंधकार काणेकर आणि प्राध्यापक काणेकर असे तीन लेख; आणि ‘पाणकळा’ ह्या र. वा. दिघे यांच्या कादंबरीचे व मुक्तेश्वरांच्या ‘नलोपाख्याना’चे समीक्षण असे एकंदरीत १२ लेख या संग्रहात समाविष्ट केले आहेत.

“आपल्या वाङ्मयीन आवडी ठरविताना बऱ्यावाईटातून तरतमातून निवड करण्याची कोशीस वाङ्मयाचा चिकित्सक वाचक करील, अशी अपेक्षा असते. प्रा. मालशे हे आवडी डोळसपणाने निश्चित करून आपल्या आवडत्या लेखकांबद्दल व लेखन प्रकाराबद्दल विवेचन करतात, असा प्रत्यय त्यांचे हे लेख वाचताना येतो.” असा अभिप्राय प्राचार्य म. गो. भाटे यांनी प्रस्तावनेत दिला आहे.

विनोद, लघुकथा, कविता, नाटक, लघुनिबंध या विषयांवरील तसेच माडगूळकरांची कथा, सावकरांची कविता आणि काणेकरांचे लघुनिबंध यांना मराठी साहित्य विश्वात महत्त्वाचे स्थान आहे. अशा साहित्यिकांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यास प्रेरक ठरेल असा हा टीकालेखसंग्रह आहे.

बि. दा. वासमकर

**आज्ञापत्र : बावडेकर, रामचंद्रपंत नीळकंठ अमात्य. प्रकाशक : अनंत आत्माराम मोरमकर, मुंबई, १९२३.** श्रीमंत छत्रपती शिवाजीमहाराजांचे वसुली अधिकारी यांना श्रीमन्महाराजांनी अमात्य ही पदवी दिली होती. श्रीमान श्रीशिवाजीमहाराज, श्रीमंत संभाजीमहाराज, श्रीमंत राजाराम महाराज, राणी ताराबाई व श्रीमंत संभाजीराजे यांच्या राज्यकारभारातील प्रत्यक्ष सहभागाचा परिपाक म्हणजे हा ‘आज्ञापत्र’ ग्रंथ. क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभुछत्रपती स्वामी

यांनी केलेल्या आज्ञेवरून या ग्रंथाची निर्मिती अमात्यांनी केली. हा राजनीतीपर लिहिलेला पहिला ग्रंथ होय. निरनिराळ्या संहिता संपादनांत हा ग्रंथ सहा आणि नऊ प्रकरणांत विभागून संपादित करून प्रसिद्ध केला गेला आहे. पहिल्या दोन प्रकरणांत महाराजांनी स्थापिलेले स्वराज्य आणि बारसदारानी त्याचा केलेला विकास आणि प्रजेची स्थिती हा भाग येतो. तिसऱ्या प्रकरणात राजाची कर्तव्ये, जबाबदारी, सेवक, लोकसंग्रह, खजिना, सैन्य यांचे वर्णन येते. चौथे प्रकरण प्रधानाच्या निवडी संदर्भात आहे. सावकार आणि व्यापारी यांच्या संबंधात पाचवे प्रकरण आहे. वतनदार आणि त्यांचे राजाशी संबंध या विषयीची माहिती सहाव्या प्रकरणात आहे. सातवे प्रकरण दान आणि साहाय्य राजाने कुणाला द्यावे यासंबंधी आहे. दुर्गा संबंधीचा सर्वांगीण तपशील आठव्या प्रकरणात येतो. आरमाराचे महत्त्व नवव्या प्रकरणात विशद केले आहे. तत्कालीन परिस्थितीचा विचार करून, स्वतः अमात्यांनी जे काम केले, राज्यकारभाराचे जे स्वरूप पाहिले त्याला अनुसरून शिवकाल आणि उत्तरकालातील राजनीतीचे वर्णन करणारा हा महत्त्वाचा ग्रंथ आहे.

वि. बा. प्रभुदेसाई

**इंदू काळे व सरला भोळे : जोशी, वामन मल्हार. प्रकाशक : ह. वि. मोटे, मुंबई, पहिली आवृत्ती, १९३४.** १९२० नंतरच्या कालखंडातील एक महत्त्वाचे कादंबरीकार, निबंधलेखक, विचारवंत. 'रागिनी', 'नलिनी', 'आश्रमहरिणी', 'सुशिलेचा देव', 'इंदू काळे, सरला भोळे', या कादंबऱ्या ; 'विस्तवाशी खेळ' हे नाटक व नवपुष्पकरंडकमधील कथा ही त्यांची साहित्यनिर्मिती.

'तात्विक कादंबरीचे जनक' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या वा. म. जोशीनी 'इंदू काळे, सरला भोळे'च्या रुपाने मराठी साहित्यात पत्रात्मक कादंबरी लेखनाचा अभिनव प्रकार सरस स्वरूपात प्रथमच प्रकट केला. या कादंबरीतील एकेक पत्र म्हणजे विशिष्ट पात्राचे आत्मनिवेदन आहे. ज्ञानमार्ग विरुद्ध कर्ममार्ग, कला विरुद्ध नीती, ध्येय विरुद्ध स्थिती, यांसारख्या प्रश्नांची चर्चा या कादंबरीतील विनायकराव, नारायणराव, इंदू काळे, सरला भोळे ही पात्रे करताना दिसतात. स्त्री-पुरुषांच्या बदलत्या संबंधातील मुक्तपणाचे स्वरूप कितपत कल्याणकारी असू शकेल याचीही ते चर्चा करतात.

या कादंबरीत ६१ पत्रे असून प्रत्येक पत्राला शिर्षक दिलेले आहे. तत्कालीन मध्यमवर्गीय समाजातील वास्तव नव्या मूल्यव्यवस्थेच्या आगमनाने कसे बदलू लागले होते याचा वेध घेण्याच्या दृष्टीने व तत्कालीन तात्त्विक कादंबरीचे स्वरूप समजावून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वाची कादंबरी.

यशवंत चव्हाण

**उघडे लिफाफे : संत, ना. मा. प्रकाशक : के. भि. ढवळे, मुंबई, १९४४.** ना. मा. संत यांचा पहिला लघुनिबंध संग्रह. या संग्रहाला वा. ल. कुळकर्णी यांची 'थोडेसें प्रस्तावने दाखल' या शीर्षकाची प्रस्तावना आहे. पुस्तकाच्या शेवटी ना. मा. संत यांनी आपली लघुनिबंध लेखनाविषयीची भूमिका मांडली आहे. अठरा निबंधांपैकी 'उधळेपणा, मुखवटे, खाजगी दानस' या लघुनिबंधांना इंग्रजी लघुनिबंधांच्या कल्पनेचा आधार आहे. 'व्यक्तित्त्व हेच ललित निबंधाचे खरेखुरे भांडवल', ह्या वा. ल. कुळकर्णी यांच्या मतानुसार संतांच्या व्यक्तित्त्वाची वैशिष्ट्ये त्यांच्या लेखनात दिसून येतात. पोस्टाची पेटी, पत्रे, लिफापे हे लेखकाचे चिंतन विषय आहेत. जीवनाकडे प्रसन्नपणे पाहण्याचा लेखकाचा स्वभाव 'पानाचा षोक', 'उधळेपणा' या निबंधात दिसून येतो. 'हिशेबाचे व्यसने', 'चक्रवर्ती आणि रस्ते' 'माझा प्रेमळ मित्र' या निबंधांत लेखकाची विनोदी वृत्ती प्रकट झाली आहे. 'ब्यांकबुक' या निबंधाला कारुण्याची झाक आहे. नीटनेटकेपणाची आवड, हळुवार मनोवृत्ती, प्रबळ जीवनासक्ती, अभिजात रसिकवृत्ती, मानवी जीवनाचे विविध खेळ अवलोकण्याची आवड हे संतांच्या स्वभावाचे विशेष लघुनिबंधांत आविष्कृत झाले आहेत. लेखन प्रकृतीला सुसंगत अशा शांत, सौम्य, विनोदगर्भ, नीट्स लेखनशैलीचा अंगीकार लेखकाने केला आहे. ना. सी. फडके यांनी लिहिलेल्या 'गुजगोष्टी' चे अनुकरण करणाऱ्या ना. मा. संत यांच्या पृथक व्यक्तित्त्वाचा आविष्कार 'उघडे लिफाफे' या संग्रहात झाला आहे.

वि. शं. चौघुले

**उघड्या जगांत : भोसले, म. भा. प्रकाशक : ग्रामीण प्रकाशन संस्था, भिलवडी-सातारा, १९४७.** 'उघड्या जगांत' ही म. भा. भोसले यांची दुसरी कादंबरी. 'वडवानल' हे हस्तलिखिताचे शीर्षक बदलून लेखकाने ती 'उघड्या जगांत' ह्या शीर्षकाखाली प्रसिद्ध केली आहे. गावातील खल प्रवृत्तीच्या, स्वैराचारी जुलमी सावकाराकडून होणारे वेठबिगाराचे शोषण हा कादंबरीचा विषय आहे. काकासाहेब सावकार, त्यांची मुलगी चंद्रा, वेठबिगार सखाराम या तीन प्रमुख पात्रांशिवाय सखारामची बहीण हौशा, सावकारांचा होणारा जावई बापूराव व लंपट बंडू ही कादंबरीतील दुय्यम पात्रे आहेत. सावकारांचा बेडरपणे प्रतिकार करून सखाराम चंद्रासह उघड्या जगांत निघून जातो ; तर सावकाराने केलेल्या वामाचारामुळे जन्माला आलेली सखारामची बहीण हौशा कामगारांच्या संघटनेची कार्यकर्ती व लेखिका बनते. आदर्शवादाची आवड असलेल्या लेखकाने कादंबरीचा शेवट सुखात्म केला आहे. गैरमार्गाने जाणाऱ्या बंडूला सदाचारणी बनवले आहे. नाट्यपूर्ण घटनांची निर्मिती, प्रादेशिक बोलीचा व भाषेचा वापर, सुष्ट-दुष्ट पात्रांच्या स्वभावाचे प्रकटन या गुणवैशिष्ट्यांमुळे 'उघड्या जगांत' ही कादंबरी वाचनीय झाली आहे. मात्र तिला कलात्मक उंची गाठता आली नाही.

वि. शं. चौघुले

**उत्तररामचरित्र नाटक : गोडेबोले, परशुरामपंत तात्या. प्रकाशक : एल. एम. डिसोजा छापखाना, मुंबई, पहिली**

**आवृत्ती, १८५९, तिसरी आवृत्ती, १९२६.** आपल्या भाषांतरित नाटकांनी मराठी नाट्य वाङ्मयाचे नवीन युग सुरू करणाऱ्या परशुरामपंत तात्यांनी संस्कृत मधील 'वेणीसंहार', 'उत्तररामचरित्र', 'शाकुंतल', 'मृच्छकटिक', 'नागानंद', 'पार्वती-परिणय' या सहा संस्कृत नाटकांची भाषांतरे केली.

'उत्तररामचरित्र नाटक' हे संस्कृत मधील भवभूतीच्या नाटकाचे भाषांतर. संस्कृत उत्तररामचरित्र नाटक गद्य-पद्यात्मक आहे. त्याचप्रमाणे तात्यांनीही भाषांतर करताना गद्याच्या ठिकाणी गद्य व पद्याच्या ठिकाणी पद्य असे केले असून पद्यासाठी आर्या, साक्या, दिंडी, ओव्या इत्यादी आर्ष व प्राकृत चालीचा उपयोग केला आहे.

एकूण सात अंक असलेल्या या नाटकात भगवान रामचंद्र अयोध्यापुरीत सिंहासनारुढ झाल्यावर जे रामायण घडले ते नाटकात आले आहे. पहिल्या अंकात सीतेचा त्याग, दुसऱ्या अंकात शंबुक वधाच्या निमित्ताने रामचंद्र पंचवटीस, तिसऱ्या अंकात सीता विरहाने रामाचा शोक, चवथ्या अंकात वाल्मिक मुनींच्या आश्रमात कौसल्या, जनक, वशिष्ठ, पाचव्या अंकात चंद्रकेतू व लवकुश युद्ध प्रसंग, सहाव्या अंकात राम व लव-कुश यांची भेट व सातव्या अंकात सर्वांच्या भेटी असे 'उत्तररामचरित्र' गुंफले आहे.

नाटकात करुणरस व शृंगाररस प्रधान असून विप्रलंभ शृंगार वर्णिला आहे. नाटकाच्या या आवृत्तीस गोपाळ विष्णू तुळपुळे यांचा उपोद्घात असून त्यात तात्यांचे चरित्र व वाङ्मय याचा परिचय करून दिला आहे.

यशवंत चव्हाण

**उपकारी माणसे : सामंत, रघुवीर. खंड-१ प्रवासातील सोबती (पत्रात्मक कादंबरी), खंड-२ अभ्रपटल (कथानत्मक कादंबरी), खंड-३ आकाशगंगा (मिश्र कादंबरी), प्रकाशक : पारिजात प्रकाशने, मुंबई, १९३८.** १९३३ ते १९८७ या पंचावन्न वर्षांच्या कालावधीत सात कादंबऱ्या लिहिणाऱ्या 'शब्दचित्रकार' रघुवीर सामंत यांची त्रिखंडात्मक कादंबरी. अरुण ठाकूर नावाच्या तरुण चित्रकाराला केंद्रस्थानी ठेवून सामंतांनी ही कादंबरी लिहिली आहे. सत्तर वर्षांपूर्वीच्या मध्यमवर्गीय कुटुंबाच्या जीवनाचे दर्शन कादंबरीत होते; तसेच महाराष्ट्रातील तत्कालीन राजकीय-सामाजिक घडामोडी, तीस सालचे राष्ट्रीय आंदोलन, दिवसेंदिवस नष्ट होत चाललेली एकत्र कुटुंबव्यवस्था, भिन्न परिस्थिती व भिन्न दृष्टिकोन यांमुळे नव्या-जुन्या पिढीत निर्माण होणारे संघर्ष यांचे चित्रण लेखकाने कादंबरीत केले आहे. अरुण ठाकूर, कमळा मावशी, बाबासाहेब, श्रीचंद्र टागोर, जाई पै, मंजुळा देसाई, दगडोबा जाधव या प्रमुख पात्रांचे परस्पर संबंध, त्यांची मानसिक आंदोलने, त्यांच्या आंतरिक मर्यादा, त्यांचे राग, लोभ, मत्सर, स्वार्थ, क्षुद्रपणा, लालसा, समर्पणशिलता, त्याग, औदार्य हे गुणदोष या सर्वांचा प्रत्यय कादंबरीत येतो. 'उपकारी माणसे'मधील पहिल्या खंडात फक्त पत्रांचा समावेश आहे. दुसऱ्या खंडात तृतीय पुरुषी निवेदन पद्धती व तिसऱ्या खंडातील निवेदनात प्रदीर्घ मृत्युपत्रांचा समावेश लेखकाने केला आहे. 'प्रवासातील सोबती', 'अभ्रपटल' व 'आकाशगंगा' ही कादंबऱ्यांची शीर्षके सूचक आहेत. अरुण ठाकूर या प्रमुख पात्राच्या विकासाबरोबर अन्य पात्रांचे सूक्ष्म चित्रण, पात्रचित्रणाला असलेली सामाजिक पार्श्वभूमी, त्यातून प्रत्ययास येणारी सखोल जीवन जाणीव ही 'उपकारी माणसे' ची ठळक वैशिष्ट्ये आहेत. समकालीन रूढ साचेबंद तंत्रशरण कादंबरीपेक्षा वेगळी कादंबरी लिहीत आहोत, याची जाणीव असणाऱ्या रघुवीर सामंतांनी लिहिलेली 'उपकारी माणसे' ही मराठी कादंबरीच्या दालनातील एक लक्षणीय कादंबरी आहे.

वि. शं. चौघुले

**उपेक्षितांचे अंतरंग : माटे, श्री. म. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती, १९४१, अकरावी आवृत्ती, १९६३.** 'माणुसकीचा गहिवर' आणि 'उपेक्षितांचे अंतरंग' या कथासंग्रहांनी दलित, पीडित, शोषितांची दुःखे जाणून घेऊन त्यांना शब्दबद्ध करणारा साहित्यिक म्हणून मराठी साहित्यविश्वात महत्त्वाचे स्थान श्री. म. माटे यांना दिले जाते. या दोन ग्रंथाशिवाय प्रबंधात्मक, चरित्रात्मक, वर्णनात्मक आणि निबंधात्मक असे विपुल लेखन माटे यांनी केले आहे.

'उपेक्षितांचे अंतरंग' या कथासंग्रहात तेरा कथा समाविष्ट केल्या आहेत. या सर्वच कथांमध्ये करुणरसाचा उत्कट प्रत्यय येतो. तारळखोऱ्यातील पिऱ्या, कृष्णाकाठचा रामवंशी, 'बन्सीधर ! तू आता कुठे रे जाशील ?' या कथेतील बन्सीधर, 'सावित्री मुक्यानेच मेली !' या कथेतील सावित्री पुरंदरचा नामा ही पात्रे मराठी कथात्मक साहित्यात अजरामर झाली आहेत. या सर्व कथांतील पात्रांची जी व्यथा आहे त्यामागची कारणमीमांसा शोधण्याचा प्रयत्न वाचक करू लागतो हे या कथांचे सामर्थ्य आहे.

मराठी ग्रामीण साहित्याच्या सुरुवातीच्या काळातील श्रेष्ठ दर्जाची ग्रामीण कथा म्हणून या कथांचे वर्णन करता येईल.

वि. दा. वासमकर

**उर्मिला : निकुंब, कृ. ब. प्रकाशक : स्वाती प्रकाशन, बेळगाव, १९५४.** 'उज्ज्वला' या कवितासंग्रहानंतर प्रकाशित झालेला कृ. ब. निकुंब यांचा हा दुसरा संग्रह 'उर्मिला' या संग्रहातील अधिक कविता प्रेमभावनेशी निगडित आहेत. प्रेयसीच्या आठवणी, तिच्या सहवासातील मुग्ध क्षण, भेटीची हुरहुर, प्रेम भावनेतील संकोच आणि लज्जा, मीलनातील गोडवा-नि-तृप्ती, मीलनाची असोशी, प्रणयातील रुसवे फुगवे व आशावाद अशा अनेकविध भावच्छटा 'डोळे तुझे बदामी', 'सल', 'अधुरें गीत', 'उशीर', 'ओळख', 'अडसर', 'मुका मार', 'तुझ्या रुसण्याची रीत'— इत्यादी कवितांमधून प्रकट झाल्या आहेत. 'नवलाची पहाट', 'प्रिय गगना', 'वर्षा' या कवितांमधून निसर्गाचे दर्शन होते. काही कवितांत कधी-कधी प्रेम भावनेला निसर्गाची डूब मिळालेली दिसते. भक्तिभावना, चिंतनशील वृत्ती, सामाजिक जाणीव हे कविच्या व्यक्तिमत्त्वाचे विशेष 'कृतज्ञ', 'स्नेह मी जागवीन आपला !', 'दिनान्ती', '३० जानेवारी १९४८', 'ईश्वराचं मनोगत', 'जीवन ! जीवन !',

इत्यादी कवितांमध्ये व्यक्त झाले आहे. निकुंब एक कुटुंबवत्सल कवी आहेत. कौटुंबिक भावना व्यक्त करणाऱ्या 'संहार चक्र', 'सिद्ध व्हायचे हांसून' आणि मुक्तछंदातील 'उर्मिला' या कविता विशेष उल्लेखनीय आहेत. भावनाविष्कारासाठी कवीने गीत, गझल, मुक्तछंद, सुनीत, ओवी या रचना प्रकारांचा अवलंब केला आहे. कृ. ब. निकुंबांच्या काव्य लेखनाच्या प्रवासातील 'उर्मिला' हा कवितासंग्रह म्हणजे पुढचा टप्पा आहे.

वि. शं. चौघुले

**उष:काल (अथवा अडीचशें वर्षांपूर्वीचे महाराष्ट्र) : आपटे, हरि नारायण. प्रकाशक : श्री. अ. वि. पटवर्धन, पुणे, आवृत्ती ५वी, १९२९.** श्री. हरी नारायण आपटे प्रख्यात सामाजिक आणि ऐतिहासिक कादंबरीकार. इ. स. १८९५ च्या एप्रिल महिन्यात रायगड स्मारक कल्पना महाराष्ट्रीयांच्या मनात आली. १८९६ च्या एप्रिलमध्ये शिवाजी उत्सव रायगडावर करण्यात आला. या घटने निमित्ताने श्री. आपटे यांनी शिवकालावर कादंबऱ्या लिहिण्याचे ठरविले असावे. त्यापैकी ही एक महत्त्वाची, अत्यंत लोकप्रिय ऐतिहासिक कादंबरी आहे. श्रीशिवछत्रपतींनी हिंदवी स्वराज्य स्थापनेसाठी जो पराक्रम केला. ज्या पद्धतीने मुसलमान आणि मोंगल यांच्या ताब्यातील गड, किल्ले गनिमी तंत्राने लढून मिळविले. सुलतानगड त्यांनी भेदनितीने कसा मिळविला या घटनेवर ही कादंबरी आहे. 'सुलतानगड' हे गडाचे काल्पनिक नाव आहे. या कादंबरीत जवळजवळ ५३ पात्रे असून त्यांपैकी श्रीमहाराज, तानाजी, येसाजी, श्रीधरस्वामी, मुरार जगदेव, विजापूरचा बादशहा, रंगराव अप्पा, नानासाहेब ही महत्त्वाची पात्रे आहेत. 'सुलतानगडाचा किल्लेदार रंगराव अप्पा यांचा मुलगा नानासाहेब गडावरून वडिलांच्या बरोबर भांडण करून गडावरून निघून जातो. यापूर्वी एकदा विजापूरच्या बादशहाने दिलेली मानाची वस्त्रे नानासाहेबाने नाकारलेली असतात. सर्फोजी ही नानासाहेबांच्या रागामध्ये भर घालणारी व्यक्ती. रागाने गडाबाहेर पडलेला नानासाहेब श्री. महाराजांच्या गोटात येतो. सुलतानगडावर विजय मिळविल्यानंतर श्रीमहाराजास या गडाचा गडकरी नेमतात ' हे या कादंबरीचे प्रमुख कथानक आहे. कादंबरीची रचना करताना श्री. आपटे यांनी अनेक ऐतिहासिक घटनांचे आधार घेतलेले आहेत. श्रीभवानी मातेची उपासना, आणि श्रीमहाराजांना झालेला साक्षात्कार, दृष्टान्त, गुप्त मसलती, मावळ्यांची जमवाजमव इत्यादींचे शिवकालीन प्रसंगांचे वर्णन यथातथ्य करण्याचा प्रयत्न आहे. सर्वात महत्त्वाचा भाग म्हणजे या कादंबरीचे नायकत्व श्रीमहाराजांचेकडे नसून नानासाहेबांकडे आहे.

**ऋतुचक्र : भागवत दुर्गा. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९५६.** श्रीमती दुर्गाबाई भागवत या प्रख्यात समाजशास्त्रज्ञ संस्कृत, प्राकृत भाषांच्या जाणकार, अभ्यासक आणि ललितनिबंधकार. बौद्ध वाङ्मयाच्या अभ्यासक. त्यांचे दहा ललितनिबंधसंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. प्रस्तुत पुस्तकही ललितनिबंध या स्वरूपाचे असून यासंग्रहात एकूण तेरा लेख आहेत. पहिला लेख ऋतूचक्राबद्दल असून पुढील बारा लेखात मराठी कालगणनेनुसार असून त्या त्या महिन्यांत कोणते ऋतू येतात याचे अतिशय तरल असे काव्यात्म वर्णन आहे. मराठी साहित्यविश्वात काही कविंचे काव्य सोडल्यास अशा प्रकारच्या शैलीचे निसर्गावरील अन्य लेखन आढळत नाही. लेखांची शीर्षकेही आकर्षक आहेत, चैत्रसखा वैशाख, पुष्पपंडित भाद्रपद, तालबद्ध पौष, मायावी माघ. हे लेखन लेखिकेने अनुभवलेल्या अनुभवविश्वातून साकार झाले आहे. निसर्गाच्या रंग-गंधाचे, फुलणाऱ्या वृक्षांचे, पानगळीचे विविध रूपांचे वर्णन अप्रतिम आहे. निसर्ग आणि मानव यातील नाते त्यांनी अतिशय चपखलपणे वर्णिले आहे. यातील प्रत्येक लेख उत्तरोत्तर निसर्गाचे बारकाईने वर्णन करणारा असा सिद्ध होत गेला आहे. 'लघुनिबंध' या वाङ्मय प्रकारात कोणत्याही विषयावर लालित्यपूर्ण शैलित लिहिता येते, परंतु इतर लघुनिबंधकारांच्या तुलनेत दुर्गाबाईचे हे लेखन वैशिष्ट्यपूर्ण अशा प्रकारचे आहे. 'आम्ही निसर्गापासून दूर गेलो तरी निसर्ग आमचा पाठपुरावा करतोच आहे', 'सृष्टीची सारी हालचाल एका तालासुरावर बांधलेली आहे' ही वाक्ये लेखिकेच्या समग्र निसर्ग अभ्यासाची द्योतक आहेत.

**एकच प्याला : गडकरी, राम गणेश. प्रकाशक : श्री. अनंत गणेश शेकदार, पुणे, १९१९, आवृत्ती ५वी, १९२८, प्रकाशक : बळवंत विष्णू परचुरे, मुंबई, १९२८.** राम गणेश गडकरी सव्यसाची नाटककार होत. 'गोविंदाग्रज' या टोपण नावाने काव्यलेखन 'बाळकराम' या टोपण नावाने विनोदी लेखन श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचे संप्रदायी व शिष्य. यांनी मराठी रंगभूमीच्या सुवर्ण काळात नाटके लिहिली. एकच प्याला या नाटकाची पदे मात्र विठ्ठल सीताराम गुर्जर यांची आहेत. मद्यपानाचा निषेध करणारे शोकरसपूर्ण आणि शोकांत कथानक असलेले संसार नाटक म्हणून या नाटकाचा उल्लेख होतो. या नाटकाने राम गणेशांना कीर्तिचे शिखर गाठता आले. या नाटकाचे संविधानक अतिशय सोपे, साधे आणि घरगुती आहे. सुधाकर हा या नाटकाचा नायक आणि त्याची पत्नी सिंधू ही नायिका. सुधाकर हा शहरातील अग्रगण्य वकील. रामलाल हा त्याचा स्नेही. या स्नेहाच्या साहाय्याने सुधाकर आपला अभ्यासक्रम पुरा करतो. सिंधूचे धनसंपन्न वडील हे रामलालचे स्नेही, रामलालमुळेच सुधाकराचे सिंधूशी लग्न होते. दरम्यान रामलाल इंग्लंडला जातो व सिंधू माहेरी. कोर्टातील मुन्सफाशी सुधाकराचा तंटा होऊन त्याची सनद दोन महिन्यांसाठी रद्द केली जाते. स्वाभिमानी सुधाकरास हा आपला मानभंग वाटतो

आणि याचवेळी त्याचा कारकून तळिराम त्याच्यापुढे मद्याचा 'एकच प्याला' पुढे करतो. सिंधू माहेरावरून आणि रामलाल इंग्लंडहून परततो, परंतु या कालावधीत सुधाकराचे व्यसन पराकोटीला गेलेले असते. ज्या दिवशी सुधाकराला त्याची सनद परत मिळणार असते त्या दिवशी सुधाकर कोर्टात दारूच्या अमलाखाली असतो व या त्याच्या वर्तनाने मुन्सफ त्याची सनद कायमची रद्द करतात. यापुढे सुधाकर पूर्णपणे व्यसनाधीन होतो. आपले नातेवाईक, स्नेही रामलाल यांच्यापासून दूर राहण्यास तो सिंधूला फर्मावतो. एकदा तो पूर्ण शुद्धीवर असताना तळिरामाची पत्नी गीता दारूच्या व्यसनाचे दुष्परिणाम सिंधूला सांगत असते हे संभाषण सुधाकर ऐकतो व दारू सोडण्याची शपथ घेतो. नोकरी मिळविण्यासाठी तो स्नेह्यांची मदत घेण्याचा प्रयत्न करतो पण हे न साधल्याने तो पुन्हा व्यसनाधीन होतो व सिंधूकडे सतत व्यसनासाठी पैशाची मागणी करतो. मुलाला दूध आणण्यासाठी गीताकडे दिलेले पैसेही सुधाकर मागतो व रागाच्या भरात मुलाला मारतो. मुलाला वाचविण्यासाठी मध्ये आलेली सिंधूही जखमी होते व यातच तिचा अंत होतो. पश्चात्तापाने होरपळलेला सुधाकर विष प्राशून आत्महत्या करतो. आत्महत्येपूर्वी रामलालला दारूच्या दुष्परिणामाबद्दल बोलतो. या नाटकाच्या संदर्भात नाटकाचे यश अपयश श्री. गडकऱ्यांचे नाट्यलेखन या विषयावर मान्यवरांनी बरीच उलट सुलट चर्चा केली आहे.

**ओळखीचे सूर : काळेले, रा. अ. प्रकाशक : त्रिंबक अनंत माईणकर, इंदूर, १९४१.** काव्य-संग्रहातील कविता रसिकांना पूर्वपरिचित असल्यामुळे रा. अ. काळेले यांनी संग्रहाला 'ओळखीचे सूर' हे नाव दिले आहे. 'काव्य म्हणजे काय ?' असा प्रश्न प्रस्तावनेत उपस्थित करून कवीने त्याचे स्वतः उत्तर दिले आहे. फक्त वर्तमान काळातील जीवनाचे प्रतिबिंब ज्यात पडते ते काव्य, असा काव्याचा संकुचित अर्थ न घेता व्यापक जीवन दर्शन घडवते, सौंदर्यनिर्मिती करून आनंद देते ते काव्य अशी स्वतःची काव्यविषयक भूमिका काळेले यांनी स्पष्ट केली आहे. प्रेमभावना प्रकट करणाऱ्या, निसर्गवर्णनपर आणि तत्त्वचिंतनपर अशा तीन गटांत 'ओळखीचे सूर' मधील कवितांचे विभाजन करता येते. 'चाहूल', 'हाक', 'तू गेलीस-पण' या कवितांत प्रेम-भावनेचा आविष्कार झाला आहे. प्रेमिकेशी चाललेला संवाद, प्रेमातील लडिवाळपणा, रुसवे-फुगवे यांचा आविष्कार काळेले यांच्या प्रेमकवितेत झाला आहे. 'तिची श्रीमंती,' 'काळा कोळसा' या महत्त्वाच्या तत्त्वचिंतनपर कविता आहेत. 'मनीषा' या कवितेतील निसर्गवर्णन प्रत्ययकारी आहे. दारुड्या नवऱ्याशी एकनिष्ठपणे संसार करणाऱ्या गृहिणीचे कारुण्यपूर्ण चित्रण 'प्रतीक्षा' या कवितेत कवीने केले आहे. 'वादळ' ही मुक्तछंदातील कविता रा. अ. काळेले यांनी अभिव्यक्तीची नवी दिशा शोधणारी कविता आहे.

वि. शं. चौघुले

**कडू आणि गोड : गाडगीळ, गंगाधर गोपाळ. प्रकाशक : सौ. विमल चित्रे, अभिरुची प्रकाशन, बडोदा, १९४८, (कडू आणि गोड, मानसचित्रे या कथासंग्रहासह नवी आवृत्ती गंगाधर गाडगीळ समग्र कथा, मालिका खंड १, पॉप्यूलर प्रकाशन, मुंबई, १९९८).** श्री. गंगाधर गाडगीळ, एक प्रमुख नव-कथाकार यांचा 'मानसचित्रे' हा पहिला कथासंग्रह (१९४६), दुसरा कथासंग्रह 'कडू आणि गोड' या संग्रहात एकूण तेरा कथा आहेत. या सर्वच कथा कौटुंबिक असून काही कथामध्ये बालमनाचे वर्णन आहे. नोकरी पेशातील मंडळी, त्यांचे दैन्य, दुःख, दारिद्र्य यांचे चित्रण या कथांत आहे. 'कडू आणि गोड' या कथेला अभिरूची मासिकाने आयोजिलेल्या कथास्पर्धेमध्ये प्रथम क्रमांकाचे पारितोषिक विभागून मिळाले होते. सुशिला ही या कथेतील नवविवाहित नायिका हिच्या निवेदनातूनच ही कथा साकारली आहे. खेळकर मोहक भाषाशैलीतील ही कौटुंबिक कथा. कथेतील सर्वच पात्रांचे वर्णन त्यांचे दुःख, अगतिकता सुख-दुःखाचा अनुभव हे निवेदनातूनच येते. 'शशीचं दुःख' ही निरागस बालकाचे दुःख, मुलांचे विश्व आणि बालमन रंगविणारी कथा. किडलेली माणसं ही मुंबईतील जातीय दंग्यावर आधारलेली महत्त्वाची कथा. दंग्याच्या वर्णनाबरोबर मध्यमवर्गीय नोकरदारांचे त्यांच्या पगाराच्या श्रेणीवर उच्च-नीच भाव ठरविणारे चित्रण या बरोबरच माणसांच्या वर्तनाचेही चित्रण येते. अनाकलनीय योगायोगाच्या माध्यमातून आणि मनोविश्लेषणाच्या अभिनवतेचा वापर करून कथानायक अनंताच्या जीवनाची शोकांतिका सादर करणारी कथा. क्षुल्लक गोष्ट. हृदय कथा पूर्णपणे बँक मॅनेजरच्या दिनक्रमावर आधारित कथा. ग्राहकांशी त्याचे वर्तन त्याच्या मनातील विचार या कथेत आहेत. सलामी कथेत भिकूच्या मनातील खळबळीचेच वर्णन, बयचे वर्णनही येते. मात्र सोजिरांचे बयशी वर्तन हे धक्कादायक ठरते. 'शितकण' कथेत शांताबाई भोवती घोटाळणाऱ्या मृत्यूचे त्यांना ठेवलेल्या खोलीचे वर्णन करताना 'निस्तब्ध शांततेचं इंजेक्शन' दिल्यासारखे वातावरण झाले होते असे केले आहे. शरद आणि शशी या बालकांचे बालमन आणि बालविश्व नावीन्य कथेत येते. 'गिचमिड' ही आणखी एक महत्त्वाची कथा. कारकुनांचे निर्लज्ज जग, केशवच्या मनात चाललेली विचारांच्या रेघोट्यांची गिचमिड या कथेत आहे. 'चोरटी पावलं' कथेत छचोर विमलाबाई, त्यांचं फॅशनेबल हसणं, यजमानाशी तुसडे वर्तन, त्यांच्या मुलींचे वर्तन इत्यादींचे वर्णन असूनही ही कथा कौटुंबिकच आहे. 'एकटा' कथेत माधवचे एकलेपण वर्णिले आहे. 'पावसाळी हवा' ही आणखी निवेदन स्वरूपांत नायकाचे विचार व्यक्त करणारी कथा असून या कथेत मनांतील व्याकूळता, निसर्गाचे वर्णन येते. 'नवा अंकुर' कथा कौटुंबिकच असून नवविवाहिताचे जीवन रंगवतानाच 'नव्या अंकुराचे' स्वागत करताना नायकाच्या माधवच्या अंतःकरणातील खळबळ व्यक्त करते. या सर्व कथांचा

केंद्रबिंदू माणूसच असून माणसाचे अंतर्विश्व तन्मयतेने, तद्रूपतेने वर्णिले आहे. मुलांच्या कल्पनारम्य भाववृत्तीचे चित्रण तसेच मध्यमवर्गीय जीवनातील विसंगती, विकृती, व्यथा इत्यादिंचे आणि पात्रांचे मनोव्यापार सहानुभूतिने वर्णिताना श्री. गाडगीळ अत्यंत प्रभावी भाषाशैलीचा उपयोग करतात आणि आपले एक महत्त्वाचा नवकथाकार हे स्थान निश्चित करतात.

**कमला : सावरकर, वि. दा. समग्र सावरकर खंड ७, कविता पृ. १६३ ते १८९, प्रकाशक : वीर सावरकर प्रकाशन, मुंबई, पहिली आवृत्ती, १९९३ (तृतीय आवृत्ती, १९४७).** स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर (जन्म २८ मे १८८३, मृत्यू २६ फेब्रुवारी १९६६) यांनी विपुल साहित्यनिर्मिती केलेली असली तरी केवळ 'साहित्यिक' अशी त्यांची अभिज्ञा मर्यादित करता येण्यासारखी नाही. ते एक बहुआयामी व्यक्तिमत्त्व होते. उच्च श्रेणीची कृतिशील देशभक्त, हिंदुहितैषी राजकारणी, मर्मज्ञ इतिहासकार, कवी, नाटककार, निबंधकार, भाषा-लिपिसुधारक आणि पुरोगामी विज्ञाननिष्ठ, अस्पृश्यता निवारक, समाजसुधारक असे अनेक पैलू धारण करणारी अलौकिक व्यक्ती म्हणूनच सावरकरांकडे पाहावे लागते. सावरकरांनी दहा हजारांहून अधिक काव्यपंक्ती लिहिल्या आहेत, यावरून त्यांच्या कविता संसाराचा विस्तार समजू शकतो.

'कमला' हे खंडकाव्य १९२२ मध्ये, सावरकर अंदमानमधून परत येण्यापूर्वी, 'विजनवासी' या टोपणनावाने प्रसिद्ध झाले. नंतर ते 'रानफुले' या काव्यसंग्रहात समाविष्ट करण्यात आले. (प्रकाशनवर्ष १९३४) 'कमला', 'विरहोच्छ्वास', 'महासागर' आणि 'गोमांतक' ही चार खंडकाव्ये म्हणजे सावरकरांनी पानिपत युद्ध आणि हिंदूंचा पराक्रम यांविषयी जे महाकाव्य लिहावयाचा संकल्प केला होता, त्या महाकाव्याचे भाग आहेत. या कथाभागाची जुळणी ते कशी करणार होते, हे या खंडकाव्यांमधून समजण्यासारखे नाही. तरीही, स्वतंत्रपणे या खंडकाव्यांचा आस्वाद घेता येतो. नोंदविण्यासारखी गोष्ट अशी की, 'कमला' आणि 'विरहोच्छ्वास'मध्ये कवी सावरकरांमधला 'रतिभाव' प्रधान आहे, तर 'महासागर' आणि 'गोमांतक'मध्ये वीर सावरकरांमधला पराक्रमभाव प्रबळ ठरलेला आहे.

'कमला'मधील कथानक अगदी छोटे आहे. कमला, तिचा पती मुकुंद आणि कमलेची सासू यांचे एक छोटेसे विश्व आहे. मुकुंदाचा मित्र मुकुल आणि मुकुंदा हे दोघेही मराठा सैन्यातले वीर आहेत. कमलेच्या ऋतुशांतीसाठी मुकुंदा घरी आलेला आहे. या शृंगार सोहळ्यामध्ये मुकुल आणि कमलेची बहीण प्रेमला सहभागी होतात. मुकुल आणि प्रेमला यांच्या प्रेमाचा अंकुर वाढू लागतो. मुकुंद-कमलेच्या पहिल्या मीलनरात्रीच लढाई सुरू झाल्याचा संदेश मुकुंद व मुकुलला प्राप्त होतो. ते दोघेही युद्धावर जाण्यासाठी निघतात. 'कमला' आणि प्रेमला यांचे तू रक्षण कर अशी देवाला प्रार्थना करून ते कर्तव्यार्थ सिद्ध होतात.

हा छोटा कथाभाग सावरकरांनी ८८२ ओळींच्या या खंडकाव्यात समरसून वर्णिला आहे. हे खंडकाव्य एकूणच वर्णनपर आहे. सुरुवातीचे फुलबागेचे वर्णन आणि ऋतुशांतीच्या सोहळ्याचे वर्णन यांमध्ये खंडकाव्याची जवळजवळ निम्मी व्याप्ती सामावलेली आहे. या दोन्ही वर्णनस्थानी सावरकरांनी आपल्या कल्पनावैभवाचे दर्शन घडविले आहे. बागेतील तृप्त केळी पाहून कविला व्रजगोपिकांची आठवण येते. ऋतुशांतीपूर्वी एकासनावर स्नान करतानाची मुकुंद-कमला यांची ईषत् प्रणयक्रीडाही सावरकरांच्या रतिशील कविवृत्तीची दर्शक आहे.

सावरकरांचे वैशिष्ट्य हे आहे की, अशा वर्णनप्रसंगी रतिरंगात अक्षरशः न्हाऊन निघणारा त्यांच्यामधील कवी कर्तव्याच्या क्षणी पराक्रमाच्या ध्रुवाकडे लीलया झेप घेतो. रतिरंगापासून अलिप्त होऊन ते 'वीर सावरकर' बनतात. 'कमला'मधील 'मुकुंद' म्हणजे जणू स्वतः सावरकरच आहेत. सावरकरांची आनंदवृत्तीच मुळी रतिरंगात रंगणाऱ्या, पण कर्तव्याच्या क्षणी त्यापासून अलिप्त होणाऱ्या पुरुषाची आहे.

'कमला' या खंडकाव्यातून सावरकरांच्या आनंदवृत्तीचा शोध घेता येतो. त्यांच्या आत्मप्रतीतीचे सुभग दर्शन या खंड-काव्यातून घडते.

विद्याधर सीताराम करंदीकर

**कमळण : गोखले, अरविंद. प्रकाशक : पॉप्यूलर बुक डेपो, मुंबई, १९५२.** श्री. अरविंद गोखले नव-कथाकारांतील एक प्रमुख मानकरी. त्यांचे जवळजवळ पंचवीस कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. उत्तम निवेदनात्मक शैली, घटना आणि पात्रे रंगविण्याची कला यामुळे कथाकार म्हणून मराठी कथाविश्वात श्री. गोखल्यांना मानाचे स्थान आहे. 'कमळण' या प्रस्तुत कथासंग्रहात एकूण बारा कथा आहेत. बालमनाचा शोध घेणारी एखादी कथा सोडल्यास उरलेल्या कथा कौटुंबिक, सामाजिक या स्वरूपाच्या आहेत. 'कमळण' कथेची नायिका कमळा आणि पती श्रीकांत या दोघांचा प्रेमविवाह आहे. 'संसारविश्वाची उभारणी एका क्षुद्र क्षणावर झाली आहे' असे तिला वाटते. या क्षणावर हिंदकळणारी कमळीच्या मनातील आंदोलने विचार यावर ही कथा आहे. 'अधर्म' कथेत मेधा ही प्रेयसी उत्तर आयुष्यात भेटल्यानंतर नायकाच्या मनातील वादळाचे चित्रण आहे. 'गिलावा' कथेचा नायक वासू, एक नवविवाहित परंतु असभ्य वस्तीत बिऱ्हाड असलेला. पण एका क्षणी सभ्य वस्तीतील प्रतिष्ठिताचे असभ्य वर्तन पाहून खिन्न झालेला. 'आजोबा' कथा हणमंत या बालकाचे मनांतील खळबळ व्यक्त करणारी कथा श्री. गोखले यांनी तन्मयतेने लिहिली आहे. 'कामचक्र' कथा या 'चक्रा'भोवतीच आहे. वैराग्य आणि विरक्तीचे विचार मनात येत असूनही नायक पुन्हा या चक्रातच कसा येत राहतो याचे वर्णन या कथेत आहे. आपल्या व्यंगावर उपचार करण्यासाठी चित्रपट पटकथा लिहून पैसे मिळविण्यासाठी धडपड करणारी बहिरी 'प्रतिभा प्रधान' हिची ही कथा अत्यंत तपशीलाने लिहिली आहे. 'पुरुषस्य दुःखम्' कथा बायकी हालचाली करणाऱ्या शामू आचाऱ्याचे जीवन रंगविते. 'हुबेहूब'

ही एक विलक्षण कथा आहे. नानीचा नवरा दादू आणि दरोडेखोर बळराम या दोघांच्या साम्यावर आधारित ही कथा आणि नानीच्या मनांतील खळबळ श्री. गोखले यांनी परिणामकारकरीत्या वर्णिली आहे. 'स्पंज' या कथेत मराठी रंगभूमीवर काम करणाऱ्या दरिद्री नटाचे जीवन, त्याचा संसार, त्याच्या शारीरिक व्याधी याचे वर्णन येते. विधवा कन्या तारा, पांगळा रमाकांत, पळून गेलेली पत्नी आणि ओढग्रस्त संसार सावरण्याचा प्रयत्न करणारी मुलगी याचे वर्णन अत्यंत परिणामकारक आहे. 'निर्माल्य' कथा मित्र-प्रेमावर आहे. परंतु, तितकीच धक्कादायक आहे. बालपणीचा मित्र कालांतराने नोकरी निमित्ताने दूर जातो. अचानकपणे पुन्हा भेटल्यावर जुने धागे पुन्हा नव्याने निर्माण होत नाहीत आणि या प्रसंगाचे वर्णन लेखक 'सुरुवातीच्या बहरांत फुललेली मैत्री त्याचे पुढे निर्माल्य होत जाते का ?' या वाक्याने करतो. 'पंडितराव' ही कथा दैन्यावस्थेत जीवन कंठणाऱ्या कारकुनावर आधारलेली आहे. कामातील चुकारपणा, आजारी पत्नी, ओढगस्तीचा संसार, शरीरसुख मिळविण्यासाठी आडमार्गाला जाणे या प्रसंगातून कथा चित्रित केली आहे. 'दिवा जळत नाही' ही दरिद्री किकीची कथा. जगण्यासाठी भाऊ भावड्याबरोबर केलेली केविलवाणी धडपड या कथेत वर्णिली आहे. एका समर्थ कथाकरांचा हा संग्रह असून 'कामचक्र'सारखी कथा त्या काळी लिहिण्याचे धाडसच श्री. गोखले यांनी दाखविले आहे असे वाटते.

**करीन ती पूर्व : वरेरकर, भार्गवराम विठ्ठल. प्रकाशक : ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई, आवृत्ती सहावी, १९५८.** श्री. वरेरकरांचे हे ऐतिहासिक नाटक आहे. मराठी रंगभूमीच्या सुरुवातीच्या कालखंडात बहुतेक सर्व नाटककारांनी नाट्यरचनेसाठी पौराणिक अथवा ऐतिहासिक आधार निवडून त्यावर नाटकाच्या संविधानाची रचना केली आहे. शिवकालावर बरीच नाटके लिहिली गेली त्यातही पन्हाळगडावरील बाजीप्रभू देशपांडे यांच्या पराक्रमामुळे या प्रसंगावर बऱ्याच नाटककारांनी नाटके रचिली आहेत. श्री. वरेरकरांचे हे नाटकही पावनखिंड आणि बाजीप्रभूचा पराक्रम यावरच आधारित आहे. 'सिद्दी जोहराच्या वेढ्यातून बाजीप्रभू देशपांडे यांनी पावनखिंडीत मुसलमानी सैन्याला, प्राणपणाने लढून थोपवून धरले आणि या कालांत श्रीशिवछत्रपतींना पन्हाळ्याहून निसटून विशाळगडी आश्रय घेता आला ' या कथानकावर आधारित हे नाटक आहे. लेखकाने ऐतिहासिक सत्य आणि तत्कालीन भाषा तशीच ठेवण्याचा प्रयत्न केला असल्याचे प्रस्तावनेमध्ये नमूद केले आहे. तरीही हिरोजी आणि गजरा ही दोन काल्पनिक पात्रे नाटककाराने आपल्या कल्पनेने निर्माण केली आहेत. चौथ्या अंकात परिशिष्टांक घातला असून महाराज व श्रीमंत महाराणीसाहेब जिजाबाई यांच्यात मावळे व बाजीप्रभूंचे शौर्य, हिरोजीचा पराक्रम, गजराचा पराक्रम यांच्या वर्णनाचा आहे.

**कळ्यांचे निःश्वास : शिरूरकर, विभावरी. प्रकाशक : ह. वि. मोटे, मुंबई, १९३३.** विभावरी शिरूरकर या टोपण नावाने पूर्वाश्रमीच्या बाळूताई खरे आणि विवाहानंतरच्या मालतीबाई बेडेकर यांनी कथा-कादंबऱ्या याचे लेखन केले. एका स्त्रीने त्या काळात केलेले लिखाण प्रक्षोभक ठरले. समाजामध्ये या घटनेने वादळे झाली. लेखिकेचा शोध घेण्याचा प्रयत्न झाला. 'विभावरीचे टीकाकार' या नावाचा संकलित टीकालेखांचा एक संग्रहही प्रसिद्ध झाला. 'कळ्यांचे निःश्वास' या संग्रहात एकूण अकरा कथा समाविष्ट आहेत. पहिली कथा 'कळ्यांचे निःश्वास' ही कथा नसून पुढील कथा का लिहिल्या या ' तरुण कळ्या ' का व कशासाठी निवडल्या यांचे निवेदन आहे. तत्कालीन समाजात स्त्रियांना नोकरी करण्याचे स्वातंत्र्य नव्हते पण ज्या करीत त्यांना त्यांच्या पगारातून कुटुंबाचे पोषण करावे लागे आणि मग या स्त्रियांना कुटुंबासाठी लग्न न करता राहावे लागे ही घटना 'त्याग' कथेत आहे. 'अंतःकरणाचे रत्नदीप' या कथेत या कथेची नायिका 'यमू' ही शिकलेली परंतु कुरूप पण ही ज्यावेळी विवाह करण्याचे ठरविते त्यावेळी भाऊ संबंध तोडण्याचे ठरवितो 'यमू' च्या मनात विचार येतो की, 'शेवटी ही सर्व नाती स्वार्थासाठी' आहेत. 'अविनाश' कथेत नायिकेला मृत्यूशय्येवर असलेल्या वडिलांना दिलेल्या वचनासाठी ज्याच्याबर पराकोटीचे प्रेम आहे त्या व्यक्तिला सोडून दुसऱ्याबरोबर विवाह करावा लागतो. संस्कारामुळे आणि परिस्थितीने तिला हा निर्णय घ्यावा लागतो. 'प्रेम हे विष की अमृत?' ही असफल प्रेमाची कथा आहे. 'तू आई का दावेदारीण' ही कथा भ्रष्ट आईच्या मुलीवर आहे. भ्रष्ट आईमुळे या मुलीचा विवाह मोडतो. शिक्षण नसल्याने बऱ्याच ठिकाणी नेऊनही विवाहासाठी नकार मिळणाऱ्या घटनेचे वर्णन 'ताई, हेच बरे सुखाचे संसार' या कथेत येते. 'रिकाम्या भांड्याचे निनाद' कथा अवास्तव आत्मविश्वास असलेल्या तरुणीचे जीवन रंगविते. तीन पुरुषांवर प्रेम करूनही तिला विवाहाविना राहावे लागते. 'बाबांचा संसार माझा कसा होणार?' ही या संग्रहातली महत्त्वाची कथा आणि त्या काळातही ही कथा फार गाजली होती. नोकरी करत असलेल्या प्रौढ कुमारिकेची ही कथा असून ओढग्रस्त वडिलांचा संसार चालवत असताना लग्न करावे की नाही ? या संभ्रमात असलेल्या नायिकेच्या उलट-सुलट विचारांची आंदोलने या कथेत आहेत. 'प्रेम की पशुवृत्ती' कथा भ्रष्ट वडिलांच्या मुलीची कथा आहे. वडिलांचे आईशी वर्तन कथा नायिकेने पाहिलेले असते परंतु सुरक्षिततेसाठी विवाह व्हावा पण यामध्ये पाशवी वृत्ती नसावी, असे विचार तिच्या मनात येतात आणि तिचा विचार जपणारा एक मित्रही तिच्या आयुष्यात येतो. 'प्रेमाची पारख' कथा सिंधू या कथानायिकेच्या जीवनात आलेल्या माधवराव या पुरुषाबद्दलच्या आकर्षणा-संबंधी असून प्रेम असूनही लग्न करावे की नाही ही संभ्रमावस्था वर्णिते. सर्वच कथांचे विषय स्त्री-पुरुष संबंध, प्रौढ कुमारिका, तरुण

स्त्रीच्या तारुण्यसुलभ भावना, प्रेम व विवाह या स्त्री जीवनातल्या महत्त्वाच्या विषयावर आहेत. प्रत्येक कथेत संयत चित्रण असूनही तत्कालीन समाजाने या कथांना अश्लील ठरविले होते.

**कागदी होड्या : बोरकर, बा. भ. प्रकाशक : श्रीशिवाजी मुद्रणालय, नवीन गोवे, १९३८.** महाराष्ट्रात कवी म्हणून ख्यातकीर्त असलेल्या बा. भ. बोरकर यांचा पहिला लघुनिबंध संग्रह. एकवीस लघुनिबंधांचा समावेश असलेल्या ह्या पुस्तकाला अनंत काणेकरांची प्रस्तावना आहे. प्रस्तावनेत काणेकरांनी कविवर्य बोरकरांच्या लघुनिबंधांतील गोड काव्यमयतेचा आणि तत्त्वचिंतनशीलतेचा गौरव केला आहे. मराठीतील प्रारंभीच्या लघुनिबंधात असलेली चलाख, चटपटीत आकर्षक सुभाषित-वजा वाक्ये लिहिण्याची त्यावेळच्या लघुनिबंधकारांची शैली बोरकरांनी अंगीकारली आहे. बोरकरांमधील काव्यात्मवृत्तीमुळे काही निबंधात एक वेगळे सौंदर्य आणि तरलता निर्माण झाली आहे. 'काळोख', 'कागदी होड्या', हे लघुनिबंध त्या दृष्टीने उल्लेखनीय आहेत. 'मरावं कसं', 'पुर्णतेची तहान' 'मखमली ठिगळे' या लघुनिबंधात विशुद्ध काव्यमयता, निर्मळ आणि उदात्त विचारांचे संगीत या विशेषांचा प्रत्यय येतो. १९३५ च्या सुमारास लघुनिबंधाचे स्वरूप ठरीव साच्याचे बनत चालले होते त्या पार्श्वभूमीवर बोरकरांच्या काही लघुनिबंधांचे स्वरूप ललित निबंधासारखे झाले आहे. 'कागदी होड्या' ह्या लघुनिबंध संग्रहाचे हे प्रमुख वैशिष्ट्य म्हणावे लागेल.

वि. शं. चौधुले

**कांचनगडची मोहना : खाडिलकर, कृष्णाजी प्रभाकर. प्रकाशक : नवाकाळ प्रकाशन, मुंबई, १८९८.** खाडिलकरांच्या नाट्यसंभारातील दुसरे नाटक. १६व्या शतकाच्या प्रारंभीच्या काळात हे कथानक घडले अशी कल्पना करून विजयनगरच्या पुनरुज्जीवनाचा प्रयत्न करणाऱ्या प्रतापरावाच्या चित्रणातून नाटककाराने स्वातंत्र्याचा पुरस्कार केला आहे. यातील वातावरण ऐतिहासिक असले तरी पात्रे व कथानक पूर्णपणे काल्पनिक आहे. नाट्यतंत्रावर शेक्सपियरचा प्रभाव दिसतो. ज्या प्रेम व शृंगाराच्या जोरावर खाडिलकरी नाटके गाजली ती हत्यारे त्यांना याच नाटकात लाभली. तसेच विनोद-निर्मितीसाठी योग्य पात्रांचे नमुने शोधण्याचा प्रयत्न खाडिलकरांनी याच नाटकात प्रथम केला, म्हणूनच या नाटकाचे महत्त्व.

वसंत नरहर कुबेर

**काचेचे कवच : जोशी, रा. भि. प्रकाशक : अभिनव प्रकाशन, मुंबई, १९४९.** प्रवासवर्णनकार म्हणून नंतर प्रसिद्धीस आलेल्या रा. भि. जोशी यांचा पहिला कथासंग्रह. या संग्रहातील काही कथांत स्त्री-पुरूषसंबंध, त्यांच्यातील शृंगार भावना, त्यांच्या स्वभावातील विरोध असे काही विशेष प्रकट झाले आहेत. 'उद्ध्वस्त स्मारके', 'नवी नवरी', 'किरमिगी ओठ' या कथांत मुग्ध शृंगार भावनेचे प्रकटकीकरण झाले आहे. 'काचेचे कवच', 'गोंपी', 'ओढ', 'उसळती लाट' ह्या कथांत स्त्री-पुरुष संबंधातील कारुण्य आणि दुःख प्रकट झाले आहे. लहान मुलांच्या भावविश्वाविषयी लेखकाला असलेले कुतूहल, त्यांच्या स्वभावातील काही मार्मिक छटा 'मगरीचे चित्र', 'क्रिकेट क्रिकेट' या कथांत दिसून येतात. 'सज्जावरून' या कथेचे रूप एखाद्या क्षणचित्रासारखे आहे. ही कथा नवकथेच्या वाटेने जाणारी कथा वाटते. कथांची भाषा सहजस्वाभाविक आहे. तिच्यात काही वेळा उर्दू शब्दांचा वापर लेखकाने केला आहे. भाषेतून व्यक्ती व प्रसंगाचे नेमके चित्र उभे करण्याचे लेखकाचे कौशल्य प्रस्तुत कथासंग्रहात दिसून येते.

वि. शं. चौधुले

**काजळी रात्र : शेंडे, ना. रा. प्रकाशक : रामकृष्ण सोनकुसरे, शेष प्रकाशन, भंडारा, (दु.आ.) १९७८, (प.आ.) १९५६.** नागपूरच्या 'सुषमा' मासिकात क्रमशः प्रसिद्ध झालेल्या 'काजळी रात्र' ह्या ना. य. शेंडे यांच्या कादंबरीची पहिली आवृत्ती 'सुरस' ग्रंथमालेने प्रसिद्ध केली. या कादंबरीला वि. स. खांडेकरांनी प्रस्तावना लिहिली असून कुसुमावती देशपांडे यांनी 'पुरस्कार' या शीर्षकाखाली अभिप्राय दिला आहे. १९४२ ते १९४७ या पाच वर्षांच्या काळात नागपूर-भंडारा परिसरात घडलेल्या घडामोडींची पार्श्वभूमी कादंबरीला लाभली आहे. 'कादंबरी संपूर्ण सामाजिक असून ग्रामीण जीवनाच्या कण्यावर उभारली आहे', असे लेखकाने 'अल्पसे आत्मकथन' या शीर्षकाच्या प्रस्तावनेत म्हटले आहे. 'काजळी रात्र' मध्ये पात्र-प्रसंगाची रेलचेल आहे. कादंबरीची भाषा प्रौढ आणि प्रवाही आहे. शेष महाराजांची प्रभावी व्यक्तिरेखा, अद्भूतरम्य वातावरणाची निर्मिती, ध्येयवादाची व्यक्तिपणाला मिळालेली जोड हे कादंबरीचे ठळक विशेष आहेत. ब्राह्मण, ब्राह्मणेतर व दलितांमधील भेद नष्ट होऊन सामाजिक जीवनात भावनात्मक एकता निर्माण व्हावी, हे लेखकाचे स्वप्न व त्या दृष्टीने केलेली कादंबरीतील कथानकाची मांडणी ह्या वैशिष्ट्यांमुळे 'काजळी रात्र' कादंबरी मनाची पकड घेते. मराठीत प्रादेशिक किंवा ग्रामीण साहित्याचे दालन निर्माण होण्यापूर्वी प्रादेशिक जीवनाचे चित्रण असलेली 'काजळी रात्र' ही महत्त्वाची कादंबरी आहे.

वि. शं. चौधुले

**कातरवेळ : रामाणी शंकर. प्रकाशक : सागर साहित्य प्रकाशन, मुंबई, १९५९.** 'कातरवेळ' हा शंकर रामाणी यांचा पहिला काव्यसंग्रह. प्रस्तुत संग्रहाला पु. शि. रेगे यांची प्रस्तावना आहे.

प्रेम आणि निसर्ग हे रामाणींच्या कवितांचे प्रमुख विषय आहेत याशिवाय आध्यात्मिक व चिंतनपर कवितांचा समावेश 'कातरवेळ' या संग्रहात आहे.

रामाणींच्या काही प्रेमविषयक कवितांना निसर्गाची पार्श्वभूमी आहे. निसर्ग, 'मध्यरात्रिच्या निवांत वेळी', 'दुपार', 'सांजवेळ', 'किनारा', 'सांज', 'स्वैर भटकावे' ह्या कविता म्हणजे रेखीव

निसर्गचित्रे आहेत. 'तुझ्याकडे', 'उमलें स्वप्न पहाटे', 'नातें गोड जडावें', 'पूजा', 'धुके', ह्या काही महत्त्वाच्या प्रेम कविता आहेत. संध्याकाळ, मध्यरात्र, दुपार, या दिवसाच्या विविध टप्प्यांतील निसर्गाच्या अवस्थांचे रेखीव चित्रदर्शी वर्णन कवितांत येते. 'उदास चंद्र', 'निस्तेज चंद्र', 'रात्रीची पापणी', 'खुळी अबोली', 'शेंदरी वाट', 'मनातला अंधार', 'वेदनेची डहाळी', 'उनाड वाऱ्याची शीळ', अशा समर्पक प्रतीक-प्रतिभांनी रामाणींची कविता समृद्ध झाली आहे. प्रेयसीची ओढ असलेल्या शृंगारोत्सुक, भावुक, चिंतनशील प्रेमिक 'कातरवेळ' या संग्रहात दिसून येतो. निसर्गाचे मानुषीकरण करण्यात कवीचे कौशल्य दिसून येते. रामाणींच्या कवितेचे यश त्यांची मर्यादाशीलता, शैलीतील प्रतिकात्मकता आणि अल्पक्षरात्वात सामावलेले आहे.

वि. शं. चौघुले

**कादंबरीची रचना : कुलकर्णी, श्री. मा. प्रकाशक : उन्मेश प्रकाशन, नागपूर (१९५६).** कादंबरीचे स्वरूप, सामग्री व व्याख्या, कादंबरीचे घटक, कादंबरीकाराचा दृष्टिकोन व शैली, कादंबरीचे काही प्रकार व कादंबरीचे मूल्यमापन या विषयांची विवेचक माहिती. ललितकलांची मूलभूत तत्त्वे, कलेसाठी कला, कला आणि नितीतत्त्व, जीवनाकरिता कला या वादांचा परिचय देऊन कादंबरीच्या 'काय' व 'कसे' (आशय आणि अभिव्यक्ती) या अंगांचे विवेचन या ग्रंथात लेखकाने केले आहे.

'कादंबरी' या वाङ्मय प्रकारचे स्वरुप व तंत्र या विषयाची माहिती इंग्रजीतील अनेक टीका ग्रंथांच्या आधाराने दिली असून त्या-त्या ग्रंथकाराची मते मूळातून उद्धृत केली आहेत. ग्रंथातील विवेचन साधार व मुद्देसूद असल्याने अभ्यासासाठी विद्यार्थी व जिज्ञासूंच्या दृष्टीने हा महत्त्वाचा ग्रंथ ठरतो.

चंद्रशेखर कपाळे

**काम आणि कामिनी : कंटक, प्रेमा. प्रकाशक : शं. ना. कुळकर्णी, कोल्हापूर, १९३७.** गांधीवादी लेखिका प्रेमा कंटक यांनी गांधीवादी विचारसरणीच्या प्रतिपादनासाठी लिहिलेली कादंबरी. महात्मा गांधींना अपेक्षित असलेल्या वैवाहिक किंवा नैष्ठिक ब्रह्मचर्याच्या तत्त्वाचा पुरस्कार लेखिकेने प्रस्तुत कादंबरीत केला आहे. अनेक पात्र-प्रसंगांची रेलचेल असलेल्या या कादंबरीचे कथानक मुकुंद आणि वृंदा या दोन प्रमुख पात्रांच्या भोवती गुंफले गेले आहे. वृंदाच्या तडफदार स्वभावाच्या विरोधी असलेला आदर्शवादी मुकुंद कर्तृत्वशून्य, भावनाशील, परावलंबी व काहीसा विकृतही आहे. दोघांचा संसार स्वभावातील विरोधामुळे यशस्वी होऊ शकत नाही. वृंदाने स्वाभिमानपूर्वक केलेल्या गृहत्यागाच्या आणि तिच्या कष्टमय जीवनाच्या निवेदनामुळे कादंबरी वाचनीय बनते. शांतरसप्रधान व उदात्त वातावरणाची निर्मिती, प्रगल्भ लेखनशैली आणि गांधीवादी विचारसरणीचा पुरस्कार ह्या गुणवैशिष्ट्यांमुळे प्रेमा कंटक यांची ' काम आणि कामिनी ' ही मराठीतील गांधीवादाच्या प्रभावाखालील कादंबऱ्यांतील एक उल्लेखनीय कादंबरी ठरते.

वि. शं. चौघुले

**कारागृहाच्या भिंती : गोरे, ना. ग. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९४५.** श्री. ना. ग. गोरे यांनी कारागृहाच्या एकांतवासात लिहिलेली ही दैनंदिनी आहे. फेब्रुवारी, १९४२ ते १९४३ या सुमारे वर्षभराच्या परकीय राजवटीच्या काळात गोरे हे गुलबर्गा येथील कारागृहात होते. तेथे वेळ जाण्यासाठी आणि विरंगुळा मिळण्यासाठी त्यांनी दैनंदिनी लिहिली. हीच पुढे पुस्तकरूपाने प्रसिद्ध. एका बहुश्रुत, राजकीय विचारवंताच्या आत्मकथेचे स्वरूप अभिजात रसिकता आणि कलाप्रेम, कौटुंबिक जिव्हाळा आणि वेधक, मोजकी शब्दचित्रे इत्यादींनी हे लेखन रोचक बनले आहे.

म. श्री. दीक्षित

**कालिकामूर्ती : दातार, गो. ना. प्रकाशक : दामोदर सावळाराम यंदे आणि मंडळी, मुंबई, (प.आ.) १९०९.** मराठीतील अद्‌भूतरम्य कादंबऱ्यांच्या परंपरेतील एक महत्त्वाची आणि लोकप्रिय 'कादंबरी' रेनॉल्डस्‌च्या कादंबऱ्यांची मराठीत रूपांतरे करून प्रचंड लोकप्रियता मिळवणाऱ्या गो. ना. दातार यांनी रेनॉल्डस्‌च्या ' ब्राँझ स्टॅच्यू ' या कादंबरीचे 'कालिकामूर्ती' या शीर्षकाखाली रूपांतर केले. मूळ लेखकाच्या साहित्यकृतीची प्रकृती लक्षात घेऊन तिला मराठी साज चढविण्याचे कादंबरीकाराचे कौशल्य या कादंबरीत दिसून येते. ' कालिकामूर्ती ' कादंबरीत शाक्त-अशाक्तांच्या संघर्षाचे चित्रण आहे. शाक्तांनी दिलेल्या नरबळींचा स्वीकार करणाऱ्या कालिकेच्या सभोवती घडणाऱ्या अद्‌भूतरम्य घटनांचे दर्शन विक्रांत, कालभैरव, चंद्रचूड, लीलावती, सौदामिनी, कालकन्या, अनसूया, वीरसिंह, थवानराव, मेघनाद इत्यादी पात्रांच्याद्वारे घडते. कादंबरीतील उत्कंठा, थरारकता, रहस्यमयता व नाट्यपूर्णता शेवटपर्यंत टिकवून ठेवण्याचे कादंबरीकाराचे कौशल्य लक्षणीय आहे. वाचकांची उत्कंठा वाढवत जाणारी प्रवाही शैली, अद्‌भूतरम्य घटना व योगायोगाचा उचित वापर यामुळे प्रस्तुत कादंबरीने मराठी वाचकांवर दीर्घकाळ मोहिनी घातली होती. मराठी कादंबरीत वास्तववादी कादंबरी मूळ धरीत असता कल्पिताच्या आधारे रंजनपर कादंबऱ्यांची परंपरा टिकवून धरणाऱ्या ' कालिकामूर्ती ' कादंबरीचे स्थान महत्त्वाचे आहे.

वि. शं. चौघुले

**कालिदास : मिराशी, वासुदेव विष्णू. प्रकाशक : सुविचार प्रकाशन मंडळ, नवभारत ग्रंथमाला, नागपूर, आवृत्ती १९३४.** संस्कृत भाषेचे व्यासंगी अध्यापक, साहित्यिक वा. वि. मिराशी यांचा प्राचीन व अर्वाचीन, देशी व परदेशीय

विद्वानांनी गौरविलेल्या संस्कृत कविकुलगुरू कालिदास यांच्या जीवनाचा आणि त्यांच्या विख्यात काव्यादि नाटकांचा अभ्यासपूर्ण परिचय करून देणारा संशोधनपूर्ण ग्रंथ.

या ग्रंथात 'कालनिर्णय', 'कालिदासकालीन स्थिती', 'कालिदासाची काव्यसंपदा', 'नाटके', 'कालिदास व उत्तरकालीन ग्रंथकार', अशी नऊ प्रकरणे असून ग्रंथाच्या शेवटी कालिदास स्तुतीपर संस्कृत सुभाषिते, अभ्यासासाठी आधारास घेतलेले, संस्कृत-मराठी संदर्भ ग्रंथ, लेख यांची सूची दिली आहे. संशोधनाची शिस्त पाळून लिहिलेला 'कालिदासा'वरील हा उपयुक्त ग्रंथ आहे. लेखकाने कालिदासविषय महत्त्वाच्या वादग्रस्त प्रश्नांचा ऊहापोह करताना उपलब्ध मतांचा खरे-खोटेपणा दाखवून त्यावर योग्य तो अभिप्राय नोंदवून स्वतंत्र परिक्षणही केलेले आढळते. कालिदासकालीन समाज, परिस्थिती, त्याची काव्ये, नाटके या संबंधीचे विवेचन करताना उदाहरण म्हणून घेतलेल्या संस्कृत मूळ श्लोकांची मराठीत जी भाषांतरे दिली आहेत ती अतिशय योग्य असून त्यामुळे विषय, मते समजण्याची अडचण दूर झाली आहे.

उपलब्ध कालिदास वाङ्मय, त्याविषयीचे भाष्यग्रंथ या पूर्वाभ्यासाच्या सामग्रीच्या साहाय्याने संशोधनपर नवा अभ्यास मांडणारा 'कालिदास' 'काल व काव्य' समजावून देणारा महत्त्वाचा ग्रंथ.

मोहन पाटील

**कालिदासाची नाटके : कंगले, र. पं. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९५७.** कालिदासाच्या मालविकाग्नि मित्र, विक्रमोर्वशीय व अभिज्ञान शाकुंतल या तीन नाट्यकृतींच्या रसग्रहणांचा संग्रह. ग्रंथाच्या प्रारंभी कालिदासाचा काळ आणि चरित्राचा विचार लेखकाने केला आहे. त्यानंतर भरताच्या नाट्यशास्त्राच्या आधारे संस्कृत नाटकांची चर्चा करून उपरोक्त तीन नाटकांचे संविधानक व पात्रांचा परिचय घडविला आहे. उपसंहारात नाटकाचा कालानुक्रम, संवाद व भाषा यांची चर्चा करून मूल्यमापनात्मक निष्कर्ष काढले आहेत. विद्यार्थ्यांना व संस्कृत नाट्यप्रेमी रसिकांना उपयुक्त ठरणारा ग्रंथ म्हणून महत्त्व.

चंद्रशेखर कपाले

**काव्य आणि काव्योदय : पटवर्धन, वासुदेव बळवंत. प्रकाशक : भा. रा. जोशी, पुणे, दुसरी आवृत्ती, १९२१.** अर्वाचीन मराठी कवितेतील अर्वाचीनत्वाचे समग्र तात्त्विक मंडन करणारा वासुदेव बळवंत पटवर्धन यांचा दीर्घ निबंध. प्रारंभी तत्त्वविचार आणि नंतर त्या तत्त्वविचाराच्या अनुषंगाने मराठी काव्य वाङ्मयाचे समीक्षण असे त्या निबंधाचे स्वरूप आहे. काव्य म्हणजे काय ? खरे काव्य कोणते ? आणि काव्याचा उदय कोणत्या परिस्थितीत होतो, तो उदय होण्याला कोणकोणती कारणे होतात, हे सांगणे हा या निबंधाचा मुख्य उद्देश होय.

वाङ्मयाचे विवेचन केवळ वाङ्मय दृष्टीनेच करणे, राष्ट्राभिमान, परंपरा अशा काव्यबाह्य गोष्टींनी नव्हे, ही त्यांची भूमिका आहे. काव्योदयासाठी, भौतिक आणि राजकीय परिस्थिती कशी कारणीभूत होते, ते सांगतांना त्यांनी प्रतिभावंताच्या 'थरारणाऱ्या मना'कडेही लक्ष वेधले आहे.

सु. रा. चुनेकर

**काव्यविभ्रम : जोग, रामचंद्र श्रीपाद. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, १९५१.** जोग यांनी प्रस्तुत ग्रंथात पद्य आणि अलंकार यांची काव्यविभ्रम या नावाखाली चर्चा केली आहे. 'अलंकार हे वस्तुतः शरीरबाह्य अशा दागिन्यांप्रमाणे नसून शरीरगत विभ्रमांप्रमाणे असतात.' ही भूमिका काव्य-शास्त्रातील अलंकाराचे स्थान आणि त्यामागील तात्त्विक उपपत्ती अनेक उदाहरणांद्वारे विशद केली आहे. पुढे छंद, वृत्ते, जाती, मुक्तछंद या प्रकारांचा व त्यातील उपप्रकारांचा आढावा घेतला आहे. अलंकार हे काव्याचे अस्थिर धर्म आहेत हे नोंदवूनच जोगांनी काव्याच्या नानाविध अलंकारांचा आढावा खोलवर जाऊन घेतला आहे.

अलंकारांची/विभ्रमांची निर्मिती कशी होते याचे नेमके आकलन या ग्रंथाद्वारे होते. मराठीतील हा एक प्रमुख समीक्षाग्रंथ होय.

**काव्याची भूषणे : धोंड, मधुकर वासुदेव. प्रकाशक : पारिजात प्रकाशन, मुंबई, १९४८.** श्री. म. वा. धोंड हे श्रेष्ठ समीक्षक. 'मऱ्हाटी लावणी' (१९५६), 'ज्ञानेश्वरी : स्वरूप, तत्त्वज्ञान आणि काव्य' (१९८०), 'जाळ्यातील चंद्र' (१९९४) व 'तरीही येतो वास फुलांना' हे समीक्षात्मक लेखन इत्यादी ग्रंथसंपदा.

'काव्याची भूषणे' हे अलंकारशास्त्र व अलंकार यांची सांगोपांग चर्चा करणारे मराठीतील पहिले पुस्तक. अलंकाराचे काव्यातील स्थान व कार्य सांगताना संस्कृत साहित्यशास्त्रात अलंकारासंबंधी झालेले गैरसमज दाखविले आहेत. नंतर काही उत्तम काव्यांची उदाहरणे देऊन अलंकार हे काव्याबरोबरच कसे स्फुरतात, काव्यातील रसाशी ते कसे एकरूप असतात हे स्पष्ट केले आहे. अलंकारांच्या उपपत्तीची मीमांसा करताना काव्याच्या मुख्य विषयास प्रस्तुत आणि त्या विषयाच्या दर्शनाने, चिंतनाने मनात उत्पन्न होणाऱ्या विविध कल्पनांना अप्रस्तुत अशा संज्ञा देऊन प्रस्तुत व अप्रस्तुत यांचे साम्य, विरोध, कार्यकारणभाव, स्थल, काल हे संबंध सांगितले आहेत.

अलंकारांची उपपत्ती स्वतंत्रपणे, सोदाहरण मांडून विवेचन करणारा अलंकारशास्त्रावरील उपयुक्त ग्रंथ.

**काव्यालोचन : केळकर, दत्तात्रेय केशव. प्रकाशक : मनोहर ग्रंथमाला, पुणे, १९३०.** श्री. द. के. केळकर हे ज्येष्ठ समीक्षक. सामाजिक वाङ्मयीन व शैक्षणिक इत्यादी क्षेत्रांमध्ये लेखन. 'नंदादीप' (१९४५), 'यशःश्री' (१९३४) हे काव्यसंग्रह, 'विचारतरंग' (१९५२), 'उद्याची संस्कृती' (१९५३), 'मराठी साहित्याचे सिंहावलोकन' (१९६०), 'वादळी वारे' (१९४०), 'संस्कृती संगम' (१९४१) इत्यादी साहित्य-संपदा.

प्रस्तुत ग्रंथात काव्यशास्त्राची परंपरा, काव्यस्वरूप, काव्याची सामाजिक जबाबदारी, रसचर्चा, कविप्रतिभा इत्यादी विषयांवर सांगोपांग चर्चा केली आहे. प्राचीन संस्कृत, मराठी तसेच पाश्चात्त्य काव्यशास्त्राची माहिती देऊन संस्कृत काव्य-शास्त्रातील कोणता भाग मराठीने स्वीकारावा याबद्दल दिशा दाखवली आहे. काव्य टिकाकारांचे भिन्न संप्रदाय सांगून काव्यशास्त्रकाराचे मुख्य काम नवनवीन काव्यनिर्मितीची छाननी करून रसिकांची अभिरूची सुसंस्कृत करणे असे सांगितले आहे. काव्यशास्त्र आणि तत्त्वज्ञान ही परस्परपूरक अशी ज्ञानसाधने असल्यामुळे त्यांच्यातील श्रेष्ठ-कनिष्ठपणाचा प्रश्न गैरलागू ठरविला आहे.

काव्याची उत्तम मांडणी आणि काव्यस्वरूपापासून काव्य-परिणामापर्यंत चर्चा करणारा समीक्षेतील एक महत्त्वाचा ग्रंथ.

**काव्हूर ऊर्फ इटलीचा रामदास : मुंडले, वासुदेव दामोदर. प्रकाशक : जनार्दन विनायक ओक, पुणे, १९१५.** तरुण पिढीमध्ये राष्ट्रीय गुणांचा परिपोष होण्यासाठी साह्यभूत ठरणारे चरित्र. १९व्या शतकात इटलीचा पुनरुद्धार होण्यासाठी काव्हूरने कसे प्रयत्न केले याचे वर्णन लेखकाने केले आहे. त्यासाठी चरित्रनायकाचा अलौकिक स्वार्थत्याग, उत्कट स्वदेश प्रेम, अंगीकृत कार्याबद्दलची तळमळ, राष्ट्रहितासाठी आवश्यक असणारा दीर्घयोगी व आत्मसंयमी स्वभाव या गुणांचे दर्शन घडविणे, हा लेखकाचा प्रस्तुत चरित्र लेखनामागील प्रमुख हेतू आहे. काव्हूर या चरित्र नायकाची समर्थ रामदासांशी तुलना केल्यामुळे लेखनाला वैशिष्ट्यपूर्णता आली आहे.

विजय देव

**काही म्हातारे व एक म्हातारी : घाटे, विठ्ठल दत्तात्रय. प्रकाशक : स्वस्तिक पब्लिशिंग हाऊस, मुंबई, १९३९.** श्री. वि. द. घाटे हे ललितलेखक व शिक्षणतज्ज्ञ म्हणून प्रसिद्ध. 'मधु-माधव' (१९२४) हा काव्यसंग्रह, 'यशवंतराव होळकर' (१९६४) हे नाटक, 'मनोगते' (१९६६) हा ललित निबंधसंग्रह, 'दिवस असे होते' (१९६१) हे आत्मचरित्र आणि 'नाना देशातील नाना लोक' (१९३३), 'पांढरे केस हिरवी मने' (१९५९) हे व्यक्तिचित्रांचे संग्रह इत्यादी त्यांची लेखनसंपदा.

घाटे यांच्या चौदा व्यक्तिचित्रांचा हा संग्रह आहे. यामध्ये चित्रण केलेल्या व्यक्ती वार्धक्याकडे झुकलेल्या आहेत. काहीजण तर मृत्यूच्या समीप पोहोचले आहेत. तरीही या सर्वांमध्ये एक समान सूत्र आहे ते म्हणजे ही माणसे जीवनावर निस्सीम विश्वास ठेवून कोणत्या तरी ध्येयाने भारलेली आहेत. परंतु आत्मगौरव त्यांना रुचत नाही. आपल्या कामापुढे मृत्यूचीही त्यांना दाद नाही.

मराठ्यांच्या इतिहासात रमणारे आबासाहेब जहागिरदार, ग्वाल्हेर दरबारचे पिढीजात गवई शंकरभैय्या बिनीवाले, सर्व क्षेत्रातील ज्ञान असणारे, अतिशय शिस्तबद्ध आयुष्य जगणारे श्रीमंत सयाजीराव महाराज, शिवाजी महाराजांना देव मानणारे, स्वतःला विसरून मराठ्यांच्या इतिहासात वाहून घेणारे इतिहास संशोधक याचबरोबर गोल्फ खेळ इंग्लंडमध्ये लोकप्रिय करणारे आर्थर बाल्फर अशा परदेशी माणसांचे व्यक्तिचित्रणही या संग्रहात आहे.

ही व्यक्तिचित्रे मनावर ठसा उमटवतात. मार्मिक, प्रासादिक व ठोस भाषा हे घाटे यांचे लेखनवैशिष्ट्य या संग्रहात प्रकर्षाने जाणवते.

**काळ पत्रातील निवडक निबंध - १ ते १० खंड : परांजपे, शिवराम महादेव. प्रकाशक : यशवंत गोपाळ जोशी, पुणे पुनर्मुद्रण, १९४६.** काळकर्ते शि. म. परांजपे प्रखर राष्ट्रीय बाण्याचे साहित्यिक, पत्रकार व प्रभावी वक्ते. संस्कृतची जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती मिळविणारे पहिले विद्यार्थी. 'संगीत कादंबरी' (१८९७), 'भीमराव' (१९०७) इत्यादी नाटके, 'गोविंदाची गोष्ट' (१९५०), 'विंध्याचल' (१९४९) या कादंबऱ्या 'अहल्याजार' (१९२४) हे काव्य, 'स्वराज्यातील निवडक निबंध' (१९२२) इत्यादी त्यांची लेखनसंपदा.

'काळ' पत्राने अखिल भारतात एका नव्या क्रांतीचे बीजारोपण केले. टिळक, आगरकरांनी सुरू केलेले कार्य पुढे नेले. वाचकांच्या मनाला आपल्या गुलामगिरीची सतत टोचणी लागेल आणि त्यातून मुक्त होण्याचे विचारचक्र त्यांच्या डोक्यात फिरू लागेल हे या मागचे धोरण. प्रस्तुत खंडांमध्ये स्थूलमानाने काही भाग पाडता येतात. पहिल्या भागात स्वित्झर्लंड, आयर्लंड, इटलीसारख्या पारतंत्र्यातील लोकांनी स्वातंत्र्यासाठी केलेले प्रयत्न, दुसऱ्या भागात चीन, तिबेट, हिंदुस्थान, दक्षिण आफ्रिका यांच्यावरील परकीय आक्रमणे, तिसऱ्या भागात शिवाजी महाराजांचे स्वराज्याचे प्रयत्न, चौथ्या भागात दुष्काळ, उपासमारी, पाचव्या भागात समाजाच्या दुःखांवर डागण्या देणारे पुढारी, संस्था इत्यादी 'गरिबांची उपासमार', 'संपत्तीचा दुरूपयोग' यांसारख्या लेखात एका बाजूला भुकेने तडफडणारे जीव व दुसऱ्या बाजूला मेजवाण्या झोडणारे श्रीमंत ही विषमता दाखविली आहे. राज्य कशाने मोडकळीस येते या संदर्भात चार लेख आहेत. या लेखांतून परांजपे यांनी इतिहासातील मोठमोठ्या प्रसंगांचे काव्यमय वर्णन करून सद्यःकालीन क्रांतिभावना चेतविली. 'आपण काय पेरावे?', 'गरिबांची उपासमार', 'दुष्काळाला कारण कोण?' इत्यादी लेखांतून अर्थविचार मांडला. आपल्या नाटकांच्या हस्तलिखिताची पत्रे अरण्यात बसून अग्निसमर्पण करणाऱ्या भास कविच्या आत्म्याला किती तीव्र यातना होत होत्या याचे वर्णन 'भासाची भवितव्यता' या स्फुट लेखात येते. 'दगडी कोळसा' या निरुपद्रवी विषयातही धग निर्माण करण्याचे सामर्थ्य आहे. 'अर्जुनाचा वेडेपणा' यातून उपरोध प्रकटतो. इंग्रज राज्यकर्त्यांचा लोकांच्या डोळ्यात धूळ फेकण्याचा प्रयत्न 'इंग्लिशांची परोपकारबुद्धी', 'एक चमत्कारिक खेडेगाव' इत्यादी लेखांतून दिसतो.

प्रस्तुत लेखन अग्रलेख, स्फुटे व संवाद अशा विविध माध्यमातून केले आहे. वक्तृत्त्वाचे अनेक विशेष या निबंधातून प्रकट होतात.

हे निबंध वाचताना शब्द विसरून आपण भावनांशी एकरूप होतो. या निबंधातून अभिजातवादाची स्फूर्तिदायी व संग्राह्य प्रेरणा व्यक्त होतात.

**किशोर मित्रांनो : गाडगीळ, अमरेन्द्र. प्रकाशक : व्होरा आणि कंपनी, मुंबई, १९६०.** कुमार वाचकांच्या मनात समर्थ जीवनमूल्ये व समाजहिताचा दृष्टीकोन रूजविण्याचा प्रयत्न करणाऱ्या राष्ट्रवादी भूमिका घेऊन लिहिलेल्या लेखांचा संग्रह. कुमार वाचकांना अनेकविध विषयांची माहिती व्हावी, तेजस्वी व्यक्तीकडे निकोपपणे पाहता यावे, समर्थ व्यक्तिमत्त्वाच्या निर्मितीसाठी आवश्यक ते गुण कुमारांमध्ये निर्माण व्हावेत अशी उद्दिष्टे नजरेसमोर ठेवून लिहिलेल्या लेखांचा उपयोग केवळ कुमारांनाच नव्हे तर पालकांनाही व्हावा एवढे हे प्रबोधनपर लेख महत्त्वाचे आहेत.

शरद दळवी

**कीचकवध : खाडिलकर, कृष्णाजी प्रभाकर. पहिली आवृत्ती, १९०७, प्रकाशक : चित्रशाळा प्रकाशन, पुणे, दहावी आवृत्ती १९७०, प्रकाशक : निळकंठ यशवंत खाडिलकर, नवाकाळ प्रिंटिंग प्रेस, पुणे.** खाडिलकर कृ. प्र. यांनी एकूण १५ नाटके लिहिली त्यांपैकी 'कीचकवध' हे पौराणिक गद्य नाटक.

खाडिलकरांनी रूढ पौराणिक नाटकांना आपल्या राष्ट्रहितैषी ध्येयवादाचे प्रभावी वाहन बनविले. यामुळे त्यांच्या पौराणिक नाटकांना तिहेरी सौंदर्य प्राप्त झाले. केवळ पौराणिक नाटके म्हणून वा व्यापक नैतिक आदर्शाचे प्रतिपादन करणारी नाटके म्हणून वा प्रचलित राजकीय प्रश्नाविषयी लोकमत जागृत करणारी नाटके म्हणून, अशा स्वरूपात त्यांना पाहता येईल. त्यांच्या 'कीचकवध' या पहिल्याच पौराणिक नाटकात हे तिन्ही प्रकारचे सौंदर्य एकवटलेले आहे.

कीचकवधाकरिता मूळच्या महाभारतातील कथानकात त्यांनी थोडासा फेरफार केला आहे. या नाटकाच्या प्रस्तावनेत 'द्रौपदी व कीचक ह्यांच्या प्रथम भेटीच्या संबंधाने व शेवटच्या कीचकवधाच्या प्रकारासंबंधाने व्यासकथेत महाभारतातील इतर प्रसंगांचे अनुकरण करून थोडाबहुत फेरफार केलेला आहे' असे ते म्हणतात.

तत्कालीन कर्झनशाहीत वावरलेल्या प्रेक्षकाला खाडिलकरांनी कर्झनशाहीवर केलेले हे कीचकवधाच्या कथानकाचे साग्ङ: रूपक पाहून निश्चितच आनंद झाला.

नाट्यनिर्मिती, तत्त्वप्रतिपादन आणि प्रचलित राजकीय प्रश्नाचे संसूचन या तिन्ही गोष्टींचा सुंदर आणि समर्पक समन्वय या नाटकात साधला आहे.

खाडिलकरांचे हे नाटक खूपच लोकप्रिय झाले. त्याचे कारण पौराणिक नाट्यविषयाला त्यांनी दिलेला तत्कालीन प्रभावी राजकीय आशय काही काळ या नाटकावर बंदी होती.

**कुणा एकाची भ्रमणगाथा : दांडेकर, गोपाल नीलकंठ. प्रकाशक : मौज प्रकाशन, मुंबई, १९५७.** श्री. गो. नी. दांडेकर हे एक महत्त्वाचे कादंबरीकार. 'पडघवली' (१९५५), 'मोगरा फुलला' (१९७५), 'मृण्मयी' (१९७०), 'शितू' (१९५३), इत्यादी त्यांच्या लोकप्रिय कादंबऱ्या जगन्नाथाचा रथ हे नाटक, 'दुर्गभ्रमणगाथा' (१९८३), 'महाराष्ट्र दर्शन' (१९६९) ही प्रवासवर्णने व स्थलवर्णने इत्यादी त्यांची लेखनसंपदा. 'साहित्यवाचस्पती' हा किताब.

प्रस्तुत पुस्तक म्हणजे नर्मदेच्या काठाने परिक्रमा करणाऱ्या कुणा एका माणसाचे अनुभव. हा माणूस वयाच्या तेराव्या वर्षी घरातून पळून जातो. अन्नासाठी, आसऱ्यासाठी नाना ठिकाणी हिंडतो. काही काळाने नर्मदेची परिक्रमा करतो. परिक्रमा करताना त्याला भेटलेल्या अनेक लोकांची आणि त्यांची स्वतःची ही कहाणी आहे. नर्मदातीरावरील एका देवळात उतरलेला असताना त्याचे पांडित्य पाहून एक गृहस्थ त्याला त्यांच्या पाठशाळेत घेऊन जातात. तेथे यशोदा नावाच्या विधवा मुलीशी त्याची ओळख होते. काही दिवसांच्या सहवासाने दोघांमध्ये प्रेम निर्माण होते. परंतु एक ब्रह्मचारी व विधवा समाजाचे बंधन ओलांडून एकत्र येऊ शकत नाहीत.

स्त्री-पुरुष नात्यामधील हळुवारपणा आणि प्रेम संबंधातील उत्कटता या दोन्ही वाचकांच्या मनावर ठसा उमटविणाऱ्या आहेत, विशेषांचे दर्शन या कादंबरीत घडते.

**कुंपणावरून : रानडे, श्रीधर बाळकृष्ण. प्रकाशक : केशव भिकाजी ढवळे, मुंबई, १९४७.** श्रीधर बाळकृष्ण रानडे यांनी लिहिलेले मराठी रंगभूमीवरील पहिले छायानाट्य. (निदान पुस्तकरूपाने उपलब्ध असे छायानाट्य या आधी नाही.) अंधारात ओल्या पांढऱ्या पडद्यावर छाया दाखवून हे नाट्य सादर केले गेले. अर्थात शब्द आणि अभिनय यांचे साह्य अपेक्षितच. हे छायानाट्य एकूण सहा प्रसंगांत विभागलेले आहे. कथानकाची पार्श्वभूमी सांगण्यासाठी किंवा मागील प्रसंगांना जोडण्यासाठी सूत्रधारांची योजना केलेली आहे. तो आवश्यक तितका भाग कथन करतो आणि त्यानंतर संबंधित पात्रे पडद्यामागे येऊन आपल्या छायेद्वारा आपली कथा सादर करतात. यामध्ये काजू (काजका), प्रदीप, डॉ. बिंदुमाधव, पाकोळी आणि मेत्रा ही पात्रे आहेत. ह्या पात्रांच्या साह्याने एक प्रेमकथा लेखकाने मांडलेली आहे. छायानाट्याच्या इतिहासातील हा पहिला आणि लक्षणीय प्रयत्न होय.

वि. भा. देशपांडे

**कुरुभंग : किरात. प्रकाशक : शंकर नरहर जोशी, पुणे १९२९.** 'कुरुभंग' हे किरात यांचे पाच अंकी पौराणिक नाटक, महाभारताच्या आदिपर्वाचा त्याचप्रमाणे मुक्तेश्वराच्या आदि-पर्वाचा उपयोग हे नाटक लिहिताना लेखकाने करून घेतला आहे. 'स्फूर्ती' मासिकातून क्रमशः हे नाटक प्रसिद्ध झाले.

पांडवांच्या दिग्विजयाने कौरवांना (धृतराष्ट्राला) त्यांचा मत्सर वाटू लागला. कुरू राज्याचा अर्धा हिस्सा (इंद्रप्रस्थ) धर्मराजाला द्यावा लागला. यावरून नाटकाचे शीर्षक 'कुरुभंग' सार्थ ठरते. भासाने महाभारताच्या आधारे लिहिलेल्या संस्कृत नाटकाचा हा मराठी अनुवाद आहे.

भा. व्यं. गिरधारी

**कुलवधू : रांगणेकर, मोतीराम गजानन. प्रकाशक : बॉम्बे बुक डेपो, १९४२.** १९४०-५० या काळात मराठी रंगभूमीला चैतन्य देण्याचे काम करणारे रांगणेकर हे नाटककार, दिग्दर्शक, नाट्यनिर्माते म्हणून प्रसिद्धी पावले. ते 'नाट्यनिकेतन' संस्थेचे मालक होते. 'भटाला दिली ओसरी', 'माहेर', 'तुझं माझं जमेना' इत्यादी तेरा नाटके, पाच एकांकिका व दोन कादंबऱ्या इत्यादी त्यांची लेखनसंपदा. त्यांचे नाट्यलेखन व्यावसायिक असून नाटकात स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनीच कराव्यात असा त्यांचा आग्रह होता. नेपथ्यातील वास्तवतेवर भर होता.

'कुलवधू' हे त्यांचे गाजलेले तीन अंकी संगीत नाटक. नाटकांची नायिका भानुमती सिनेमात काम करत असते. नवरा देवदत्त एका कंपनीत नोकरी करतो. पहिल्यापासून पत्नीला आपल्यापेक्षा जास्त पगार आहे ही गोष्ट देवदत्तला खटकत असते. भानुमती परक्या जातीची असल्याने देवदत्तच्या आई-वडिलांनाही ती पसंत नसते. परंतु जेव्हा तिच्या बोलण्यामुळे ते दोघे देवदत्तकडे जाऊन राहतात तेव्हा नाटक कंपनीत तिला मिळणारा आदर पाहून त्यांचे मतपरिवर्तन होते. भानुमतीचे त्यांच्याकडून नव्याने सुरू झालेले कौतुक देवदत्तला आवडत नाही. एक दिवस भानुमतीचा सत्कार होतो त्या ठिकाणी जाऊनही देवदत्तला कोणी ओळखत नाही त्यामुळे त्याचा अहंकार दुखावतो. त्यांचे भांडण होते व भानुमती घर सोडून देवदत्तच्या वडिलांकडे निघून जाते.

या नाटकामुळे पूर्वीच्या नाटकांची जुनी लांबी रुंदी जाऊन ते तीन तासांचे सुटसुटीत नाटक झाले. संगीताचे जलसे संपून हळूवार थरथरत्या भावगीताने त्यांची जागा घेतली. या नाटकातील नटमंडळी विशेषत: जोत्स्नाबाई भोळे आणि त्यांचे संगीत, चटकदार संवाद इत्यादी वैशिष्ट्यांमुळे हे नाटक लोकप्रिय झाले.

**कुसुमांजली : महाजनी, विष्णू मोरेश्वर. प्रकाशक : विविध ज्ञानविस्तार, १८८५.** विष्णू मोरेश्वर महाजनी यांनी केलेल्या एकेचाळीस इंग्रजी स्फुट कवितांच्या भाषांतराचा संग्रह कोलरिज, मिल्टन, टॉमस, मूर, जेम्स, माँटेगोरी, लॅब, स्कॉट, शेले, वर्डस्वर्थ, शेक्सपियर, ग्रे, टेनिसन या मूळ इंग्रजी कवींच्या कवितांची भाषांतरे करताना दिंडी, पद, लावणी, कटाव, साकी व श्लोक या रचनाप्रकारांचा उपयोग यशस्वी रितीने केला आहे. पंडिती वळणाच्या कवितेनंतर व केशवसुतांची कविता अस्तित्वात येण्याआधी भाषांतराच्या साह्याने इंग्रजी काव्याचा परिचय करून देणे हे उद्दिष्ट साध्य, त्रुटित, सुटसुटीत भावोत्कट इंग्रजी स्फुट कवितांच्या या भाषांतराचा पुढील कवींवर परिणाम झालेला दिसतो.

वि. शं. चौघुले

**कृष्णजन्म : शिवकल्याण, संपादक : गो. ब. मोडक, प्रकाशक : निर्णयसागर छापखाना, मुंबई, १९०४.** ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवावर नित्यानंदैक्य दीपिका या नावाची ओवीबद्ध विस्तृत टीका-रचना करणारे शिवकल्याण यांनी श्रीमद्‌भागवताच्या दशमस्कंधावर ९० अध्यायांची प्रदीर्घ टीका रचिली असून 'श्रीकृष्णजन्म'हे त्यातील ५ अध्यायांचे एक प्रकरण आहे. शिवकल्याणांच्या दशमस्कंधावरील समग्र टीकेपैकी 'श्रीकृष्णजन्म' (ओवीसंख्या ६३१०), रास-पंचाध्यायी आणि वेदस्तुती ही तीन प्रकरणेच आजवर प्रसिद्ध झाली आहेत. पहिल्या दोन प्रकरणांचे इ. स. १९०४ मध्ये प्रकाशन झाले असून गो. ब. मोडक हे त्याचे संपादक आहेत.

दशमस्कंधावरील या समग्रटीकाग्रंथाचा लेखनकाल इ. स. १६०३ ते १६२८ असून हा टीकाग्रंथ शिवकल्याणांनी पंढरपूर येथे लिहिला.

या टीकेत शिवकल्याणाने सर्व संसारीजनांस कृष्णावतार रहस्य उलगडून दाखविले आहे. कृष्णलीलांचे वर्णन करताना रसाळपणाबरोबरच भक्ती व अध्यात्माचे सूत्र त्यात गोवले आहे. यातील विविध रूपकांच्या योजनेवरून जसे त्यांच्या कल्पकतेचे आणि विद्वत्तेचेही दर्शन घडते. शिवकल्याणांच्या रचनेवर ज्ञानेश्वरांचा प्रभाव असल्याचेही जाणवते.

वि. पां. देऊळगावकर

**केकावली : मोरोपंत.** मोरोपंतांचा जन्म इ. स. १७२९ रोजी पन्हाळगडावर झाला. त्यांचे संपूर्ण नाव मोरेश्वर रामजी पराडकर, आयुष्यातील पहिली २३-२४ वर्षे त्यांनी पन्हाळ-गडावरच काढली. इ. स. १७५२ च्या सुमारास वडील रामजीपंत यांच्या सोबत ते सर्व मंडळीसह बारामतीस बाबजी नाईक यांच्या आश्रयास आले. त्यांच्या कवित्व गुणांची पारख करून बाबूजी नाईकांनी त्यांना ५०० रुपयांचे वर्षासन देऊन आपल्याजवळ कायमचे ठेवून घेतले.

मोरोपंतांच्या काव्याचा विस्तार प्रचंड असून संस्कृत काव्य सोडून केवळ मराठी कवितेची त्यांची पद्यसंख्या पाऊण लाखाच्या आसपास भरेल एवढी आहे. संस्कृत काव्यांचा अनुवाद त्यांनी पुष्कळ केलेला असला तरी स्वतंत्र स्फुट रचनाही त्यांच्या नावावर विपूल आढळतात. 'आर्याभारत', 'मंत्रभागवत', 'मंत्ररामायण', 'कृष्णाविजय', 'हरिवंश', इत्यादी प्रदीर्घ काव्ये तसेच 'भागवती प्रकरणे', ' पुराणकथांच्या आधाराने लिहिलेली प्रकरणे ', ' संतवर्णनपर ', ' देवतास्तुती ' आणि ' संस्कृत देवतास्तुतीपर स्तोत्रे ', अशी विपुल ग्रंथसंपदा मोरोपंतांनी निर्माण केली. ते स्वतःला मयूर कवी म्हणून घेत. मयुरेश्वर असाही उल्लेख करीत.

मोरोपंतांच्या भक्तीभावनेचा उत्कट आविष्कार म्हणून 'केकावली'ची प्रशंसा केली जाते. या सुरस स्फुट रचनेमध्ये त्यांनी आपला उद्धार व्हावा म्हणून परमेश्वराची परोपरीने विनवणी केली आहे. 'केकावली' मध्ये १२२ केका असून १२१ व्या केकामध्ये—

'दयामृतघना ! अहो ! हरि ! वळा मयुराकडे रडे शिशु
तयासि घे कळवळे नि माताकडे'

अशी तळमळीची प्रार्थना ते करतात तर १२२वी केका उपसंहाराची असून श्रीरामाला ती अर्पणपत्रिका आहे.

प्रासादिक, प्रसंगी संस्कृत प्रचूर पण उत्कट भावाविष्कारी रचना, पाठांतर सुलभता, या गुणांमुळे हे स्वतंत्र स्फुट काव्य लक्षवेधी ठरले आहे.

मोहन पाटील

**केशवसुत (अर्थात) कृष्णाजी केशव दामले यांचा कवितासंग्रह व चरित्र : प्रकाशक : चित्रशाळा प्रेस, पुणे, १९२१.** केशवसुत हे आधुनिक मराठी कवितेचे जनक. आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही घटकांच्या माध्यमातून त्यांनी रूढ मराठी कवितेला सर्वस्वी नवे रूप दिले 'तुतारी', 'स्फूर्ती', 'नवा शिपाई', 'झपूर्झा' या त्यांच्या प्रसिद्ध कविता.

प्रस्तुत ग्रंथात केशवसुतांचे संपूर्ण चरित्र व त्यांच्या एकशे बत्तीस कविता समाविष्ट आहेत. केशवसुत वयाच्या १४/१५ व्या वर्षांपासून श्लोक व आर्या रचत. त्यांचे तरुणपण अत्यंत कष्टप्रद व अस्थिर होते. त्यांना आर्थिक स्थैर्यही नव्हते. त्यांच्या आयुष्यातील ही निराशा त्यांच्या कवितांतून प्रकटते. कवी ना. वा. टिळक यांच्या सहवासात केशवसुतांच्या कवित्व शक्तीला प्रेरणा मिळाली. त्यांच्या 'हरपले श्रेय', 'सतारीचे बोल,' 'गोफण' 'नैऋत्येकडील वारा', 'घराकडील गोष्टी', 'म्हातारी' इत्यादी कविता अंत:करणाला चटका लावणाऱ्या आहेत. 'तुतारी' या कवितेत सुधारणावादाचा जोरदार पुरस्कार आहे. ब्रम्हानंदाचा अनुभव शब्दांमध्ये सांगण्याचा प्रयत्न 'झपूर्झा' या कवितेत आढळतो. 'एक खेडे', 'गोष्टी घराकडील त्या' इत्यादी कित्येक कविता आत्मचरित्रात्मक आहेत. 'आम्ही कोण' म्हणूनि काय पुसीसी ? आम्ही असो लाडके देवाचे.... असे परखड उत्तर ते कवींवर टीका-करणाऱ्यांस देतात. 'मृत आशांच्या चितांवरूनिया पिशाच्च माझे भटकत राहे। शांति नसचि तया' आणि 'लवाजम्याचे झुलती हत्ती लक्ष त्याकडे देतो कोण ? खिशामध्ये हे घड्याळ बोले आला क्षण! गेला क्षण!' अशा कवितांमधून जीवनाची क्षणभंगुरता व्यक्त होते.

आजवर पौराणिक कथा-आख्यानांत रंगून जाणाऱ्या मराठी कवितेला सर्वसामान्य माणसांच्या जगात आणणारी स्त्री-पुरुष संबंधांतून निर्माण होणारी उत्कट प्रीतिभावना आणि तिचा व्यक्तिविशिष्ट आविष्कार करणारी केशवसुतांची कविता मराठी काव्यप्रवासातला एक महत्त्वाचा टप्पा आहे.

**केशवसुत काव्यदर्शन : जोग, रामचंद्र श्रीपाद. प्रकाशक : के. भि. ढवळे, मुंबई, १९४७.** केशवसुतांच्या कवितांचा चौदा प्रकरणांत परिचय करून देणारे पुस्तक केशवसुतांचा संप्रदाय, त्यांचे क्रांतिकारकत्व, त्यांची जीवनविषयक दृष्टी, गूढगुंजनपर व प्रेमविषयक कविता, केशवसुतांची निसर्ग कविता, त्यांची सुनीतरचना, त्यांनी काव्यशैलीत केलेले प्रयोग आणि काव्यरचनेवरील आक्षेप या सर्वांचा परामर्श लेखकाने प्रस्तुत पुस्तकात घेतला आहे. ओज आणि जिव्हाळा असलेली केशवसुतांची कविता समकालीन कवितेत श्रेष्ठ असल्याचा निर्वाळा लेखकाने दिला आहे. ग. त्र्यं. माडखोलकर, श्री. नि. वर्तक, डॉ. भा. त्र्यं. पटवर्धन या चिकित्सक टीकाकारांच्या विधानांचा परामर्श घेऊन केलेले विवेचन हे या पुस्तकाचे लक्षणीय वैशिष्ट्य आहे.

सुधा कापरे

**कोकणी गऽऽ वस्ती : कर्णिक, मधू मंगेश. प्रकाशक : मनोहर ग्रंथमाला पुणे, १९५८.** कथाकार आणि कादंबरीकार म्हणून लौकिक प्राप्त केलेल्या मधू मंगेश कर्णिक यांचा पहिलाच संग्रह. मालवण-कणकवली परिसरात राहणाऱ्या देवदासी, महार, चांभार, शेतकरी व इतर श्रमजीवींचे चित्रण कोकणाची प्रादेशिक पार्श्वभूमी असलेल्या ह्या प्रारंभीच्या कथासंग्रहात कोकणी माणूस आणि अठरा विश्वे दारिद्र्याने व्यापलेले जीवन यांचे दर्शन कर्णिकांच्या कथांतून होते.

**कोकणीचे व्याकरण : फादर स्टिफन्स.** फादर स्टिफन्सने 'क्रिस्तपुराण' हे मराठी भाषेत रचिले असून त्याव्यतिरिक्त स्थानिक गोमंतकी बोलीत 'दौत्रिन क्रिस्ता'सारख्याही त्यांच्या काही रचना आढळतात. त्याचेच 'आर्ति द लिंग्व कानारी' (किनाऱ्यावरील बोलीचे व्याकरण या शीर्षकाच्या पोर्तुगीज भाषेतील व्याकरणाच्या १६४० व १८५८ अशा दोन आवृत्या निघाल्या आहेत.) भारतातील आधुनिक भाषांपैकी सर्वप्रथम मुद्रित झालेले मराठीच्या एका बोलीचे हे प्राचीनतम व्याकरण फादर स्टिफन्सचे 'कोकणीचे व्याकरण' या नावाने अलीकडे निर्देशिले जाते. स्टिफन्सच्या मूळ व्याकरणात पाद्री दियोगु रिबैरु व जेजुइत पर्याय आणखी चार पाद्रींनी भर घातल्याची माहिती मिळते. एतद्देशीयांच्या मदतीने स्वप्रांतीय ख्रिस्ती मिशनऱ्यांना स्थानिक भाषाज्ञान प्राप्त करून घेण्याच्या उद्दिष्टाने अशा प्रकारची अनेक व्याकरणे त्या काळी तयार झाली होती. कोकणीची मुळाक्षरे, शुद्धलेखन, आघात, नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, वाक्यरचना इत्यादी व्याकरणातील विविध घटकांचा परामर्श घेताना आधीचे लॅटिनचे ज्ञान असलेल्यांना स्थानिक गोमंतक बोली आत्मसात करून घेता यावी, एवढे मर्यादित उद्दिष्ट समोर ठेवूनच स्टिफन्सने हा खटाटोप केल्याचे स्पष्ट दिसते.

वि. बा. प्रभुदेसाई

**कोलंबसाचा वृत्तांत : कोल्हटकर, महादेव गोविंद. प्रकाशक : परशुरामपंत तात्या गोडबोले, गणपत कृष्णाजी छापखाना, मुंबई, तिसरी आवृत्ती, १८५७.** रॉबर्टसन याने लिहिलेल्या अमेरिकेच्या इतिहासाच्या दुसऱ्या पुस्तकावरून, महादेव गोविंदशास्त्री कोल्हटकर यांनी हे चरित्र १८४९ मध्ये मराठीत लिहिले. त्याची तिसरी आवृत्ती परशुरामपंत तात्या गोडबोले यांनी शोधून १८५७ मध्ये प्रसिद्ध केली. कोलंबसाचा जन्म, बालपण, त्याची नौकानयनाची आवड, त्याने तरुणपणी केलेल्या सफरी, या सफरींमधील संकटे, त्याप्रसंगी त्याने दाखविलेले

धैर्य, त्याच्या दर्यावर्दी जीवनातील आशानिराशा, निरनिराळ्या राष्ट्रांतील लोकांमध्ये असलेले भौगोलिक अज्ञान, नवीन प्रदेश शोधण्याची कोलंबसाची जिज्ञासा आणि त्याच्या देशबांधवांकडून आणि सहकाऱ्यांकडून आलेले अडथळे, कोलंबसाचे समयोचित वागणे, त्याच्या स्वभावातील चातुर्यादी गुणांची वर्णने आणि अमेरिका खंडाचा शोध लावण्यास त्याने मिळविलेल्या यशाचा वेधक इतिहास या पुस्तकात आहे. पुस्तकाची भाषा इंग्रजी वळणाची वाटते. विशेषतः पहिल्या व तिसऱ्या आवृत्तीतील भाषिक फरक लक्षात घेण्यासारखे आहेत.

भीमराव कुलकर्णी

**क्रांती : सानेगुरुजी (साने, पांडुरंग सदाशिव). प्रकाशक : इंद्रायणी साहित्य, पुणे, १९४०.** सानेगुरुजी हे कवी, कादंबरीकार, गांधीवादी विचारवंत आणि भावनाप्रधान लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत. सर्वांभूती प्रेमभाव, माणसाच्या मूलभूत चांगुलपणावरील विश्वास आणि ईश्वरावरची श्रद्धा ही त्यांच्या लेखनाची प्रमुख वैशिष्ट्ये होत. 'श्यामची आई' (१९३५) ही त्यांची अत्यंत प्रसिद्ध कादंबरी. 'कला म्हणजे काय', 'दिल्ली डायरी' असे चौदा अनुवादित ग्रंथ, 'भारतीय संस्कृती' (१९३७) हा लेख-संग्रह इत्यादी चे लेखन.

'क्रांती' ही स्वातंत्र्याच्या आंदोलनाचे चित्रण करणारी कादंबरी. शेतकरी, कामगार व विद्यार्थी जागृत झाल्याशिवाय क्रांती होणार नाही. त्यासाठी त्यांना शिक्षण देणे, त्यांची संघटना बनविणे महत्त्वाचे आहे, हा विचार यात मांडला आहे. मुकुंदराव, रामदास, शांता, मोहन इत्यादी पात्रांद्वारे ध्येयाने भारलेल्या तरूण मनांचे हृद्य चित्रण केले आहे. शेवटी या तरुणांनी पेरलेले क्रांतीचे बीज सर्व जगाला व्यापून उरेल अशी आशा व्यक्त केली आहे.

**क्रिस्तपुराण : फादर स्टिफन्स. संपादक : शांताराम बंडेलू, प्रकाशक : प्रसाद प्रकाशन, पुणे, १९५६.** फादर स्टिफन्स (इ. स. १५४९ ते १६१९) या जेजुइत (ख्रिस्ती) पंथीय इंग्रज धर्मप्रसारकाने इ. स. १६१४ साली रचिलेले मराठीतील महाकाव्य 'क्रिस्तपुराण' या नावाने प्रसिद्ध असले तरी त्याने पोर्तुगीज भाषेमध्ये दिलेले शीर्षक असे आहे : 'दिष्कुर्स सोब्रि अ व्हिन्द द जेजू क्रिश्तु नॉस्यु साल्वादोर द अुन्दु' (आमचा जगतारक जेजू क्रिस्त याचे जीवनचरित्र). संपूर्ण ग्रंथाची ओवी संख्या १०९६२ असून त्याचे 'पैले पुराण' व 'दुसरे पुराण' असे दोन विभाग आहेत. या ग्रंथाची एकंदर पंच्याण्णव 'अवस्वरू'मध्ये म्हणजे अध्यायांत विभागणी झाली आहे. गोव्याला इ. स. १६१६, १६४९ व १६५४ साली त्याच्या पाठोपाठ निघालेल्या तीन आवृत्त्यांवरून ग्रंथाच्या लोकप्रियतेची ग्वाही मिळते. त्यानंतर जे. एच. सालढाणा यांनी मंगळूरला १९०७ साली प्रसिद्ध केलेली चौथी आवृत्तीही रोमन लिपीतच होती. १९५६ साली पुण्याला प्रसिद्ध झालेली नवी आवृत्ती मात्र देवनागरी लिपीत आहे. लिपी रोमन पण भाषा मराठी अशा या महापुराणाची रचना करणाऱ्या फादर स्टिफन्सने पूर्वसुरींच्या मराठी कथापुराणांचा अभ्यास करून प्रसंगी त्यांचे अनुकरण केल्याचे पुरावेही आढळतात. त्यातील योगवासिष्ठ, विष्णूदासनाम्याचे महाभारत, ज्ञानदेव विरचित द्रोणपर्व तसेच नामदेव, एकनाथ यांच्या ग्रंथांतील साम्यस्थळे काढून दाखविता येतात. 'जैसी हरळांमाजि रत्नकिळाः कि रत्नामाजि हिरानिळाः तैसी भासांमाजि चोखाळ भासा मराठीः जैसी पुस्पांमाजि पुस्प मोगरी कि परिमळांमाजि कस्तुरिः तैसी भासांमाजि साजिरी मराठीयाः पखिड्यामध्ये मयोरूः वृखिआमध्ये कल्पतरूः भासांमध्ये मानु थोरूः मराठियेसिः हा स्टिफन्सने गायिलेला मराठीचा महिमा अन्तःकरणाला मोहवून टाकणारा असला तरी ते पूर्वसुरींचेच अनुकरण होय. धर्मांतर केलेल्या नवख्रिस्त्यांना जुन्या हिंदू धर्मातील अभिजात ग्रांथिक मराठीतील रसाळ कथापुराणे वाचण्या-ऐकण्याची बंदी करण्यात आल्यामुळे त्यांची गरज भागवण्यासाठी या प्रतिपुराणांची निर्मिती झाली. साक्षरांप्रमाणेच निरक्षरांनाही विनासायास या पुराणाचा आस्वाद घेता यावा, म्हणून कवीने ह्यात स्थानिक गोमंतकी बोलीतील शब्दविशेषांची व वाक्प्रचारांची जाणीवपूर्वक पेरणी केल्यामुळे हे ख्रिस्तपुराण हिंदू समाजातही खूपच लोकप्रिय झाले होते.

वि. बा. प्रभुदेसाई

**क्रौंचवध : खांडेकर, विष्णू सखाराम. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी पब्लिशर्स प्रा. लि., १९४२.** श्री. खांडेकर हे प्रख्यात मराठी कथा-कादंबरीकार, लघुनिबंधकार व समीक्षक होत. पंधरा कादंबऱ्या, एकतीस लघुकथासंग्रह, दहा लघुनिबंध-संग्रह, सहा रूपककथासंग्रह, एक नाटक, चरित्रात्मक, समीक्षात्मक ग्रंथ व संकीर्ण लेखसंग्रह इत्यादी त्यांची साहित्यसंपदा. 'ययाती' या कादंबरीला (१९७४-७५) साली ज्ञानपीठ पुरस्कार. 'हृदयाची हाक', 'अमृतवेल' या गाजलेल्या कादंबऱ्या. १९६८ साली 'पद्मभूषण'. जीवनाविषयी नवी श्रद्धा रुजविण्याचे काम त्यांच्या साहित्याने केले.

प्रस्तुत कादंबरीत खांडेकरांनी पुराणकाळात महर्षी वाल्मिकींनी एका भिल्लाला क्रौंचवधाबद्दल दिलेल्या शापाची घटना पार्श्वभूमी म्हणून घेतली आहे. दादासाहेब हे संस्कृतचे प्राध्यापक दिनकर देसाई नावाचा तरुण परिस्थितीमुळे त्यांच्या-कडे काही दिवस राहायला येतो. त्यांची मुलगी सुलोचना त्यांच्या प्रेमात पडते. रामगडचे राजेसाहेब, जनतेवरील त्यांचा अन्याय, अज्ञानात पिचणारे गोर-गरीब पाहून दिनकर अस्वस्थ असतो. तो राजेसाहेबांविरूद्ध लढण्याचे ठरवितो. या क्रांतीकार्यामुळे सुलूशी लग्न करणे अशक्य वाटून तो तिला सोडून जातो. राजेसाहेबांचे डॉक्टर भगवंतराव शहाणे यांच्याशी सुलूचे लग्न होते. सुलू मनाने त्यांची होऊ शकत नाही. दिनकरशी पुन्हा भेट झाल्यावर ती त्याच्या कार्यात सामील होते. भगवंतरावांना हे आवडत नाही. शेवटी आपल्याला फाशी होणार असल्याचे कळल्यावर दिनकर दादासाहेबांना शेवटचे पत्र लिहितो. ते वाचून दादासाहेबांचा गैरसमज दूर होतो. भगवंतरावही दिनकरला तुरूंगातून सोडवून आणतात.

पुराणकाळातील क्रौंचवधाचा जागोजाग येणारा संदर्भ, प्रभावी व्यक्तीचित्रणे यामुळे शब्द, अश्रु आणि कृती या तीन मार्गांपैकी कृतीचा मार्ग श्रेष्ठ असल्याचा ठसा मनावर उमटतो.

**खडक आणि पाणी : गाडगीळ, गंगाधर. प्रकाशक : उत्कर्ष प्रकाशन, पुणे, १९६०.** श्री. गंगाधर गाडगीळ हे १९४५ पासून सुरू झालेल्या नवकथेचे अध्वर्यू. कथा, कादंबरी, प्रवासवृत्त, समीक्षा, नाटक, बालसाहित्य, अर्थशास्त्र इत्यादी क्षेत्रात लेखन. 'कडू आणि गोड' (१९४८), 'तलावातील चांदणे' (१९५४) हे कथासंग्रह, 'खरं सांगायचे म्हणजे' (१९५४), 'बंडू' (१९६१) हे विनोदी लेखन तर 'साहित्याचे मानदंड' हे समीक्षालेखन इत्यादी लेखनसंपदा.

'सत्यकथा', 'नवभारत', 'मनोहर' इत्यादी मासिकांतून वेळोवेळी प्रसिद्ध झालेल्या लेखांचा हा एकत्रित संग्रह. नवसाहित्याच्या स्वरूपाचे दर्शन घडविणे व समर्थन करणे हा यामागील हेतू. ग्रंथाचे तीन भाग आहेत. तत्त्वचर्चा या पहिल्या भागात साहित्याच्या एकूण स्वरूपाविषयी चर्चा केली आहे. रस चर्चेपेक्षा साहित्यिकाच्या व्यक्तिमत्त्वाला महत्त्वाचे स्थान दिले आहे. भाषेची वैशिष्ट्ये व साहित्यावरील परिणाम सांगितला आहे. नवसाहित्यदर्शन आणि समर्थन या दुसऱ्या भागात नवकथेचे अंतरंग व बाह्यस्वरूप स्पष्ट करून नवकथेवरील आक्षेप दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. रसग्रहण या तिसऱ्या भागात मर्ढेकर, व्यंकटेश माडगूळकर, इंदिरा संत, श्री. ना. पेंडसे इत्यादी साहित्यिकांच्या कलाकृतींचा आढावा घेतला आहे.

साहित्याचा सामाजिक परिणाम, त्यातील विश्वात्मकता, नवसाहित्याचे स्वरूप सोदाहरण स्पष्ट करून साहित्याचा विविधांगी विचार करणारा समीक्षा ग्रंथ.

**खडाष्टक : जोशी, शंकर परशुराम. प्रकाशक : शं. प. जोशी, १९२७.** श्री. शं. प. जोशी हे नाटककार, कवी व कादंबरीकार होते. 'मायेचा पूत' (१९११), 'तो आणि ती' (१९३९) ही नाटके, 'शिवाजीचा कोण?' ही ऐतिहासिक कादंबरी. 'विधवांचे गाऱ्हाणे' (१९०९) हे पद्यलेखन इत्यादी त्यांची लेखनसंपदा.

'खडाष्टक' रंगभूमीवर यशस्वी आणि लोकप्रिय ठरलेले तीन अंकी विनोदी नाटक आहे. काही कारण नसताना शाब्दिक भांडणांची प्रवृत्ती असलेल्या चिकटे व कटकटे या कुटुंबातील व्यक्तींची मोठी मजेदार व्यक्तिचित्रे नाटकात आहेत. स्वतःच्या कुटुंबासाठीही पैसे खर्च करण्यास नकार देणारे बारोपंत, घरच्या भांडणाला कंटाळून मित्राकडे राहायला जाणारे रागोपंत, सुनेशी सतत भांडणारे कर्कशराव, कवीश्वर व गौरी इत्यादी पात्रे मानवी स्वभावाचे उत्कृष्ट नमुने म्हणता येतील.

या प्रहसनवजा नाटकात स्वभावनिष्ठ, प्रसंगनिष्ठ व शब्दनिष्ठ अशा तिन्ही प्रकारच्या विनोद बहारीचा साधलेला आहे.

**खरा ब्राह्मण : ठाकरे, केशव सिताराम (प्रबोधनकार). प्रकाशक : के. सी. ठाकरे, स्थल निर्देश नाही, (प.आ.), १९३३.** 'रेडिओ स्टार्स' या संस्थेने १९३३ साली रंगभूमीवर आणलेले 'खरा ब्राह्मण ' हे संगीत नाटक 'प्रबोधनकार' के. सी. ठाकरे यांनी लिहिले आहे. धार्मिक आणि सामाजिक गुलामगिरीचा नायनाट करण्यासाठी 'प्रबोधन' हे नियतकालिक चालविणाऱ्या ठाकरे यांनी अस्पृश्यता विध्वंसनाच्या प्रश्नावर नाटक लिहिण्यामागील आपली भूमिका पुढील शब्दांत स्पष्ट केली आहे - "अस्पृश्यतेच्या विध्वंस हा हिंदू समाजाच्या माणुसकीच्या जाणिवेचा प्रश्न आहे. ही माणुसकीची तिडीक जसजशी वृद्धिंगत होईल तसतसा हा गुंतांळ्याचा प्रश्न आपोआप सुटणारा आहे. हेच या नाटकाच्या द्वारे दाखविण्याचा प्रामाणिक प्रयत्न मी केला आहे. ...प्रस्तुत नाटिकेतली निरनिराळी पात्रे रंगविण्यासाठी मी १६व्या शतकातली रंगपेटीच वापरली आहे. कलम मात्र २०व्या शतकातले पण मनुष्यस्वभाव हा 'सनातन'च असल्यामुळे स्वभाव वैचिष्याचे 'कलर टचेस' देताना सहजपणे भिरकावलेले जोडे कोणाच्या पायाला 'फिट' बसले तर त्यांनी ते मोफत वापरावे. माझी हरकत नाही. मात्र 'गोट' जरा नीट तपासून पहावा !" खरा 'ब्राह्मण' नाटकाचे कथानक तीन अंकांत उभारले आहे. पहिल्या अंकात रामजन्मोत्सवाच्या प्रसंगाचे चित्रण आहे. हार घालायला आलेल्या विठू महाराला भंपकराव व चव्हाटे हे कर्मठ, सनातनी ब्राह्मण हार घालू देत नाहीत. विठूच्या मुलाच्या सुस्वरूप पत्नीकडे लंपटपणे पाहतात. कुटिलपणे दाजिबा ह्या मराठ्याला फितवून विठू महाराला मारहाण करण्यासाठी चिथावणी देतात. इतक्यात एकनाथ ह्या सुधारणावादी ब्राह्मणाची पत्नी गिरजा येते. विठूचा हार रामाला घालायचा निश्चय करते. पण सनातनी ब्राह्मणांनी अडवणूक केल्यामुळे विठू आपला हार एकनाथांना घालतो. दुसऱ्या अंकात देवदासी समस्येवर नाटककाराने लक्ष केंद्रित केले आहे. हिरकणी या गायिकेच्या माडीवर गाणे ऐकलेल्या श्रोत्यांमधील केरबा बाहेर जातो आणि वाटेत भेटलेल्या सीतेबरोबर विठूच्या सुनेबरोबर गैरवर्तन करतो. हिरकणी व गावबा सीतेची सोडवणूक करतात. हिरकणी आपले दु:ख सीतेला सांगते. हिंदू धर्माने आपल्या समाजाला कशा यातना भोगायला लावल्या आहेत, याचे करुणार्थ वर्णन हिरकणी सीतेजवळ करते. तिसऱ्या अंकातील घटना अधिक नाट्यपूर्ण आहेत. अस्पृश्यता निवारणाचे काम करणाऱ्या आणि जातिभेद न मानता अस्पृश्यांना-महारांना जवळ करणाऱ्या ब्राह्मण सरदार एकनाथांना शिक्षा सुनावण्यासाठी काशीक्षेत्राहून स्वामींना पाचारण केले जाते. ते न्यायनिवाडा करून प्रगतिशील एकनाथांना शिक्षा करण्याचा आपला आधीचा निर्णय बदलतात. कारण त्याचवेळी गावातील महारवाड्याला लागलेली आग विझविण्यासाठी धावपळ सुरू होते. विठू महाराची सून सीता एका बाळंतिणीला आणि तिच्या बाळाला

वाचविताना खूप भाजते. स्वामींसमोरच ती मरण पावते. कुटील, धर्मांध ब्राह्मणांचा दुष्ट हेतू, त्यांची निंद्य कर्मे आणि त्यांनी चालविलेला अनाचार याचा प्रत्यय स्वामींना येतो. शिवाय ब्राह्मण्य झुगारून देऊन अस्पृश्यतानिर्मूलनासाठी झटणाऱ्या एकनाथांच्या कार्याचे आणि विठू महारामधील सत्प्रवृत्तीचे महत्त्व स्वामींना मनोमन पटते. स्वामी स्वतःच ब्राह्मज्ञानाचा आणि ब्राह्मण्याच्या अहंकाराच धिक्कार करतात आणि विठूला मिठी मारून म्हणतात, "तुझी ही स्वार्थत्यागी, सत्त्वशील नि गंभीर वृत्ती पाहून 'तूच खरा ब्राह्मण- तूच खरा ब्राह्मण ' म्हणून तुला हृदयाशी कवटाळण्यातच आमची माणुसकी सिद्ध होणार आहे". प्रबोधनकार ठाकरे यांनी अस्पृश्यतेच्या प्रश्नावर लिहिलेल्या ह्या नाटकात सुष्ट-सन्मार्गी व दुष्ट-दुरवर्तनी पात्रे यांच्यातील विरोध उभा केला आहे. एकनाथ, गिरजा ही संत एकनाथांच्या जीवनाशी निगडित नावे कायम ठेवली आहेत. प्रसंगानुरूप पदे व गीतांची योजना केली आहे. हास्यनिर्मितीसाठी बाह्यात्कारी विनोदी पण अंतर्यामी गंभीर अशा गावबा या पात्राची निर्मिती केली आहे. "प्रस्तुत नाटिका अस्पृश्यतेचा प्रश्न कितपत सोडवील हे सांगणे अवघड आहे. वस्तुस्थितीचे स्पष्ट चित्र दाखवून या विषयाच्या विवंचनेची खरी तिडीक सहृदय वाचक प्रेक्षकात उत्पन्न झाली, तरी माझ्या श्रमाचे सार्थक झाले, असे मी मानीन" अशी अपेक्षा प्रबोधनकार के. सी. ठाकरे यांनी प्रस्तावनेत व्यक्त केली आहे. 'खरा ब्राह्मण' नाटकामुळे ती अपेक्षा नक्कीच पूर्ण होते.

**वि. शं. चौघुले**

**खिस्ताचे यातनागीत : मानुएल ज्याकिस द नोरोत्र्ज, प्रकाशक : मुंबई विद्यापीठ जर्नल, मुंबई, १९४०.** इसवीच्या १६व्या शतकातील, गोमंतकातील, "मानुएल ज्याकिस द नोरोत्र्ज" (पाद्री) याने ख्रिस्तवधाच्या सुप्रसिद्ध घटनेवर आधारलेले हे काव्य लिहिले आहे. मूळ लेखन रोमन लिपीत आहे. साहजिकच मराठी लेखनासाठी रोमन लिपी तोकडी पडलेली आहे व त्यामुळे या काव्याची भाषा अत्यंत अशुद्ध आहे. महाराष्ट्रात अन्यत्र अपरिचित असलेले गोमंतकीय बोलीतील बरेच शब्द यात आढळतात. तसेच काही पोर्तुगीज शब्दांचा बापरही कवीने केलेला आढळतो. फादर स्टिफन्सने मराठीत लिहिलेल्या (रोमन लिपी) ख्रिस्तपुराणाने या रचनेवर बराच प्रभाव टाकला असल्याचे जाणवते. भारतात ख्रिस्ती धर्मप्रचाराच्या हेतूने व ख्रिस्तचरित्र वर्णन करण्याच्या निमित्ताने झालेली ही रचना होय. या काव्याची १६८ कडवी आहेत. मुंबई विद्यापीठाच्या जर्नलमध्ये श्री. अ. का. प्रियोळकर यांनी १९४० मध्ये हे काव्य प्रसिद्ध केले होते.

**अरविंद कुरुंदकर**

**खोगीर भरती : देशपांडे, पु. ल. प्रकाशक : अनाथ विद्यार्थीगृह, पुणे, १९५०.** मराठी जीवनातील विविध वृत्ती-प्रवृत्तींचे चित्रण असणाऱ्या सतरा उपहासगर्भ विनोदी लेखांचा संग्रह, वेगवेगळे विनोदी विषय, व्यक्तीपेक्षा मानवी प्रवृत्तींचा केलेला उपहास, उपरोधपूर्ण खेळकर भाषाशैली या गुण वैशिष्ट्यांमुळे हा संग्रह मराठी विनोदी वाङ्मयात संस्मरणीय भर घालतो.

**शरद दळवी**

**गडकऱ्यांचे अंतरंग : वाळिंबे, रामचंद्र शंकर. प्रकाशक : चित्रशाळा प्रकाशन, पुणे, १९५१.** डॉ. रा. शं. वाळिंबे हे साहित्यशास्त्र विवेचक, समीक्षक. 'खरे काव्य' 'वाङ्मयीन टीका': 'शास्त्र व पद्धती' (१९४६)', 'साहित्यातील संप्रदाय' (१९५०), 'ज्ञानेश्वरीतील विदग्ध रसवृत्ती' (१९५३), 'मुक्तात्म्यापासून प्रमद्वरेपर्यंत' (१९४७), इत्यादी त्यांची लेखनसंपदा.

'वाग्वैजयंती' काव्यसंग्रहात समाविष्ट झालेल्या कवितां-मधील आशयस्पष्ट करून, त्यांचे मर्म उकलणे व त्यायोगे गडकऱ्यांच्या व्यक्तित्त्वातील वैशिष्ट्ये नमूद करणे हा प्रस्तुत ग्रंथाचा हेतू. गडकऱ्यांची विचारसरणी घडविण्यास कारणीभूत असणाऱ्या वैयक्तिक आयुष्यातील काही घटना सांगून आपल्या विवेचनाच्या पुष्ट्यर्थ त्यांच्या नाटकांतील काही भाग नमूद केला आहे. गडकऱ्यांच्या साहित्यात व्यक्त होणारी अनिर्वचनीय हुरहुर, स्त्री-पुरुषांमधील प्रणयभावनेच्या विविध छटा, प्रणयनैराश्याच्या दारुण व्यथांचे उत्कट चित्रण हे त्यांचे वेगळेपण सांगितले आहे. गतकाळातील स्वप्नात तल्लीन होणारे मन चित्रित करणारी 'तीन तरी' भावनावंश मनाच्या वेड्या आशेचे चित्रण करणारी 'वेडा' भयाण एकांताची आसक्ती दर्शविणारी 'घुबडास' प्रेम आणि मरण इत्यादी कवितांची उदाहरणे दिली आहेत. दिव्यप्रेमाची गडकऱ्यांना असणारी ओढ, 'फुटकी तपेली', 'त्याच तारकेस याचना' यांतून दिसते. गडकरी आपल्यातील उत्कटतेचा आविष्कार मरणाच्या विचारांबाबतीतही करतात. म्हणूनच भावनांची आत्यंतिक उत्कटता हा गडकऱ्यांचा असाधारण विशेष म्हणून विशद केला आहे. गडकऱ्यांच्या कविता व नाटकांच्या निर्मिती प्रक्रियेवर प्रकाश टाकणारा हा ग्रंथ आहे.

**गतगोष्टी अर्थात माझी जीवनयात्रा : केळकर, नरसिंह चिंतामण. प्रकाशक : य. न. केळकर, पुणे, १९३९.** न. चिं. केळकरांचे आत्मचरित्र प्रथम काही कौटुंबिक माहिती, लहानपणीच्या आठवणी आल्या आहेत. त्यानंतरच्या कॉलेज व विद्यापीठ या प्रकरणात प्रो. रघुनाथराव आपटे, हरिभाऊ गोडबोले, मेजर केन्डी वगैरेंच्या आठवणी आहेत.

'गतगोष्टी'मध्ये ज्यांचा प्रत्यक्ष घटनांचा संबंध आला त्यांचे निवेदन आहे. परंतु त्यांच्या जीवनाशी ज्यांचा संबंध आला नाही अशाही अनेक राजकीय घडामोडींचा विस्तृत तपशील आहे. या अर्थाने ते तत्कालीन 'गतगोष्टी'मध्ये तत्कालीन समाज जीवनाचे दर्शन घडते.

**सुधा कापरे**

**गंधरेखा : रेगे, पुरुषोत्तम शिवराम. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९५३.** पु. शि. रेगे कवी, कादंबरीकार,

नाटककार व समीक्षक म्हणून प्रसिद्ध. 'फुलोरा' (१९३७), 'हिमसेक' (१९४३), 'पुष्कळा' (१९६०) इत्यादी काव्यसंग्रह, रंगपांचालिक आणि दोन नाटके (१९५८) ही नाट्यसंपदा, 'सावित्री' (१९६२), 'रेणू' (१९७३) या कादंबऱ्या इत्यादी लेखनसंपदा.

प्रस्तुत संग्रहात 'फुलोऱ्यांतील पाच हिमसेक' मधील नऊ, 'दोल्यांतील एक' आणि १९३८ नंतर प्रसिद्ध झालेल्या पण असंग्रहित अशा मिळून एकूण पन्नास कविता संग्रहित केल्या आहेत. मानवी जीवनातील सृजनशक्ती आपल्या असंख्य अनुभवांसहित रेग्यांच्या कवितेत प्रकट होते. या अनुभवांच्या मुळाशी पुरुषमनाला लागलेली स्त्रीची सनातन, आदिम ओढ रुजलेली असून स्त्रीच्या केंद्रिय रूपविभ्रमांपासून ते स्त्रीमनातील अबोध, अगोचर भावरूपापर्यंत सर्व रूपांतून सृजनाचा शोध ते आपल्या कवितांतून घेतात. मानवाचे सर्जनशील मन, त्याचे जगणे, कलेशी असणारे त्याचे नाते इत्यादी गोष्टींनाही रेग्यांच्या चिंतनशील कवितेत—

'झाड माझे लाल ज्याला
आग्रहाची लाख पाने ;
आणि माझी बंडखोरी
घोषतो मी गात गाणे.' असे स्थान मिळते.

रेग्यांची कविता सामाजिक जाणीव सहसा व्यक्त करीत नाही. 'मिलन', 'अभिसार', 'तू हवीस यात न पाप', 'गाथा' अशा कितीतरी कवितांमधून शारीर प्रेमाचे, आकर्षणाचे वर्णन करत करत त्यापलीकडे पोहोचणारे, शब्दांपलीकडचे सांगू पाहणारे कविमन या संग्रहात भेटत राहते.

**गारंबीचा बापू : पेंडसे, श्रीपाद नारायण. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९५२.** 'एलगार' (१९४९), 'ऑक्टोपस' (१९७२), 'लव्हाळी', 'हद्दपार' 'तुंबाडचे खोत' इत्यादी गाजलेल्या कादंबऱ्यांचे लेखक श्री. ना. पेंडसे 'रॉकफेलर' शिष्यवृत्ती मिळवणारे भारतातील पहिले लेखक होत. हर्णे, आंजर्ले बंदरपट्टीतील भूप्रदेश आपल्या कादंबऱ्यांतून जिवंतपणे चित्रित करून त्यांनी मराठी कादंबरीला एक प्रादेशिक चेहरा दिला.

अतिशय लोकप्रिय आणि बहुचर्चित कादंबरी म्हणून 'गारंबीचा बापू' या कादंबरीचा उल्लेख केला जातो. एका डोंगराच्या पाखेवर वसलेल्या गारंबी गावात कादंबरीचे कथानक घडते. येथील सुपारीच्या बागा, अतिशय कष्ट करणारे व सोने साठविणारे लोक, ब्राह्मण व गुरव यांची पाटाच्या पाण्यावरून होणारी भांडणे हे कोकणातील वातावरण यात रंगविलेले आहे. कादंबरीचा नायक बापू लहानपणापासून हुशार व धीट असतो. त्याला सांभाळणारे वडील विठोबा, भूतवाडीची मावशी, मित्र दिनकर आणि राधा ही बापूच्या प्रेमाची माणसे. सरपंच अण्णा खोत यांच्याशी असणारा बापूचा झगडा, गावभर भटकणारी आई यशोदा, रावजीची बायको राधा हिच्याशी असणारे बापूचे प्रेमसंबंध, सुपारीच्या धंद्यात बापूची झालेली भरभराट आणि राधेशी लग्न केल्यावर लोकांनी घेतलेला आक्षेप, बापूची सरपंचकी अशा अनेक घटनांमधून हे कथानक आकार घेते. आयुष्यभर बापूशी भांडणारी आई यशोदा शेवटी त्याच्याकडेच परत येते.

बापूच्या स्थितिशील जीवनात गतीशीलता निर्माण करताना पेंडसे यांनी राधेच्या व्यक्तिचित्रणातून स्त्री-पुरुष संबंधांवर प्रकाश टाकला आहे. बापूची कहाणी का गारंबीची कहाणी असा प्रश्न उपस्थित व्हावा अशी घाटदार कादंबरी.

**गावगाडा : आत्रे, त्रिंबक नारायण. प्रकाशक : वि. ना. अत्रे, आर्यभूषण मुद्रणालय, पुणे, १९१५.** ग्रामीण समाजशास्त्र आणि ग्रामीण प्रश्नांची शेतीच्या संदर्भात या ग्रंथात चर्चा करण्यात आली आहे. लेखक महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागातून वावरला असल्याने आणि दुष्काळी अधिकारी म्हणून काही काळ काम केल्याने त्याला या विषयाची अव्वल दर्जाची माहिती प्राप्त झालेली दिसते. ग्रामीण समाजरचनेतील मूलभूत घटकांची चर्चा करून त्यांनी हे पुस्तक लिहिले आहे. ग्रामव्यवस्था, ग्रामजीवन व ग्रामकारभार या सर्वांचा विचार या ग्रंथात आहे. ग्रामीण जीवनाचे मुख्य घटक दोन - एक शेतकरी व दुसरा त्याच्यावर अवलंबून असलेला अन्य समाज या अन्य समाजांच्या व्यावसायिक गरजांतून अस्तित्वात आलेली बलुते-आलुते, दुकानदार व फिरस्ते यांचे सूक्ष्म चित्रण लेखकांनी केले आहे. इंग्रजांच्या राजवटीत या व्यवस्थेमध्ये झालेले परिवर्तन त्यांनी नोंदवले आहे. हे परिवर्तन त्यांना प्राचीन ग्रामरचनेच्या तुलनेने विकृतीकडे झुकलेले दिसते. त्यामुळे लेखकाने या रचनेतील दोषांचे दिग्दर्शन करण्यावर व त्यावर उपाय सुचविण्यावर भर दिलेला दिसतो. शेतकऱ्यांबद्दलच्या कळकळीतून त्यांनी हे लेखन केल्याचे जाणवते. शेतीप्रधान समाजरचनेस प्राधान्य व तद्नुषंगिक व्यवस्थेला दुय्यम स्थान असले पाहिजे, हे लेखकाचे म्हणणे रास्त आहे. मराठी माणसाचे दुबळे अर्थकारण आणि वैश्यवृत्तीचा अभाव यांमुळे महाराष्ट्राची झालेली पिछेहाट त्यांनी सर्वांगाने विशद केली आहे. लेखकाजवळ इतिहासप्रेम भरपूर आहे, आपल्या समाजाच्या स्वत्वाची लेखकाला जाणीव आहे. परंतु त्याचबरोबर नव्या समाजरचनेच्या संदर्भात आपल्या ग्रामीण जीवनाचे बुद्धिवादी, वस्तुनिष्ठ रूप सिद्ध झाले पाहिजे, यावर त्यांच्या विवेचनाचा भर आहे. जातिरचना व वतनपद्धती या दोन विशेषंती गावगाडा विस्कळीत कसा झाला याचे ग्रंथातील विवेचन मूलग्रामी स्वरूपाचे आहे. पाश्चात्यांच्या अभ्यासपद्धतीचा उपयोग करून स्वानुभवाने लिहिलेला एक समाजशास्त्रविषयक उत्कृष्ट ग्रंथ, असे त्याचे वर्णन करता येते.

**भीमराव कुलकर्णी**

**गीतद्विदल : देशपांडे, कमलाबाई आणि केळकर, य. न. प्रकाशक : य. न. केळकर, पुणे, १९२५.** श्रीमती कमलाबाई देशपांडे व श्री. यशवंत नरसिंह केळकर यांच्या विविध विषयांवरील कवितांचा एकत्रित संग्रह. कमलाबाईंच्या कवितांत निसर्गाचे वर्णन आहे ; आणि स्त्रीस्वभावाला अनुसरून भावाविष्कार झाला आहे. य. न. केळकरांची कविता अधिक प्रतिभापूरित, सुश्लिष्ट व संस्कृतप्रचुर भाषेत लिहिलेली आहे. निसर्गाशी साधलेली जवळीक आणि भाषेचा अनुभवाला चढविलेला सुबक साज ही त्यांची कवितेची आणखी दोन ठळक वैशिष्ट्ये आहेत.

**वि. म. कुलकर्णी**

**गीतरामायण : माडगूळकर, ग. दि. प्रकाशक : नभोवाणी मंत्रालय, नवी दिल्ली, १९५७.** आठवड्याला एक याप्रमाणे आकाशवाणीसाठी गुंफिलेली आणि सुधीर फडके यांनी गायिलेली ही छपन्न गीतांची रामायण कथा आहे. रामायणातील निवडक असे उत्कट प्रसंग, अनुरूप व्यक्तींच्या मुखातून वदल्यामुळे भावोत्कर्ष साधला गेला आहे. सजीव व्यक्तीरेखाटने आणि रचनेतील नाट्यपूर्णता हे गीतरामायणाचे विशेष आहेत. मोहक कल्पना, सार्वकालिक सत्यांचा सुभाषितरूप निर्देश, रामायणातील अन्य रचनांतील संदर्भ सूचित करण्याची लकब, विविध योग जातिरचनांचा अवलंब, प्रसंगानुरूप गतिमान, चित्रदर्शी, प्रासादिक शैली या गुणांमुळे गीतरामायणाला कलात्मक उंची प्राप्त झाली आहे. गीतरामायणाच्या उदंड लोकप्रियतेमुळे त्याची अनेक अनुकरणे पुढील काळात झाली पण ती अनुकरणाच्याच पातळीवर राहिली. यात गीतरामायणाचे अनन्यसाधारणत्व साठलेले आहे.

**कृ. ब. निकुम्ब**

**गीता प्रवचने : विनोबा (भावे विनायक नरहर). प्रकाशक : परमधाम प्रकाशन, ग्रामसेवा मंडळ, वर्धा, १९४५.** विनोबा प्रभावी निबंधकार, तत्त्वदर्शी, 'सर्वोदय समाजाचे संस्थापक' व गांधीवाद मांडणारे आधुनिक संत होत. 'स्वराज्यशास्त्र' (१९४२), 'ईशावास्यवृत्ती' (१९४७), 'साहित्यिकांशी हितगुज' (१९५७), 'साम्यसूत्रे' (१९५८), इत्यादी त्यांची लेखनसंपदा.

१९३२ साली धुळ्याच्या जेलमध्ये अनेक संत, महंत आणि सेवकांसमोर सांगितलेली विनोबांची ही प्रवचने सानेगुरुजींनी ती टिपून घेतली आहेत. जीवनाशी संबंध नसलेले कोणतेही वैचारिक वाद या प्रवचनांमध्ये नाहीत. रोजच्या उपयोगाच्या गोष्टींची चर्चा यामध्ये आहे. खेड्यातील किंवा शहरातील सामान्य श्रमिकांनाही यातून श्रमपरिहार लाभेल अशी याची रचना आहे. प्रस्तुत संग्रहात एकूण अठरा प्रकरणे आहेत. पहिल्या प्रकरणात अर्जुनाच्या विषादाची कारणमीमांसा करून गीतेचे प्रयोजन सांगितले आहे. गीतेचा जन्म स्वधर्माच्या आड येणाऱ्या मोहाचे निवारण करण्यासाठी झाला आहे असे सांगून पुढच्या प्रकरणांमध्ये कर्मयोग विशद केला आहे. साधनेतील सातत्य, देहापासून आत्मा अलग करण्याची आवश्यकता, त्यासाठी करावयाचे प्रयत्न, रजो व तमो गुणांचा त्याग, आत्मज्ञान आणि त्यासाठी आवश्यक असणारी भक्ती इत्यादी जीवनाचे संपूर्ण शास्त्र विशद केले आहे. शेवटी साधनेची सहजावस्था म्हणजेच साधकाच्या साधनेची पराकाष्ठा होय असे प्रतिपादन केले आहे.

गीता भाष्यपर ग्रंथांपैकी विनोबांच्या गीता प्रवचनांचा हा संग्रह अतिशय प्रासादिक आहे.

**वसुंधरा बनहट्टी**

**गीताई : भावे, विनोबा. प्रकाशक : भाऊ पानसे, स्थलनिर्देश नाही, १९५५.** श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितलेल्या भगवद्‌गीतेचे शब्दशः श्लोकबद्ध मराठी भाषांतर. शब्दांच्या अर्थात बदल होऊ न देता अत्यंत सोप्या भाषेत भगवद्‌गीतेचे भाषांतर विनोबांनी कुशलतेने केले आहे. म्हणून संस्कृत गीतेचे जसेच्या तसे भाषांतर असूनही 'गीताई' रोचक ठरली आहे.

**वसुंधरा बनहट्टी**

**गीर्वाणलघुकोश (संस्कृत-मराठी), संपादक : ओक, जनार्दन विनायक. प्रकाशक : द्वारकाबाई ओक तथा सरस्वतीबाई आपटे, ३, ई-रोड, जमशेदपूर, बिहार, सुधारून वाढवलेली तिसरी आवृत्ती, १९६०.** अमरकोश, वाचस्पती, शब्दकल्पद्रुम असे संस्कृत कोश, शब्द-रत्नाकर, संस्कृत-मराठी कोश. तसेच वामनराव आपटे, मानिअर विल्यमस्, कै. वैद्य इत्यादींचे संस्कृत-इंग्रजी कोश, अशा कोशवाङ्मयाचे व अनेक संस्कृत ग्रंथांचे अवलोकन करून तयार केलेला मोठ्या आकारातील सुमारे ६५० पृष्ठांचा संस्कृत-मराठी शब्दकोश.

कोशकर्त्याने, नाम, धातू, विशेषण असे तीन भाग यामध्ये उपयोजले आहेत. तसेच अखेरीस ' न्याय ', ' अलंकार ', ' वृत्त ', ' ज्योतिषविषयक योगकरणाची यादी ', या सदराखाली ती ती परिशिष्टे दिली आहेत. संस्कृतमधील तत्त्वपर ग्रंथ, उपनिशदे, महाकाव्ये, संस्कृत नाटके इत्यादी ग्रंथ वाचनासाठी या कोशाचा उपयोग व्हावा हा हेतू असून संस्कृत शब्दांचे मराठी अर्थ देताना, पर्यायी अर्थही पुष्कळ दिले आहेत. शब्दांचा अर्थ तर आहेच शिवाय तो शब्द कोणत्या संस्कृत ग्रंथातील आहे याचे संक्षिप्त निर्देशही पुढे दिलेले आहेत. उदाहरणार्थ — 'आधिवास ' हा संस्कृत शब्द घेतला तर त्याचा एक अर्थ राहण्याचे स्थान, म. भा. ७.३८.१०, दुसरा अर्थ मुख्य ठिकाण मृ. १०. तिसरा, जन्मभूमी म. भा. १२.३६.१९. चौथा अर्थ वास्तव्य. वा. रा. ३.३६.४. अशा पद्धतीने शिस्तबद्ध कोशाची मांडणी येथे आढळते, मृच्छकटिक, महाभारत, वाल्मिकी रामायण, मनुस्मृती, अशा अनेक संस्कृत ग्रंथांचे अवलोकन, शब्दशोधन, संदर्भास धरून त्याचे अर्थ देणे या सर्व गोष्टी पाहिल्या की कोशकर्त्याच्या व्यासंगाचे, परिश्रमाचे आणि चिकाटीचे कौतुक वाटते. संस्कृत तसेच मराठी भाषेच्या अभ्यासकांना उपयुक्त आधार असा शब्दकोश संग्रह.

**मोहन पाटील**

**गोंडवनातील प्रियंवदा आणि घरकुट्टे घराण्याचा इतिहास : केतकर, श्रीधर व्यंकटेश. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, १९२६.** केतकरांची ही पहिली कादंबरी, बा. सं. गडकरी यांनी केलेल्या उपहासामुळे ईर्ष्ये पोटी लेखन. विवाहपूर्व अनुभव आणि अनुनयोत्तर विवाह, तसेच स्त्री स्वातंत्र्य हा प्रमुख विषय या कादंबरीत आला आहे. मातृसत्ताक कुटुंबपद्धतीचा अप्रत्यक्ष पुरस्कार कादंबरीत केला गेला आहे. स्त्री स्वातंत्र्यविषयक क्रांतिकारक, प्रसंगी अतिरेकी वाटणाऱ्या कल्पना हा लेखन-विशेष कादंबरीची नायिका असणाऱ्या अल्लड स्वभावाच्या प्रियंवदेचे चित्रण लक्षणीय तंत्रदृष्ट्या अनेक दोष असूनदेखील 'सदाशिव पेठी' कादंबरीचे क्षेत्र अमेरिकेतील स्थायिक भारतीयांपर्यंत विस्तृत केले म्हणून या कादंबरीचे विशेष महत्त्व. हरिभाऊ आपट्यांच्या सामाजिक ध्येयवादाची भूमिका कायम राखणारी पण कादंबरीतील सामाजिकतेचे वेगळे रूप प्रकट करणारी मराठीतील ही महत्त्वाची कादंबरी आहे.

वसंत नरहर कुबेर

**गोपुरांच्या प्रदेशात : गाडगीळ, गंगाधर. प्रकाशक : सुरेश एजन्सीज, पुणे, १९५२.** प्रस्तुत प्रवासवर्णनात गाडगीळांनी दक्षिण भारतातील विविध स्थळांच्या प्रवासासंबंधी सतरा लेख लिहिले आहेत. गाडगीळ पती-पत्नी आणि त्यांचा मित्र प्रधान या तिघांनी केलेला हा प्रवास आहे. मुंबई सोडल्यानंतर विजयनगर शहराची रचना, इतिहास, संस्कृती, विरूपाक्ष व विष्णू यांची मंदिरे, म्हैसूरचा जगमोहन राजवाडा, त्यातील कलाकृती, कावेरी नदीवरील कृष्णराजसागर धरण यांची वर्णने केली आहेत. दक्षिणेच्या इतिहासात लष्करी महत्त्व असलेले श्रीरंगपट्टण, मद्रास सरहद, निलगिरी पर्वत, उटकमंड येथील डोंगरावरील बाग, लालसर डाळिंबी, निळी फुले, कन्याकुमारी, मद्रास बंदर अशा अनेक छोट्या-मोठ्या सौंदर्यस्थळांची माहिती दिली आहे. याबरोबर तेथे असणारे चहाचे दुर्भिक्ष, जेवणाच्या पद्धती, खरेदीचा अनुभव, प्रवासात भेटलेले वेगवेगळे लोक, गमतीदार घटना यांचे दर्शन गाडगीळांनी घडविले आहे.

विशेषतः निसर्गप्रेमी, विनोदी, रसिक, चिंतनशील अशा गाडगीळांच्या नजरेतून घडणारे दक्षिण भारताचे दर्शन मनाला रिझवते.

**गोविंदाग्रज : हर्षे, रा. ग. प्रकाशक : दे. ह. वाडेकर, पुणे, १९२१.** या समीक्षात्मक पुस्तकाचीउपशीर्षक 'काव्य परिक्षणात्मक प्रबंध' असे आहे. विख्यात मराठी लेखक राम गणेश गडकरी ऊर्फ कवी 'गोविंदाग्रज' यांच्या 'वाग्वैजयंती' या काव्यसंग्रहाचे हे रा. ग. हर्षेकृत परिक्षण आहे. आधुनिक मराठी कवीला, त्याच्या व्यक्तित्वाला व लेखनकर्तृत्वाला प्राधान्य देऊन लिहिलेला समीक्षा ग्रंथ. ज्या काळात गोविंदाग्रजांच्या लोकप्रियतेची कमान कमालीची उंचावलेली होती त्या काळात त्यांच्या काव्यकर्तृत्वाची गुणदोषयुक्त साधार आणि परखड मीमांसा करणारा हा समीक्षा ग्रंथ आहे.

या पुस्तकाची एकूण चौदा प्रकरणे विषयानुरोधाने पाडली आहेत. आरंभी काव्य विशेषतः भावकाव्य या प्रकाराची तात्त्विक मीमांसा आली असून ही मीमांसा गोविंदाग्रजांच्या कवितेला कितपत लागू पडते, हे पडताळून पाहण्याचा उपक्रम दिसतो. कवितांचे बहिरंगप्रधान आणि अंतरंगप्रधान असे दुहेरी परिक्षण येथे आढळते. आपली मते मांडताना इतरांच्या मतांचा आवश्यक त्या प्रमाणात परामर्श हर्षे यांनी घेतलेला आहे. ही समीक्षा तात्त्विक व न्यायनिष्ठुर वाटली तरी गोविंदाग्रजांच्या गुणांना योग्य त्या प्रमाणात न्याय देण्याइतकी सहृदयी आहे. या अनुषंगाने श्रेष्ठ कवितेची लक्षणे, गूढगुंजन कशाला म्हणावे, नाट्यसंगीत आणि नाट्य यांचे अन्योन्यसंबंध कसे असावेत यांसारख्या प्रश्नांची श्री. हर्षे यांनी केलेली चर्चा उद्‌बोधक आहे.

गोविंदाग्रजांच्या काव्यातील गुणदोषांची मीमांसा करणारा हा एक महत्त्वाचा समीक्षालेख संग्रह आहे.

गो. म. कुलकर्णी

**ग्रामर ऑफ दि मराठा लँग्वेज : इत्यादी बर्जेस. प्रकाशक : बॉम्बे अमेरिकन मिशन, मुंबई, १८५४.** हिंदुस्थानात स्थापन झालेल्या ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालक मंडळाने मिशनऱ्यांना ख्रिश्चन धर्माचा प्रसार करण्याची १८३३ मध्ये परवानगी दिली. त्यामुळे मिशनऱ्यांना मराठी भाषा शिकण्याची गरज निर्माण झाली. तेव्हा कॅरे, बॅलंटाईन, केनेडी, स्टीव्हरुन्सन, दादोबा पांडुरंग या पूर्वसुरींच्या व्याकरणांचा अभ्यास करून बर्जेस या मिशनऱ्याने हे व्याकरण लिहिले. मराठी भाषेची मूलभूत तत्त्वे संक्षेपाने या ग्रंथात दिलेली असून भाषेचे नियमही स्पष्ट केलेले आहेत. प्रामुख्याने युरोपियन मिशनरी व अभ्यासक यांच्यासाठी लिहिलेल्या या ग्रंथाने बर्जेस याला व्याकरणकार म्हणून प्रसिद्धी मिळाली. १८४८ मध्ये याच मथळ्याचे मराठी पुस्तक प्रसिद्ध झाले होते त्याचा हा इंग्रजी अनुवाद असावा. शासकीय विभागीय ग्रंथालय, पुणे येथे हा ग्रंथ उपलब्ध आहे.

म. प. पेठे

**ग्रामर ऑफ दि मराठा लँग्वेज : बलंटाईन, जेम्स आर. प्रकाशक : इडिन्‌बर्ग, १८३९.** डॉ. विल्यम कॅरे या सुप्रसिद्ध व्याकरणकाराचे इंग्रजीतील पुस्तक मराठी भाषा शिकण्याच्या दृष्टीने फारसे समाधानकारक नव्हते तसेच ते दुर्मीळही झाले होते, हे लक्षात घेऊन हेलिबरी येथील ईस्ट इंडिया कॉलेजच्या मराठी वर्गासाठी बॅलंटाईन यांनी हे पुस्तक लिहिले. अतिशय वळणदार आणि सुबक तसेच धावत्या रोमन व मोडी लिपीतील बॅलंटाईन यांच्या स्वतःच्या अक्षरातील हे पुस्तक डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे ग्रंथालय येते उपलब्ध असून मराठी भाषा शिकण्याच्या दृष्टीने आवश्यक असलेले मराठी व्याकरणाचे सर्व विषय त्यात आलेले आहेत.

म. प. पेठे

**ग्रामर ऑफ दि मराठा लँग्वेज : मकबा मुहम्मद इब्राहिम. प्रकाशक : करिअर, मुंबई, १८२५.** मुन्सी मकबा मुहम्मद

इब्राहिम मुल्ला यांनी इ. स. १८२५ मध्ये 'ए ग्रामर ऑफ दि मराठा लँग्वेज' या नावाचे मराठी व्याकरण लिहिले. त्याची पृष्ठ संख्या ११२ आहे. मराठी व्याकरणनिर्मितीसाठी झालेल्या तत्कालीन प्रयत्नांत मकबाचे हे व्याकरण महत्त्वाचे मानले जाते. व्हॅन्स केनेडी याने ह्या व्याकरणातील त्रुटी दूर करून ते सुधारले, असा एक उल्लेख 'युरोपियनांचा मराठीचा अभ्यास व सेवा' या डॉ. श्री. म. पिंगे यांच्या ग्रंथात केला आहे. मकबाचा हा व्याकरण ग्रंथ मुंबई येथील मराठी संशोधन मंडळाच्या ग्रंथालयात उपलब्ध आहे.

उषा पुरोहित

**घररिघी : जोशी, महादेवशास्त्री. प्रकाशक : जोशी सुधा महादेव, ज्ञानराज प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९५५.** नवकथेच्या विकसनशील कालखंडातील एक महत्त्वाचे कथाकार. गोमंतकच्या पार्श्वभूमीवर त्यांची बहुतेक कथा साकारली आहे. 'वेल विस्तार', 'मोहनवेल', खडकातील पाझर', 'भावबळ', 'प्रतिमा', 'कथा-काव्यलता' इत्यादी कथासंग्रह असून 'घररिघी', हा त्यांचा आठवा कथासंग्रह.

या कथासंग्रहात 'घररिघी', 'वनवाप्तिनी', 'एक पीडीची आत्मकथा', 'पुरंदरची शिकार', 'जंजिऱ्याच्या तटावरुन', 'अवस अन् पुनव,' 'वैशाखवणवा' इत्यादी नऊ कथा समाविष्ट आहेत. या संग्रहातील काही कथांची पार्श्वभूमी गोमंतक असून काही कथांची पार्श्वभूमी गोव्याबाहेरची आहे.

जुन्या परंपरेत, संस्कृतीत, मूल्यांच्या जपणुकीत रमलेली संस्कारसंपन्न कथा असून तीमध्ये गोमंतकचा निसर्गरम्य परिसर, तेथील व्यक्तिजीवन, सप्रवृत्ती, सद्भावना, यांचा प्रभाव याबरोबरच गोमंतकातील चालीरीती, सुष्टदुष्ट व्यक्तींची सुखदु:खे, याचे दर्शन या कथातून घडते. क्वचित 'एका पीडीची आत्मकथा'सारखी कथा वृषोत्सर्ग हे धार्मिक विधान मध्यवर्ती कल्पून लिहिलेली दिसते.

सद्भावनेवरील व मांगल्यावरील श्रद्धा, अनोखे भावबळ, आणि प्रसन्न व मनमोकळी भाषाशैली हे या कथांचे विशेष. नवकथेचा व प्रादेशिक कथांचा समर्थ आविष्कार पाहण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा कथासंग्रह.

यशवंत चव्हाण

**घराबाहेर : अत्रे, प्रल्हाद केशव. प्रकाशक : शिवराम हरी गद्रे, कर्नाटक, मुंबई, १९३४.** १९३३ ते १९४३ या काळात उतरती कळा लागलेल्या रंगभूमीला नवी उभारी देण्याचे काम अत्रे यांनी केले. नाटककार, कवी, विडंबनकार, शिक्षणतज्ज्ञ, चित्रपटनिर्माते, दिग्दर्शक, वृत्तपत्रकार, वक्ते, नेते असे बहुरंगी व्यक्तिमत्त्व. विनोदी, गंभीर व सामाजिक नाटकांचे लेखन. 'लग्नाची बेडी', 'मी उभा आहे', 'उद्याचा संसार', 'जग काय म्हणेल?' इत्यादी. 'श्यामची आई' या त्यांच्या चित्रपटाला राष्ट्रपती सुवर्णपदक व ' महात्मा फुले ' या चित्रपटाला रौप्यपदक मिळाले.

'घराबाहेर' हे त्यांचे तीन अंकी संगीत नाटक. एका दुर्दैवी स्त्रीची करुण कहाणी ऐकल्यानंतर या नाटकाची निर्मिती झाली. नाटकाची नायिका निर्मला साधी व पापभिरू स्त्री आहे. श्रीमंतीच्या जोरावर तिचे सासरे आबासाहेब इनामदार व सावत्र दीर निळकंठ तिला त्रास देत असतात. एक दिवस आबासाहेब तिच्यावर गलिच्छ आरोप करतात. त्यावेळी आपला नवरा शौनक गप्प राहिलेला पाहून निर्मला चिडते. मंगळसूत्र काढून टाकते व घराबाहेर पडते. मुलाला तिच्याबरोबर जाऊ दिले जात नाही. जीव देण्यासाठी नदीकडे चाललेल्या निर्मलाला मीनाक्षी नावाची विधवा वाचवते आणि भय्यासाहेब नावाच्या वकिलांकडे तिची राहण्याची सोय करते. शेवटी शौनक जेव्हा मुलाला घेऊन तिच्याकडे येतो तेव्हाच ती त्याच्याबरोबर जाण्यास तयार होते. आबासाहेबांचे खरे रूप कळल्यामुळे शौनक आणि निर्मला नवे घर करतात.

मध्यमवर्गीय कुटुंबातील स्त्री मंगळसूत्र तोडून घराबाहेर पडते. ही घटना त्या काळात आश्चर्यचकित करणारी ठरली होती. एक प्रक्षोभक सामाजिक नाटक म्हणून ते प्रसिद्ध पावले.

**चक्रवर्ती नेपोलियन : भावे, वि. ल. प्रकाशक : भारत गौरव ग्रंथमाला, मुंबई, १९१७.** ' चक्रवर्ती नेपोलियन ' हा वि. ल. भावे यांचा एक अत्यंत लोकप्रिय ग्रंथ. तीन खंडात चरित्रकाराने त्याची मांडणी केली आहे. नेपोलियन हा जग जिंकू पाहणारा फ्रान्सचा महत्त्वकांक्षी रणनिपूण बादशहा. फ्रेंच राज्यक्रांतीतील अंदाधुंदीत तो प्रथम जगाच्या रंगभूमीवर आला आणि वॉटर्लूच्या रणमैदानावर त्याचा भाग्यतारा अस्तंगत झाला. अजोड सेनानी, कणखर प्रशासक आणि रसिक प्रेमवीर ही त्याच्या जीवन कर्तृत्त्वाची तीन प्रमुख अंगे.

वि. ल. भावे यांनी नेपोलियनची चरित्रकहाणी भक्तिभावाने आणि विस्तृतपणे कथन केली आहे. नेपोलियनच्या चरित्रातील अनेक नाट्यपूर्ण, आवाहक प्रसंग आणि चढउतार भावे तपशिलाने आणि रसपूर्ण, ढंगदार भाषेत चित्रित करतात. सुरस, चटकदार भाषाशैली हे या चरित्राचे खास वैशिष्ट्य आहे. 'फलश्रुती' हे अखेरचे प्रकरण मराठीत या दृष्टीने उल्लेखनीय आहे.

**म. श्री. दीक्षित**

**चंदनवाडी : माडखोलकर, गजानन त्र्यंबक. प्रकाशक : अक्षय प्रकाशन, पुणे, १९४३.** श्री. ग. त्र्यं. माडखोलकर हे विख्यात मराठी पत्रकार, कादंबरीकार व समीक्षक होते. 'मुक्तात्मा' (१९३३), 'मुखवटे' (१९४०) इत्यादी त्यांच्या प्रसिद्ध कादंबऱ्या. 'रातराणीची फुले' (१९४०) आणि 'शुक्राचे चांदणे' (१९४८) या संग्रहातील कथा गाजल्या.

'चंदनवाडी' ही त्यांची एक महत्त्वाची कादंबरी. चंदनवाडी या गावातील येसू व रखमा या दोन विधवांची ही कथा. देशमुख घराण्यात ऐश्वर्य भोगलेले येसू व नंदू हे जोडपे. गावातील देशपांडे घराण्याच्या तगाद्यामुळे नंदू आपल्या मालकीची चंदनवाडी त्यांना विकतो. त्याच्या मृत्यूनंतर येसू व तिची विधवा सून रखमा शेतमजुरी करून पोट भरू लागतात. चंदनवाडीचे मालक मरण पावल्यानंतर त्यांचा मुलगा दादासाहेब देशपांडे याच्याशी त्या दोघींना संघर्ष करावा लागतो. येसूची नात चंदन व दादासाहेबांचा मुलगा अवधूत या दोघांचे प्रेम जमते. चंदन गर्भवती होते. घराण्यातील वैमनस्यामुळे रखमा चिडून तिला गर्भपाताचे औषध देते. त्यामुळे चंदन मरण पावते.

माडखोलकरांनी अत्यंत साध्या कुटुंबात घडलेल्या घटना मोठ्या सफाईने रंगविल्या आहेत. परिणामकारक व्यक्तिचित्रे, सहज सुंदर भाषाशैली यामुळे कादंबरी वाचनीय ठरते.

**चर्वणा : जोग, रामचंद्र श्रीपाद. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९६०.** प्रस्तुत ग्रंथात जोग यांचे पूर्वप्रसिद्ध वाङ्मयविषयक लेख संग्रहित केले आहेत. वाङ्मय हा शब्द कथा-कादंबरी-नाटकस्वरूप वापरून सामान्यांकडून वर्ग-प्रतिनिधींकडे आणि तेथून व्यक्तींकडे साहित्याची प्रगती कशी होते हे स्पष्ट केले आहे. हास्यरस, त्याची कारणमीमांसा विडंबन म्हणजे काय? उपहास व उपरोध यांतील साम्यभेद, इंग्रजीतील आयरनी इत्यादींचे स्पष्टीकरण केले आहे. नव-साहित्य दुर्बोध असण्याची कारणे दिली आहेत. वाङ्मयीन सद्भिरुचीचे स्पष्टीकरण देऊन शृंगार आणि विनोद हे त्याचे निकष मानले आहेत, येथे औचित्यही महत्त्वाचे मानले आहे.

साहित्याचा विचार त्याच्या सामाजिक परिणामांच्या संदर्भात करणार या दृष्टीने प्रस्तुत ग्रंथ महत्त्वाचा आहे.

**चला आळंदीला : साक्रीकर, श्रीकृष्ण. प्रकाशक : पॉप्युलर बुक डेपो, मुंबई, १९५८.** विज्ञान व आध्यात्म यांची सांगड घालण्याचे प्रतिपादन करणारी, ज्ञानेश्वरकालीन पार्श्वभूमीवरील नाट्यकृती. या नाटकात ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाची बैठक मुक्ताबाईच्या मुखातून व्यक्त होते. तर चांगदेव हा जगाला जाळू पाहणाऱ्या वैज्ञानिकांचे प्रतीक म्हणून येतो.

रुपा व सुंद्रा हे जन्मांध व कुरूप भिकाऱ्यांचे जोडपे. आळंदी कोसभर राहिली असता थकून शिळ्या भाकरीचे तुकडे चघळीत विश्रांती घेत असता, तेथे चांगा वटेश्वराचा शिष्य भांगा गोटेश्वर त्यांना भेटतो व आपल्या गुरूकडून मंत्रसिद्धीने त्यांना दृष्टी देववितो. पण डोळे आल्यावर त्यांना असे हीन व कटू अनुभव येतात की, ते स्वहस्ते डोळ्यांत तापलेल्या सळ्या घालून पुन्हा अंध होतात. तथापि, त्या क्रियेचे त्यांचे शारीरिक दुःख मुक्ताबाई पांडुरंगाच्या कृपाप्रसादाने नाहिसे करते आणि वृथा अहंकारी चांगदेव-गोटेश्वराच्या दृष्टीलाभाच्या आग्रहाला ते बळी पडत नाहीत. विज्ञानाला आध्यात्माची जोड नसेल तर ते विध्वंसक ठरू शकते याचे दिग्दर्शन करणारी ही नाट्यकृती आहे. तिच्यात दहा भक्तिप्रधान गाण्यांचाही समावेश आहे.

गो. वि. वैद्य

**चांगदेव चरित्र : पुणतांबेकर, शामजी गोसावी मरुद्गण. प्रकाशक : वि. ल. भावे, ठाणे, १९०४.** 'चांगदेव चरित्र' हा ग्रंथ शामजी गोसावी मरुद्गण पुणतांबेकर यांनी इ.स. १७४५ मध्ये लिहिला आहे. ग्रंथ ओवीबद्ध असून, त्याचे पहिले तीन अध्याय उपलब्ध नाहीत. उपलब्ध असलेल्या ४ ते ७ अध्यायांची ओवीसंख्या ६४४ आहे.

शामजी गोसावी स्वतःला ज्ञानेश्वरकालीन चांगदेव (वटेश्वर) यांच्या कुलपरंपरेतील समजतात. त्यांनी दिलेल्या पितृपरंपरेने चांगदेव वटेश्वर हे त्यांचे दहावे पूर्वज होत. प्रस्तुतचे चांगदेव चरित्र मात्र वटेश्वराचे नसून 'चांगदेव मुधेश' या त्याच्या अन्यपूर्वजाचे आहे. चांगदेव वटेश्वर विठू चांगदेव मुधेश, अशी त्यांची पितृपरंपरा होय.

'चांगदेव मुधेश' यांच्या या चरित्रात, त्यांचा वेदशास्त्राभ्यास गृहस्थाश्रम, गयेची यात्रा परतल्यावर आपल्या सर्व संपत्तीची व कुलकर्णपणाच्या वतनाची भाऊबंदांत केलेली वाटणी, नंतर पंढरपुरास विठ्ठल सेवेत कालक्रमण व शेवटी गोदातीरी पुणतांबे येथे वास्तव्य अशा घटनांची माहिती आलेली आहे.

"काही देवपूजा। मजला सांगावी। कृपा करावी। दीनोद्धारा।" अशी त्यांची भूमिका, पुण्यतांब्यास केशवाच्या चतुर्भूज मूर्तीची प्रतिष्ठापना करून तिच्या उपासनेचे नित्यव्रत त्यांनी स्वीकारले. त्यानंतर ते स्वतःस चांगा केशवदास म्हणवू लागले.

चंद्रकांत धांडे

**चांदण्यातील गप्पा : कानिटकर, काशीताई. प्रकाशक : नाडकर्णी आणि मंडळी, मुंबई,१९२१.** कथालेखिका श्रीमती काशीताई कानिटकर यांच्या 'विविध ज्ञानविस्तार' या मासिकात प्रसिद्ध झालेल्या गोष्टींचा हा संग्रह आहे. प्लेगमुळे रानात राहावयास गेलेल्या मंडळीपैकी काही व्यक्ती चांदण्यात गप्पा मारता मारता गोष्टी सांगतात असे कल्पनेने पाच व्यक्तींकडून या कथा सांगितल्या गेल्या आहेत, अशी लेखिकेने मांडणी केली आहे. त्यामुळे त्यामध्ये भरपूर नाट्यात्मता व गोष्टीवेल्हाळपणा आहे. साऱ्या कथांमध्ये वाचकांना सुखविणारे रहस्य आहे. काशीबाईंची भाषा प्रौढ, गंभीर आहे. लेखिकेची अवलोकनशक्ती व वर्णनशक्ती या कथांमधून पुरेपूर व्यक्त झालेली दिसते. अद्भूतरम्यता, कौटुंबिक सदाचार आणि सुहृदभाव यांनी साऱ्याच कथा युक्त आहेत.

भीमराव कुलकर्णी

**चांदरात व इतर कविता : काणेकर, अनंत आत्माराम. प्रकाशक : रामकृष्ण बुक डेपो, मुंबई, १९३३.** श्री. अनंत काणेकर कवी, पत्रकार, कथाकार, व लघुनिबंधकार म्हणून

प्रसिद्ध 'तुटलेले तारे' (१९३८), 'पिकली पाने' (१९३४) हे लघुनिबंधसंग्रह; 'धुक्यातून लाल ताऱ्याकडे' (१९४०) हे प्रवासवर्णन, 'जागत्या छाया' (१९३५) कथासंग्रह 'अनंतिका' (१९७९) हे आत्मचरित्र इत्यादी साहित्यसंपदा. १९६५ सालचे 'पद्मश्री' पुरस्कार विजेते.

'चांदरात...' हा काणेकरांचा पहिला आणि एकुलता एक कवितासंग्रह आहे. त्यात ४८ कविता आहेत. या संग्रहाने कवी म्हणून मराठी काव्यात त्यांचे स्थान निश्चित झाले. प्रस्तुत संग्रहात कवितेचे विषय, रचनापद्धती, वृत्ते यांची विविधता मोठ्या प्रमाणावर आढळते. स्वप्नांची वास्तवातील सत्याशी लगेच सांगड घातली जाते. 'पतंगप्रीत', 'मी करतो तुजवर प्रेम', 'ऐरण' इत्यादी कवितांतून तरुण निरोगी मनाची हुरहुर, ओढ, आशा-निराशा यांचे उत्कट दर्शन घडते. 'चटका', 'एकलेपणाची आग' अशा कवितांमधून प्रेमात पडलेल्या व्यक्तीच्या मनाची आंदोलने व्यक्त होतात.

'निळ्या, तांबड्या, हिरवट, पिवळ्या तेजाची सांडणी
करितसे व्याधाची चांदणी
बेफाम पसरिते पंख हृदय-पाखरू
उडुनिया पाहते अनंत अंबर भरू!
या इवल्या देही कसे तया आवरू!'

या उदाहरणावरून निसर्गाशी असणारी जवळीक दिसते. विनोदी व विडंबन गीते ही या संग्रहाची महत्त्वाची विशेष आहेत. 'प्रेम आणि पतन', 'नळावर तणतणून भांडणाऱ्या बाईस' इत्यादी. एकूणच या संग्रहातील कविता स्वच्छंदपणे अवतरली आहे.

**चित्रपट मी व मला दिसलेले जग : माटे, श्रीपाद महादेव. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, १९५७.** श्री. माटे हे प्रसिद्ध समाजशास्त्रज्ञ होते. ललित व वैचारिक लेखन. अस्पृश्यताविरोधी कार्य. 'रोहिणी' मासिकाचे पहिले संपादक. 'उपेक्षितांचे अंतरंग' (१९४१), 'माणुसकीचा गहिवर' (१९४९), 'अनामिका' इत्यादी कथासंग्रह. महारमांग, रामोशी अशा उपेक्षित जमातीतील व्यक्तींचे चित्रण त्यांनी केले. 'महाराष्ट्र सांवत्सरिक' (३ खंड १९३३-३५) प्रसिद्ध केले.

प्रस्तुत ग्रंथ म्हणजे 'वसंत' मासिकात वेळोवेळी छापून आलेल्या आत्मचरित्रात्मक लेखांचा संग्रह हा आहे. माटे यांचे संपूर्ण जीवनचरित्र यात सांगितले आहे. विदर्भामध्ये १८८६ साली त्यांचा जन्म झाला. पुढे सातारा, शिंगणापूर, विटा अशा ठिकाणी त्यांनी स्थलांतर केले. त्यावेळची सामाजिक परिस्थिती, त्यांचे शिक्षक, महाविद्यालयीन जीवन, रँग्लर परांजपे, वासुदेव पटवर्धन, शि. म. परांजपे अशा लोकांचा सहवास माटे यांनी वर्णिला आहे. स्वदेशीची चळवळ, बालगंधर्वांचा प्रभाव, राजकीय धोरणे याचबरोबर त्यांच्या अस्पृश्यता निवारणाच्या महत्त्वाच्या कार्याबद्दल माहिती आहे. मांगवाड्यात सुरू केलेली शाळा, अस्पृश्यांच्या वस्त्या झाडणे इत्यादी अनेक कामे त्यांनी केली. 'केसरी' वृत्तपत्राला पन्नास वर्षे पूर्ण झाल्याप्रीत्यर्थ 'सांवत्सारिक' ग्रंथाचे संपादन, 'केळकर ग्रंथ', 'हिंदू समाजदर्शन', 'विज्ञानबोध' इत्यादी ग्रंथाचे संपादन त्यांनी केले. शेवटी पुण्याच्या सार्वजनिक जीवनात कोल्हटकर, अत्रे, शंकराचार्य इत्यादींशी झालेल्या वादांचा आढावा घेतला आहे. शेवटी जीवनाबद्दल समाधान व्यक्त केले आहे.

माटे यांचे सांगोपांग जीवनचरित्र व त्या काळातील सामाजिक, राजकीय परिस्थितीचे चित्रण वाचनीय ठरते.

**चित्रविणा : बोरकर, बा. भ. प्रकाशक : मौज प्रकाशन, मुंबई, १९६०, (पुनर्मुद्रण १९६७).** सौंदर्यवादी रसिकदृष्टी आणि संस्कारशील, आध्यात्मिक मनोवृत्ती यांतून निर्माण झालेली गीतात्म भावकविता.

इहवादी निष्ठेबरोबरच आध्यात्मिक ओढही कवीच्या काव्यजाणिवेत महत्त्वाची. निसर्गसौंदर्य, स्त्रीसौंदर्य आणि प्रणय यांतून कवीला विश्वचैतन्याचा साक्षात्कार घडतो. सौंदर्यासक्त वृत्तीतून अवतरलेली निसर्ग-कविता सांकेतिकतेपासून मुक्त आहे. विविध ऋतूंतील विविधता पूर्ण मनोहर रूपे निसर्ग-कवितेतून अवतरतात.

निसर्गाप्रमाणेच प्रणयातील धुंदीबरोबरच व्याकुळता, हुरहुर, संयतता यांचाही प्रभावी आविष्कार. कवी काही कवितांत अंतर्मुख होताना दिसतो. ही अंतर्मुखता आध्यात्मिक ध्यासातून आलेली आहे.

कवितेची शैली परंपरेचे सामर्थ्य पचवून पृथगात्म बनलेली. अनेक सांस्कृतिक मिथ्स, प्रतिमा, संगीतातील संकल्पना व परिभाषा, लयबद्धता हे लक्षवेधक विशेष.

वासुदेव सावंत

**चित्रा : साठे, अण्णाभाऊ. प्रकाशक : लोकसाहित्य प्रकाशन, मुंबई, १९५२.** श्री. अण्णाभाऊ साठे शाहीर, कथाकार, कादंबरीकार, नाटककार म्हणून प्रसिद्ध. 'अकलेची गोष्ट', 'माझी मुंबई' अशी चौदा लोकनाट्ये; 'आग', 'अहंकार' इत्यादी कादंबऱ्या; 'चिरानगरची भुतं' (१९०८), 'बरबाद्या कंजारी' (१९६०) असे तेरा कथासंग्रह. 'फकिरा' (१९५९) या त्यांच्या कादंबरीवरील चित्रपटास महाराष्ट्र राज्य पारितोषिक प्राप्त.

अण्णाभाऊ साठे सातारा जिल्ह्यात भटकत असताना कऱ्हाड-कोल्हापूर रस्त्याला एक मामा, भाची त्यांना भेटतात. त्या गृहस्थाने सांगितलेली कथा व त्या तरुणीचे सौंदर्य या कादंबरीच्या प्रेरणा. सातवे गावातील चित्रा नावाच्या अतिशय देखण्या मुलीची ही कथा आहे. लहानपणी वडील वारल्यामुळे चित्रा, तिची मोठी बहीण सोना व आई मामाकडे राहत असतात. मामाने लावून दिलेली चित्रा व सोना दोघींची लग्ने अपयशी ठरतात. मामा दोघींना मुंबईला पाठवतो. तेथे त्या दोघींना वेगवेगळ्या पुरुषांशी करावा लागलेला संघर्ष, चित्राने स्वतःपुरता शोधलेला मार्ग आणि दोन्ही बहिणींचे एकत्र येणे प्रस्तुत कादंबरीत वर्णिले आहे.

स्त्री-पुरुष संबंध आणि एका स्त्रीमधील धाडसीपणा, संकटांना सामोरे जाण्याची तिची जिद्द या स्वभाव वैशिष्ट्यावर प्रस्तुत कादंबरी प्रकाश टाकते.

**चिमणरावांचे चऱ्हाट : जोशी, चिं. वि. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९३३.** दुसऱ्या महायुद्धाच्या कालखंडातील महाराष्ट्रीय मध्यमवर्गाचे प्रातिनिधिक चित्रण करणाऱ्या या विनोदी कथासंग्रहात १४ कथा आहेत. यातील 'चिमणराव' हा सांसारिकांचा आणि 'गुंड्याभाऊ' हा समाजसेवेसाठी ब्रह्मचारी राहणाऱ्यांचा प्रतिनिधी. या पात्रांच्या नित्यजीवनातील प्रसंगांचे चित्रण करताना सामाजिक दोषांवर मार्मिक टीका केली असून निर्भेळ विनोदातून हसू आणि आसू यांचा एकाचवेळी येणारा प्रत्यय हे या लेखनाचे वैशिष्ट्य. मराठी विनोदी वाङ्मयात अग्रस्थान द्यावे या योग्यतेचे हे विनोदी लेखन आहे.

वसंत नरहर कुबेर

**चौफुला : आचार्य भागवत, स. ज. प्रकाशक : द. र. कोपर्डेकर, पुणे, १९४४.** आचार्य स. ज. भागवत यांनी चार पुस्तकांना लिहिलेल्या प्रस्तावनांचा संग्रह. मूळ ग्रंथांचे लेखक सानेगुरुजी, शं. द. जावडेकर, र. ग. जोशी व ना. ग. जोशी हे आहेत. या प्रस्तावना लेखकाच्या व्यासंगांचा आणि रसिकतेचा प्रत्यय देतात.

शे. मा. हराळे

**छन्दोरचना : पटवर्धन, माधव त्र्यंबक. प्रकाशक : कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई, १९३७.** मराठीमध्ये छंदःशास्त्रीय विचाराचे प्रवर्तन करणारा व आधुनिक काळातील मराठीतील छंदःशास्त्राला तात्त्विक बैठक मिळवून देणारा ; महत्त्वाचा स्वतंत्र संशोधकीय ग्रंथ. पटवर्धनांनी पद्यरचनाशास्त्राची आमूलाग्र, नव्या पायावर पुनर्घटना केली. त्यात निश्चित व्यवस्था लावण्याचा प्रयत्न केला. त्यांनी पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना हा सिद्धान्त प्रस्थापित करून समग्र पद्यरचनाशास्त्राची उभारणीच पद्यातील अंतर्गत लयीच्या अनुरोधाने करून त्याप्रमाणे सर्व उपलब्ध पद्यरचनेची व्यवस्था लावून दाखविली व त्या शास्त्राचे मराठीकरण केले. छन्दोरचनेच्या पहिल्या आवृत्तीची आमूलाग्र पुनर्रचना करून, अधिक संशोधनाची जोड देऊन, भर घालून 'छंदोरचने'ची दुसरी आवृत्ती सिद्ध केली आहे. पद्यरचना ही वृत्तस्वरूप असो, जातिस्वरूप असो, वा छंदःस्वरूप असो, ती काही सम, अर्धसम आणि विषम असू शकते, ते या दुसऱ्या आवृत्तीत विस्ताराने दाखविले आहे. पहिल्या दोन अध्यायांत काही पद्यरचनाविषयक प्रश्नांचा विचार केला असून शेवटच्या आठव्या अध्यायात छंदशास्त्राचा धावता इतिहास सांगितला आहे. या ग्रंथाला मुंबई विद्यापीठाने डी.लिट ही पदवी दिली. मराठीतील हा पहिला डी.लिट पात्र ग्रंथ.

सु. रा. चुनेकर

**छोरी : पाडगावकर, मंगेश. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, १९५७.** श्री. मंगेश पाडगावकर यांची गणना नवकवीत केली जाते. तरीही कटुता, वैफल्य, रचनेचे तेढेपण यांपासून त्यांची कविता अलग आहे. 'धारानृत्य' (१९५०), काव्यसंग्रह 'जिप्सी' (१९५३), 'छोरी' (१९५७) या काव्यसंग्रहांना राज्यपुरस्कार. 'सलाम' (१९८०) या संग्रहाला साहित्य अकादमी पुरस्कार. 'भोलानाथ' (१९६४), 'बबलगम' (१९६७) हे बालगीतसंग्रह. इंग्रजीतील लिमरिकच्या धर्तीवर मराठीमध्ये वात्रटिका लेखन इत्यादी साहित्यसंपदा.

प्रेम आणि निसर्ग या विषयांवरील कविता प्रस्तुत संग्रहात आहेत. यातील कोणताही अनुभव निसर्गाच्या अस्तित्वाशिवाय व्यक्त होत नाही. प्रेमाची वेदना जपणारे, तिच्या आठवणीने बावरे झालेले मन 'पुन्हा एकदा', 'तुला पाहिले मी हसताना', 'डंख' अशा काही कवितांतून व्यक्त झाले आहे. याबरोबरच प्रेमाने धुंद होणारे, तिच्या सहवासाने पुलकित होणारे मन 'हृदय तुझे', 'तू असताना', 'रहस्य' इत्यादी कवितांमध्ये दिसते. 'सुरंगा' आणि 'ओळख' या कवितांमध्ये रंगांची मुक्त उधळण दिसते. उदा.

"निळ्या, केशरी, तांबुस पिवळ्या
रानफुलांचा घोस कुंतली
फिरायचे विसरून वाऱ्याची
झुळझुळ बोटे त्यांत गुंतली."

उन्हाचा पिवळेपणा, थेंबाचा गारवा अनुभवण्यासाठी शब्दांच्या चमत्कृतीपेक्षा संवेदनांचे भावगर्भ संघटन आवश्यक असते. हे संघटन 'छोरी' च्या प्रत्येक कवितेतून अनुभवण्यास मिळते.

**जन्मखुणा : गोखले, अरविंद. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९४७.** अरविंद गोखले यांच्या दहा कथांचा संग्रह. माणसाच्या मनातील चांगुलपणा, उदात्त भावना व सत्त्वशील वृत्तीचे दर्शन कथांमध्ये होते. कथांमधील विषयाची विविधता हेही प्रस्तुत संग्रहाचे वैशिष्ट्य आहे.

वसुंधरा बनहट्टी

**जळमाती : पोवळे, श्रीकृष्ण. प्रकाशक : पोवळे प्रकाशनाकरिता, अभिनय प्रकाशन, मुंबई, १९४९.** 'अग्निपराग' (१९४६) या पहिल्या संग्रहातील जहाल क्रांतिवादी व सामाजिक विषमतेच्या जाणिवेतून लिहिलेल्या प्रक्षुब्ध कवितांमुळे पोवळे यांना कुसुमाग्रजांचे अनुयायी, 'अग्निसंप्रदायाचे कवी' असे संबोधिले गेले. परंतु त्यांच्या या दुसऱ्या संग्रहात ती ज्वलंत सामाजिक जाणीव फारशी व्यक्त झालेली दिसत नाही. या संग्रहातील बव्हंश कविता स्त्री प्रेमाशी निगडित. या प्रेमाचे दोन गडद रंग भग्न प्रीतीचा निराश वैफल्यपूर्ण असा एक आणि जणू भग्न प्रीतीचा दारुण आघात विसरण्यासाठी, मद्य-मदिराक्षी यांच्या धुंद नशेचा आधार घेऊन स्वतःचे दुःख विसरू पाहण्यासाठी उधळलेला उन्मुक्त, स्वैर प्रणयाचा दुसरा रंग या दोन रंगांच्या

अनेक छटा 'जळमाती'तील कवितात आढळतात. या कवितांमध्ये एक प्रकारचा प्रांजळपणा, प्रामाणिकपणा, मनमोकळेपणा आहे. विफलता व निराशा यांच्यातूनच जगाविषयीची तुच्छता, बेपर्वा वृत्ती, ईश्वराविषयी अश्रद्धा, उद्दामपणा, बेदरकारपणा ह्या गोष्टीही निर्माण झालेल्या दिसतात. श्रीकृष्ण पोवळे यांच्या कवितांवर उमरखय्यामी तत्त्वज्ञानाचा ठसा दिसून येतो.

प्रभा गणोरकर

**जाईजुई : जोशी, यशवंत गोपाळ. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९४९.** श्री. य. गो. जोशी हे कथाकार म्हणून प्रसिद्ध. 'रेघोट्यांचे दैवत' (१९४७), 'मायेच्या सावल्या' (१९४७), 'तरंग' (१९५०) कथासंग्रह. 'शेवग्याच्या शेंगा', 'वहिनीच्या बांगड्या', 'दुधावरची साय' या त्यांच्या गाजलेल्या कथा. 'पडसाद' (१९३८), 'श्रीकांत' (१९३७) या कादंबऱ्या इत्यादी लेखनसंपदा.

प्रस्तुत कथासंग्रहाला वि. स. खांडेकर यांची प्रस्तावना आहे. १९३० ते १९४० या दशकात जोशी यांना कथालेखक म्हणून मिळालेले स्थान स्पष्ट करून त्यांच्या कौटुंबिक कथांचे सहजसुंदर रूप खांडेकरांनी उलगडून दाखविले आहे. आपल्या भावांच्या प्रेमासाठी आसुसलेली तारका, वहिनीला आई-मानणारा दीर, आपण दुधावरची साय असल्याचे आज्जीला सांगणारी नात. नवरा-बायकोमधील भांडण, रुसवा, प्रेम, सुखाच्या आशेसाठी धर्माचा आधार घेणारा माणूस इत्यादी रोजच्या आयुष्यात पाहायला मिळणारी माणसे जोशी यांच्या कथेत भेटतात. त्यांच्या या कथा कौटुंबिक असून जिव्हाळ्याने भारलेल्या आहेत. 'धर्म ही अफू आहे', 'दुधावरची साय', 'वहिनीच्या बांगड्या', 'शेवग्याच्या शेंगा' इत्यादी कथा मनावर ठसा उमटविणाऱ्या आहेत.

**जिप्सी : पाडगावकर, मंगेश. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, ३५ सी, ताडदेव रोड, मुंबई, प्र.आ., १९५३.** 'धारानृत्य' या पहिल्याच काव्यसंग्रहातून कवी बोरकरांच्या निसर्ग संवेदनासमृद्ध कवितेचे संस्कार घेऊन आलेल्या पाडगावकरांनी 'जिप्सी' या दुसऱ्याच कवितासंग्रहात आपले स्वतंत्र काव्यविश्व उभारले. 'छोरी', 'निंबोनीच्या झाडामागे', 'विदूषक', 'वात्रटिका', 'सलाम', 'उदासबोध', इत्यादी ३२ कवितासंग्रह प्रसिद्ध व एक नाटकही यांनी लिहिले आहे. तरल, कोमल, निसर्गसंवेदना, आणि कोवळ्या नाजूक प्रेमभावनेच्या छटा आपल्या प्रेमकवितांतून दृग्गोचर करणारी पाडगावकरांची कविता आशावादी, जीवनवादी आणि सामाजिक जाणिवेने प्रभावीतही आहे.

या संग्रहातील पुष्कळशी कविता विशुद्ध प्रेमकविता असून, 'गंधातून गूढ उकलते', 'आज', 'जर पहाटेच येणार तरी', 'मी चंचल होऊनी आले', 'विस्मरणाची दान तुझे ते', 'तू असतीस तर' इत्यादी कवितांत कवीने नाजूक भावभावनांची आणि निसर्गसूक्ष्म, संवेदनांची मनोज्ञ गुंफण केलेली दिसते. 'दुःख', 'हात हवे मज', 'कधी पाहतो', 'आनंदयात्री' या कविता जीवनवादी, विचारप्रवर्तक स्वरूपाच्या आहेत.

मराठी कवितेची गडद शब्दकला तरल, सुकोमल बनविणाऱ्या पाडगावकरांच्या या संग्रहातील कवितांत त्यांच्या पुढील काव्याविष्काराची बीजे नजरेत भरतात.

मोहन पाटील

**जिवाशिवाची भेट : वरेरकर, भा. वि. प्रकाशक : अभिनव प्रकाशन, मुंबई, १९५०.** ग्रामीण पार्श्वभूमीवरील सामाजिक नाटक.

उद्ध्वस्त होणाऱ्या खेड्यांतील जीवनात यंत्रयुगाने झालेले आमूलाग्र परिवर्तन, कुशल कारागिरांची आर्थिक दुरवस्था, धार्मिक पिळवणूक यांचे यथार्थ चित्रण आणि महात्मा फुल्यांच्या विचारांतून घडवलेले समाजप्रबोधन यामुळे हे नाटक मराठी सामाजिक नाटकांत महत्त्वाचे आहे. नेहमीचा प्रेमाचा सांकेतिक त्रिकोण व काहीसा आदर्शवाद हे दोष असले तरी खेड्याचे बदलते चित्र या नाटकांतून स्पष्टपणे उभे करण्यात लेखकाला यश आले आहे.

ऊर्मिला दळवी

**जीवन आणि साहित्य : भागवत, ज. स. प्रकाशक : सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, मुंबई, १९४४.** इ. स. १९३५ ते १९४१ या कालखंडात लोकशिक्षण दलित सेवक, लोकशक्ती इत्यादी नियतकालिकांत प्रसंग परत्वे लिहिलेल्या एकतीस लेखांचा संग्रह या लेखांचे विषय असे : रवींद्र दर्शन, कालिदास गौरव साहित्याचे जीवनातील स्थान, जीवन आणि रंगभूमी, भारतीय संस्कृती, ध्येयवादी जीवन, श्यामची आई हे पुस्तक इत्यादी प्रस्तुत संग्रहातील लेख विषयाचे सांगोपांग विवेचन करणारे व माहितीपूर्ण आहेत. लेखांतील विवेचनाला सहानुभूति रसिकता व लेखकाच्या व्यासंगशीलतेची जोड मिळाली आहे.

सुधा कापरे

**जीवनकथा : चापेकर, ना. गो. प्रकाशक : आर्यसंस्कृती मुद्रण, पुणे, १९४३.** 'जीवनकथा'हे ना. गो. चापेकरांचे आत्मचरित्र. ब्रिटिश आमदानीतील लोकप्रिय न्यायाधीश, समाजेतिहासाचे व्यासंगी ग्रंथकार आणि साहित्य क्षेत्रातील कर्ते धुरीण अशा विविध नात्यांनी ग्रंथकार वाचकांना परिचित असल्यामुळे त्यांच्या 'जीनवकथे'ला वाचनीयतेबरोबर संदर्भमूल्यही प्राप्त झाले आहे. सहा खंडांत ही 'जीवनकथा' संथ, सरळपणे विस्तारित होते. शेवटी पत्रव्यवहार आणि लेखकाच्या ग्रंथांवरील अभिप्राय यांनी बरीच पृष्ठे व्यापिली आहेत. लेखकाची प्रांजळबुद्धी, सश्रद्ध मन आणि सर्वच व्यवहारातील नेमस्तवृत्ती या तीन गुणांचे मनोज्ञ दर्शन ठसठशीतपणे घडते. पारंपरिकता आणि आधुनिकता या दोन्ही दृष्टींचा आढळ चापेकरांच्या लेखनात होतो. न्यायमूर्ती रानडे यांच्या परंपरेत शोभणाऱ्या एका समाजाभिमुख कर्तृत्ववान व्यक्तीचे व त्याचबरोबर एका सुखवस्तू मध्यमवर्गी चित्पावनी कुटुंबाचे चित्रण या दृष्टीने प्रस्तुत 'जीवन कथा' साहित्य आणि समाजविषयक चळवळींच्या अभ्यासकांना मार्गदर्शक ठरेल.

म. श्री. दीक्षित

**जोगवा : आरती प्रभू (चि. त्र्यं. खानोलकर). प्रकाशक : मौज प्रकाशन, मुंबई, १९५९.** 'जोगवा' या संग्रहातल्या ९४ कवितांपैकी बव्हंशी कवितांत आरती प्रभूंनी जीवनाशी संबंध असलेल्या विविध पातळ्यांवरील दु:खाविषयीची जाणीव व्यक्त केलेली आहे. या कवितांचे स्वरूप 'सामाजिक' नाही. दु:खाची जात 'रोमँटिक' (सौंदर्यवादी काव्यातील दु:खाची) आहे. त्यामुळे आपले दु:ख मोठे मानणे, ते निसर्गावर आरोपित करणे व दु:खमग्न राहणे या गोष्टी या संग्रहात आढळतात. तसेच आत्मनिर्भत्सना, आत्मघृणा किंवा अहंकार हे सौंदर्यवादी मनोवृत्तीचे विशेषही या संग्रहात आढळतात. हे दु:ख अमूर्त प्रतिमांच्या साह्याने किंवा निसर्ग प्रतिमांच्या साह्याने व्यक्त होते. मर्ढेकरांच्या नंतरच्या कवितेचा काही प्रमाणात संस्कार असूनही स्वत: खानोलकरांच्या वेगळ्या शैलीचा ठसा या संग्रहातील कवितांवर दिसून येतो.

प्रभा गणोरकर

**जोगिया : माडगूळकर, ग. दि. प्रकाशक : कुलकर्णी, ग्रंथागार, १९५६.** 'जोगिया'तील कविता म्हणजे ग. दि. माडगूळकरांनी केलेली विविध रूपिणी काव्यनिर्मिती आहे. राष्ट्रपुरुषांविषयीचा श्रद्धाभाव, सातार्‍याच्या क्रांति-पर्वामधील हृदयस्पर्शी प्रसंग, ग्रामीण निसर्ग, तेथील व्यक्ती त्यांच्या बद्दलची ओढ, संत आणि शाहीर यांच्याबद्दलचा आदर ही माडगूळकरांच्या कवितेची काही आकर्षणे. थोडी प्रेमकविता, एक उपहासात्मक दीर्घकाव्य, दोन श्रुतिका यांचाही येथे समावेश झाला आहे.

ही बहुतेक कविता कथानकप्रधान, निवेदनपर, वस्तुनिष्ठ आहे. तिची शैली प्रसादपूर्ण, चित्रदर्शी व नाट्यपूर्ण आहे.

कृ. ब. निकुंब

**जोसेफ मॅझिनी आत्मचरित्र आणि राजकारण : सावरकर, विनायक दामोदर. प्रकाशक : बाबाराव सावरकर, पहिली आवृत्ती, १९०७. दुसरी आवृत्ती मुद्रक : वि. पु. भागवत, मौज मुद्रणालय.** जोसेफ मॅझिनीच्या आत्मचरित्राचे वि. दा. सावरकर यांनी केलेले भाषांतर. मॅझिनीच्या राजकीय विचाराने प्रभावित झालेल्या सावरकरांनी मॅझिनीच्या आत्मचरित्र आणि राजकारण ह्या लेखाचे मराठी भाषांतर १९०६ मध्ये केले. इंग्लंडमधील त्यांच्या वास्तव्यानंतर ते मायदेशी पाठविले.

या पुस्तकाचे वैशिष्ट्ये म्हणजे सावरकरांनी लिहिलेली २६ पृष्ठांची प्रदीर्घ विश्लेषक प्रस्तावना होय. सावरकरांनी देशी क्रांतीकारकांचा आत्मविश्वास आणि त्यांची कार्यप्रवणता वाढावी या उद्देश्याने ही प्रस्तावना लिहिलेली आहे. या प्रस्तावनेतील 'इटली' या शब्दाऐवजी 'इंडिया' हा शब्द वाचला की या प्रस्तावनेतून सावरकरांना जो उपदेश करायचा होता तो स्पष्ट होतो. इतकी सूचक, कूट, लाक्षणिक आणि स्फूर्तिप्रद प्रस्तावना आहे.

मॅझिनच्या राजकीय तत्त्वज्ञानाचे स्पष्ट रूप आपणाला या आत्मचरित्रातून कळून येते. हे आत्मचरित्र २८३ पृष्ठांचे असून त्यामध्ये भाग-१ आत्मचरित्र खंड-१, भाग-२ तरूण इटली, भाग-३ आत्मचरित्र खंड-२, भाग-४-आत्मचरित्र खंड-३, व भाग-५ वा गनिमीकाव्याचे नियम व खंजिराची उपपत्ती असा तपशील आला आहे.

हा ग्रंथ १८५७ पासून १९४६ पर्यंतच्या सर्व भारतीय क्रांतीकारकांना अर्पण केला असून ग्रंथावर इंग्रज राजवटीत बंदी घालण्यात आली होती. पुढे ती मुंबई सरकारचे मुख्य प्रधान बाळासाहेब खेर यांच्या अधिकारातील काँग्रेस मंत्रिमंडळाने उठविली.

यशवंत चव्हाण

**झेंडूची फुले : अत्रे, प्रल्हाद केशव. प्रकाशक : सारस्वत प्रकाशन मंडळ, पुणे, १९२५.** प्रस्तुत विडंबन काव्यामुळे 'विडंबनाला' मराठी वाङ्मयामध्ये स्वतंत्र स्थान मिळाले. या संग्रहाला स. ग. मालशे यांची दीर्घ प्रस्तावना आहे. त्यात विडंबनाच्या इतिहासापासून विडंबन केलेल्या मूळ कवितांचे, कवींचे संदर्भ स्पष्ट केलेले आहेत. काही आवृत्यांची मुखपृष्ठे, साहित्याचार्य तात्यासाहेब कोल्हटकर यांचे पत्र-आणि 'मी विडंबनकार कसा झालो ?' हा अत्रे यांचा लेख इत्यादी गोष्टींचा या संग्रहात समावेश आहे. १९२० सालच्या सुमारास आत्मप्रतिष्ठेसाठी धडपडणाऱ्या कवीमधील प्रतिस्पर्धा पाहून अत्रे यांनी त्यांच्यावर केलेले विनोदी भाष्य म्हणजेच 'झेंडुची फुले' या संग्रहात पंचवीस प्रकरणे असून पहिले गद्यात्मक व बाकी सर्व पद्यात्मक आहेत. विशेषत: आपले दैवत असणाऱ्या गडकऱ्यांवरील टीका हाणून पाडणे हा हेतूही या विडंबनामागे होता. अत्रे यांनी 'कवी आणि चोर?', 'आम्ही कोण?', 'कवी आणि कारकून' इत्यादी कवितांमधून चालचलाऊ कवींची हजेरी घेतली आहे. मृत्यू, आई यांसारख्या विषयांवर ठरवून दोघांनी/अनेकांनी कविता रचण्याची रविकिरण मंडळातील कवींची ट्रम 'रस्त्यावर पडलेले विडीचे थोटुक' यातून समोर येते. रामदासी श्लोकांसारखी रचना करून अवगुणांचा उत्कृष्ट उपहास साधला आहे. उदा.

"सदा खाद्यपेयावरील हात मारी
बिले देइ सारून मित्रासमोरी
अरेरे, घरी राहिले आज पैसे-"
खिसे चांचपोनी मना बोल ऐसे!

उत्तरार्धात काँग्रेसचे नेते - विशेषत: महाराष्ट्रीय काँग्रेस नेते आणि त्यांच्या राज्यात लोकांचे चाललेले हाल हे विडंबन विषय आहेत. 'बायको सासरी आल्यानंतर', 'एका पावसाळी' अशा रचना निखळ विनोदी आहेत. शेवटी विडंबनाची निमित्ते विसरली तरी श्रेष्ठ विनोदबुद्धीमुळे झेंडूची फुले आठवतील असा विश्वास व्यक्त केला आहे.

**टाकांच्या फेकी : किर्लोस्कर, शं. वा. व फडके, ना. सी. प्रकाशक : किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी, जि. सातारा, आवृत्ती तिसरी, १९४९.** 'किर्लोस्कर मासिकाचे संपादक, साहित्यिक शं. वा. किर्लोस्कर यांचा चित्रपुस्तकाचा एक अभिनव प्रयोग म्हणून या पुस्तकाकडे पाहिले जाते. डाव्या

बाजूच्या पानावर चित्रकार शं. वा. किर्लोस्करांनी काढलेली नेटकी, कल्पक चित्रे आणि उजव्या बाजूला कादंबरीकार ना. सी. फडके यांचे चित्राच्या अनुषंगाने शैलीदार भाष्य असे या पुस्तकाचे स्वरूप आहे. अशा प्रकारचे मराठीतील हे पहिलेच पुस्तक असून इसापनीतीच्या धर्तीची कल्पना मनात आणून व्यक्तिमत्त्व घडणीस योग्य असा मौलिक बोध देण्याचा हा एक यशस्वी प्रयत्न आहे.

यातील चित्रे आणि चित्राबरील भाष्य दोन्हीही सरस आहेत. 'संसाराची चाळण' चित्रात, तुम्ही स्वतः सामर्थ्यवान असाल तर या चाळणीत तुमचा टिकाव लागेल. नाहीतर गळून जाल 'मनोविकारा'चा घोडा उधळला की तो कोठे नेऊन टाकेल त्याचा अंत नाही. त्यावर सावधपणे निग्रहाने मांड ठोकून बसले पाहिजे. किंवा 'अकारण' भीतीचे एकपट सावट दसपट मोठा बागुलबोवा दाखवते, हा भेकडपणाचा आरसा प्रथम फेकला पाहिजे. असा साध्या पण मनोघडणीस, नित्याच्या जीवनात उपयुक्त अशा बोधक सूचना देत करमणुकीतून शिकवण देणारे हे सचित्र पुस्तक अबालवृद्धास उपयुक्त असे आहे.

पुस्तकात ८७ चित्रे असून किर्लोस्करांची चित्रे आणि फडक्यांचे भाष्य याची चांगली जुगलबंदी जमल्याचे जाणवते. कल्पक चित्रयोजना आणि सरस भाष्य यांचा मेळ साधून केलेला एक अभिनव प्रयोग म्हणून हे पुस्तक पाहण्यासारखे आहे.

मोहन पाटील

**टिळकांची कविता : (पुस्तक पहिले) टिळक, (रेव्ह.) नारायण वामन. प्रकाशक व संपादक : भास्कर कृष्ण उजगरे, पुणे, १९१४.** मराठी काव्यात केशवसुत, रे. टिळक, विनायक, गोविंदाग्रज आणि बालकवी यांचा ' आधुनिक कविपंचक ' म्हणून उल्लेख करण्यात येतो.

आधुनिक कवितेमध्ये टिळकांची कविता उल्लेखनीय आहे. मवाळ वृत्तीचा मानवतावादी ईश्वर श्रद्धाळू कवी म्हणून त्यांना ओळखले जाते. ' मुलां-फुलांचे कवी ' म्हणून जरी त्यांचा उल्लेख होत असला तरी त्यांच्या काव्यविश्वामध्ये-काव्यविषयक, वैयक्तिक भावनिष्ठ, उपरोधात्मक, स्वदेश व स्वातंत्र्य ओढ व्यक्त करणाऱ्या तसेच जीवन चिंताजनक इत्यादी विषयांवरील कविता आढळतात. काव्याचे स्वरूप अतिसोज्वळ आणि उदात्त असून काव्यशैली साधी, सुबोध मऱ्हाटमोळी आहे.

१८८५ ते १९२० या पस्तीस वर्षांत नवीन पद्धतीने रचना करणाऱ्या दोन पिढ्या होऊन गेल्या. यांतील केशवसुत आणि समकालीन यांची पिढी होय. यात ना. वा. टिळक, माधवानुज, दत्त, विनायक, लक्ष्मीबाई टिळक इत्यादी कवींचा प्रामुख्याने समावेश होतो. दुसऱ्या पिढीमध्ये गोविंदाग्रज, रेंदाळकर, बी, बालकवी इत्यादींचा समावेश होतो. या दोन्ही पिढ्यांच्या कालखंडात कवी रे. टिळक हे रचना करीत होते.

केशवसुतांपेक्षा रे. टिळक आरंभी बहुतेक पारंपरिक काव्य रचनाच करीत, परंतु तेही पुढे भावगीत संप्रदायाकडे वळलेले दिसतात.

भरतेश्वर पाटील

**डाक बंगला : माडखोलकर, गं. त्र्यं. नागपूर, १९४२.** बड्या युरोपियन आणि हिंदी अधिकाऱ्यांचं तसेच व्यापारी प्रतिनिधींचं स्वैर संचार, विश्रांती आणि रंगेलपनाचं सुखनिधान ही डाक बंगल्याची वैशिष्ट्यपूर्ण महती लक्षात घेऊन लिहिलेली १०६ पृष्ठांची छोटेखानी कादंबरी.

कादंबरीला जोडलेल्या प्रस्तावनेत 'ही एक दीर्घकथा आहे' असा स्पष्ट उल्लेख आढळतो. कादंबरीचा विषय अतिशय वरवरचा, उथळ असून 'कांचन' नावाच्या एका अभागिनीची शोकांतिका यात कथन केली आहे. प्रारंभ 'कांचन'च्या मृत्यूने दाखवून पुढच्या प्रकरणातील तिची जीवन कहाणी लेखक धक्कातंत्राने सांगत जातात.

'कांचन' या नायिकेविषयी वाचकांच्या मनात अनुकंपा वाटावी म्हणून घटना प्रसंगातून क्लृप्तीप्रधानता आणण्याचा हव्यास, कमालीची तांत्रिकता या बाबी कादंबरीत आढळतात.

एका वेगळ्या विषयावरील कादंबरी लेखनाचा प्रयत्न.

मोहन पाटील

**डॉ. आनंदीबाई जोशी चरित्र व पत्रे : कानिटकर, काशीबाई. प्रकाशक : मनोरंजन ग्रंथप्रसारक मंडळी, पुणे, १८९१.** आनंदीबाई जोशी यांचे चरित्र व त्यांनी लिहिलेली पत्रे यांचा समावेश असलेले पुस्तक. ज्या काळात स्त्री-शिक्षण दुर्लभ होते त्या काळात वैद्यकीय शिक्षण घेण्यासाठी विशीच्या आत परदेशगमन करून आलेल्या एका मराठी विवाहित स्त्रीचे एका तिशीतील मराठी स्त्रीने—काशीबाई कानिटकर यांनी लिहिलेले चरित्र म्हणून या पुस्तकाचे मोल आहे. काशीबाईंनी चरित्रनायिकेची व्यक्तिरेखा अत्यंत सहानुभूतीने रेखाटली आहे. पत्नीला एम.डी. होण्यासाठी परदेशी पाठवणारे गोपाळराव, गोपाळ आनंदीबाईंचे सहजीवन, आनंदीबाईंचा अमेरिकेतील साधासुधा, स्वाभिमानी कष्टाळू जीवनक्रम, त्यांना सदैव उपयोगी पडणाऱ्या सहृदय कारपेंटरबाई, पत्नीच्या भेटीसाठी गोपाळरावांनी केलेला खडतर प्रवास आणि त्यांनी पत्नीच्या अंतापर्यंत तिची केलेली सेवाशुश्रूषा इत्यादींचे सहानुभूतीपूर्ण निवेदन काशीबाई कानिटकरांनी केले आहे. त्यासाठी संबंधितांच्या पत्रांचा आधार चरित्र लेखिकेने घेतला आहे.

म. श्री. दीक्षित

**डॉ. केतकर : गोखले, द. न. प्रकाशक : भागवत वा. पु., मौज प्रकाशन गृह, मुंबई, पहिली आवृत्ती, १९५९.** चरित्राच्या प्रारंभी लेखकाचे छोटेखानी निवेदन असून प्रत्यक्ष चरित्रामध्ये बालपण, गीते आणि भराऱ्या, अमेरिकेतील विद्याव्यासंग, मायभूमीच्या वाटेवर, ज्ञानकोशास प्रारंभ, लग्नमाळ, बहुरूपी ज्ञानकोशकार अशी एकूण १५ प्रकरणे आहेत.

डॉ. केतकर यांच्या बहुमिती बहुरंगी व्यक्तिमत्त्वात कित्येक परस्परविरोधी भासणाऱ्या रंगछटा मिसळलेल्या होत्या. अशा चरित्रनायकाच्या व्यक्तिमत्त्वाचे चित्र त्यांच्या जीवनातील विविध

प्रसंगांच्या पार्श्वभूमीवर जसे प्रतिती होईल तसे प्रामाणिकपणे चित्रित करण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. तसेच केतकरांनी केलेल्या वाङ्मयीन कार्याचा यथायोग्य परिचयही या चरित्रात करून दिला आहे.

चरित्रग्रंथात डॉ. केतकरांच्या कुटुंबाची छायाचित्रेही दिली आहेत. डॉ. केतकरांचे जीवन व कार्य समजावून घेण्याच्या दृष्टीने उपयुक्त चरित्रग्रंथ.

यशवंत चव्हाण

**तरुणीशिक्षण नाटिका अथवा आधुनिक तरुणीशिक्षण व स्वातंत्र्य यांचे भविष्यकथन : कानिटकर नारायण बापूजी. प्रकाशक : कृ. बा. पांडे, पुणे, १९८६.** समाजसुधारक आणि सुधारणा यांची चेष्टा करणारे नाटक. दिखाऊ इंग्रजी शिक्षणाने व स्त्रीस्वातंत्र्याने स्त्रिया बहकतील, मद्यपान व सार्वजनिक नृत्यगृहे यांतून बेताल नाचायला लागतील, प्रेमविवाह करतील, वल्लभाबरोबर पळणे त्यांना गोड वाटेल. अशा प्रकारच्या आशंकेतून नाटकाची निर्मिती झालेली दिसते. पाश्चात्त्य आचरणाच्या अनुकरणाचे यथेच्छ व भडक विडंबन यात आढळते. नव्या शिक्षणाने नवी पिढी षंढ व नादान बनेल हे नाटककाराचे भाकित. 'केसरी' ने महिनाभर सतत प्रखर टीका करून या नाटकाचे वाभाडे काढले. 'विविधज्ञानविस्ताराने' 'शिमग्याची भेट', 'हलकटपणाची परमावधी' या शब्दाने त्याची बोळवण केली. पण तत्कालीन समाजाने खूष होऊन पुण्याच्या पुष्करिणी हौदाजवळ राहणाऱ्या कानिटकरांना 'पुष्करिणी शेक्सपिअर' ही उपाधी देऊन त्यांचा गौरव केला.

भीमराव कुलकर्णी

**तलावातले चांदणे : गाडगीळ, गंगाधर. प्रकाशक : लाखानी बुक डेपो, मुंबई, १९५४.** सुखवादाला प्राधान्य देऊन ललित साहित्यातून वास्तवाऐवजी स्वप्नरंजनाचाच आविष्कार घडवणाऱ्या १९२० ते १९४५ या काळातील मराठी कथेची कोंडी फोडून कला, वाङ्मय या विषयीचे नवे सिद्धान्त नव्या आशय अभिव्यक्तासह प्रस्थापित करणाऱ्या नवकथाकारांच्या रांगेतील एक महत्त्वाचे कथाकार; आणि समीक्षक म्हणून परिचित.

'खडक आणि पाणी', 'साहित्याचे मानदंड', 'पाण्यावरील अक्षरें', 'आजकालचे साहित्यिक' हे समीक्षाग्रंथ त्यांचे प्रसिद्ध असून वादविवादाच्या स्वरूपाचे लेखन करून गाडगीळांनी साहित्यविषयक प्रश्नांचा शोध आपल्या विश्लेषक बुद्धीने आणि रसिकवृत्तीने या ग्रंथातून घेतलेला आहे.

लोकमान्य टिळकांवरील 'दुर्दम्य' ही चारित्रपर कादंबरी, 'आर्थिक नवलकथा' 'बंडू' इत्यादी त्यांची इतर साहित्य संपदा प्रसिद्ध असून प्रामुख्याने नवकथाकार म्हणून मराठी वाचकांना ते अधिक परिचित आहेत.

या संग्रहातील कथांत व्यक्ती आणि समाज, नियती आणि जगण्याची ओढ, यातील ताणतणावाची चित्रे नव्या रूपक, प्रतिमांच्या योजनेतून त्यांनी रेखाटली असून ती मानवी जगण्याला विश्लेषक परिमाण देतात. 'माणूस, पेटी आणि कासव' यातील संघर्ष चित्रण, 'आमची सोनी गाय' मधील तटस्थ मिस्किलपणा, तसेच अनुभूतीचा वेगळा आविष्कार घडवणाऱ्या 'तलावातले चांदणे', 'गढूळ पाणी' या कलात्मकदृष्ट्या महत्त्वाच्या त्यांच्या कथा या संग्रहात समाविष्ट आहेत.

घटनेपेक्षा व्यक्तिच्या मनातील सूक्ष्म व्यापारावर लक्ष केंद्रित करून एक गोळीबंद एकसरे मांडणारी ही अनोखी कथा अभ्यासनीय आहे.

**तांबडी माती : मर्ढेकर, बा. सी. प्रकाशक : दा. ना. मोघे प्रकाशन, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर, १९४३.** मराठीतील पहिले नवकवी आणि कलावादी भूमिकेची अभिनव मांडणी करणारे समीक्षक म्हणून बा. सी. मर्ढेकर परिचित आहेत. कादंबरी लेखनात संज्ञाप्रवाही पद्धतीचा प्रयोग करणारे कादंबरीकार म्हणून त्यांचा परिचय मराठी रसिकांना आहे. त्यांच्या 'रात्रीचा दिवस' (१९४२), 'तांबडी माती' (१९४३), आणि 'पाणी' (१९४८) या कादंबऱ्या मराठी कादंबरीच्या प्रवाहात वेगळेपणाने उठून दिसतात.

'ताबंडी माती'या कादंबरीत पुढीलप्रमाणे कथानक येते— कोंडीबा शेतकऱ्याचा मुलगा शिवा हा ग्यानू पहिलवानाला कुस्तीत चित करतो; त्याचे सारजाशी लग्न होते; दुसऱ्या महायुद्धात तो भरती होतो. सारजा माहेराहून सासरी येत असताना तिला कुणीतरी पळवते. कॉ. कुमार नावाचा एक माणूस सुलभा लिखिते नावाच्या विलासी विधवा स्त्रीवर बलात्कार करतो. कुमारविषयीच्या तिरस्काराने भारलेली सुलभा त्यानंतर गर्भपात करून घेऊन फौजी दवाखान्यात जखमी सैन्यांची सेवा करीत राहते.

'ताबंडी माती'च्या प्रस्तावनेत मर्ढेकर म्हणतात, "या लिखाणातून एखादी क्रांतिकारक विचारसरणी प्रसृत करण्याची किंवा समाजाला प्रगतीच्या मार्गावर पाऊल पुढे टाकायला लावण्याची माझी महत्त्वाकांक्षा नाही... फक्त जीवनाच्या एका पाऊलवाटेवर भावनांची काही विरोधसादृश्ये दृष्टिपथात आली त्यांच्या नमुन्यानुसार कल्पनेच्या मार्गावर शब्दांच्या धाग्यादोऱ्यांनी हे कथानक विणले एवढेच." शिवाय 'रात्रीचा दिवस' या कादंबरीच्या प्रस्तावनेत त्या कादंबरीची परीक्षा विचारनिष्ठ तर्कमूल्यांनी न करता नाट्यमूल्यांनी करावी, ही अपेक्षा व्यक्त करतात. तीच अपेक्षा प्रस्तुत कादंबरीच्या प्रस्तावनेतसुद्धा व्यक्त करताना दिसतात.

प्रस्तुत कादंबरीबद्दल अ. ना. देशपांडे यांनी 'तांबडी माती' मधीलच एक वाक्य उद्धृत करून, "ही कादंबरी वाचल्यानंतर वाचकांच्या मनात भावनाविचारांचा असाच एक 'आकृतिशून्य' 'थर' तयार होणे शक्य आहे"; असा अभिप्राय व्यक्त केला आहे.

आशयाला गौणत्व देऊन संज्ञाप्रवाही पद्धतीचा एक प्रयोग म्हणून 'रात्रीचा दिवस'प्रमाणे याही कादंबरीचा उल्लेख करता येतो.

वि. दा. वासमकर

**तांबे : एक अध्ययन : काळेले, रा. अ. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९५६.** राजकवी भा. रा. तांबे यांच्या काव्याचे साकल्याने प्रथमच केलेले अध्ययन. तांबे यांच्या जीवनवृत्तांतात त्यांच्या काव्याची पार्श्वभूमी व जडणघडण, कवितांचे संकलन व संपादन आणि त्यांच्या काव्याचे विश्लेषण 'वर्ण नसे सौवर्ण', 'पापाची स्मृती राहिली तर', 'ढळला दिन' आणि 'अन्य विषय' या प्रकरणांतून अभ्यासपूर्ण रीतीने येतात. तांबे यांची कविता व जीवन यांचा घनिष्ठ संबंध या प्रकरणातून व्यक्त होतो. 'तांबे यांची कविता पर्यालोचन'मध्ये त्यांच्या काव्यावर माहितीपूर्ण टीपा असून 'तांब्यांची काव्यविषयक मते' व 'शेवटी'मध्ये समारोपात्मक अभिप्राय आला आहे.

तांबे यांच्या कविताविषयक तसेच त्यांच्या समग्र लेखन विषयक सूची यांमुळे व लेखकाच्या सखोल व्यासंग व अभ्यासामुळे तांबे यांच्या कवितेच्या अभ्यासकांना एक उपयुक्त असा हा संदर्भ ग्रंथ आहे.

चंद्रशेखर कपाळे

**तांबे यांची समग्र कविता : तांबे, भास्कर रामचंद्र. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९३५, सातवी आवृत्ती, १९७५.** सदर ग्रंथास प्रकाशकाचे छोटेखानी निवेदन व प्रा. रा. श्री. जोग यांचे 'मधुघटामधील मधू' हे दीर्घ परीक्षण जोडले असून परिशिष्टामध्ये पहिल्या आवृत्तीस लिहिलेली माधवराव पटवर्धन यांची व तिसऱ्या आवृत्तीस लिहिलेली प्रा. बा. गो. मायदेव यांची प्रस्तावना दिलेली आहे. डेमी आकाराच्या या ग्रंथाची पृष्ठसंख्या ३३० इतकी आहे.

या संग्रहात तांबे यांच्या २२५ इतक्या कविता संपादित केलेल्या असून त्यामध्ये त्यांच्या आधीच्या दोन संग्रहातील कविता तसेच काही असंग्रहित व अप्रकाशित कवितांचाही समावेश करण्यात आलेला आहे. कवीच्या समग्र कवितांतून संस्कृत काव्य, समकालीन कवी तसेच इंग्रजी कवीच्या कवितांचा अभ्यासपूर्ण व्यासंग दिसून येतो.

तांबे यांची भावकविता म्हणजे जीवनलहरी आहेत. ते स्वतः आपल्या कवितेविषयी म्हणतात : माझ्या कवितेचा हा एक विशेष आहे की, तिची वाढ 'माझ्या जीवनाच्या संगतीने झाली आहे...' प्रो. मायदेव यांना लिहिलेल्या एका पत्रात ते म्हणतात, 'माझ्या कवितांचा आधार येथून तेथपावेतो समाजाच्या अंतर्बाह्य अवलोकनावर आहे. त्याच्या बुडाशी प्रत्यक्ष प्रसंग फारच कमी, आणि इतर काव्याचा आधार तर अगदीच कमी....'

प्राधान्याने प्रणयात्मक असलेली तांब्यांची कविता निरागस, निकोप, तृप्त वृत्तीची आहे. प्रणयाच्या अनेक नाजूक, लोभस व रमणीय छटा काव्यात प्रकटलेल्या आहेत.

या संग्रहात त्यांची भावगीते, प्रेम भावनेचा उत्कट आविष्कार करणारी कविता, स्त्री जीवनाचा, स्त्री सौंदर्याचा, स्त्री प्रेमाचा वेध घेणारी कविता तसेच शिशुगीतेही आहेत. पण त्याचबरोबर मृत्यूचेही स्वागत अत्यंत रमणीय पद्धतीने करणाऱ्या कविताही आहेत.

संग्रहाला प्रो. मायदेव यांनी लिहिलेल्या प्रत्येक कवितेच्या संदर्भातील टीपा दिल्या आहेत.

**तुकाराम : तिनईकर, द. वि. आणि वढसवकर, शं. वि. प्रकाशक : बाबाजी दौलत राणे, १९१२.** राजापूर नाटक मंडळीचे मालक बाबाजीराव राणे यांनी हे नाटक रंगभूमीवर आणले व गाजविले त्यामुळे ते त्यांच्याच नावावर नमूद झालेले असले तरी त्याचे खरे रचनाकार दत्तात्रय विष्णू तिनईकर व शंकर विनायक वढसवकर हे आहेत.

मंबाजीबुवासारखे साधुत्वाचे सोंग आणणारे ढोंगी व शिवाजीमहाराजांसारखे साधुपुरुषांसमोर नतमस्तक होणारे छत्रपती यांच्या व्यक्तिचित्रांच्या पार्श्वभूमीवर संत तुकारामांचे भक्तिरंगात रंगून गेलेल्या वैराग्यशाली संतकवींचे रसाळ व्यक्तिचित्रण तुकारामांच्या अभंगवाणीचा प्रसंगानुरोधाने केलेला उपयोग नाट्यप्रसंग अधिक उत्कट करणारा आहे. तुकारामांची पत्नी जिजाई हिच्या विरोधी व्यक्तित्वामुळे तुकारामांच्या भक्तिमार्गी जीवनाचा अधिकच ठसा उमटतो. भक्तिरसात भिजलेल्या अभंगांना स्वतंत्रपणे रचलेल्या सुबोध पदांची व नाट्यपूर्ण संवादांची जोड मिळाल्यामुळे नाट्यलेखन प्रभावी झाले आहे.

मु. श्री. कानडे

**तुकाराम चरित्र : पांगारकर, लक्ष्मण रामचंद्र. प्रकाशक : हनुमान छापखाना, पुणे, १९२०.** तुकाराम चरित्र हे पूर्वखंड, मध्यखंड व उत्तरखंड अशा तीन विभागात लिहिले आहे. पूर्वखंडामध्ये मंगलाचरण, कालनिर्णय, पूर्वपीठिका व संसाराचा अनुभव ही प्रकरणे आलेली आहेत.

मध्यखंडामध्ये वारकरी संप्रदायाचे साधनमार्ग, तुकोबांचे ग्रंथाध्यायन, गुरूकृपा व कवित्वस्फुर्ती, चित्तशुद्धीचे उपाय, सगुणभक्ती व दर्शनोत्कंठा आणि श्री विठ्ठलस्वरूप व सगुणसाक्षात्कार या विषयांवर विवेचन आले आहे. हा उपासना खंड तुकोबांच्या वचनाद्वारे विस्तृत लिहिला आहे. यानंतर वारकरी संप्रदायाची सिद्धान्तपंचदशी सांगून एकादशीव्रत, नामसंकीर्तन, सत्संग व परोपकार यांचे महत्त्व व तुकोबांचा पूर्वाभ्यास सांगितला असून पुढे तुकोबांनी कोणत्या ग्रंथांचे अध्ययन कसे केले व त्यातून काय बोध घेतला हे सांगितले आहे.

उत्तरखंडात तुकोबांनी प्रपंचाची होळी करून परमार्थ साधला म्हणजेच अल्प क्षणिक सुखाचा त्याग करून अखंड अविनाशी सुख जोडले व ते नारायणस्वरूपच झाले असे म्हटले आहे. ते सदेह वैकुंठाला गेले या कथेवर विश्वास बसत नसेल त्यांनी ; निदान त्यांच्या अभंगांचा तरी विश्वास व आदर बाळगून अध्ययन करावे असे चरित्रकार सांगतात.

सुधा कापरे

**तुकारामबोवा : भिडे, बाळकृष्ण अनंत. प्रकाशक : के. के. ढवळे, १९०८.** बाळकृष्ण अनंत भिडे यांनी लिहिलेले हे तुकाराम चरित्र. 'सरस्वती मंदीर' मासिकातून प्रसिद्ध झाले. अशाच प्रकारचे वामन पंडित व मुक्तेश्वर यांच्याबरही त्यांनी लेख लिहिले. संतांची चरित्रे ऐतिहासिक दृष्टीने त्यांच्या काव्यातील आत्मपर उद्‌गारांचा योग्य उपयोग करून चिकित्सक पद्धतीने आणि विवेचकतेने लिहावीत असे भिडे यांचे मत होते. प्रस्तुत चरित्र त्याच पद्धतीने लिहिलेले आहे.भाविकांनी लिहिलेल्या, चमत्कारांनी भरलेल्या चरित्रापेक्षा हे लहानसे चरित्र निश्चितच निराळे आहे.

मा. कुलकर्णी

**तुकारामहाराज यांचे संतसांगाती : बेंद्रे, वासुदेव सीताराम. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९५८.** श्री. वासुदेव सीताराम बेंद्रे इतिहाससंशोधक या नात्याने महाराष्ट्राला ज्ञात आहेत. त्यांचे वीस ग्रंथ प्रसिद्ध असून प्रत्येक ग्रंथामागे त्यांची संशोधकवृत्ती व व्यासंग दृष्टोत्पत्तीस येतो. तुकाराम चरित्राची साधने गोळा करत असताना तुकाराम चरित्रापूर्वी या संदर्भातील काही ग्रंथ प्रकाशित करण्याच्या योजनेतून या ग्रंथाची निर्मिती झाली आहे. तुकाराम महाराजांशी संबंधित आणि त्यांचे समकालीन या व्यक्तींवर हा ग्रंथ आहे. एकूण तेवीस व्यक्तिंच्यावर या ग्रंथात लेखन असून प्रास्ताविक व उपसंहार याबरोबर संकीर्ण या शीर्षकाचेही एक प्रकरण या ग्रंथात आहे. तुकारामशिष्या बहिणाबाई, मंबाजी गोसावी यांच्यावरील मजकूर साधार विवेचनासह दिलेला आहे. विशेषत: बहिणा-बाईच्या शिष्यत्वाबद्दलचा वाद मंबाजी गोसावी यांचे खलनायकपण यावर विवेचन आहे. 'तुकाबांच्या चारित्र्याची व त्यांच्या संतसांगातींच्या आचारविचारांची सत्य कल्पना येण्याकरिता' सदर ग्रंथाची निर्मिती केली आहे असे प्रतिपादन लेखकाने 'उपसंहार' प्रकरणांत दिले आहे. यासाठी त्यांनी निरनिराळया संशोधन ग्रंथालयातून ग्रंथ मिळवून व पूर्ण संशोधनांती हा ग्रंथ लिहिला आहे. तुकारामांच्या अभ्यासकांना हा एक उपयुक्त ग्रंथ आहे.

**तुझे आहे तुजपाशी : देशपांडे, पु. ल. प्रकाशक : ग. पा. परचुरे प्रकाशन मंदिर, गिरगाव, मुंबई-४, आवृत्ती पहिली, जानेवारी १९५७, आवृत्ती नववी, मार्च १९७२.** 'तुझे आहे तुजपाशी' हे पु. ल. देशपांडे यांचे विलक्षण लोकप्रिय नाटक. हिंदी प्रदेशातल्या एका भूतपूर्व संस्थानिकांच्या-इंदूरच्या देवासकराच्या वाड्याच्या दिवाणखान्यात हे नाट्य घडते.

काकाजी-आचार्य, श्याम-गीता, उषा-सतीश या जोड्या म्हणजे परस्पर विरोधी व्यक्तिमत्त्वांचा संघर्ष-त्यातून नाटक फुलत जाते ; वासू अण्णा, जगन्नाथ भिकू आणि अति विशाल महिला मंडळ ही गौण पात्रे.

रसिकपणे, दिलदारपणे जीवन उपभोगावे आणि माणुसकी टिकवावी असे सांगणारी काकाजींची व्यक्तिरेखा, तर करड्या वृत्तीने संयमाचा आग्रह धरीत जीवन संघर्षापासून पलायनवादी भूमिका घेणारे आचार्य या दोघांमधील नाट्य बहारदार-अखेरीस आचार्यांचे प्रांजळ आणि कठोर आत्मपरीक्षण, परिवर्तन. 'मानवा, तुझे सुख तुझ्या मनातच लपलेले आहे' असे सांगणारी ही नाट्यकृती.

बाह्यांगी विलक्षण विनोदी पण काकाजी-आचार्य या व्यक्तिरेखांमधून निर्माण होणारे विनोद-कारूण्य यांचे अनोखे मिश्रण. सभ्यतेला, सुसंस्कृततेला जराही धक्का न लावता नाटकात सतत खेळकर वातावरण.

काव्यात्म संवाद, संभाषण खरीखुरी वाटणारी, अनौपचारिक, कधी-कधी गप्पासारखी असली तरी कथानकाचं सूत्र धरून ठेवणारी. शब्द, प्रसंग, स्वभावनिष्ठ विनोद-कोटी याचा पुरेपूर वापर हिंदी मिश्रित मराठीची मोहक खुशबू दरवळणारी काकाजीभाषा; क्षिप्रेचा किनारा, पाताळपाणी इत्यादी भौगोलिक संदर्भ.

या नाट्यकृतीचे नाट्यमूल्य आणि प्रयोगमूल्य उच्चदर्जाचे. प्रस्तुत नाटकाचे हिंदीमधून 'कस्तुरी मृग'या नावाने भाषांतर प्रसिद्ध ; व त्याच नावाने काही नाट्यप्रयोगही.

भरतेश्वर पाटील

**तृणाची वेदना : कुलकर्णी, तु. शं. प्रकाशक : मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद, १९५५.** नवकथेच्या प्रभावाखाली लिहिलेल्या कथांचा संग्रह. दु:खी माणसाबद्दल अपार सहानुभूती, मध्यमवर्गीयांची विरणारी स्वप्ने व त्यांचे रागलोभ आणि बेचैनी यांची चित्रणे या कथांतून आली आहेत. 'खुराडे', 'छायास्मृती'सारख्या कथांतून मध्यमवर्गीय जीवनाचे स्तर व्यक्त होतात. तसे रात्री पोटासाठी वाईट धंदे करणाऱ्यांचीही चित्रे येतात. लेखकाची शैलीही नवकथेशी मिळतीजुळती आहे.

प्रल्हाद वडेर

**तोतयाचे बंड : केळकर, नरसिंह चिंतामण. प्रकाशक : अच्युत चिंतामण भट, १९१३.** नरसिंह चिंतामण केळकर यांचे ऐतिहासिक गद्य नाटक. १७६१ च्या पानिपतावरील लढाईत बेपत्ता झालेल्या भाऊसाहेबांचा तोतया बनून सुखानिधान महाराष्ट्रात आल्यावरची हकिकत कथानकात मांडली आहे.

भाऊसाहेबांची पत्नी पार्वतीबाई हिच्या पतीच्या जिवंत असल्यावरील विश्वास आणि तोतयाच्या संकटाचे निवारण

कसे करावे याची नाना फडणीसांना पडलेली चिंता याचे उत्कृष्ट चित्रण नाटकात झाले आहे. पार्वतीबाईंची पतिनिष्ठा, प्रत्यक्ष भेटीची इच्छा यातून नानांनी मुत्सद्दीपणाने आणि चतुराईने काढलेला मार्ग ह्यांचे दर्शन घडविताना, हैबतराव, सुखनिधानाची पत्नी अमला, बंगभट इत्यादी काल्पनिक पात्रांची जोड दिली आहे. खटकेबाज संवाद, अस्सल मराठी वळणाची भाषा, तणावपूर्ण वातावरण हलके करण्यासाठी आणलेला विनोद या सर्वच बाबी कौशल्यपूर्ण असल्याने नाटक रसिकमान्य झाले.

या नाटकाची तिसरी आवृत्ती, १९३१ मध्ये स. रा. सरदेसाई यांनी प्रकाशित केली. पुढे १९६९ मध्ये सुविचार प्रकाशन मंडळ यांनी एक तीन अंकी शालेय आवृत्ती केळकरांचे कर्तृत्व विशद करणाऱ्या प्रस्तावनेसह प्रसिद्ध केली.

वीणा देव

**थोरले (पहिले) माधवराव पेशवे : कीर्तने, विनायक जनार्दन. प्रकाशक : इंदूप्रकाश छापखाना, मुंबई, प्र. आ. १८६१, नवी आवृत्ती, १८७६.** हे मराठी रंगभूमीवर आलेले पहिले पुस्तकी नाटक. कीर्तने यांनी हे नाटक कॉलेजमध्ये शिकत असतानाच लिहिले असून ५६ पृष्ठांच्या या छोटेखानी नाटकाचे चार अंक असून त्यात एकंदर २२ प्रवेश आहेत. नाटकाचा प्रारंभ पौराणिक नाटकातील सूत्रधार-विदूषक यांच्या प्रवेशाने होतो. परंतु कीर्तनेंनी पौराणिक नाटकातून या दुकलीच्या तोंडी येणारे विनोदी, बाष्कळ संवाद टाळून वेगळेच बाणेदार संवाद घातले आहेत त्यात नावीन्य आहे. "मराठी राज्य केवळ लुटारू होते असे नाही. काही शहाण्यांची अशी समजूत आहे. माधवराव पेशव्यांच्या राज्यात कसे होते ते सांगतो." असे सूत्रधार बोलतो आणि नाटकाला प्रारंभ होतो तो माधवरावांना सातारच्या राजाराम महाराज यांचेकडून पेशवाईची वस्त्रे मिळतात तिथपासून.

नाटककाराने या छोट्या नाटकात दाटीवाटीने माधवरावांची मृत्यूपर्यंतची सारी कारकीर्द, रमाबाईंचे सती जाणे असे सगळे ठळक प्रसंग आणले आहेत. त्याचबरोबर, रघुनाथराव, आनंदीबाई, त्रिंबकमामा, रामशास्त्री, सखारामपंत, महादजी शिंदे, तुकोजी होळकर आणि माधवरावांच्या पत्नी रमाबाई या ऐतिहासिक व्यक्तींच्या भावछटा स्पष्ट करण्याचाही प्रयत्न केलेला आहे. नाटकात राजाराम यांच्या तोंडी सातारी ग्रामीण बोली भाषेतील संवाद असून, निंबाळकर, सरदार शिपाई वगळता, रघुनाथराव वगैरे पेशव्यांच्या तोंडचे संवाद अस्खलित मराठी आहेत. ते खटकतील म्हणूनच की काय प्रस्तावनेत बाळाजी बापू साने यानी '.....ग्रंथकर्त्याचा उद्देश मराठी दरबाराचे वास्तविक स्वरूप दाखवण्याचा आहे. त्यापेक्षा पात्रानुरूप भाषाही बदलने अवश्य पडले.' असे आधीच म्हणून ठेवले आहे.

मराठी नाट्यसृष्टीला संगीतविहीन, स्वतंत्र गद्य नाटकाचे वळण देणारा महत्त्वाचा प्रयत्न, हे या नाटकाचे वैशिष्ट्य.

मोहन पाटील

**दंडधारी : नेवाळकर, दा. वि. प्रकाशक : मनोहर छापखाना, पुणे, १९०९.** दा. वि. नेवाळकर यांचे सुधारक-सनातनी या वादाच्या पार्श्वभूमीवरील सनातनी विचारसरणीचे संगीत नाटक. श्री. कृ. कोल्हटकरांच्या 'मतिविकार'मधील पुनर्विवाहाच्या प्रचाराला विरोध करण्यासाठी या नाटकाचा जन्म झाला अशी समजूत आहे. या नाटकात पुनर्विवाहसमर्थकांचे वेडे चाळे व पुनर्विवाहाचे दुष्परिणाम दाखवले आहेत. " पुनर्विवाहासारख्या सुधारणा घाईने समाजावर न लादता त्या बाबतीत अनुकूल काळाची वाट पहावी. धर्मांतर, दारिद्र्यनिर्मूलन, देशभक्ती अशा अधिक निकडीच्या प्रश्नांवर लक्ष केंद्रित करावे " असे विचार लेखकाने दंडधारी या नायकाच्या तोंडी घातले आहेत. तत्कालीन जिव्हाळ्याच्या विषयावर लिहिलेले असल्यामुळे या नाटकाला बरीच लोकप्रियता मिळाली.

कल्याण काळे

**दत्तांची कविता : संपादक : घाटे, वि. द. पुणे, १९२९. दुसरी आवृत्ती, १९३१.** दत्तात्रय कोंडो घाटे ऊर्फ कवी दत्त यांच्या निवडक ४८ कविता या संग्रहात समाविष्ट आहेत. या कवितांचे लेखन १८९६ ते १८९८ या कालखंडात झाले. विषयदृष्ट्या या कवितांची विभागणी निसर्ग कविता, भाव कविता, राष्ट्रीय आणि सामाजिक कविता व शिशुगीते अशा चार प्रमुख प्रकारांमध्ये करता येईल. शिशुगीतांचा एक स्वतंत्र प्रवाह त्यांनी मराठी काव्यात निर्माण केला. निसर्गाकडे पाहण्याची एक सजीव सचेतन दृष्टी त्यांच्या निसर्गकाव्यात प्रामुख्याने आढळते.

अनुराधा पोतदार

**दमयंती स्वयंवर : रघुनाथ पंडित, प्रथम प्रकाशन, १९३५, संपादक : प्रियोळकर, अ. का. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे. आवृत्ती दुसरी, १९५९.** मराठी कवितेला संस्कृत काव्यपद्धतीचा साज चढवून तिला प्रतिष्ठा मिळवून देणारा कवी असा लौकिक असलेल्या, इ. स. च्या १७व्या शतकात होऊन गेलेल्या रघुनाथ पंडिताचे हे काव्य 'नल-दमयंती आख्यान'या नावानेही उल्लेखिले जाते. तंजावर येथे सापडलेल्या प्रतीत आख्यान हा शब्द नाही. कथाकीर्तनकारांनी ही कथा महाराष्ट्रात आणली आणि लोकप्रिय केली. नल-दमयंतीची कथा मुळात, महाभारताच्या वनपर्वात आलेली आहे. रघुनाथ

पंडिताने, या रचनेसाठी श्रीहर्षाच्या नैषधीयचरित या महाकाव्याचा आधार घेतलेला आहे. प्रस्तुत काव्यात एकूण २१८ श्लोक आहेत. त्यांपैकी १५० रघुनाथ पंडिताचे स्वतंत्र श्लोक असून, राहिलेले ६८ श्लोक हा मूळ संस्कृत काव्यातील श्लोकाचा अनुवाद आहे. रघुनाथ पंडितांनी संस्कृत महाकाव्याचा आधार घेतलेला असला तरी दमयंतीस्वयंवराची रचना मात्र महाकाव्यासारखी नाही. यातील श्लोकरचना विविध वृत्तांत असून, मधून मधून पदे व चूर्णिकाही आहेत. त्यामुळे त्याची कीर्तनोपयोगिता जाणवते. हंस आणि दमयंती यांचे वर्णन, स्वभावरेखन मनोवेधक आहे. निखळ लौकिक प्रेमकथा रंजकपणे सांगणारे काव्य म्हणून प्राचीन मराठीत हे काव्य आपल्या वेगळेपणाने उठून दिसते.

चंद्रकांत धांडे

**दर्शन प्रकाश : मुरारिमल्ल. प्रकाशक : भास्कर महानुभाव, पुणेकर, पुणे, दुसरी आवृत्ती, १९०१. प्रकाशक : दत्तलक्षराज महानुभाव चित्रशाळा प्रेस, (मतिरत्नाकर-१ व दर्शन प्रकाश ग्रंथ-२, १९१८).** प्रस्तुत ग्रंथाचा कर्ता मुरारिमल्ल हा उपाध्ये आम्नायातील मयंकराज याचा शिष्य होय. ह्याने हा ग्रंथ शके १५६० (इ. स. १८३८) च्या सुमारास लिहिलेला आहे. निरनिराळ्या धर्मपंथांची व मतांची माहिती देणारा हा ओवीबद्ध ग्रंथ आहे. याची एकूण ३६ प्रकरणे आहेत. हा ग्रंथ निगम-आगम-वेदादी धांडोळून लिहिला आहे, असे कवीने स्वतः म्हटले आहे. याशिवाय गीता, भागवत, भविष्य, पुराण, न्यायशास्त्र, सांख्यशास्त्र इत्यादींचा शास्त्राधारही घेतलेला आहे. महानुभावांच्या मुद्री, कुंची, लिंगी, जाटी, दंडी आणि मुंडी अशा सहा दर्शनांची माहिती यात दिलेली आहे. ग्रंथाच्या शेवटी लेखनकालविषयक उल्लेख आहे. या ग्रंथातील काही विषय असे---ॐकारवर्णन, पुरुषलक्षण, व्याकरण, अर्जुन विश्वरूपदर्शन, पृथ्वीचे विविध द्वीपाचे वर्णन, शून्यगणित, पर्वत वर्णन, युगाची कालनिश्चिती, गृहस्थधर्म इत्यादी यावरून ग्रंथाच्या विस्ताराची, विविधतेची कल्पना यावी.

यशवंत कानिटकर

**दशकनिर्धार : रमावल्लभदास (कर्नाटकातील मल्लापूरच्या आवडी मठात उपलब्ध).** सतराव्या शतकातील कवी रमावल्लभदास (काळ इ.स. १६०९ ते इ. स. १६६८) यांनी हा ग्रंथ इ. स. १६३३ मध्ये लिहिला. बहिरभटाची भागवताच्या दशमस्कंधावरील 'बहिरंभटी' वा भैरवी टीका पाहून कवीला हा ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा झाली. या ग्रंथात भागवताच्या दशमस्कंधाच्या आधारे श्रीकृष्णाच्या जन्माची कथा कवीने रसाळ वाणीने वर्णन केली आहे. रमावल्लभदासांची अशा प्रकारची रचना कर्नाटकातील मल्लापूरच्या आवडी-मठात उपलब्ध होते.

नजमा पठाण

**दाजी भाग १ व २ : ताम्हणकर, ना. धों. प्रकाशक : भाग १-किर्लोस्कर प्रेस, भाग-२, रा. ज. देशमुख, पुणे.** या व्यक्तिचरित्रपर पुस्तकात दाजी या विधायक कार्य करणाऱ्या कार्यकर्त्याचे चित्रण आहे. दाजीच्या कार्यपद्धतीत विक्षिप्तपणा, विनोदबुद्धी, कल्पकता, युक्त्या आणि घोटाळे भरपूर असल्यामुळे ते रंजक झाले आहे. सत्यनिष्ठ, स्वतंत्र मते बाळगणारा, स्वार्थत्यागी, स्वावलंबनप्रिय असा हा दाजी कर्ता समाजसुधारक आहे. शिक्षणपद्धती, स्त्रीस्वातंत्र्य, स्वधर्म, साहित्य, स्वदेश, स्वभाषा, सामाजिक समता यांचा पुरोगामी दृष्टिकोनातून विचार करणारा दाजी, बेशिस्त हेडमास्तर, गरिबांना पिडणारे संस्थानिक, दांभिक गांधीवादी, इंग्रजाळलेले स्वकीय या सर्वांची खोड मोडतो.

दाजीच्या एकूण धडपडीतून काहीतरी विधायक घडते खास. तरीही, त्याचे गुण हाच त्याला 'अखेर शाप ठरला' ही लेखकाची हळहळ वाचकांना अस्वस्थ करते.

**दाजी धडपडे : ताम्हणकर, ना. धो. प्रकाशक : रा. ज. देशमुख आणि कंपनी, पुणे, १९३६.** स्त्रियांविषयीच्या एका गंभीर समस्येला वाचा फोडणारे हे संगीत नाटक आहे. यात ११ पदे आहेत. अनेक स्त्रियांना शीलभ्रष्ट करून समाजात उजळ माथ्याने वावरणाऱ्या डॉ. भार्गवसारख्यांची पापे उघड करून, समाजकंटकांचे निर्दालन करण्याचे कार्य तरुणांनी हाती घ्यावे, अशी शिकवण हे नाटक देते. समाजप्रबोधनाचा उद्देश नाटक पूर्ण करते.

उषा दा. कुलकर्णी

**दादा ! भाई !! नवरोजी !!! : डावरे, पद्माकर. प्रकाशक : मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई, १९६०.** हा दादा ! भाई !! नवरोजी !!! व मामा फडणवीस अशा दोन एकांकिकांचा संग्रह आहे. पहिल्या एकांकिकेत पती, पत्नी आपापल्या आवडीच्या स्थळाला मुलगी पाहण्यास निमंत्रण देतात आणि गोंधळ उडू नये म्हणून मामेभाऊ, मावसभाऊ अशी बतावणी करावयास सांगतात. पण मुलगी त्या दोघांना दादा व भाई बनवून, तिसराच, स्वतःच्या पसंतीचा नवरा शोधते. ' मामा फडणवीस ' मध्ये लोकांना फसवून लुबाडणाऱ्या भामट्याला पोलीस इन्स्पेक्टर कसा बनविलो व कायद्याच्या कचाट्यात कसा अडकवितो याचे चित्रण आहे. विनोदी, उपरोधिक शैलीतील या हलक्या फुलक्या एकांकिका रंजक आहेत.

ऊर्मिला दळवी

**दास विश्रामधाम : एक्केहाळीकर, आत्माराम. संपादक : शं. श्री. देव, खंड १ ते ४, धुळे, १८१२-१८२३.** हा रामदास स्वामींच्या अनेक चरित्रग्रंथांतील सर्वांत मोठा चरित्रग्रंथ होय. त्याचे कर्ते आत्माराम हे आपचंदच्या रामदासी मठाचे अधिपती. त्यांचे मूळ नाव तिप्पण्णा व ते राहणारे मोगलाईतील नाघोरचे.

पुढे समर्थ संप्रदायात आल्यावर त्यांनी आत्माराम या नावाने हा चरित्रग्रंथ लिहिला. त्यांची ओवीसंख्या सोळा हजारांवर असून तो १२१ अध्यायांत विभागला आहे. त्यात समर्थचरित्राबरोबर समर्थांचे पुष्कळसे वाङ्मयही समाविष्ट आहे. आत्मारामपंतांची स्वतःची शे-सवाशे पदेही त्यात आहेत. रामदासी संप्रदायाची माहितीही आहे. म्हणून शं. श्री. देव या ग्रंथाचे वर्णन 'एन्सायक्लोपीडिया रामदासिका' असे करतात. या ग्रंथात विस्तार, वैचित्र्य आहे पण माहितीचा बारकावा मात्र नाही. ऐतिहासिक माहिती पारखून घेतलेली नाही. लेखकाची भूमिका चिकित्सकाची नसून भाविकाची आहे. तरीही, समर्थसंप्रदायाचा एक बृहद्ग्रंथ म्हणून या चरित्राचे मोल आहे. श्री. देवांनी तो चार खंडात प्रसिद्ध केला आहे. त्याचा रचनाकाल इ. स. १८०० च्या सुमाराचा आहे.

शं. गो. तुळपुळे

**दासबोध : रामदास.** समर्थ रामदास स्वामींचा हा सर्वात मोठा ग्रंथ असून याची रचना इ. स. १६३० ते इ. स. १६५२ या कालखंडात झालेली आहे. या ग्रंथाची प्रारंभीची रचना म्हणजे एकवीस समासी जुना दासबोध.

'दासबोधा'चा प्रतिपाद्य विषय अध्यात्म असला तरी प्रयत्नवाद, राजकारण, समाजकारण, कवित्व इत्यादी अनेक विषयांची सविस्तर चर्चा त्यात झालेली आहे. दासबोधात जीवन व्यवहारातील अनेक विषयांची व प्रवृत्तींची लक्षणे आलेली असून त्यातून रामदासांचे व्यापक जीवनावलोकन व सूक्ष्मदृष्टी यांचा प्रत्यय येतो. उत्तम पुरुषांची लक्षणे, निस्पृही माणसांची लक्षणे, महंत व विरक्त यांची वर्णने आपल्या शिष्यांना शहाणे करावे यासाठीच त्यांनी सांगितलेली आहेत. रामदासांचे सर्व तत्त्वज्ञान या ग्रंथात आलेले आहे. रामदासांची भाषासरणी साधी, सुबोध, रोखठोक, स्पष्ट प्रतिपादन करणारी व तत्कालीन बोली भाषेने प्रभावित अशी आहे.

दासबोधाची ओवीसंख्या ७७५१ असून यात रामदासांनी आपल्या शिष्यांना दिलेली शिकवण आहे.

**दिंडी गेली पुढे : केचे, मधुकर. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९५९.** संतांच्या अभंगांचा बाज असलेल्या ३८ कवितांचा हा वैशिष्ट्यपूर्ण संग्रह आहे. ज्या दिशेने दिंडी पुढे गेली तिचे ध्यास, पूजन ही अभिलाषा या कवितांतून व्यक्त होते. ही दिंडी प्रतीकात्मक आहे. आंतरिक तळमळ व्यक्त करणाऱ्या या कवितेला स्वतःचे असे आर्त रूप, उन्माद व रंग आहे. ज्यांची या कवितेतील विठोबर श्रद्धा नसेल, त्यांनाही तिची ओढ, सलगी, त्याच्या ध्यासाने सोसावे लागलेले दुःख इत्यादी उत्कटपणे प्रतीत व्हावे, हृदयाला जाऊन भिडावे- त्यातील उमाळ्याने, जिव्हाळ्याने ओढ लागावी असे तिचे स्वरूप आहे. 'माझा सर्वनाश गोड व्हावा' अशा अविस्मरणीय ओळींनी अधोरेखित होणारे या अभंगांचे रूप वैशिष्ट्यपूर्ण आहे.

विमल भालेराव

**दिण्डीरवन : जोशी, महादेवशास्त्री. प्रकाशक : जोशी ब्रदर्स बुकसेलर्स, पुणे, १९५४.** कुमार वाचकांना संस्कृती व परंपरा यांचा कथांद्वारे परिचय करून देणाऱ्या कथाकल्पकता या संचातील पहिले पुस्तक. यातील सर्व कथा निरनिराळ्या तीर्थक्षेत्रांची उत्पत्ती कशी झाली या विषयीच्या आहेत. राधेमुळे रुसून गेलेल्या रुक्मिणीला शोधण्यास दिण्डीरवनात गेलेला श्रीकृष्ण पंढरपुरी कसा स्थिरावतो ती कथा आहे दिण्डीरवन. तुळजापूरच्या उत्पत्तीची कथा आहे 'तुकाई'; नरसोबाच्या वाडीविषयी कथा 'मनोहर पादुका'; गोदावरीचे उगमस्थान भीमाशंकर, त्यांची कथा; त्र्यंबकेश्वरच्या निर्मितीची कथा 'गौतमी ते गंगा'; काशीक्षेत्र व राजा रिपुंजय यांची कथा 'दिवोदास' आणि गोकर्णमंदिराच्या शिल्पकाराची कथा 'जक्कणाचार्य' अशा सात कथा या संग्रहात आहेत.

लोकसाहित्य, पुराणे, आख्यायिका, पोवाडे क्षेत्रमहात्म्य वगैरेतून निवडलेल्या या कथा विविधरंगी व व्यापक संस्कृतीचे दर्शन घडवीत, सद्गुणांचे संस्कार सहजपणे करीत ज्ञान व मनोरंजन साधतात.

शरद दळवी

**दिनकराची स्फुट कविता : संपादक, प्रकाशक : देव, शं. श्री. धुळे, १९१०.** दिनकरस्वामींनी इ. स. १६५४ मध्ये रामदासांचा गुरुपदेश घेतला व ते प्रमुख चौदा मठांपैकी एका मठाचे महंत होते हे लक्षात घेतले असता त्यांच्या रचनेवर रामदासी कवितेचा प्रभाव असावा हे स्वाभाविक दिसते. दिनकरस्वामींची स्फुट कविता विपुल आहे. ज्ञान आणि वैराग्य हे यांच्या काव्यलेखनाचे प्रमुख विषय असून तिचे पर्यवसान रामाच्या उपासनेत झालेले दिसते. ही कविता इ. स. १९१० मध्ये शंकरराव देव यांनी संपादित करून प्रकाशित केलेली आहे. दिनकरस्वामींच्या 'श्रीराम करुणा' आणि 'करुणापर श्लोक' या श्लोकबद्ध रचना चांगल्या साधलेल्या आहेत. उत्कट अनुभूती, सुबोध, सरळ आणि रसपूर्ण रचना असे या सर्व कवितेचे स्वरूप आहे. रामदासांवरील निष्ठा व रामदासी काव्याचा व्यासंग यामुळे दिनकरांच्या काव्यात रामदासांच्या विचारांचे सर्वत्र पडसाद उमटलेले आहे. रचनापद्धतीदेखील थेट रामदासी वळणाची आहे.

**दिनविशेष : जोशी, प्र. न. प्रकाशक : प्र. न. जोशी, पुणे. १९५०.** या कोश-स्वरूपाच्या ग्रंथाला श्री. अणे यांचा पुरस्कार

आणि श्री. म. माटे यांची प्रस्तावना आहे. शककालगणनेनुसार वर्षातील प्रत्येक तिथीस कोणत्या महत्त्वाच्या घटना घडल्या याची नोंद या ग्रंथात आहे. भारताच्या आणि विशेषतः महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनातील प्रमुख घटना, तिथी यांचे माहात्म्य संक्षेपाने निवेदिले आहे.

म. श्री. दीक्षित

**दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ : पारसनीस, द. ब. प्रकाशक : द. ब. पारसनीस, पुणे, १९०२.** १९०३ साली ७वे एडवर्ड बादशाह यांच्या राज्याभिषेकानिमित्त दिल्ली येथे जो मोठा समारंभ व्हायचा होता, त्यानिमित्त द. ब. पारसनीसांनी हे पुस्तक लिहून प्रसिद्ध केले. १८९३ साली लेखकाने स्वतः दिल्ली पाहून काही टाचणे करून ठेविली होती. त्यात, हंटर, किन वगैरे ग्रंथकारांच्या टाचणांची भर घालून हे पुस्तक सिद्ध केले.

या पुस्तकातील वीस पानांत दिल्लीची ऐतिहासिक माहिती आणि साठ पानांत प्रवाशांकरिता उपयुक्त माहिती आहे. परिशिष्टात दिल्लीवर राज्य करणाऱ्या सत्ताधीशांची नामावली आहे ; त्यात युधिष्ठिर राजापासून ते पृथ्वीराज चव्हाणपर्यंतचे हिंदू राजे व नंतरच्या मुसलमान बादशहांच्या नामावलीचा समावेश आहे.

भीमराव कुलकर्णी

**दिवाकरांच्या नाट्यछटा : दिवाकर (गर्गे शंकर काशिनाथ). प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे. पहिली आवृत्ती, १९३३, पाचवी आवृत्ती, १९६८.** या ग्रंथात दिवाकरांच्या एकूण ५१ नाट्यछटांचा समावेश केलेला आहे. ग्रंथाच्या प्रारंभी रा. कृ. लागू यांनी दिवाकरांचा परिचय करून दिला असून नाटककार विजय तेंडुलकर यांनी प्रत्येक नाट्यछटेसाठी थोडक्यात प्रस्तावना लिहिली आहे.

दिवाकरांनी मराठी वाङ्मयात 'नाट्यछटा' हा नवा वाङ्मयप्रकार निर्माण केला असून दिवाकर हे मराठी वाङ्मयात नाट्यछटाकार म्हणूनच सुपरिचित आहेत. त्यांनी १९११ ते १९३१ या काळात या नाट्यछटा लिहिलेल्या आहेत. नाट्यछटा म्हणजे नाटकाचा अति-लहान किंवा सोपा प्रकार नव्हे किंवा कथेचे किंचित नाट्यीकरणही नव्हे. एकीकडे नाटक, नाटिका आणि दुसरीकडे कादंबरी, कथा याहून या प्रकाराला त्याचे असे नाट्यात्म स्वतंत्र वेगळे अस्तित्व आहे.

प्रारंभी या स्वरूपाच्या रचनेस 'नाट्यप्रसंग' असे संबोधले जात होते परंतु पुढे 'नाट्यछटा' हे नाव रूढ झाले. 'मोनोलॉग' काव्यप्रकाराच्या प्रभावाने दिवाकरांना या रचना करावयास स्फुर्ती मिळाली. लेखकाने मानवी जीवनातील सुखदुःख, उद्वेग, निराशा, मनोविकार या सर्व गोष्टी पात्रांच्या द्वारे अतिशय प्रभावीपणे आविष्कृत केल्या आहेत. त्याचे स्वरूप प्रासंगिक आहे. 'फाटलेला पतंग', 'चिंगी महिन्याची झाली नाही तोंच', 'बोलावणं आल्याशिवाय नाही' या नाट्यछटा त्या काळी अतिशय गाजल्या. शाळा कॉलेजातून त्यांचे प्रयोगही झाले.

आकर्षक शीर्षक, चटकदार संवाद, उपरोध, नाट्यात्मकता, एकपात्रमुखी कथन इत्यादी गुणांच्या बरोबरीनेच गंभीर जीवनानुभवाच्या अस्तरास लावलेली कारुण्याची झालरही तितकीच लक्ष वेधून घेणारी आहे.

मानवी जीवनातील साध्यासुध्या प्रसंगातील नाट्य शोधून एकमुखीपात्राकडून, संवादाच्या माध्यमातून कमी वेळेत उभे करण्याचे कसब दिवाकरांनंतर एकाही मराठी लेखकास त्या प्रकारात साधले नाही. म्हणून कवितेच्या रसग्रहणासाठी व आशय स्पष्टतेसाठी त्या उपयुक्त आहेत.

यशवंत चव्हाण

**दिवाकरी : दिवाकरबाबा वर्धनस्य. संपादक : व. दा. कुलकर्णी, मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिका, हैदराबाद, अंक ६, १९७१.** ही महानुभावीय गीताटीका आहे. तिचे कर्तृत्व दिवाकरबाबा वर्धनस्य यांजकडे दिले जाते. हे दिवाकरबाबा आणि कवीश्वर अम्नायातील दिवाकरमुनी एकच असल्यास या टीकेचा रचनाकाल चौदाव्या शतकाच्या अखेरीस येतो. तीत भगवतगीतेच्या श्लोकांतील प्रत्येक पदाच्या अर्थाचे स्पष्टीकरण केले असून ते महानुभाव मतास धरून आहे. अर्थात ही पदपद्धतीने केलेली टीका आहे. तिच्यातील पंधरावा अध्याय व. दा. कुलकर्णी यांनी संपादित केला आहे.

शं. गो. तुळपुळे

**दूधसागर : बोरकर, बा. म. प्रकाशक : के. भि. ढवळे, मुंबई, १९४७.** हा बोरकरांच्या 'जीवनसंगीताच्या' पाठोपाठ प्रसिद्ध झालेला कवितासंग्रह. प्रेम आणि निसर्ग ही बोरकरांची आवडती विहारस्थळे असल्याचा प्रत्यय याही संग्रहात येतो. स्पर्श, जपानी रमलाची रात्र या प्रेमकविता, दूधसागर, सजवू कार्तिक मास, अशा निसर्गकविता आणि सुर्मेवाला, बांगड्या, दुखणाईत दिवा, बाळ जन्मा आले अशा अनुभवाचे वैविध्य आविष्कृत करणाऱ्या कविता बोरकरांच्या अभिव्यक्तीचे सामर्थ्य व्यक्त करतात.

कृ. ब. निकुंब

**दुधाची घागर : जोशी, य. गो. प्रकाशक : प्रसाद प्रकाशन, पुणे, १९५५.** आपण कसे घडलो, कसे वाढलो आणि अनेक टक्के टोणपे खात जीवनाच्या आजच्या अवस्थेप्रत आपण कसे येऊन पोहोचलो या साऱ्यांचे निवेदन या पुस्तकात आहे. आपले जीवन आणि आपले व्यक्तिमत्त्व घडविण्याची किमया रूढार्थाने अडाणी असणाऱ्या आपल्या आईने कशी केली, आपल्यावर तिने जाणीवपूर्वक संस्कार कसे केले ते लेखक सांगतो. य. गो.

जोशींच्या इतकेच, किंबहुना त्याहीपेक्षा त्यांच्या आईला या आत्मनिवेदनात अधिक महत्त्व मिळाले आहे. आपल्या आईच्या आठवणींची दु:खाने भरलेली घागर वाचकांसमोर रिती करून लेखकाने आपल्या मनाचे अनेक पदर उलगडले आहेत. एक साधे सरळ व प्रांजळ आत्मकथन, लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाची सर्व वैशिष्ट्यांसह व्यक्त झाले आहे.

सुरेश वाळिंबे

**दुर्दैवी रंगू अथवा पानिपतचा शेवटचा संग्राम : वैद्य, चिं. वि. प्रकाशक : चित्रशाळा, पुणे, १९१४.** 'लालन बैरागीण' या ऐतिहासिक कादंबरीवर वैद्य यांनी टीका केल्यामुळे त्यांना ऐतिहासिक कादंबरी लिहिण्याचे आव्हान देण्यात आले, ते स्वीकारून त्यांनी ही कादंबरी लिहिली. रंगू या बालविधवेच्या कहाणीभोवती इतिहासाचे वेधक कोंदण उभे करून लेखन झाले आहे. पेशव्यांच्या कौटुंबिक गुंतागुंती, वाटाघाटी, मसलती आणि मराठेशाहीतील मोहिमांची आखणी, सैनिकांच्या मनावरील दैववादाचा पगडा इत्यादींचा उपयोग केल्याने अस्सल ऐतिहासिक वातावरणाचा अव्वल दर्जा अनुभवास येतो. विश्वासरावाच्या दर्शनाने उन्मार्गगामी रंगूच्या मनोभूमिकेत उडालेली खळबळ आणि विश्वासरावाचे धीरोदात्त, सोज्ज्वळ व्यक्तिचित्र यातील संघर्ष परिणामकारक वठला आहे. ऐतिहासिक कादंबरीतील इतिहास काल्पनिकतेने कसा जिवंत होऊन येतो याचे कादंबरीत दर्शन घडते.

भीमराव कुलकर्णी

**दूरचे दिवे : शिरवाडकर, वि. वा. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९४६.** वि. वा. शिरवाडकरांचे हे पहिले नाटक ऑस्कर वाइल्डच्या 'आयडियल हजबंड'चे हे मुक्त रूपांतर आहे. आदर्शत्वाच्या कल्पना उराशी बाळगून राजकारणात वावरणाऱ्या एका सुखी जोडप्याच्या संसारात उठलेले वादळ येथे दाखविले असून आदर्श आणि व्यवहार यांची तडजोड कशी करावी लागते याचे नाटकात चित्रण केले आहे. आदर्शवादाच्या कल्पना हे केवळ दूरचे दिवे आहेत असे प्रतिपादन केले आहे. जिवंत व्यक्तिरेखा, परिणामकारक संघर्षचित्रण, उत्कट प्रसंग यांतून नाटककार शिरवाडकरांच्या सामर्थ्याचा प्रत्यय येतो.

वसंत नरहर कुबेर

**दूर्वांकुर : तळवलकर, गोपीनाथ. प्रकाशक : गोपाळ बळवंत जोशी, आनंद छापखाना, पुणे, १९२९.** लघुगीते आणि सुनीते या रचनाप्रकारांतील ३५ कवितांचा हा संग्रह आहे. मनोरमा, आनंद, मनोरंजन, काव्यरत्नावली, ज्ञानप्रकाश अशा मासिकांमधून १९२४ ते १९२९ सालापर्यंत वेळोवेळी प्रसिद्ध झालेल्या कविता यात संग्रहित झाल्या आहेत. या कवितांत कवीने अनुभवलेल्या विशिष्ट संवेदनांचे प्रतिबिंब, आर्तता, गांभीर्य, कोमलता या गुणविशेषांसह प्रकटले आहे.

वसुंधरा बनहट्टी

**दृष्टान्तपाठ : केशिराजबास. संपादक : नेने भवाळकर, १९३७.** सिद्धान्तसूत्रपाठाचे संकलनकार केशिराजबास तथा केसोबास यांनी हा ग्रंथ सिद्ध केला. सूत्रपाठांतील विचार आणि विचारमालिका या प्रकरणांत चक्रधरांचे तात्त्विक विचार ग्रथित करण्यात आलेले आहेत. वेळोवेळी निरनिराळ्या व्यक्तींना उल्लेखून चक्रधरांनी आपल्या विचारांचे विवरण केले आहे. यातच हे दृष्टान्त आलेले आढळतात. 'असतीपरी'चे विवरण करण्यासाठी काही दृष्टान्त योजिले आहेत. केसोबासांनी हे दृष्टान्त संकलित करून, सूत्र-दृष्टान्त, दार्ष्टान्तिक या क्रमाने मांडणी करून 'दृष्टान्तपाठ' हा ग्रंथ सिद्ध केला. यात एकूण ११४ दृष्टान्त आहेत.

जीवांना ज्ञानाचा अगर भक्तीचा अधिकार केव्हा प्राप्त होतो, कोणत्या कर्मामुळे जीव मोक्षाला अनधिकारी होतो अशा गोष्टींचे अत्यंत मार्मिक वर्णन विविध दृष्टान्तांच्या साहय्याने या ग्रंथात केले आहे.

दृष्टान्तांत चक्रधरांच्या जिवंत बोलीभाषेचे सामर्थ्य प्रत्ययाला येते. यातील दार्ष्टांतिकाची रचना केशिराजांनी इ.स. १२९० च्या नंतर केली असावी.

स. रा. गाडगीळ

**दृष्टान्तलक्षण : आनेराज व्यास.** महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधर स्वामी यांच्या सूत्रमय वचनांच्या स्पष्टीकरणार्थ आनेराज व्यास (शके ११९० ते शके १२६२) यांनी 'लक्षणरत्नाकर' हा संस्कृत ग्रंथ लिहून त्यात सूत्रार्थनिर्णयाची एकूण ३२ लक्षणे सांगितली. त्यात 'दृष्टान्त' हे तिसरे लक्षण आहे. त्याची व्याख्या त्यांनी 'येन दृष्टं प्रमेयान्तस्तं दृष्टान्तम् प्रचक्षयते' अशी केली आहे. त्यावर त्यांनी स्वत:च 'दृष्टान्तलक्षण' हा मराठी ग्रंथ लिहिला. त्यात चक्रधर स्वामींनी दिलेल्या दृष्टान्तांच्या आधारे आनेराजांनी या लक्षणाचे स्वरूप स्पष्ट केले आहे. दृष्टान्तपाठावरील सर्वोत्कृष्ट भाष्य विश्वनाथ बासांचे 'दृष्टान्तस्थळ' हे असले तरी आनेराजांचा प्रस्तुत ग्रंथही एक लक्षण या दृष्टीने दृष्टान्ताचे स्वरूप चांगल्या रितीने विशद करतो. महानुभाव ग्रंथकारांच्या पंडिती वळणाच्या लेखनाचा तो एक नमूना आहे.

शं. गो. तुळपुळे

**दृष्टान्तस्थळ : बीडकर, विश्वनाथ व्यास. प्रथम प्रकाशक : व. दा. कुलकर्णी, मराठी स्वाध्यायपत्रिका, उस्मानिया विद्यापीठ, १९७३ (वार्षिक अंक-काही भाग प्रसिद्ध).** महानुभाव तत्त्वज्ञानाचे व्यासंगी व पंथीय मूळ ग्रंथांचे विवरण

करून त्यात संगती लावणारे भाष्यकार म्हणून प्रसिद्ध असलेल्या विश्वनाथ व्यास बीडकरांचे दृष्टान्तपाठावरील भाष्य म्हणजे प्रस्तुत ग्रंथ. हा ग्रंथ अनेक दृष्टींनी महत्त्वाचा आहे. यात पाठचिकित्सा करून प्रमाणित पाठ निश्चित करण्याचा प्रयत्न लेखकाने केलेला आहे. दृष्टान्तपाठातील शब्दांचे व वाक्यांचे संभाव्य अनेक अर्थ यात देण्यात आलेले आहेत. तसेच विविध दृष्टान्तातील संबंधही स्पष्ट करण्यात आलेले आहेत. पंथात या ग्रंथाला मान्यता लाभलेली आहे. संस्कृतमधील न्याय-शास्त्राविष्ठित तत्त्वचर्चेप्रमाणे, महानुभावपंथीय विद्वानांनी इ.स. च्या १३व्या, १४व्या शतकात अर्थनिर्णयशास्त्राचा जो पाया घातला त्याचा विकास इसविसनाच्या १७व्या शतकातील विश्वनाथ व्यासांच्या भाष्यात दिसून येतो.

अरविंद कुरुंदकर

**देवनाथ महाराजकृत कवितासंग्रह : देवनाथ : प्रथम प्रकाशन : ओक वा. दा. १८९६, दुसरे प्रकाशन : देवनाथ महाराजांची कविता, संपादक : साठे, अ. सी. — पांडे, सु. नि., अग्निहोत्री, पां. स., वैदर्भ, काव्यसंग्रह दुसरे, गुच्छ-१९१५.** देवनाथ हे एकनाथ परंपरेतील असून त्यांनी गोविंदनाथांकडून दीक्षा घेतली. त्यांचा ' महाराष्ट्र कवी देवनाथ महाराजकृत कवितासंग्रह ' श्री. वा. दा. ओक यांनी इ. स. १८९६ मध्ये प्रसिद्ध केला.

देवनाथांची अनेक पदे लावणीसदृश्य असून लयबद्धता व गेयता ही त्यांची प्रमुख वैशिष्ट्ये आहेत. राम व कृष्ण या देवतांविषयीच्या त्यांच्या पदांची संख्या विपुल आहे. विदर्भात देवनाथांची ही रचना अत्यंत लोकप्रिय आहे. त्यांनी पदरचनेतून उपदेश केला असून भक्तिमार्गाचे सुगम विवेचनही केले आहे. देवनाथांनी हिंदी भाषेत काही पदे लिहिली असून ती विनयमोहन शर्मा यांनी ' हिंदी को मराठी संतों की देन ' या पुस्तकात प्रसिद्ध केली आहेत.

नजमा पठाण

**देव माणूस : जोशी, नागेश. प्रकाशक : मॉडर्न बुक डेपो, पुणे, १९४५.** हे एक संगीत नाटक आहे. नुसत्या पुस्तकी शहाणपणाने जग जिंकता येत नाही, त्याला व्यवहार-ज्ञानाची जोड लागते, तसेच स्वातंत्र्य म्हणजे स्वैराचार नव्हे असा विचार पटविण्यासाठी अनिल-नंदिनी, विलास-रागिणी या परस्पर-विरोधी स्वभावाच्या जोड्या उभ्या केल्या असल्या तरी सर्वांवर निःस्वार्थ बुद्धीने प्रेम करणारा दादा (विश्वनाथ) हाच संपूर्ण नाटकावर छाप पाडतो. प्रेम आणि व्यवहार यांचा संघर्ष हे नाटकाचे बलस्थान. साधी, सोपी, निरलंकृत भाषा, प्रासादिक गीतरचना आणि अंतःकरणाला भिडणारे घटना-प्रसंग व संवाद यांमुळे हे नाटक लोकप्रिय ठरले. 'दिलरुबा मधुर हा', 'चांद माझा हसरा', 'सुखवी तया संसारा' ही या नाटकातील पदे विशेष गाजली.

वसंत नरहर कुबेर

**देशिक-चरित्र : गुरुनाथ. प्रथम प्रकाशक : आवळीकर पंडित, नवभारत, १९५८ (मुडगी, जिल्हा बेळगाव येथील स्वामींच्या मठात ग्रंथ उपलब्ध झाला).** हा ग्रंथ संतचरित्रपर असून, पंडित आवळीकरांच्या प्रयत्नाने उजेडात आला. गुरुनाथ आपली गुरुपरंपरा विवेकसिंधूकार मुकुंदराजापर्यंत नेऊन भिडवितो. त्याचा प्रस्तुत ग्रंथ मुकुंदराजाच्या परंपरेचा धागा अधिक स्पष्ट करणारा आहे.

देशिक म्हणजे आत्मज्ञानी पुरुष. गुरुनाथाने बेळगाव जिल्ह्यातील मुडगी येथे सोळाव्या शतकापासून होऊन गेलेल्या अद्वयबोध, रंगबोध या देशिकांची चरित्रे वर्णिली आहेत. त्यात ७ अध्याय व ८९६ ओळ्या आहेत. शिवबोधांनी दृष्टान्त देऊन आपल्याला हा ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा दिली आणि गुरूची कीर्ती वाखाणी असा आदेश दिला असे कवीचे निर्मिती प्रयोजन सांगितले आहे. घटप्रभेच्या तीरावरील गुत्यापूर हे कवीचे गाव असले तरी प्रस्तुत चरित्र त्याने हुकेरी १७०७ मध्ये पूर्ण केले.

उषा पुरोहित

**दोन ध्रुव : खांडेकर, वि. स. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी (पब्लिशर्स) प्रा. लि., ४७३, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०, पहिली आवृत्ती, १९३८, दहावी आवृत्ती, १९९४.** विषमतेचा निषेध नोंदविणे आणि समतेचा पुरस्कार करणे या उद्देशाने ही कादंबरी लिहिली. खांडेकर म्हणतात, "गरिबांच्यावर आज हजारो वर्षे अन्यायच होत आला. मालक बनलेला वर्ग पैशाच्या, धर्माच्या अन् संस्कृतीच्या नावाखाली त्यांची पद्धतशीर पिळवणूक करीत बसला आहे. त्यांचे अज्ञान, त्यांचे दारिद्र्य, त्यांची अगतिकता— ही सारी या पिळवणुकीची दृश्य चिन्हे आहेत. ही जाणीव होताच माझे मन दुःखाने भरून गेले, हे दुःख सांगायची धडपड मी दोन ध्रुवात केली आहे."

गरीब-श्रीमंत, कला आणि जीवन, त्याग आणि भोग, शहर आणि खेडे असे अनेक स्तरावरील संघर्षाचे दर्शन या कादंबरीमध्ये आहे.

रमाकांत, वत्सला, सुलोचना, सुरंगा, विद्याधर इत्यादी पात्रांद्वारे रंजनात्मक दृष्टीने जीवनवादाचा पुरस्कार लेखक करतात.

गांधीवाद आणि समाजवाद यांच्या संमिश्र प्रभावाखाली लेखकाने या कादंबरीचे लेखन केले आहे.

या कादंबरीमध्ये, लेखकाची जीवनवादी वैचारिक दृष्टी, सामाजिक प्रश्नांचे चिंतन, मानवी जीवनाबद्दल विचार करण्याची जिज्ञासू वृत्ती, गरिबीत पिचत असलेल्या शापितांबद्दल

अपार सहानुभूती या वैशिष्ट्यांबरोबरच कथानक रंजक करण्याच्या वृत्तीचे दर्शन आढळते.

भरतेश्वर पाटील

**दोला : रेगे, पु. शि. प्रकाशक : दत्तात्रय वामन नाईक, सदानंद मुद्रणालय, पणजी-गोवा, आवृत्ती, १९५०.** १९४० ते १९५० या दहा वर्षांतील एकत्रित कराव्या वाटल्या अशा एकूण ९८ कवितांचा संग्रह. रेगे यांचे 'साधना आणि इतर कविता' (१९३१), 'फुलोरा' (१९३७) आणि 'हिमसेक' (१९४३) याशिवाय, 'गंधरेखा', 'पुष्कळा', 'दुसरा पक्षी', 'प्रियाळ' हे त्यांचे अलीकडचे काही प्रसिद्ध काव्यसंग्रह.

नवकाव्याच्या काळात मर्ढेकरांनंतर रेगे टीकेचा विषय बनले होते. त्यांच्यावर कोर्टात खटलेही भरले होते पण नंतर नंतर नवकाव्याच्या स्वरूपाची गंभीरपणे चिकित्सा होऊ लागली. कवितेचे शब्दरूप, अनुभवाची जात, त्या जातीची विविध अंगे, अनुभवाला साकार करणारी प्रतिमासृष्टी, शब्दबंध, वाक्यबंध, नादरचना आणि या सर्व अंगांचा मिळून बनणारा कवितेचा रचनाबंध अशा सूक्ष्मतेने त्यांच्या दुर्बोध आणि अश्लील कवितांचा समग्रतेने विचार झाला.

रेग्यांच्या काव्यातील भाव आणि शृंगाराच्या मोकळ्या उत्तान छटा, ' दोला ' संग्रहातील कवितांमध्ये प्रकर्षाने दिसतात. स्त्री शरीराला दिलेले प्राधान्य आणि स्त्रीच्या मूर्त स्वरूपात पाहिलेली विश्वचैतन्यमयी सृजनशक्ती हा इंद्रिय सुखापलीकडचा अनुभव, त्या पातळीवर पेलण्याची क्षमता असणाऱ्या मनासच ती भावेल अशी आहे.

मोहन पाटील

**दौलत : फडके, ना. सी. प्रकाशक : अ. स. गोखले, पुणे, १९२९.** 'दौलत' ही ना. सी. फडके यांची गाजलेली व तत्कालीन वाचकांत आवडीने वाचली गेलेली कादंबरी आहे. वस्तुतः फडके हे कलावादी व रंजनपरतेचा पुरस्कार करणारे लेखक आहेत. या कादंबरीत त्यांनी काहीशी बोधवादी भूमिका घेतली आहे. लेखकाने कथानक, उपकथानक अनपेक्षितता योगायोग या तंत्राशी संबंधित बाबींचा अवलंब ही कादंबरी लिहिताना केला आहे. पैसा, कीर्ती व प्रतिष्ठा यांच्यामागे लागल्यामुळे माणूस आयुष्यातला खरा आनंद गमावून बसतो. गरिबीतही समाधानाने, आनंदाने जगता येते, हे जीवनविषयक बोधपर तत्त्व फडके यांनी प्रस्तुत कादंबरीत सांगितले आहे; आणि त्या तत्त्वाला अनुलक्षून कथानकाची मांडणी केली आहे. अविनाश व निर्मला ह्या नायक-नायिकांची जोडीचे मुख्य कथानक व त्याला पूरक ठरणारी मधुरा व कांचन आणि कमळा व धनंजय यांची उपकथानके कादंबरीत आहेत. श्रीमंत घराण्यातील सुंदर व हुशार निर्मला आणि मध्यमवर्गीय कुटुंबातील देखणा, कर्तृत्ववान व सुखभावी अविनाश यांना परस्परांविषयी ओढ वाटते. पण निर्मलचे वडील धनंजय या व्यसनासक्त, उद्धट, बेफिकीर स्वभावाच्या आय.सी.एस. तरुणाशी करायचे ठरवितात. निर्मलाला वडिलांचा हा प्रस्ताव मान्य नसतो. निर्मलेची मैत्रीण कमळा हिचे धनंजयशी लग्न होते. धनंजय कमळेला अत्यंत वाईट पद्धतीने वागवतो, पदोपदी तिचा अपमान करतो. मधुरा ही अविनाशच्या मित्राची बहीण. गुंडांच्या तावडीत सापडलेल्या मधुरेला अविनाश धैर्याने सोडवतो. स्वतःच्या श्रीमंतीचा अभिमान असणाऱ्या आणि गरिबांना तुच्छ समजणाऱ्या निर्मलेच्या वडिलांना गरिबीचे आणि माणुसकीचे महत्त्व पटते. तीच खरी 'दौलत'ह्या तत्त्वाचा जणू त्यांना साक्षात्कार होतो. अविनाश-निर्मलेच्या मीलनाने कादंबरीचा शेवट गोड होतो. नेटके बांधीव कथानक, आकर्षक व्यक्तिमत्त्वाची नायक-नायिकेची जोडी, त्यांच्यातील संयमित प्रणय या विशेषांमुळे 'दौलत' कादंबरी महाराष्ट्रातील वाचकांच्या पसंतीस उतरली. कादंबरीतील योगायोग, रहस्यमयता रसिकांना आवडली. फडक्यांची आकर्षक भाषाशैली हेही कादंबरीचे वैशिष्ट्य आहे. फडक्यांच्या पुढील कादंबऱ्यात तंत्रबद्धतेला अधिक महत्त्व दिले गेले. त्या साचेबंद आणि कृत्रिम झाल्या. या पार्श्वभूमीवर ना. सी. फडके यांच्या 'दौलत' कादंबरीचे यश उल्लेखनीय ठरते.

वि. शं. चौघुले

**द्राक्षांचे घोस : गुर्जर, विठ्ठल सीताराम. प्रकाशक : मॉडर्न बुक डेपो, पुणे, १९३६.** १९१० पासून कथालेखनाला आरंभ करून आयुष्याच्या अखेरपर्यंत जवळजवळ ८०० कथा लिहिणाऱ्या वि. सी. गुर्जरांच्या अकरा गोष्टी समाविष्ट केलेला हा एकमेव कथासंग्रह आहे. गुर्जरांची 'संपूर्ण गोष्ट' हा हरिभाऊंची 'स्फुट गोष्ट' व ना. सी. फडक्यांची 'लघुकथा'यांना जोडणारा दुवा आहे. बोधवादाकडून रंजकतेकडे कथा आणण्याचे श्रेय गुर्जरांचे आहे, हे दाखवून देणारा प्रस्तुत संग्रह आहे.

या संग्रहातील कथा प्रामुख्याने घटनाप्रधान आहेत. मराठी कथेला स्वतंत्र मानाचे स्थान मिळवून देण्याचे व १९१० ते १९२५ या काळात कथा हा वाङ्मयप्रकार लोकप्रिय करण्याचे कार्य या कथांनी केले.

म. ना. अदवंत

**द्रोणपर्व : देशपांडे, नरहरी मोरेश्वर.** प्रदीर्घकथात्मक रचनेची परंपरा विशेष लोकप्रिय होऊ लागलेल्या काळात मुक्तेश्वरी भारताच्या प्रभावातून वा अनुकरणातून भारती पर्वांवरील काही रचना निर्माण झाल्या. त्यात शुभानंद व नरहरी मोरेश्वर यांच्या रचना लक्षणीय आहेत.

शके १६८१ ते १६९१ या दहा वर्षांत नरहरी मोरेश्वराने उद्योग, भीष्म, द्रोण व कर्ण ही चार पर्वे लिहिली. तो परंपरेने रामदासी पंथातला असला तरी त्याच्या भारतीपर्वांवर मुक्तेश्वरांचाच प्रभाव दिसतो, परंतु त्याने मुक्तेश्वराचे केवळ अनुकरण केलेले नाही. मुक्तेश्वरी संस्कार त्याच्या अंगी भिनला आहे व त्यातून त्याची शैली आकाराला आली आहे.

नरहरीची रचना मूळ महाभारताशी अधिक प्रामाणिक आहे. द्रोणपर्व शके १६९० मध्ये पूर्ण झाले. त्यात ३५ अध्याय व ४९१५ ओव्या आहेत. कवीची शैली संस्कृतप्रचुर आहे. युद्धाचे, आदेश आवेगाचे प्रसंग प्रभावीपणे रंगविले आहेत. भावात्मक प्रसंगाचे वर्णनही प्रत्ययकारी रितीने केलेले आहे विशेषतः शरपंजरी पडलेल्या भीष्माचा आणि कर्णाचा संवाद उल्लेखनीय आहे. मुक्तेश्वरी परंपरेतील कवीच्या कवित्वशक्तीचा प्रत्यय आणून देणारी ही रचना आहे.

उषा पुरोहित

**द्रौपदीवस्त्रहरण : भिका मुनी.** भिका ऊर्फ भिका मुनी हे सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात काव्यलेखन करणारे महानुभाव कवी. दत्तात्रयाचे उपासक, उद्धवगीतेवर रचलेल्या 'भक्ति-अनुभव' ह्या भाष्यग्रंथावरून अध्यात्मातील त्यांची गती लक्षात येते. 'प्राण बोध' व 'प्रार्थनास्तोत्र'ह्या रचनाही भिका मुनींच्याच आहेत असे श्री. मुजुमदार यांचे मत आहे.

'द्रौपदीवस्त्रहरण'ची कथा संतकवींप्रमाणेच पंडित कवींचीही विशेष आवडीची असावी, हे त्यावरील मराठी अनेक काव्यरचनांवरून लक्षात येते. भिका मुनीं यांनीही 'द्रौपदीवस्त्रहरण' नावाची एक लावणीवजा लहानसे काव्य रचले आहे. हे काव्य अवघ्या चोवीस कडव्यांचे असले तरी करुणरसाचा त्यातून पुरेसा आविष्कार झालेला दिसतो. 'भिक्षुकवी' या नावानेही हे कवी ओळखले जातात.

सुहासिनी इर्लेकर

**द्रौपदीवस्त्रहरण : बीडकर, विठ्ठल.** महाराष्ट्र कवी विठ्ठलकृत कवितासंग्रहात 'द्रौपदीवस्त्रहरण' या नावाची दोन काव्ये समाविष्ट करण्यात आलेली आहेत. पहिले 'द्रौपदी-वस्त्रहरण' २३१ श्लोकांचे आहे. पण त्याचे जनकत्व संशयग्रस्त आहे.

दुसरे 'द्रौपदीवस्त्रहरण' एकूण ४३ श्लोकांत आलेले आहे व त्याचा रचनाकाळ शके १६०२ हा आहे. या काव्याच्या शेवटच्या श्लोकात कवीचें नाव, गाव, काळ यासंबंधी माहिती दिलेली आहे. विठ्ठलाने हे काव्य शिखरिणी वृत्तात रचलेले आहे.

पांडित्यप्रदर्शन, अभिजात संस्कृत काव्यसंकेतांचे अनुकरण ही या काव्याची वैशिष्ट्ये आहेत.

लता मोहरीर

**द्रौपदी-स्वयंवर : अवचितसुतकाशी. संपादक : गोखले (डॉ.) वा. दा., प्रकाशक : म. सा. परिषद, १९८० (रचना-काळ इ. स. १६९६).** या कवीची द्रौपदी-स्वयंवर कथेवर दोन आख्याने उपलब्ध आहेत. एक श्लोकबद्ध आणि दुसरे ओवीबद्ध. श्लोकबद्ध आख्यान एक हजार श्लोकांचे असून ते १४ सर्गांवर आधारलेले आहे. ओवीबद्ध आख्यानात ३६३८ ओव्या आहेत. अवचितसुतकाशी हा महानुभावपंथानुयायी असावा. 'मराठी क्षत्रिय' असा तो स्वतःच्या जातीचा उल्लेख करतो. त्याच्या श्लोकबद्ध आख्यानाचा रचनाकाळ शके १५८६ असून ओवीबद्ध आख्यान शके १६१८त रचण्यात आले.

महाराष्ट्रातील मराठी कुळींची नावे आणि महाराष्ट्रीय पक्वान्नांचे निर्देश या काव्यात आढळतात. पंचधारा नियतकालिकात (वर्ष २२, अंक ४, १९८०) शिवाजी गउळकर यांनी ओवीबद्ध आख्यानातील २४व्या अध्यायाचा विस्ताराने परामर्श घेतला आहे.

श्री. रं. कुलकर्णी

**द्वारकाविजय : पंडित वामन.** वामन पंडितांनी भागवताच्या दशम स्कंधाच्या आधारे लिहिलेले हे काव्य असून यात श्रीकृष्णाच्या द्वारीकेतील वैभवाचे चित्रण आले आहे.

श्रीकृष्ण हा परमेश्वर असला तरी लौकिक जीवनात तो सामान्य माणसासारखा वागतो असे कवीने दाखविले आहे. सर्व चराचराच्या रूपाने परमेश्वर नटलेला आहे. हे विश्व म्हणजे परमेश्वराचेच रूप होय, हे वामन पंडितांनी यात स्पष्ट केले आहे.

**धग : शेळके, उद्धव. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९६०.** वऱ्हाडच्या ग्रामीण भागातील शिंपी समाजातील एक प्रातिनिधीक कुटुंबकथा या कादंबरीत वर्णिली आहे. दारिद्र्य आणि त्यातून उद्भवणाऱ्या समस्यांशी सामना करण्यात कुटुंबातील सर्वांच्या शक्तीच्या होणाऱ्या व्ययाचे यात चित्रण आहे.

मध्यमवयीन महादेव शिंपी हा कादंबरीचा नायक आहे. त्याला निश्चित उद्योगधंदा वा नोकरी नाही. कौतिक ही त्याची निरक्षर पण हुशार, मेहनती, कर्तव्यदक्ष पत्नी पदरी तीन मुले त्यांना शिक्षण देता येत नाही. पैकी नामदेव सद्विचारी, सद्वर्तनी असतो पण थोरला भीमा नेमका त्याच्या उलट असतो. त्याच्या आगळिकींना कंटाळून कौतिक त्याचे नाव टाकते. भीमा शेजारच्या कुटुंबातील बानोच्या वाटेस जातो. तेव्हा त्याचे कुटुंबातील वास्तव्य संपते. शेतमजुरी करणाऱ्या कौतिकला स्वतःचे शिवणयंत्र गहाण टाकावे लागते. त्या व्यवहारात ती फसवली जाते. महादेव काही दिवस लहानसहान कपड्यांच्या विक्रीचा धंदा करतो. पण त्याचा कपड्यांचा गठ्ठाच रात्री चोरीस जातो. पुढे त्याला रक्तपितीचा रोग जडतो. बापाच्या मर्तिकाला तो जात नाही. ती जबाबदारी कौतिक पार पाडते.

खेड्यातील हिंदू-मुसलमान कुटुंबांचे संबंध व सख्य यांचे सुंदर चित्रण या कादंबरीत दिसते. कादंबरीतील संवाद ग्रामीण वऱ्हाडी बोलीत असून प्रादेशिक वातावरण चांगले रंगविले आहे. कौतिकच्या रूपाने ग्रामीण भारतीय स्त्रीच्या आदर्शाचा एक नमुना डोळ्यांपुढे उभा राहतो. मराठी कादंबरीच्या विकासातील एक महत्त्वाचा टप्पा ह्या कादंबरीने गाठला आहे.

गो. वि. वैद्य

**धर्मरहस्य अथवा अंत्यजोद्धार : नेवाळकर, दा. वि. प्रकाशक : दा. वि. नेवाळकर, पुणे, १९०९.** स्पृश्यास्पृश्यभेद न पाळता, निदान सामाजिक व्यवहारात तरी अंत्यजांना समान वागणूक द्यावी असा संदेश या संगीत नाटकातून दिला आहे. शंकराचार्य स्वतः वेड्या पीराचे सोंग घेऊन सर्वत्र संचार करतात व स्वप्रभावाने अनेकांचे मतपरिवर्तन करतात असे या नाटकात दाखवले आहे. निरनिराळ्या प्रसंगातून, युक्तिवादातून धर्माचे खरे रहस्य सांगण्याचा लेखकाचा प्रयत्न आहे. अंत्याजांना आपल्या धर्मात ओढण्याच्या ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या प्रयत्नांचाही लेखकाने निषेध केला आहे. यात कबीराच्या अर्थपूर्ण वचनांचा जागोजागी वापर केलेला आहे.

कल्याण काळे

**धवळे : महदंबा.** आद्य मराठी कवयित्री महदंबा वा महदाइसा (शके ११५०-१२२५) हिने रचलेले 'धवळे' प्राचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासात वैशिष्ट्यपूर्ण मानले जातात.

'धवळे' म्हणजे विवाहप्रसंगी गावयाची वरविषयीची गीते. श्रीगोविंदप्रभू यांच्या आज्ञेनुसार महदंबा चार दिवस रुक्मिणी-स्वयंवराची गाणी उत्स्फूर्तपणे म्हणते. तिने गायलेली ही गीते म्हणजेच 'धवळे' होत.

धवळ्यांच्या पूर्वार्धात ८४ ओव्या आलेल्या असून त्यांची रचना शके १२०८ पूर्वी झालेली असावी असे अनुमान आहे. उत्तरार्ध यानंतर जवळजवळ २०-२५ वर्षांनी रचला गेला असावा, यात ६४ ओव्या आलेल्या आहेत. महदंबेने श्रीकृष्ण चरित्रातील एक भाग म्हणून (महदंबेने) रुक्मिणीहरणाच्या कथेचे केवळ निवेदन केलेले नाही, तर या कथेतील नाट्य लहानमोठ्या प्रसंगचित्रांद्वारे ओवीरचनेतून जिवंतपणे उभे केले आहे. 'धवळ्यांच्या' उत्तरार्धाचे स्वरुप मात्र पूर्वार्धापेक्षा वेगळे आहे. उत्तरार्धाच्या ६४ ओव्यांपैकी १० ओव्यांत श्रीकृष्ण-रुक्मी संघर्षाचे चित्र येते, तर उरलेल्या ओव्यांत विवाहोत्तर सोहळ्यातील वेगवेगळ्या विधींचे सविस्तर वर्णन येते.

या धवळ्यांची ओवीरचना लयबद्ध व बोलीभाषेतील जिवंतपणा व्यक्त करणारी व लोकगीताचे रूप धारण करणारी आहे.

लता मोहरीर

**धावता धोटा : वरेरकर, भार्गवराम विठ्ठल. प्रकाशक : कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, १९३३.** १९३० साली 'तुतारी' पत्रात ही कादंबरी क्रमशः प्रसिद्ध होत होती. परंतु उत्तरार्धाची काही प्रकरणे प्रसिद्ध झाल्यानंतर हे पत्र बंद झाले. त्यामुळे पूर्ण कादंबरी पुस्तकरूपाने वाचकांना प्राप्त झाली ती १९३३ च्या डिसेंबरमध्ये. या कादंबरीवर आधारित 'सोन्याचा कळस' हे वरेरकरांचेच नाटक प्रसिद्ध झाले ते १९३२ मध्ये. या आवृत्तीला मंगेश विठ्ठल राज्याध्यक्ष यांची प्रस्तावना असून पृष्ठसंख्या ४६३ इतकी आहे.

राजकीय कादंबरी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या कादंबरी प्रकारातील ही पहिली कादंबरी असून गिरणी कामगारांच्या जीवनावर आधारलेल्या या कादंबरीचा काळ साधारणतः पहिल्या महायुद्धाच्या वेळचा आहे.

कन्हयालाल करसनदास ऊर्फ मोटाभाई हा एका लक्षाधीश गिरणवाल्याचा मुलगा. मजुरांचे जीवन समजून घेण्याच्या इच्छेने कान्हू कृष्णा बनून गिरणगावात राहावयास येतो. हा कादंबरीचा प्रारंभ असून पुढे चाळीतील सर्व व्यवहार, परस्पर संबंध, कामगारांचे दैन्य-दारिद्र्य याचे वास्तवदर्शी चित्रण हे कादंबरीचे कथानक गांधीयुगाच्या आधीचे आहे. गांधींच्या आफ्रिकेतील कर्तबगारीचे केवळ पडसाद बाबा शिगवणापर्यंत येऊन पोहचलेले असतात. साम्यवादी नेतृत्वाचाही नुकताच उगम होत असतो. या काळच्या मजुरांच्या जाणिवा, त्यांची संघटनशक्ती, त्यांचे मार्ग याचे बाबा शिगवण, पांडू, कान्हू कृष्णा, बिजली या पात्रांच्या द्वारा यथातथ्य चित्रण कादंबरीकारांनी केलेले आहे.

वरेरकरांनी क्वचित संभाव्य घटनेवर उभारलेल्या या कथानकाची संपूर्ण कादंबरीतील आखणी व शेवट कौशल्याने साधला आहे.

कादंबरीत चित्रित झालेले कामगार जीवन व आजचे कामगार जीवन, त्यांच्या समस्या, दैन्य-दारिद्र्य, संप, मालक वर्गाशी तंटे इत्यादी गोष्टी सारख्याच वाटतात त्यामुळे कामगार जीवनाचा वेध घेणारी एक समर्थ कादंबरी म्हणून विशेष लक्षणीय.

यशवंत चव्हाण

**धुक्यातून लाल ताऱ्याकडे : काणेकर, अनंत. प्रकाशक : सागर साहित्य, मुंबई, १९४०.** अनंत काणेकरांचे हे प्रवासवर्णन आहे. विलायतेला केवळ लंडन, पॅरीसची शोभा पाहण्यास नव्हे तर त्या निमित्ताने रशियाला जाण्यास मिळावे यासाठी काणेकरांचा प्रयत्न होता व अनेक अडचणी दूर सारून ते मॉस्कोच्या गॉर्कीपार्कपर्यंत गेले. रशियाच्या मुक्कामात जेवढे पाहण्यासारखे होते ते त्यांनी पाहिले. महत्त्वाच्या स्थळांना विशेषतः विंटर पॅलेस, क्रांतीचे वस्तुसंग्रहालय, बॉल्शॉय थिएटर, मॉस्कोतील पॉलिटेक्निक यांना भेटी दिल्या. त्यांचे वर्णन या पुस्तकात आहे.

हे प्रवासवर्णन म्हणजे युरोपच्या व रशियाच्या प्रवासाचा वृत्तांत असून काणेकरांच्या रसिकतेच्या व आधुनिक वृत्तीच्या छटा त्यात दिसून येतात. विशिष्ट स्थळे व तेथे पाहिलेल्या व्यक्तिविशेषांची रसिकतेने रेखाटलेली धावती क्षणचित्रे या स्वरूपाचे

हे प्रवासवर्णन आहे. मराठीतील प्रवासबृत्तलेखन आधुनिक अभिरुचीच्या दिशेने वाटचाल करू लागल्याची स्पष्ट चिन्हे काणेकरांच्या या पुस्तकात उमटलेली आहेत.

सुधा कापरे

**धृपद : करंदीकर, विंदा. प्रकाशक : पॉप्युलर बुक डेपो, मुंबई, प्रथम आवृत्ती, १९५९.** नवकाव्यावर दुर्बोध, अश्लील अशा स्वरूपाची टीका होत असतानाच्या काळात विंदा करंदीकरांचा स्वेदगंगा (१९४९) हा पहिला कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. पण काव्यरसिकांना करंदीकरांची सगळीच कविता दुर्बोध वाटण्या ऐवजी ती वेगळी वाटली. त्यांच्या 'किर्तन', 'धोंड्याचान्हावी', 'माझ्या मना बन दगड', या कवितांना काव्यवाचनांच्या कार्यक्रमातून भरपूर दाद मिळाली. जनसामान्यांच्या कळवळ्यातून शोषणाविरुद्ध रोकडे काव्य प्रगट करणारी चिंतनशील वृत्तीची करंदीकरांची कविता प्रयोगशीलही आहे, 'मृदगंध', 'धृपद', 'जातक', 'विरुपिका', 'संहिता', हे काव्यसंग्रह ; 'राणीचा बाग', 'सशाचे कान', 'एटू लोकांचा देश', इत्यादी सात बालगीतांचे संग्रह, 'स्पर्शाची पालवी', 'आकाशाचा अर्थ', हे लघुनिबंधसंग्रह, 'परंपरा आणि नवता', 'ॲरिस्टॉलचे काव्यशास्त्र'हे साहित्यशास्त्रावरील ग्रंथ, तसेच, गुजराती, इंग्रजी इत्यादी परभाषेतील अनेक भाषांतरे अशी मोठी साहित्य संपदा त्यांच्या नावावर आहे.

संमिश्र व प्रगल्भ अनुभावाचे रूप करण्यासाठी काव्याच्या घाटाचे प्रयोग करीत राहण्याची करंदीकरांची प्रेरणा सतत विकसित होत राहिली याचे प्रत्यंतर 'धृपद', या काव्यसंग्रहात येते. संग्रहात एकूण ९५ कविता समाविष्ट असून, त्यामध्ये जातक रचना ५१, मुक्तसुनिते १०, ताल चित्रे ७, आततायी अभंग २७ अशा विविध स्वरूपाच्या रचना आढळून येतात. आशा-निराशा या रूढ सांकेतिक वर्गिकरणात न सामावणारा प्रगल्भ अनुभव, करंदीकर, विश्ववास्तवाशी सलंग्न असलेली अंतिम भयाची जाणीव व प्रत्यक्ष जीवनाविषयी वाटणारी अपरिहार्य ओढ अशा नव्या अनुभवात एकरूप स्वरूपात मांडतात याचा या कविता वाचताना प्रत्यय येतो.

मोहन पाटील

**ध्रुवचरित्र : भोसले, प्रतापसिंह.** तंजावरकर प्रतापसिंह भोसले (इ. स. च्या १८व्या शतकाचा उत्तरार्थ) या नृपतीच्या १७ नाटकांमध्ये ध्रुवचरित्र या नाटकाचा समावेश आहे. या नाटकाची रचना उत्सव प्रसंगी सादर करण्यासाठी झाली असावी. या नाटकात भक्ती व श्रृंगार या रसांची सांगड घालण्यात नाटककार यशस्वी झाला आहे. या नाटकाची एकंदर प्रकृती गंभीर आहे. तिला विनोद मानवत नाही. जो काही विनोद आढळतो, तो विदूषक व राजा उत्तानपाद यांच्या संवादात प्रारंभी आला आहे. संस्कृत नाट्यपरंपरेप्रमाणे नाट्यारंभ ईशस्तवनपर नांदी, नाटक व नाटकाची सूत्रधाराकडून दिली जाणारी माहिती यांनी होत असला तरी नाट्यप्रयोग 'यशगान' पद्धतीने सादर होतो. नाटकाचा बहुतेक भाग पद्यमय असून सर्व पदे गाण्याचे काम तसेच कथानुसंधान व पात्रपरिचयाचे काम सूत्रधाराकडे आहे. नाटकाच्या शेवटी भरत वाक्याप्रमाणे ईशप्रार्थना आहे.

**ध्वनिविचार : कालेलकर, ना. गो. प्रकाशक : पुणे विद्यापीठ प्रकाशन, पुणे, १९५५.** भाषाशास्त्र म्हणून एकोणिसाव्या शतकात अस्तित्वात आलेल्या समाजजीवनाच्या अभ्यासाला आवश्यक अशा नव्या शास्त्राच्या एका महत्त्वाच्या अंगाचे दिग्दर्शन करणे ही या ग्रंथामागील भूमिका आहे.

प्रस्तुत ग्रंथातील विवेचनाच्या दृष्टीने एकंदर प्रकरणांची विषयानुसारी विभागणी—ध्वनिविचाराचा इतिहास, ध्वनि-निर्मिती, ध्वनींचा भाषेत उपयोग, ध्वनिपरिवर्तन, ध्वनिपरि-वर्तनाच्या प्रकृती, ध्वनिपरिवर्तनाचा भाषेवर परिणाम, अनपेक्षित ध्वनिपरिवर्तन, नव्या भाषा, भाषेचे दृश्य स्वरूप : लेखन, लिपीची मूलतत्त्वे आणि मराठीचे लेखन, परिणामकारी ध्वनिविचार अशी केलेली आहे. मराठीत अशा प्रकारचे लेखन प्रथमतःच करताना परिभाषेची अडचण येऊनही कोणताही इंग्रजी शब्द, कंसातदेखील न वापरता किंवा संस्कृतच्या आधारे मुद्दाम कृत्रिम परिभाषा तयार करण्याच्या खटाटोपात न पडता लेखकाने असे काही अर्थवाही, सुटसुटीत व परिचित शब्द योजले आहेत. भाषाविज्ञानातील ध्वनिविचाराचे आधुनिक ज्ञान करून देऊन तत्संबंधित अन्य विषयांचे स्वरूप तात्त्विक दृष्टीने स्पष्ट करणारा मराठीतील अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ.

वि. बा. प्रभुदेसाई

**नटसम्राट गद्यनाट्याचार्य गणपतराव जोशी यांचे चरित्र. प्रकाशक : लक्ष्मण नारायण जोशी. वाङ्मयविहार मंडळ, पुणे, १९२३.** हे गणपतराव जोशी यांचे विस्तृत आणि पहिले चरित्र आहे. चरित्राच्या आरंभी गणपतराव जोशी यांचा जीवनपट रेखाटला असून नंतर नट व शाहूनगरवासी नाटक मंडळीचे चालक या नात्याने त्यांनी केलेल्या कार्याचा सविस्तर परिचय करून दिला आहे. कै. वा. बा. केळकरांच्या मार्गदर्शनामुळे गणपतरावांच्या अंगच्या नाट्यगुणांचा विकास कसा झाला व गणपतरावांनी प्रत्येक भूमिकेत आपल्या अभिनयाचे अलौकिक दर्शन कसे घडविले याची माहिती यात दिलेली आहे. गणपतरावांचे सहकारी बाळाभाऊ जोग यांच्याही नाट्यगुणांची ओळख करून दिलेली आहे. त्यांच्या अंतर्गत घडामोडींची विपुल माहिती या ग्रंथात मिळते. गणपतराव व बाळाभाऊ यांची नाटकातील छायाचित्रे अंतर्भूत केल्याने चरित्रग्रंथाचे महत्त्व अधिक वाढले आहे.

मु. श्री. कानडे

**नवनीत : परशुराम बल्लाळ. संकलक, प्रकाशक : परशुराम बल्लाळ गोडबोले, १८५४.** जुन्या मराठी कवितांचे वेचे असलेले हे पुस्तक परशुरामपंत तात्यांनी अनेक जुनी हस्तलिखिते परिश्रमपूर्वक मिळवून सरकारी शाळा-पाठचशाळांमधील विद्यार्थ्यांसाठी तयार केले. तत्कालीन सुशिक्षितात मराठी कवितेची आवड या पुस्तकाने निर्माण केली. परशुरामपंतांच्या हयातीतच (१८७४ पर्यंत) याच्या चार आवृत्या निघाल्या. त्यांच्या नंतर नवीन आवृत्या निघाल्या त्यामध्ये तळेकरशास्त्री व रावजीशास्त्री यांचा वाटा होता. नवनीतामुळेच रघुनाथ पंडितांचे दमयंती स्वयंवराख्यान लोकांपुढे आले. नवनीताचा दुसरा भाग १८६३ मध्ये परशुरामपंतांनीच 'कवितासारसंग्रह' या नावाने काढला होता. 'नवनीताने उत्तम काव्याचे नमुने लोकांपुढे आणण्याचे मोठे कार्य केले. १९५४ मध्ये अ. का. प्रियोळकर यांच्या संपादनाने नवनीताची शतसंवत्सरी म्हणून अठरावी आवृत्ती प्रसिद्ध केली गेली.'

ना. ग. जोशी

**नवमतवाद (ऐतिहासिक भौतिकवादाची रूपरेषा) : पेंडसे, लालजी. प्रकाशक : अभिनव प्रकाशन, प्रथम आवृत्ती, १९३५, द्वितीय आवृत्ती सप्टेंबर, १९६८.** 'हिंदुंचे समाजरचनाशास्त्र' या पुस्तकाचे कर्ते श्री. गो. म. जोशी यांच्या आव्हानाला उत्तर म्हणून नवमतवादाची तात्त्विक भूमिका शास्त्रशुद्ध पद्धतीने मांडणारा, छोटेखानी ग्रंथ.

एकेकाळी मराठी वाङ्मयामध्ये 'नवमतवाद' हा वादळी चर्चेचा विषय होता. 'प्रतिभा', 'किर्लोस्कर' इत्यादी मासिकांतून विविध साहित्यसंमेलनातून तसेच जाहीर सभा-चर्चेतून हा वाद चांगलाच रंगला होता. या वादाला चर्चेमध्ये अश्लीलता, पावित्र्यविडंबन असे फाटेही फुटत होते अशा स्थितीमध्ये नवमतवादाची निर्दोष, अचूक व व्यापक भूमिका विचारवंतांपुढे असण्याची गरज होती. अशा वेळी या वादग्रस्त विषयावर शास्त्रीय, तात्त्विक स्वरूपाचे विवेचक पुस्तक लिहून 'नवमतवाद' या विचारधारेला स्पष्टता व निश्चितता आणून देण्याची कामगिरी लेखकांनी या ग्रंथाद्वारे पार पाडली आहे.

'प्रत्येक घटना कारण-परिणामांनी बद्ध असते. म्हणून ती भौतिक असते या दृष्टीने मानवाचा सामाजिक इतिहास तपासला तर निरनिराळ्या वेळी कशी स्थित्यंतरे झाली ? व ती का झाली ?'हे सूत्र पकडून ऋग्वेदकाळापासून भांडवल-शाहीच्या अस्तापर्यंत मानवी समाजातील स्थित्यंतराचा आलेख मांडून सनातन्यांच्या अभिरुचीपूर्ण विसंगतींचा मर्मभेद करणारा व नवमतवादाची विचारप्रणाली प्रस्थापित करणारा चिकित्सक ग्रंथ म्हणून ग्रंथाची उपयुक्तता अधिक.

सनातन्यांच्या आक्षेपांना उत्तर देताना लेखकांनी समर्पक व पटणारी उदाहरणे ग्रंथात दिलेली आहेत. अर्थ, गौरवपूर्ण भाषा व शास्त्रीय काटेकोर विवेचन यामुळे हा छोटा ग्रंथ जुन्या व नव्या मतांच्या लोकांत वाचनीय ठरावा.

मोहन पाटील

**नवी मळवाट : मुक्तिबोध, शरच्चंद्र. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई-४, आवृत्ती : २३ ऑक्टोबर १९४९.** मर्ढेकरांनंतरचे, नवकाव्यावर स्वतःचा वेगळा ठसा उमटवणारे एक विचारवंत मानवतावादी कवी, नवकाव्याची भूमिका मांडणारे समीक्षक म्हणून मुक्तिबोधांना ओळखले जाते.

या संग्रहात मुक्त छंदात लिहिलेली त्यांची कविता समाविष्ट असून या संग्रहाच्या प्रस्तावनेतच त्यांनी 'समतेच्या जीवनाचे उद्याचे वास्तव ही नवकवितेची आधारशीला आहे अशी स्वतःची भूमिका मांडली आहे.'

या संग्रहातील कवितेत नवकवीच्या हृदयात पेटलेल्या नवविचाराच्या ठिणगीचे " उद्याच्या त्या दिव्य आणि उच्च प्रीतीसाठी । आज सोडू द्वेसाचिये जळजळीत बाण । " अशा वेगळ्या आशयाभिव्यक्तीसह दर्शन घडवले आहे. मानवतेला मारक असलेल्या वास्तव यंत्रणेतील अनेक विनाशकारी शक्तींवर मात करून उद्याचा उज्ज्वल भविष्यकाळ साकार करण्याची जिद्द व्यक्त करणारी या संग्रहातील त्यांची कविता एक नवी आशादायी विचारधारा आहे.

कवितेच्या आशयातील बदल अभिव्यक्तीच्या रितीवर परिणाम करतो हे मत त्यांनी या संग्रहातील 'हिरवीगार वनस्पती', 'पाचोळ्याचा राडा' भविष्याच्या गर्भातील बाळाचे रुदन, मेघरूपी कासवाच्या काळ्या पाठीवर खवल्यानी व्यापलेले नभ यांसारख्या अनेक नव्या नव्या आधुनिक प्रतिमांतून लक्षात आणून दिलेले आहे. नवा अर्थगर्भ आशय व प्रतिमांतील विचारप्रवण हे संग्रहाचे वैशिष्ट्य. सार्वजनिक जीवनातील अराजक, विसंगती, विद्रूपता मानवी मूल्यांची हत्या, विराट विश्वसंसारात उपकरण ठरलेला मानव या विषयीचा मानसिक संघर्ष कवीच्या पोटातून ओठावर येताना एक दुर्दम्य आशादायी सुक्त त्यांची कविता म्हणते आहे असा विश्वास देणारी मराठी कवितेच्या स्थित्यंतराच्या मार्गावरील ही नवी मळवाट आहे.

**नवे गोकूळ : देशपांडे, पु. ल. प्रकाशक : परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई, १९५८.** स्वच्छता, श्रम आणि स्वावलंबन यांचे

महत्त्व हसत खेळत सांगणारी कुमारांसाठीची प्रयोगक्षम संगीत नाटिका. उलटेवाडी गावातील सारे लोक आळशी असतात. त्यामुळे पशुपक्षीदेखील तिथे राहायला कंटाळून बाहेर जाण्याच्या तयारीत असतात. उलटेवाडीतील मट्ठ, आळशी, घाणेरड्या गाढवा-डुकरांची, ढेकूण, डास, नारू वगैरेंची चैन असते. त्यांच्या सर्वनाशी मंडळाचेच राज्य तिथे असते. तिथे पोचलेला सोंगाड्या विदूषक, मुलांच्या मदतीने या साऱ्यांचा नाश करून शाळा सुरू करतो. लोकांना उद्योगी बनवतो. मग उलटेवाडीचे बनते 'नवे गोकुळ'. लोकनाट्याची शैली, चटकदार संवाद, गाणी व संगीत यामुळे बालमनावर मोहिनी घालण्याचे वेगळेच सामर्थ्य या संस्कारक्षम नाटिकेत आहे.

उर्मिला दळवी

**नव्या गुजगोष्टी : फडके, नारायण सीताराम. प्रकाशक : एफ. बाबूराव आगशीकर, संपादक : 'कला' नवा गोवा १९३७.** ना. सी. फडके हे कथाकार, कादंबरीकार, लघु-निबंधकार, कला-क्रीडा समीक्षक आणि लघुनिबंध व गुजगोष्टी या साहित्यप्रकारांचे आद्यप्रवर्तक मानले जातात. 'विलक्षण ओवाळणी', 'माणूस जगतो कशासाठी ?'या त्यांच्या प्रसिद्ध कथा, 'अल्ला हो अकबर' (१९१७), 'कुलाब्याची दांडी', 'अखेरचं बंड', 'दौलत' इत्यादी शंभराहून अधिक कादंबऱ्या, पंचवीसहून अधिक कथा त्यांनी लिहिल्या 'प्रतिभासाधन' (१९३२). 'लघुकथा तंत्र आणि मंत्र' हे दोन ग्रंथ लिहून कथातंत्राचा विचार मराठीत प्रथमच मांडला. कलेसाठी कला ही त्यांची साहित्यविषयक भूमिका होती. १९६३ साली पद्मभूषण.

मराठी कथेला प्रमाणबद्धता, तंत्रशुद्धता, बांधेसुदपणा आणि अंतःसौंदर्य आणण्यात फडक्यांनी मोठी कामगिरी केली. प्रस्तुत संग्रहात मध्यमवर्गीय माणसे व त्यांच्या आयुष्यातील सुख-दुखाचे छोटे-छोटे क्षण चित्रित केले आहेत. प्रथमच आपला पांढरा केस आपल्याला दिसणे, वाट चुकल्यामुळे पहायला मिळालेले निसर्गसौंदर्य, पहाटे उठण्याचा नियम, चांदणी रात्र, सतत अधिक सुखाच्या मागे लागून हातातील सुखाला पारखे होणे. अशा विविध घटनांवर या कथा आधारित आहेत. छोट्या क्षणांमधून सुख शोधण्याचा प्रयत्न येथे दिसतो.

'अंधारी रात्र', 'आरसेमहाल', 'आंबट द्राक्षे', 'ताजा कलम' इत्यादी गुजगोष्टीविशेष परिणामकारक आहेत.

**नागकन्या : माडखोलकर, गजानन त्र्यंबक. प्रकाशक : कोठावळे केशव विष्णू, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई, पहिली आवृत्ती १९४२, तिसरी आवृत्ती १९७२.** एक प्रथितयश कादंबरीकार म्हणून माडखोलकरांना ओळखले जात असले तरी त्यांनी 'बाग्देवतेस', 'पानिपतचे रणकंदण', 'शिवप्रभूस', यासारख्या कविता लिहिल्या असून त्यांनी 'केशवसुतांचा संप्रदाय', 'आधुनिक कविपंचक', 'विष्णू कृष्ण चिपळूणकर', 'विलापिका' हे टीकात्मक निबंध-प्रबंधही लिहिलेले आहेत.

१९३३ पासून १९५३ पर्यंत त्यांनी 'मुक्तात्मा', 'भंगलेले देऊळ' इत्यादी १३ कादंबऱ्या लिहिल्या.

'नागकन्या' या कादंबरीच्या शीर्षक पृष्ठावर 'एक रान कहानी' असा उल्लेख आहे. या कादंबरीचा कथानककाळ अवघा २४ तासांचा असून पूर्णतः तापीच्या किनारी व नदीच्या पात्रात घडलेले हे कथानक आहे. एका रमणीय चांदण्या रात्री नायक रंगा याने मादिया नावाच्या एका मिशनरी कन्येबरोबर केलेला विलास हा या कादंबरीचा विषय आहे.

गोंडभाषेतील शब्दांचे आधिक्य असलेली भाषा. तापी नदीच्या परिसरातील निसर्ग सौंदर्याच्या 'चक्षुर्वैसत्यम रसान' वर्णनांची लयलूट व कल्पनेच्या भराऱ्या यामुळे ही कादंबरी तरुण वर्गास वाचनीय वाटते.

या छोटेखानी कादंबरीत माडखोलकरांनी स्त्रीदेहाच्या सौंदर्याचे उन्मादक वर्णन, नायक-नायिकेचा स्वैराचार, कामवासनेचे मुक्त वर्णन, नग्नतेचे दर्शन घडविले आहे. म्हणूनच अनेक टीकाकारांनी 'विकृत मनोवृत्तीचा कळस' असणारी कादंबरी असा तिचा उल्लेख केला आहे. असे असले तरी 'मादिया' च्या निमित्ताने भारतीय प्रतिगामी विचारसरणीवर, निष्क्रियतेवर बऱ्याचप्रमाणात टीका करण्याची संधी लेखकाने साधून घेतली आहे.

यशवंत चव्हाण

**नागपूरकर भोसल्यांची बखर : गुप्ते, काशीराव राजेश्वर. संपादक : काळे यादव माधव, आवृत्ती दुसरी, प्रकाशक : श्री. ल. पांढरीपांडे, पुणे १९३६.** नागपूरकर भोसले यांच्या घराण्याची ही कैफियत असून ती इ. स. १८२२ मध्ये लिहिली गेली आहे. त्या साली 'मिस्तर रिचर्ड जेंकिन्स बहादूर यांनी मिस्तर क्लकिंसन साहेब बहादूर यांस "नागपूरकर भोसले सेनासाहेब–सुभा" यांची हकिकत माहितीगाराकडून लिहून घेण्यास सांगितले. त्यावरून काशीराव राजेश्वर गुप्ते यांनी ही बखर लिहिली. रिचर्ड जेंकिन्स हा नागपूरचा रेसिडन्ट होता. पहिले रघुजी भोसले यांच्या पदरी बळवंतराव महिपती गुप्ते होता त्याचा काशीराव हा पुतण्या. नागपूरकर भोसले यांचे घराणे, मूळ पुरुष, त्यांच्याकडे परंपरेने चालत आलेल्या सेनासाहेब–सुभा या पदाची माहिती, त्यांना हे पद कसे प्राप्त झाले, त्यांना कोणता प्रदेश केव्हा मिळाला यासंबंधी

या कैफियतीत विस्ताराने सांगितले आहे. का. ना. साने ह्यांनी 'नागपूरकर भोसल्यांची बखर'असे तिचे नामकरण केले.

स. मा. गर्गे

**नाट्यकविता संग्रह : भावे, विष्णू अमृत. प्रकाशक : भावे विष्णू अमृत, १८८५.** इ. स. १८४३ ते १८६१ या अठरा वर्षांच्या कालखंडात विष्णू अमृत भावे यांनी विविध पौराणिक नाटकांसाठी जी पदे रचिली त्यांचा संग्रह त्यांनी नाट्य-व्यवसायातून निवृत्त झाल्यानंतर २४ वर्षांनी प्रकाशित केला. हाच प्रस्तुत संग्रह होय.

नाट्यारंभी म्हणावयाची ईशस्तुतीपर पदे प्रथम देऊन नंतर पुराणातील निरनिराळ्या कथाभागाला अनुलक्षून रचलेली पदे या संग्रहात दिलेली आहेत. हरिश्चंद्रव्याख्यान इत्यादी कथाविषयांवर आधारलेली पदेही या संग्रहात समाविष्ट आहेत. यात एकूण ५० आख्याने आहेत.

किर्लोस्करांच्या संगीत नाटकांचे आगमन होण्यापूर्वीच्या संगीत नाटकांचे स्वरूप समजण्याच्या दृष्टीने विष्णूदास भाव्यांचा नाट्यकवितासंग्रह हे फार महत्त्वाचे साधन आहे.

मु. श्री. कानडे

**नाथ भागवत : एकनाथ.** मूळ संस्कृत भागवत ग्रंथाच्या एकादश स्कंधावरील नाथांची ही टीका 'नाथ भागवत' किंवा 'एकनाथी भागवत' या नावाने ओळखली जाते.

नाथ भागवताचे ३१ अध्याय असून ओवीसंख्या १८८१० आहे. नाथांनी ग्रंथारंभी गणपती, सरस्वती, श्रीकृष्ण, दत्तात्रेय, जनार्दनस्वामी, ज्ञानदेवादी संत व्यास, वाल्मिकी, शंकराचार्य आणि भानुदासादी पूर्वजांना वंदन केले आहे. साधूची लक्षणे, शिष्याची लक्षणे, भक्तीचे मार्ग यांविषयी ग्रंथात विस्तृत विवेचन असून भक्ती हाच खरा ज्ञानाचा आणि उद्धाराचा मार्ग आहे असे प्रतिपादन आहे. या ग्रंथात अनेक आख्याने आलेली आहेत. नाथांचे सर्व तत्त्वज्ञान आणि विचारसंपदा या ग्रंथात असल्यामुळे वारकरी संप्रदायाचा प्रमाणग्रंथ म्हणून त्यास मान्यता मिळाली.

सोपी भाषा, समर्पक दृष्टान्ताच्या आधारे झालेले प्रासादिक, रसाळ तत्त्वप्रतिपादन ही या ग्रंथाची वैशिष्ट्ये होत. हा ग्रंथ काशी येथे पूर्ण झाल्यामुळे नाथांनी तिकडे रूढ असलेला विक्रम शक नोंदविला आणि शालिवाहन शक १४९५ अशीही नोंद केली.

चंद्रकांत धांडे

**नाभिकपुराण : भारती विश्वनाथ.** या ग्रंथात आपल्या न्हावी जातीचे श्रेष्ठत्व लेखकाने वर्णिले आहे. प्रत्यक्ष दत्तात्रेयाने दर्शन देऊन ग्रंथलेखनास प्रवृत्त केल्याचे लेखक सांगतो. न्हावी जातीचा आद्यपुरुष म्हणजे शंकराच्या आज्ञेने त्याच्या नाभीतून मानवरूपाने जन्म घेणारा शेष होय. नाभीतून जन्मला म्हणून तो नाभिक व म्हणून ग्रंथनाम 'नाभिकपुराण'. या ग्रंथाचे एकूण १३ अध्याय असून ओवीसंख्या १६३४ आहे. ग्रंथलेखनकाल शके १२६० असा मुद्रित झालेला असला तरी भाषेचे स्वरूप बघता तो इतका प्राचीन वाटत नाही. दोन अडीचशे वर्षांपूर्वीचा फारतर असावा असे ज. र. अजगावकर यांचे मत आहे. या ग्रंथातील एक संपूर्ण अध्याय हिंदीत लिहिलेला असून अन्यत्रही हिन्दी शब्दप्रयोग आढळतात.

अरविंद कुरुंदकर

**ना. गोखले चरित्र : साने, पां. स. (सानेगुरुजी). प्रकाशक : विश्वनाथ गणेश कंपनी, पुणे, १९२७.** 'ना. गोखले चरित्र'हे ना. गोखले यांचे पहिलेच विस्तृत चरित्र आहे. या चरित्राला द. वा. पोतदार यांनी प्रस्तावना लिहिली आहे. प्रथमार्ध आणि उत्तरार्ध अशा दोन भागात चरित्र नायकाच्या कौटुंबिक आणि नेमस्त राजकीय कर्तृत्वाची कहाणी या चरित्रात सुबोधपणे वर्णिली आहे. चरित्राच्या अखेरीस काही परकीय आणि काही स्वकीय समकालीन थोरामोठ्यांच्या आठवणी दिलेल्या आहेत. त्या इंग्रजीत असल्या तरी मूळ विषयाला पूरक, उठाव देणाऱ्या आहेत. सानेगुरुजींच्या उमेदवारीच्या काळातील लेखनाचे स्वरूप समजण्याच्या दृष्टीनेही प्रस्तुत चरित्र उपयुक्त ठरते.

म. श्री. दीक्षित

**नामसुधा : वामन पंडित.** इ. स. १७व्या शतकातील प्रसिद्ध कवी वामन पंडित यांची 'नामसुधा' ही आख्यानक रचना आहे. या काव्याचे नाव वामन पंडितांनी 'हरिनामसुधा' असे ठेवले होते. पण संक्षेपाने ते 'नामसुधा' झालेले आहे. नामसुधाचे कथानक तीन अध्यायांत विभागले गेले आहे. मूळ संस्कृत भागवताच्या स्कंध ६ मधील १ ते ३ अध्यायांतील कथाभागाच्या आधाराने ५३५ श्लोकांत या काव्याची रचना झालेली आहे. ज्ञानहीन नामोच्चाराने पापक्षालन होत असले तरी चित्तशुद्धी होत नाही. ज्ञानयुक्त नामोच्चाराने पापबीजे नष्ट होतात. हे वाचकांच्या मनात ठसविण्यासाठी वामनाने अजामिळाची कथा सांगितली आहे. या कवितेच्या शेवटी आलेल्या उल्लेखावरून वामन पंडिताने हे काव्य कोल्हापूर येथील महालक्ष्मी मंदिरात पूर्ण केले असे दिसून येते.

**नारायणबोध : चौगुले (डॉ.) रामजी गणोजी, नारायणबोध—भाग पहिला. प्रकाशक : रामजी बिन गणोजी चौगुले, मुंबई, १८६०. चौगुले यांचा शिळाछाप छापखाना.** 'स्त्रीचरित्र' या ग्रंथाच्या तुलनेत लेखकाचा हा ग्रंथ भिन्न स्वरूपाचा असून आपल्या मुलाला उपदेश करण्यासाठी लेखकाने तो लिहिला आहे. हा ग्रंथ गोष्टीवजा असून त्याची पृष्ठसंख्या ४६० आहे. 'जारकर्मापासून हानी', 'विश्वासघात केल्यापासून दुर्दशा' यासारख्या मथळ्यांच्या गोष्टीत, प्रथम किंवा शेवटी निबंधवजा

भाग जोडून एकेक कथा देण्याचा उपक्रम लेखकाने केला आहे. डॉ. रामजी गणोजी हे प्रारंभी सैन्यात होते. ह्या नोकरीत त्यांनी वैद्यकविद्या मिळविली. स्वतःचा छापखाना टाकून त्यातून स्वतःचे ग्रंथ छापले. रसायनशास्त्रावर त्यांचे तीन ग्रंथ आहेत. संक्षेपशैलीला महत्त्व असलेल्या अव्वल इंग्रजीच्या कालखंडात विस्ताराने लेखन करणारा लेखक म्हणून रामजी गणोजी लक्षात राहतील.

वसंतराव बोरगावकर

**नारायणराव पेशवे यांच्या मृत्यूचा फार्स : जोगळेकर, ज. वा. प्रकाशक : मोरेश्वर बापूजी, मुंबई, १८८८.** १८७० साली प्रसिद्ध झालेले विरेश्वर सदाशिव छत्रे यांचे 'श्रीनारायणराव पेशवे'यांचे नाटक समोर ठेवून जोगळेकरांनी हा प्रचंड फार्स लिहिला आहे. फार्स म्हणजे लघुनाटक या कल्पनेपासून तो मुक्त आहे. डबल डेमी आकाराची १३६ पृष्ठे यात आहेत. ठसठशीत व्यक्तिचित्रणे व प्रसंगचित्रणांनी तो युक्त आहे. आनंदीबाई व रघुनाथरावांची व्यक्तीचित्रे प्रभावी आहेत. आनंदीबाई ही कृत्या असून तिच्या चिथावणीने नारायणरावाचा वध कसा घडतो याचे नाट्यपूर्ण चित्रण आहे. सामाजिक रीतीरिवाज, पदे यांची उत्कृष्ट जोड आहे.

भीमराव कुलकर्णी

**नारायणरावांच्या वधाचा पोवाडा : लहरी मुकुंदा.** पेशवाईचा काळ बघितलेल्या शाहिरांत लहरी मुकुंदा या शाहिराचा समावेश होतो. 'नारायणरावांच्या वधाचा पोवाडा' ही लहरी मुकुंदाची रचना आहे. नारायणरावांच्या मृत्यूचे करुण चित्र रेखाटणाऱ्या या पोवाड्याचे एकूण १३ चौक असून तेराव्या चौकात कवीने आपला नामोल्लेख केला आहे. य. न. केळकर संपादित 'ऐतिहासिक पोवाडे'मध्ये हा पोवाडा संग्रहित केला आहे.

तु. शं. कुलकर्णी

**नावल व नाटक ह्याविषयी निबंध : मराठे, का. बा. प्रकाशक : मॉडर्न बुक डेपो प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १८७२, दुसरी आवृत्ती, १९६२.** का. बा. मराठे हे एकोणिसाव्या शतकातील एक विद्वान ग्रंथकार, साक्षेपी भाषांतरकार, विचारवंत आणि प्रार्थनासमाजाचे अनुगृहित म्हणून प्रसिद्ध आहेत.

'वेदांविषयी निबंध' (१८६९) या पुस्तकानंतर १८७२ साली प्रसिद्ध झालेला 'नावल व नाटक ह्याविषयी निबंध' हा निबंध अत्यंत गाजला. इ. स. १८३५ ते इ.स. १८७४ या काळात प्रसिद्ध झालेला हा पहिला व एकमेव वाङ्मयविषयक निबंध आहे.

प्रस्तुत निबंधात नावल (कादंबरी) व नाटक यांची तात्त्विक आणि उपयोजित चर्चा करणारे दोन भाग आहेत. १८६१ मध्ये प्रसिद्ध झालेल्या लक्ष्मणशास्त्री हळबे यांच्या 'मुक्तमाला' या कादंबरीपासून त्याच प्रकारच्या अद्‌भुतरम्य कादंबऱ्या प्रसिद्ध होऊ लागल्या. त्यासंबंधी मराठे यांनी 'हल्ली नावलांची कीड फार झाली आहे' असा सार्थ अभिप्राय व्यक्त केला आहे. अद्‌भूत कादंबऱ्यांतून आलेल्या घटनांचे चित्रण विपर्यस्त असते असे मराठे म्हणतात. तसेच औचित्याच्या बाबतीतही अशी नावले चांगली नाहीत असे स्पष्टपणे ते उदाहरणे देऊन म्हणतात. नावलांची चर्चा करताना नावलात आलेल्या भाषेचीही मराठे चिकित्सा करतात. 'नाटक' या भागातील विवेचनावर भरतमुनींच्या नाट्यशास्त्राचा प्रभाव जाणवतो. नाटकात किती रस असावेत यासंबंधी विवेचन करताना 'शाकुंतल', 'मुद्राराक्षस', 'कुमारसंभव', 'मालतीमाधव' या ग्रंथातील काव्यपंक्ती घेऊन मराठे यांनी विवेचन केले आहे. संस्कृत नाटकाबरोबरच ट्रेजेडीचीही चर्चा या ग्रंथाच्या शेवटी येते.

वाङ्मयचिकित्सा करणारा आणि १८७२ साली पुस्तकरूपाने प्रसिद्ध होणारा पहिला वाङ्मयविषयक निबंध म्हणून या ग्रंथाचे ऐतिहासिक महत्त्व आहे. तसेच या ग्रंथातील साहित्यविषयक विचार आजच्या काळातही मार्गदर्शक आहेत.

वि. दा. वासमकर

**नासिक येथील स्वातंत्र्यशाहीर कवी गोविंद यांची कविता : गोविंद (गोविंद त्र्यंबक दरेकर). प्रकाशक : कृ. ब. महाबळ, नासिक, आवृत्ती १९३०.** स्वराज्य की स्वातंत्र्य ? या धामधुमीच्या काळात स्वयंस्फुर्तीने स्वातंत्र्याची गाणी गाणारा पहिला शाहीर म्हणून कवी गोविंद यांची ख्याती आहे.

हे नगर जिल्ह्यातील कण्हेरपोखरी या खेड्यात मराठा जातीत जन्मलेले कवी असून यांच्या काही स्फूर्तिदायक कविता त्या काळी सरकारी रोषांस पात्र ठरून जप्त झाल्या होत्या. मराठी वाङ्मयेतिहासातील १९२०-३५ या तांबे व रविकिरण मंडळाच्या काव्यकर्तृत्वाच्या कालखंडातच लेखन करणाऱ्या, मध्यवर्ती प्रवाहाच्या थोडेसे बाहेर राहून स्वतंत्र वृत्तीने भिन्न भिन्न प्रेरणांनी लेखन करणाऱ्या चंद्रशेखर, बी, माधव, सावरकर, टेकाडे यांच्या नामावलीत कवी गोविंद यांच्याही नावाचा आवर्जून उल्लेख केला जातो.

या संग्रहात 'शिवबाचा दरबार', 'टिळकांची भूपाळी', 'हिंदभू वांछिते विगत स्वातंत्र्य ते', 'भारत प्रशस्ती,' 'महाराष्ट्रगीत', इत्यादी देशभक्तीने भारलेली कवने समाविष्ट असून 'मुरली' व पुष्कळ स्फुट कविता साकी, दिंडी, तसेच विविध चालींच्या ढंगात लिहिलेली कवनेही संग्रहित केलेली आहेत. सगळ्याच कवितांवर लावणी वाङ्मयाचा ठसा असलेला जाणवतो. कदाचित 'शाहीर' ही उपाधी या रचनेला अनुसरूनच कवी गोविंदांना लाभली असावी असे एकंदर रचना वाचताना वाटते. ओज, रसपरिपोष, नादानुकारी, अनुप्रासयुक्त शब्दयोजना ही या संग्रहाची वैशिष्ट्ये.

मोहन पाटील

**निगमसार : वामन पंडित.** 'यथार्थदीपिका'कार वामन पंडिताने लिहिलेला हा तत्त्वचिंतनपर ग्रंथ आहे. या ग्रंथाच्या

कालरचनेचा उल्लेख ' शके पंधरा शते पंचाणव। ते ग्रंथ प्रगटिला अभिनव (९.१६३)' असा (इ. स. १६७३) स्पष्टपणे करण्यात आलेला आहे.

उपनिषदांच्या तात्पर्यानुसार या ग्रंथाची रचना केलेली असून यात ९ अध्याय आहेत. मलयाचलावरील सच्चिदानंद सद्गुरूंची भेट, त्यांनी केलेला भार्गवी वारुणी विद्येचा उपदेश व त्यांच्या निमित्ताने घडलेले परमेश्वरदर्शन या संबंधीचे विवेचन यात आहे. " सकल निगमांचे सार। ब्रह्म अद्वैत निर्धार। (१.५) " ह्या विषयाचे निरूपण करण्याची भूमिका ग्रंथकाराने स्वीकारलेली आहे.

' सकल संतांचा अनादि अनुभव (९.१६३)' वर्णन करणारा हा ग्रंथ तत्त्वनिरूपणाच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. श्रुतिवचनांचा आधार घेत पांडित्यपूर्ण शैलीत वामन पंडितांनी भाष्य केलेले आहे. निरनिराळ्या सिद्धान्ताचा परस्परसंबंध व्यवस्थित स्पष्ट करून मांडलेली एक सुसंबद्ध विचारप्रणाली असा विशेष या ग्रंथात दृष्टीस पडतो.

लता मोहरीर

**नित्यानंदैक्यदीपिका : शिवकल्याण.** शिवकल्याणाची ही रचना म्हणजे ज्ञानेश्वरांच्या 'अमृतानुभव' या ग्रंथावरील विवरणात्मक टीका होय. महाराष्ट्र सारस्वतकार भावे यांनी 'नित्यानंद दीपिका' असे या ग्रंथाचे नाव दिले आहे तर डॉ. तुळपुळे यांनी 'नित्यानंदैक्यदीपिका' हेच नाव बरोबर असल्याचे म्हटले आहे. नित्यानंद हे शिवकल्याणांचे गुरू होते.

या ग्रंथाची रचना शके १५५७ (इ. स. १६३५) मधली आहे. शिवकल्याण हा मूळचा अंबाजोगाईचा. त्याने ही टीका देवगिरी येथे आरंभिली पण मध्यंतरी थोडा खंड पडून पंढरपूर येथे ती पूर्ण झाली असे दिसते. ज्ञानेश्वरांच्या मूळ ८०० ओव्यांवर शिवकल्याणांनी ६४१० ओव्या रचिल्या. या ग्रंथाचे वैशिष्ट्य असे की, या टीकेत ज्ञानेश्वरांच्या ग्रंथाचे नाव मुळातल्याप्रमाणे 'अनुभवामृत' असे आढळते.

मूळ ग्रंथाच्या अंतरंगाशी अत्यंत समरसून करण्यात आलेली ही रचना वैशिष्ट्यपूर्ण आहे. संस्कृत ग्रंथावर मराठी टीका करण्याची परंपरा असली तरी, मूळ मराठी ग्रंथावर मराठीतच टीका करण्याचा एक नवीन पायंडा शिवकल्याणांनी या ग्रंथाने पाडला.

वि. पां. देऊळगावकर

**निबंधमाला : चिपळूणकर विष्णू कृष्ण. प्रकाशक : जोशी, शंकर नरहर, चित्रशाळा छापखाना, पुणे, पहिली आवृत्ती १९१७.** 'निबंधमाला' ही मासिक रूपाने जानेवारी, १८७४ पासून प्रकाशित झाली व १८८१ च्या अखेर एकूण ८४ अंक निघाल्यानंतर बंद करण्यात आली. या आठ वर्षांतील सर्व अंक ग्रंथरूपाने १९०७ मध्ये प्रसिद्ध झाले.

या ग्रंथात एकंदर सत्तावीस विषयांवरचे लहानमोठे निबंध असून त्यामध्ये भाषाविषयक, वाङ्मयविषयक, चर्चात्मक, परमतखंडनात्मक, सामाजिक, राजकीय व मानसशास्त्रीय इत्यादी विषय आलेले आहेत. पहिल्या पाच अंकातील विषय भाषा आणि वाङ्मय या सौम्य विषयासंबंधी आहेत तर सहा ते आठ अंकांतून इतिहास विषयावर लेखन आहे. नवव्या अंकापासून सोळाव्या अंकापर्यंत भाषादूषण, लेखनशुद्धी, वाचन, भाषांतर यांसारख्या निर्लेप विषयांवर लेखन असून त्यानंतरच्या भागात इंग्रज सरकार, मिशनरी, तथाकथित सुधारक इत्यादी विषयावरील निबंध आलेले आढळतात.

निबंधासाठी चिपळूणकरांनी जी भाषाशैली वापरली आहे ती मोठी डौलदार, प्रौढ, व्युत्पन्न, उदाहरणे व दाखले यांनी समृद्ध आहे. निबंधाचा विषय, त्याची रचना, मांडणी, प्रारंभ, विवेचन, पूर्वपक्ष, उत्तरपक्ष इत्यादी अनेक विशेषांनी हे निबंध मराठीतील आदर्श निबंध ठरले आहेत.

प्रत्येक निबंधाच्या सुरुवातीस समर्पक, संस्कृत सुभाषित दिले असून जागोजागी 'तळटीपा' दिल्या आहेत. वाङ्मय, भाषा व वैचारिकता या दृष्टीने आजही हे निबंध उपयुक्त ठरतात.

यशवंत चव्हाण

**निबंधसंग्रह : निबंधसंग्रह भाग-१, भाग-२, भाग-३, आगरकर, गोपाळ गणेश. प्रकाशक :**
**भाग-१ - शिराळकर आणि कंपनी, पुणे, १८९५**
**भाग-२ - रामचंद्र महादेव ठोसर, पुणे, १९१७**
**भाग-३ - बाळकृष्ण मल्हार फडतरे, पुणे, १९१८.** थोर समाजसेवक, सुधारकांचे अग्रणी, फर्ग्युसन महाविद्यालयाचे प्राचार्य गोपाळ गणेश आगरकर यांनी साप्ताहिक सुधारक या साप्ताहिकांत लिहिलेल्या लेखांच्या संग्रहाचे हे तीन भाग आहेत. " सुधारकांत प्रसिद्ध झालेले राजकीय, सामाजिक व धार्मिक विषयांवरील लेख " असा उपमथळा संग्रहात नमूद आहे. प्रस्तुत परिचयात तीनही संग्रहांचा एकत्रित परिचय आहे. " चांगले काय व वाईट काय, त्याज्य काय व संग्रहणीय काय यांचा तारतम्य भावाने विचार करता येत नाही " अशा समाजासाठी "इष्ट असेल ते बोलणार व साध्य असेल ते करणार " अशा बाण्याने केलेले हे आवेशपूर्ण, ओघवत्या भाषेतील लेखन आहे. लेखन तारतम्य भावाने केलेले आहे तरीही या लेखांतील तळमळ प्रशंसनीय आहे. सामाजिक सुधारणा, लोकजागृती, लोकशिक्षण, समाजाची सर्वांगीण उन्नती, व्यक्तिस्वातंत्र्य, विवेकवादावर आधारलेला

बुद्धिवाद आणि ऐहिक सुखसंवर्धन हे प्रमुख मुद्दे सर्व लेखांत येतात. तत्त्वज्ञानाचा व्यासंग, अंत:करणाची तळमळ, निर्भीड विचार हे या लेखांत जागोजागी जाणवतात. राजकीय स्वातंत्र्य नसल्याने त्याचा धार्मिक व सामाजिक बदलासाठी करावयाचा विचार होत नाही हा एक महत्त्वाचा विचार प्राचार्य आगरकरानी मांडला आहे. बाल-विवाहाच्या विरुद्ध 'संमती वयाच्या कायद्या'संदर्भात जो संघर्ष झाला त्यामध्ये श्री. आगरकरानी आपले विचार ठामपणे मांडले आहेत. 'सुधारक' साप्ताहिकाची सुरुवात हे "महात्म्याला शोभणारे कृत्य" होय अशा शब्दात श्री. आगरकरांचा गौरव केला गेला आहे. समाजामध्ये विचारजागृती व्हावी असा त्यांचा ध्यास होता व तो या लेखातून त्यांनी व्यक्त केला आहे. समाजाच्या अंधश्रद्धाळूपणाविरुद्ध त्यांनी अत्यंत परखड भाषेत लेखन परंपरा आणि पूर्वग्रह यांचे मानवी मनावर यांचे दडपण पूर्णपणे असते यामुळे अंध-श्रद्धाळूपणा जाण्यासाठी हा एक मोठा अडथळाच असतो, असे मत त्यांनी मांडले आहे. जॉन स्टुअर्ट मिल या ब्रिटिश सामाजिक विचारवंताच्या 'लिबर्टी' या ग्रंथाचा खोलवर परिणाम श्री. आगरकरांच्या विचारावर दिसून येतो.

**निंबोणीच्या झाडामागे : पाडगावकर, मंगेश. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९५६.** काव्यात्मक भाषेत विविध विषयांचा वेध घेणारे वीस ललित निबंध.

जीवनातील सौंदर्यसृष्टीचे व भावबंधनाचे महत्त्व 'निंबोणीच्या झाडामागे' या लघुनिबंधात येते, तर 'धूसर दुपार', 'सोनेरी केसांची परी', 'चक्रव्यूह' आदींमध्ये निसर्गाच्या विविध दृश्यांचे मोहक वर्णन आहे. 'मर्यादा'मध्ये मूक प्राणी व मानव यांच्या वृत्ती विशेषांचे चित्रण आहे. 'अर्धा डझन माणसे', 'आरामखुर्ची', 'वॉशिंग्टनची कुऱ्हाड' इत्यादींमध्ये हिशेबी, ढोंगी प्रवृत्ती, यांत्रिकपणा, सभ्यतेचा दिखाऊपणा यांचा नर्म उपहास आहे. विषयांचे वैविध्य, जीवनातील विसंगतीचा नर्म उपहास ही या ललित लेखनाची वैशिष्ट्ये आहेत.

ऊर्मिला दळवी

**निरंजनचरित्र : पाठक, भगवान. प्रकाशक : महाराष्ट्रीय सारस्वत ग्रंथ ४, भाग-२, १९१५.** आपल्या मातोश्री रमाबाईंच्या आज्ञेने भगवन्त कवीने आपल्या आजोबांचे लिहिलेले गद्यचरित्र म्हणजे 'निरंजनचरित्र' होय. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांना उपलब्ध झालेल्या हस्तलिखिताच्या आधाराने त्यांनी हा ग्रंथ संपादित करून १९१५ साली प्रसिद्ध केला. या ग्रंथाचा रचनाकाल शके १६८३ (इ. स. १७३१) असून तो ग्रंथात नमूद केला आहे. (वृथा संवत्सर उत्तरायण, ग्रीष्मरितों, ज्येष्ठ शुद्ध एकादशी, मंदवारी चतुर्थ प्रहरी ग्रंथ संपला). ग्रंथारंभी भगवान कवीने चरित्रनायकाची व पर्यायाने स्वत:ची कुलपरंपरा दिलेली आहे. तुक पाठक - नरसिंह येल्होबा - रत्नाकर भगवान कवी. येल्होबा म्हणजेच निरंजनस्वामी त्यांना लहानपणापासून देवाचा नाद होता. गणपतीचा अवतार मानल्या गेलेल्या निरंजनदेवांनी बालपणी अवतारकृत्ये केली, कोड घालविणे, ब्रह्मराक्षसाचा त्रास दूर करणे असे चमत्कार केले, शिष्यपरिवार जमविला, त्यांना अनुग्रह दिले, पदरचना केली व अखेरीस समाधी घेतली, याचे भाविक व रसाळ वर्णन या चरित्रात आहे. या ग्रंथाची भाषा बखर गद्याप्रमाणे आहे.

म. प. पेठे

**निर्विकल्प ग्रंथ : बीडकर, एकनाथ.** इसवी सनाच्या १६ व्या शतकात होऊन गेलेल्या एकनाथ बीडकर यांनी लिहिलेला निर्विकल्प ग्रंथ म्हणजे गीतेवरील टीका आहे. या काव्याची ओवीसंख्या ७२६ आहे. श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या संवादरूपाने कवीने भगवद्गीतेतील तत्त्वज्ञान या ग्रंथात मांडलेले आहे. एकनाथ बीडकर हे जनीजनार्दन यांचे शिष्य होते. पैठणचे एकनाथ व बीडकर एकनाथ यांनी आपल्या कवितेत 'एका जनार्दन' ही समान नाममुद्रा योजल्यामुळे बरीच रचना शंकास्पद समजली जात होती. आता पाटंगण देवस्थानात एकनाथ बीडकर यांचे भागवत दशमस्कंध टीका, भागवत एकादशस्कंध टीका, गणेशविलास, निर्विकल्प, चोरिकलीला ऊर्फ बालक्रीडा इत्यादी ग्रंथ उपलब्ध झाले आहेत व पैठणकर एकनाथापासून त्याचे वेगवेगळेपणही सिद्ध झाले आहे.

**निवृत्तिराम : गिरिधर. प्रकाशक : शंकर श्रीकृष्ण देव, धुळे १९१६.** गिरिधरांच्या ग्रंथाचे एकंदर बावीस समास असून ओवीसंख्या २०२६ इतकी आहे. 'दासबोधा'मुळे आपण प्रभावित कसे झालो व आपणास उपरती कशी झाली, याचे वर्णन कवीने या ग्रंथात केले आहे. या ग्रंथाच्या पहिल्या समासात श्री समर्थ आख्यान, दुसऱ्यात गुरुकृपास्तवन, तिसऱ्यात ब्रह्मानुभव व चवथ्यात ग्रंथानुभव यांचे वर्णन करून, कवीने पुढे मनमाया, अहंमाया, अहंममता, भक्ती, ज्ञान, वैराग्य, मनोपसर्ग, संकल्प, प्रपंच, अभ्यास, स्वर्गकाम, ब्रह्मगोळ सृष्टिक्रम, मूळमाया, पंचीकरण, सर्वसिद्धान्त इत्यादी सर्व गोष्टी पूर्वक्षातच कशा येतात व त्या सर्वांची निवृत्ती (निरसन) होऊन केवळ निखळ निर्गुण परब्रह्म कसे उरते, ते स्पष्ट केले आहे. बाविसाव्या समासात ग्रंथाचा उपसंहार करताना गिरिधरांनी दासबोधाचा गौरव केला आहे.

शकुंतला कानडे

**निवेदन : कोसंबी, धर्मानंद. प्रकाशक : मनोरंजक ग्रंथ प्रसारक, मुंबई, पहिली आवृत्ती, १९२४.** मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीच्या पुस्तकमालेतील ९७वे पुस्तक 'निवेदन'मधील काही प्रकरणे 'भारत' साप्ताहिकातून प्रथम १९१२ (नोव्हें.) ते १९१६ (फेब्रु.) पर्यंत छापण्यात आली होती.

प्रो. कोसंबी पहिल्या खेपेस अमेरिकेहून परत आल्यावर काही मित्रांच्या आग्रहास्तव गृहत्याग केल्यापासून ते अमेरिकेहून परत येईपर्यंतचा प्रवासाचा वृतांत सांगण्याच्या उद्देशाने 'निवेदन' मधील दोन प्रकरणे 'भारत' साप्ताहिकात प्रसिद्ध झाली.

ग्रंथात बालपणापासूनचा वृतांत आला असून आपल्या तारुण्यात आगरकर, विष्णूशास्त्री इत्यादींच्या लेखनाचा आपल्यावर कसा प्रभाव पडला, तसेच तुकाराम बुवांच्या गाथेतील चरित्राने आपणास कशी प्रेरणा मिळाली इत्यादी कथन केले आहे. त्याचबरोबरच प्रार्थना समाजाचा लाभ कसा झाला हेही लेखक सांगतात.

ग्वाल्हेर, काशी, नेपाळ, सिलोन, मद्रास, ब्रम्हदेश, बौद्धक्षेत्र इत्यादी याशिवाय श्रीमंत गायकवाड महाराजाच्या आश्रयाने अमेरिकेचा प्रवास, तेथील समाजशास्त्राचा अभ्यास इत्यादी गोष्टी वर्णन केल्या आहेत.

आयुष्यात घडलेल्या गोष्टी निर्विकार व तटस्थ वृत्तीने लेखकाने या आत्मचरित्रात मांडल्या आहेत. मराठीतील एक उत्कृष्ट आत्मचरित्र म्हणून उपयुक्त.

**यशवंत चव्हाण**

**निष्कलंकप्रबोध : शेख, महंमद.** शेख महंमद (सतरावे शतक) यांचे हे सुमारे तीनशे ओव्यांचे आध्यात्मिक स्फुट प्रकरण आहे. यात त्यांनी समाजातील हीन आचारविचारांवर व पाखंडी कर्मकांडावर परखड टीका केली आहे. ढोंगी गुरू, समाजाला नाडणारे बुवा-महंत, सोवळ्याओवळ्याचे स्तोम, भोंदू संन्यासी, कोळिणी, साळिणी, कुंभारणी, ब्राह्मणी यांसारख्या बाया-बापड्यांना ठकविणारे बाबा, जिवंत उदक शोधून पिणारे तथाकथित अहिंसक, धर्माच्या नावावर मुरळ्या भोगणारे व्यभिचारी, शेंबडे, स्वप्निक या सर्वांवर या ग्रंथात टीकेचे, मार्मिक प्रहार केले आहेत. याऐवजी, पवित्र ज्ञान, पवित्र आचार व सुलभ भक्ती हीच कशी श्रेष्ठ आहे याचा उपदेश (प्रबोध) शेख महंमदानी या महत्त्वपूर्ण प्रकरणात केला आहे.

**नजमा पठाण**

**निळासावळा : कुलकर्णी, जी. ए. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९५९.** या कथासंग्रहात बारा कथा असून त्यातील बव्हंश कथा कौटुंबिक पार्श्वभूमीवरील आहेत. त्यात चितारलेले जीवन एकाकी, दुःखी, पराभूत माणसांचे आहे. या माणसांच्या अनुभवांच्या तीव्रतेचा प्रत्ययकारी आविष्कार जी. ए. जेव्हा आपल्या संवेदनशील शैलीतून करतात तेव्हा या सामान्यांच्या जीवनातील गोष्टींना श्रेष्ठ कलेचे परिमाण लाभले.

ईर्षेने कबुतर उडविण्याचा अनुभव सण्णाचे भावविश्व कसे व्यापून राहतो, त्या भावविश्वात कबुतराच्या उडण्याबरोबर कशी आंदोलने होतात व अखेरीस सण्णाला शून्यतेचा अनुभव कसा येतो याचा प्रत्यय 'चंद्राबळ' कथेत येतो. आयुष्य एका झोकात काढणाऱ्या प्रिन्सिपॉल ठकारांना आपल्या आयुष्यातल्या मळकट भागाचे कसे प्रत्ययकारी दर्शन होते व ते दुःखाने तळमळतात याचे चित्रण 'पडदा' कथेत आहे. याच रीतीने लंगड्या गोविंदाचार्याची हतबुद्धता व विषण्णता, नाडगौंडा मास्तरांचा सैरभैरपणा, 'मुखवटा' मधील सदूचा निर्विकार मुखवटा, 'अंधाराची पावले' तील श्रांत, निर्जीव, असहाय्यविकल मन, 'हिरवी मखमल गोरा हात' मधील दामूच्या दडपलेल्या आयुष्याला काल्पनिक, स्वप्निल बेबंद आयुष्य जगण्याची वाटलेली ओढ व 'गुंतवळ'या कथेत धरण उभारणीत गुंतलेल्या जनसमुदायाचे आयुष्य प्रत्ययकारीपणे वर्णिताना लेखकाने त्यातील अपरिहार्य यांत्रिकतेवर ठेवलेले बोट, हे सारे या कथांना उत्कृष्ट परिमाण मिळवून देतात. म्हणून जी. एं चा हा पहिलाच कथासंग्रह असला तरी त्यात जागोजागी श्रेष्ठतेच्या पाऊलखुणा आहेत.

**अशोक जोशी**

**निळे डोंगर तांबडी माती : काणेकर, अनंत. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे. १९५७.** निळे डोंगर आणि तांबडी माती यांनी नटलेल्या दक्षिण भारतात मे, जून १९५० मध्ये लेखकाने चित्रकार दीनानाथ दलाल यांच्यासह केलेल्या भटकंतीची ही दैनंदिनी आहे. बंगलोर, म्हैसूर, उटी, कोचिन, अलेती, कन्याकुमारी, तजांवर अशा प्रेक्षणीय स्थळांची मनावर उठलेली प्रतिबिंबे काणेकरी मिस्किलपणाने वर्णिली आहेत. छोटे छोटे प्रसंग व मोजक्या शब्दांत चित्रित झालेल्या व्यक्ती लक्षात राहतात. रूसून रस्त्यात बसलेला नवरदेव, म्हैसुरातील पुणेरी टांगेवाला, भांडखोर रिक्षावाले आणि बावळट पट्टेवाला, धोतर-टाय लावणारे केरळातल्या गावातले पुरुष, अशा व्यक्तींच्या स्वभावातील गमतीजमतीच्या चित्रणामुळे प्रवास-वर्णनापेक्षा प्रवास चित्राची एक वेगळीच दिशा मराठी प्रवास-साहित्याला दाखविणारे महत्त्वाचे पुस्तक. दलालांचा वैशिष्टपूर्ण रेखाटनांची जोड या पुस्तकाला लाभली आहे.

**प्रल्हाद वडेर**

**नीतिकथा : जांभेकर, बाळ गंगाधर शास्त्री. प्रकाशक : सरकारी छापखाना, मुंबई, १९३८ आवृत्ती तिसरी बोधकथा भाग-२ (मूळ बंगालीवरून).** मुंबई इलाख्याच्या एलफिन्स्टन या गव्हर्नराने आखलेल्या शैक्षणिक धोरणानुसार एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला शाळापुस्तक मंडळीच्या द्वारा विविध विषयांतील सोप्या भाषेतील मराठी शालेय पुस्तकांच्या निर्मितीस प्रारंभ झाला. या प्रेरणेनुसार मूळ बंगालीत असलेल्या कथांचा अनुवाद करून 'नीतिकथा'हे पुस्तक जांभेकरांनी प्रसिद्ध केले. पहिल्या भागाचे नाव 'बोधकथा' तर दुसऱ्या भागाचे नाव 'नीतिकथा' असे होते. शाळेत शिकणाऱ्या बालवयातील मुलांच्या मनावर नीतिपाठाचे संस्कार व्हावेत, हा या पुस्तकामागील हेतू होता. मूळ बंगाली ग्रंथातील कथेत जांभेकरांनी स्वरचित बऱ्याच कथांची भर घातली आहे. चुटकेवजा असलेल्या या कथांना रचनादृष्ट्या उपदेशपर निबंधाचे स्वरूप प्राप्त झाले आहे. कथेच्या अखेरीस सारांश दिलेला असून तो 'इसाप'च्या कथांची आठवण करून देणारा आहे.

म. प. पेठे.

**नीतिग्रंथ : छत्रे, हरी केशवजी, (चेम्बर्सच्या मॉरल टेल्सचे भाषांतर). प्रकाशक : हरी केशवजी छत्रे, १८४६.** हरी केशवजी (इ.स. १८०४ ते १८५८) हे अव्वल इंग्रजीतील एक उत्तम भाषांतरकार म्हणून प्रसिद्ध होते. इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. हा नीतिग्रंथ म्हणजे चेम्बर्स मॉरल टेल्सचे भाषांतर आहे. लेखकाने हा ग्रंथ इ.स. १८४६ साली तयार केला. या ग्रंथात एकूण ३८ वेगवेगळी प्रकरणे आहेत. त्यांपैकी २९ प्रकरणे निबंधवजा असून त्यांचे विषय जीवजंतूविषयी वागणूक, आप्तांविषयी वागणूक, परोपकार-बुद्धी, मिताहार, सत्य, शौर्य, स्वदेशप्रीती यांसारखी आहेत. ग्रंथातील इतर भाग कथात्मक स्वरूपाचा आहे. त्यांपैकी अनेक कथा इसापनीतीतून घेतलेल्या आहेत. तत्कालीन परिस्थिती-नुसार या सर्व रचनेवर ख्रिस्तिवळणाचा ठसा आहे.

म. प. पेठे

**नीतिदर्पण : बापट, विष्णुशास्त्री. आवृत्ती दुसरी. संपादक : सरकारी छापखाना, मुंबई, १८३७. आवृत्ती पाचवी, पुणे पाठशाळा छापखाना, पुणे, १८५७.** हा नीतिकथांचा संग्रह इ. स. १८३७ मध्ये लिहिला गेला. यात सुरुवातीला 'इंग्लिश लोक आणि महाराष्ट्र लोक'यांचा प्राचीन आणि नवीन वृत्तान्त हा वर्णनात्मक भाग असून पुढील चार कथांत परस्परविरोधी तुलनात्मक वर्णन आहे. सुबुद्धी हा इमानेइतबारे नोकरी करून पंचवीस चढला. तर दुर्बुद्धी हा लाच खाऊन संकटात पडला, धनंजय शेटने प्रामाणिकपणे वागून लढाईतसुद्धा सरकारी खजिना सांभाळला म्हणून त्यास मान व बक्षीस असे दोन्ही मिळाले, तर घेला शेटने सुरतेच्या नगर शेटची चोरी केली म्हणून त्याला अटक व शिक्षा झाली, अशा या कथा आहेत. पुढील गोष्टींत जुवा, कैफ, व्यभिचार, लग्नपद्धती यांच्या संबंधीचे वर्णन आहे. कथांची रचना नीतीच्या उपदेशासाठी केल्याने त्यात कृत्रिमता जाणवते. तरीही त्यातून समाजस्थितीचे उमटलेले चित्र लक्षणीय आहे.

**नीहार : पद्मा. प्रकाशक : मौज प्रकाशनगृह, मुंबई, १९५४.** या कवितासंग्रहात स्त्रीसुलभ भाववृत्तींचा सहज आविष्कार. मातृत्व, वात्सल्य, विरह, पतिप्रेम अशा कौटुंबिक विश्वाशी निगडित असणाऱ्या भावनांचे प्राबल्य आणि प्रीतिभावनेच्याही विविध छटा आढळतात. स्त्रीच्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाची आधुनिकतेची जाणीव व्यक्त करणारी 'मी माणूस'ही कविता आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही बाबतीत वेगळी उठून दिसते. जीवनातील लहानसहान सुखदु:खांना चटकन काव्यरूप देणाऱ्या इतर कविता लोकगीतांच्या भावमोहक निर्भरतेने व अकृत्रिमतेने नटल्या आहेत. आपल्या समकालीन, नवकाव्यविषयक संकेतापासून स्वभावतः दूर राहणारी ही कविता आहे. प्रतिमा प्रतिके वा अलंकार यांचेही तिला आकर्षण नाही. आशय वा शैली यांच्यात क्वचित सांकेतिकता आढळली तरी एकूण भावाविष्कार संयत आहे.

प्रभा गणोरकर

**न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांचे चरित्र : फाटक, नरहर रघुनाथ. प्रकाशक : न. र. फाटक, मुंबई, १९२४.** निरनिराळ्या ठिकाणांहून माहिती मिळवून आणि परिश्रम घेऊन समतोल दृष्टीने लिहिलेले चरित्र. विश्वसनीयता व चटकदारपणा या दोन्ही गुणांचे मिश्रण या चरित्रात दिसून येते. न्यायमूर्ती रानडे हे केवळ कायदेपंडित व हायकोर्टाचे न्यायाधीश नव्हते तर अर्थशास्त्रज्ञ, इतिहासकार, शिक्षणप्रसारक तसेच ईश्वरभक्त होते, याची ओळख या पुस्तकात पटते. महादेवरावांनी दिलेल्या व्याख्यानांचा विस्ताराने परिचय करून दिलेला आहे. स्वजनांना उपदेश व संस्थांच्या द्वारे त्यांचा प्रयोग करीत राहणे ही रानडे यांच्या व्यक्तिमत्त्वाची वैशिष्ट्ये वाचकांच्या पुढे ठेवण्याचा हा उल्लेखनीय प्रयत्न आहे.

सुधा कापरे

**पंचभाषा विलास : राजे शहाजी भोसले.** हे दक्षिणेतील 'यक्षगान' पद्धतीचे संगीत-नृत्य प्रधान नाटक. तंजावर येथील राजे शहाजी भोसले हे विद्याव्यासंगी, कलाप्रेमी आणि अनेक भाषा कोविद होते. मराठी, संस्कृत, तामिळ, तेलुगू व उत्तरेची व्रजभाषा हिंदी या विविध भाषांतून त्यांनी विपुल ग्रंथनिर्मिती केली आहे. पंचभाषा-विलास या नाटकात उपर्युक्त पाच भाषांचा प्रयोग करण्यात आला आहे. कृष्णावर अनुरक्त झालेल्या चार राजकन्या, अनुक्रमे, तमिळ, तेलगू, मराठी व हिंदी भाषिक असल्याचे यात दाखविले असून, त्या कृष्णप्राप्तीसाठी आपापल्या भावना आपापल्या भाषेत व्यक्त करतात. नाटक एकांकी व एकप्रवेशी आहे. गीतांची योजना भरपूर आहे. यातील गीतगायन बव्हंशी सूत्रधाराकडे आहे. शहाजी राजांचा काल इ. स. १६७१ ते १७११ हा होय. मराठी नाट्यलेखनाचा व प्रयोगाचाही प्रारंभ तंजावर येथे १६८४ मध्ये शहाजी राजांच्या नाटकांनी झाला हे उल्लेखनीय आहे.

चंद्रकांत धांडे

**पंचरत्न : रंगनाथ मोगरेकर. संपादक, प्रकाशक : वि. ल. भावे, इंदुप्रकाश छापखाना, मुंबई, १९०५.** हा ग्रंथ आद्य शंकराचार्यांच्या 'सोपानपंचक' या प्रकरणावरील टीका आहे. मूळ संस्कृत प्रकरणात साधकाचे आचरण कसे असावे, अज्ञान अवस्थेपासून स्थितप्रज्ञ अवस्थेपर्यंत तो कसा पोचतो व परमेश्वरप्राप्ती कशी होते हे सांगितलेले आहे. हाच उपदेश लोकहितार्थ मराठी भाषेत सांगावा अशी लेखकाची भूमिका आहे. परमेश्वर-सिद्धानंद-परमानंद-वैकुंठानंद-कृष्णानंद अशी गुरुपरंपरा असलेल्या या कवीने प्रारंभी गुरुस्तवन करून शंकराचार्यांविषयी आदर व्यक्त केला आहे. कवी ज्ञानमार्गी असल्याचे या ग्रंथात दिसून येते. या ग्रंथाचे अध्याय किंवा प्रकरणे नाहीत. सलग २०६५ ओव्यात ग्रंथाची मांडणी केली असून श्रुती, स्मृती, गीता, भागवत, योगवसिष्ठ, उपनिषदे यांचा आधार घेऊन गोष्टींच्या माध्यमातून तत्त्वज्ञान सांगितले आहे. रचना सुसूत्र, टापटीपीची, मुद्देसूद, सरळ व प्रसादपूर्ण आहे. समर्पक अलंकारांची योजना आणि प्रौढ, गंभीर ठसठशीत भाषा हा या ग्रंथाचा विशेष आहे.

चंद्रकांत धांडे

**पंचवार्तिक : भीष्माचार्य. संपादक : दत्तराज महानुभाव श्रीगोपीराज महानुभाव, चित्रशाळा प्रेस, १९२७ (महानुभावी प्राचीन व्याकरण).** चौदाव्या शतकातील महानुभाव पंडित भीष्माचार्य यांचा महत्त्वपूर्ण टीपग्रंथ. पंडित आनेराज यांच्या 'लक्ष्मणरत्नाकर' या ग्रंथावरचा हा टीपग्रंथ आहे. या ग्रंथास 'मराठीतील पहिले व्याकरण' म्हटले जाते. महानुभाव संप्रदायाचे प्रवर्तक श्रीचक्रधरस्वामी यांच्या सूत्रांचा आधार या ग्रंथास लाभला असून, ही सूत्रे स्पष्ट करण्यासाठी भीष्माचार्यांनी व्याकरणाचा आधार घेतला आहे. या ग्रंथाची विभागणी पाच विभागांत केली असून त्यांचा तपशील असा आहे—

(१) सूत्रलक्षण— यात सूत्र, वचन, वाक्य व महावाक्य यांच्या व्याख्या सांगून शब्दांच्या जाती, लिंग, क्रियापद, कृदन्त, तद्धित, प्रयोग, संधी, समास इ. चे विवरण केले आहे.

(२) सूत्रप्रकृती— यात सूत्रांच्या संज्ञा, परिभाषा, विधी, नियम इ. दहा प्रकृतिवैशिष्ट्यांचे विवरण केले आहे.

(३) सूत्रकारक— यात कारकांचे विवरण केले आहे.

(४) सूत्रव्याख्यान— यात पदच्छेद, विग्रह, आक्षेप व समाधान इ. सूत्रावरील व्याख्यानाचे विभाग वर्णिले आहेत.

(५) सूत्रस्वरूप— प्रतिज्ञा, प्रमाणादी लक्षणांनी सूत्राचे सम्यक स्वरूप.

नजमा पठाण

**पठ्ठे बापूराव : भावे, ल. ना. प्रकाशक : परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई, १९६०.** शाहीर पठ्ठे बापूराव (कै. श्रीधर कृष्ण कुलकर्णी, १८६६-१९४५) यांच्या जीवनावरील हे चरित्रात्मक नाटक आहे. गावातील तलाठीपण करणारा बापूराव, नाम्या व चंद्रा यांच्या तमाशाफडाचा ताबा घेतो. दुखावलेला नाम्या बापूरावाचा काटा काढण्यासाठी कारस्थानी व स्वार्थी हरिभाऊ सावकारातर्फे मामलेदाराला आणून चावडीवरचा तमाशा दाखवितो व तमाशा की नोकरी असा पेच टाकतो. बापूराव नोकरी ठोकरतो. देखणी, गोड गळ्याची पवळा बापूरावला येऊन मिळाल्यावर कोल्हापूरच्या शाहू महाराजांकडून मानाचा पटका मिळतो. बापूरावाच्या गैरहजेरीत संशयाची ठिणगी टाकण्याचे नाम्याचे प्रयत्न विफल होतात. बापूराव-पवळा एकमेकांना सोडत नाहीत. नाम्या पवळाला धमकी देतो की, ती जर बापूरावला सोडून गेली नाही, तर बापूरावच्या जीवाला धोका आहे. धमकीमुळे, चांगल्या हेतूने पवळा बापूरावपासून दूर जाते. पवळा गेल्यावर निराश झालेला बापूराव फड बंद करून हलाखीत झोपडपट्टीत राहू लागतो व अखेर विपन्नावस्थेत त्याचा अंत होतो. बापूराव व पवळा यांच्या स्वप्नदृश्यातील भेटीच्या प्रसंगातून ही शोकांतिका अधिक गहिरी होते. बापूरावांच्या काही लावण्या व गवळणींचा चपखल उपयोग या नाटकात केलेला आहे. या उत्कट व करुणरम्य शोकांतिकेचा प्रथम प्रयोग ५ डिसेंबर १९५९ रोजी झाला.

गो. वि. वैद्य

**पडघवली : दांडेकर, गो. नी. प्रकाशक : मौज प्रकाशन, मुंबई, १९५५.** कोकणच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली कादंबरी. या कादंबरीतील 'पडघवली' हे छोटेसे गाव कोकणातील खेड्यांचे प्रतिनिधी आहे. कर्तृत्ववान खोताने वसवलेला पडघवली गाव अतिशय रम्य आहे. तेथील निसर्ग आणि मन दोन्हीही फुललेली आहेत. पण आधुनिकतेमुळे शहरात केंद्रीकरण होते आणि इकडे व्यंकूसारखी दुष्ट माणसे श्रेष्ठ ठरतात त्यामुळे त्या नंदनवनाचे वाळवंट व माणुसकीचा दगड होतो. मनाला चटका लावणारी ही कहाणी, सारे आयुष्य त्याच मातीत गेलेल्या खोताच्या सुनेनेच सांगितले आहे.

हे एका नष्ट होऊ घातलेल्या खेड्याचे चित्र असून ते विविध व्यक्तींतून आणि त्यांच्या स्वभावदर्शनातून स्पष्ट होते. कादंबरीची भाषा ओघवती आहे. ग्रामीण कोकणी भाषा आणि स्त्रियांची बोली भाषा यांचा वैशिष्ट्यपूर्ण ठसा या भाषेवर आहे.

आधुनिकतेमुळे, शहरात केंद्रीकरण झाल्याने खेड्यांना आलेली मरगळ व पारंपरिक समाजव्यवस्था आणि ग्रामव्यवस्था यांची पडझड पाहून व्यथित झालेल्या लेखकाची तळमळ कादंबरीतून जाणवते. मराठीतील ही एक वैशिष्ट्यपूर्ण प्रादेशिक कादंबरी आहे.

शांता विजय लागू

**पंढरीमाहात्म्य : श्रीधर. प्रकाशक : पुरंदरे आणि कंपनी, मुंबई, १९०३.** इ. स. १६९३ ते १७१२ या कालावधीत या आख्यानाची रचना झाली असावी. ग्रामीण भागात आजही ज्याचे ग्रंथ भक्तिभावाने वाचले जातात त्या श्रीधर नाझरेकराने हे आख्यान अनेक संस्कृत व मराठी ग्रंथांचे आधार घेऊन रचले आहे. श्रीधराने रामायण-महाभारतादी ग्रंथ जनसामान्यांपर्यंत पोचवून सांस्कृतिकदृष्ट्या मोलाची कामगिरी बजावली आहे. श्रीधर हा अत्यंत कुशल कथाकार होता याचा प्रत्यय २१ अध्यायांवर आधारलेल्या १२३८ ओव्यांच्या या आख्यानातही येतो.

याच कवीचा 'पांडुरंग-माहात्म्य' हा ग्रंथ असून त्याची ओवीसंख्या ७४८ आहे.

श्री. रं. कुलकर्णी

**पण लक्षात कोण घेतो ? : आपटे, हरी नारायण, प्रकाशक : आर्यभूषण छापखाना, पुणे, पहिली आवृत्ती, नववी आवृत्ती १९६७.** हरिभाऊंची ही एक सामाजिक कादंबरी. एकूण ८७ प्रकरणात विभागलेल्या या कादंबरीची पृष्ठसंख्या ४८६ इतकी आहे. प्रथम ही कादंबरी हरिभाऊंच्या 'करमणूक' पत्रातून १८९०-९३ मध्ये क्रमशः प्रसिद्ध झाली. पुढे पुस्तकरूपाने ती अवतरली. कादंबरीच्या सुरुवातीला उपोद्घात हे प्रकरण लिहून कादंबरीमागील पार्श्वभूमी लेखकाने सांगितली आहे. तर उपसंहारात गणपतरावांनी काही गूढ गोष्टींची उकल केली आहे.

तत्कालीन अनेक सामाजिक प्रश्नांना वाचा फोडणारी व वाचकांना अंतर्मुख करणारी एक प्रभावी कादंबरी असून 'यमू' ही या कादंबरीची नायिका आहे. कादंबरीमध्ये कथानकापेक्षा जीवनचित्रणाला जास्त महत्त्व दिले आहे. यमूच्या जीवनाचा कारुण्यमय आलेख मांडून तत्कालीन समाजाचे प्रतिबिंब उमटविण्याचा प्रयत्न केला आहे. यमूच्या जन्मापासून ते यमूच्या मृत्यूपर्यंत ज्या घडामोडी घडल्या त्या घटनांचे चित्रण या कादंबरीत केले आहे.

एका एकत्र कुटुंबामध्ये यमूचा जन्म झाला. यमूचे बाबा तापट स्वभावाचे, आई मात्र सहनशील. यमूला गणपतराव हा भाऊ व सुंदरी ही बहीण. एकत्र कुटुंबामध्ये ज्या समस्या असतात त्या सर्व समस्या यमूच्या कुटुंबामध्ये होत्या. त्या वेळच्या परंपरेनुसार यमूचे बाराव्या वर्षी रघुनाथरावाबरोबर लग्न होते. रघुनाथराव मुंबईस कॉलेजमध्ये शिकत असतानाच हे लग्न होते. सासरी यमूची सर्वार्थाने कोंडी होते. सासवा, दीर अशा अनेकांची मने तिला सांभाळावी लागतात. योग्य संधी मिळताच रघुनाथराव यमूला मुंबईस घेऊन जातात. यमूने लिहावे, वाचावे, समाजात मिसळावे असे त्यांना वाटत असते. यमूलाही शिक्षणाची आवड असते. हळूहळू यमू लिहू, वाचू लागते. एवढेच नव्हे तर स्त्रियांच्या सभेत जाऊन निबंध वाचू लागते. परंतु सासरी हे सर्व कळल्यानंतर हलकल्लोळ माजतो. अनेक तोंडाने तिला व रघुनाथरावाला ते बोलू लागतात पण रघुनाथरावांची साथ व प्रोत्साहन असल्याने यमू हे सारं सहन करते. यमू प्रगतीच्या एका वळणावर असतानाच रघुनाथरावांचा मृत्यू होतो. यमू विधवा होते. यमूला फसवून सासरची लोक तिचे केशवपन करतात. शेवटी केशवपनानंतर पंधरा दिवसात यमूचा मृत्यू होतो.

या मुख्य कथानकाबरोबरच काही उपकथानकेही या कादंबरीत आहेत. उदा. दुर्गीचा कष्टमय संसार, यमूच्या वडिलांचे दुसरे लग्न, गणपतरावांचा विसंवादी संसार, शंकर मामांजीचे दुसरे लग्न, रामकृष्ण व त्याची पत्नी, आईबापांची हृदयद्रावक कथा. या सर्व कथानकामधून तत्कालीन समाजजीवन, रूढी, परंपरा यांचे दर्शन घडते. 'आत्मकथन' पद्धतीने लिहिलेल्या या कादंबरीची भाषाशैली पाल्हाळीक पण अर्थवाही, साधी, सोपी व तत्कालीन ब्राह्मण कुटुंबातील असून वास्तववादी कादंबरी म्हणून हरिभाऊंच्या या कादंबरीचे वेगळेपण लक्षात घेतले जाते.

यशवंत चव्हाण

**पंतांची सून : फाटक, गणेशशास्त्री कृष्णशास्त्री. प्रकाशक : गणेशशास्त्री फाटक, १९२८.** हे तीन अंकी, प्रसंगप्रधान प्रहसन आहे. यातील गंभीर प्रसंगही विनोदाच्या अंगाने लिहिलेले आहेत. मुलाच्या लग्नातील हुंड्याची अर्धी रक्कम न मिळाल्यामुळे सुनेला कायमचे माहेरी ठेवू पाहणाऱ्या धनलोभी श्रीधरपंतांनी त्यांचा मुलगा प्रभाकर हा डॉ. लिंगेश व त्यांची पत्नी यांच्या मदतीने एक कारस्थान रचून फजिती करतो असे दाखविलेले आहे.

हे नाटक प्रथम शारदा संगीत मंडळीने रंगभूमीवर आणले. या नाटकाचा तामिळ भाषेत बोलपटही झाला होता.

केतकी कुळकर्णी

**पद्मपुराण : पंडित, दामोदर.** इ. स. १६व्या शतकातील महानुभाव कवी पंडित दामोदर याने लिहिलेले 'पद्मपुराण' म्हणजे मूळ संस्कृत काव्याच्या आधारे केलेली मराठी रचना आहे. परंतु प्रसिद्ध अशा संस्कृत पद्मपुराणापेक्षा हे वेगळे आहे. आपले पद्मपुराण भागवतकथा व हरिवंश या पुराणातूनच निर्माण झाले असे कवीने म्हटले आहे. ग्रंथारंभी कवीने हंस, दत्त, चक्रपाणी, चक्रेश्वर, नागार्जुन आणि दत्तराज यांना नमन केले आहे. या ग्रंथात अनेक कथांची गर्दी झाल्यामुळे स्वभावचित्रणात फारसा वाव नव्हता, ती उणीव कवीने वर्णन कौशल्याने भरून काढली आहे. त्यामुळे अनेक वर्णने बहारदार झाली आहेत. उपमा, दृष्टांत उत्प्रेक्षा व रूपक या अलंकारामुळे काव्यसौंदर्यात भर पडली आहे. 'इति श्री पद्मपुराणे संपूर्ण

ओवी संख्या ३०००' असे कवी म्हणत असला तरी ग्रंथातील ओव्याची संख्या २७५१ आहे.

**पाच कवी : राज्याध्यक्ष, मंगेश विठ्ठल. प्रकाशक : कर्नाटक प्रकाशन संस्था, मुंबई, प्रथमावृत्ती, १९४६.** मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष हे सुजाण आणि विदग्ध वृत्तीचे आधुनिक समीक्षक म्हणून परिचित आहेत.

'पाच कवी' हा मंगेश विठ्ठल राज्याध्यक्षांचा एक महत्त्वाचा संपादित ग्रंथ आहे. केशवसुत, नारायण वामन टिळक, विनायक, गोविंदाग्रज आणि बालकवी यांच्या निवडक कविता घेऊन राज्याध्यक्षांनी हा ग्रंथ सिद्ध केला आहे.

केशवसुतांच्या 'मजुरावर उपासमारांची पाळी', 'कवितेचे प्रयोजन', 'तुतारी', 'झपूर्झा', 'स्फूर्ती', 'नवा शिपाई', 'आम्ही कोण' इ. बारा कवितांचा समावेश केला आहे. रे. टिळकांच्या 'माझी भार्या', 'वनवासी फूल', 'कुणास्तव कुणी तरी', 'केवढे हे क्रौर्य', 'रणशिंग', इ. अकरा कवितांचा समावेश आहे. विनायकांच्या 'महाराष्ट्र लक्ष्मी', 'हतभागिनी', 'यापुढे', 'दसरा', इ. दहा कविता; गोविंदाग्रजांच्या 'राजहंस माझा निजला !', 'दसरा', 'विरामचिन्हे', 'प्रेम आणि मरण', 'कृष्णाकाठी कुंडल', इ. नऊ कविता; आणि बालकवींच्या 'अरुण', 'निर्झरास', 'फुलराणी', 'श्रावणमास', 'बालविहग', 'धर्मवीर', 'औदुंबर' इ. तेरा अशा एकूण ५५ कवितांची निवड राज्याध्यक्षांनी 'पाच कवी' या प्रस्तुत ग्रंथासाठी केली आहे.

प्रस्तुत ग्रंथाला सुरुवातीला राज्याध्यक्षांनी विस्तृत अशी प्रस्तावना लिहिली आहे. याशिवाय प्रत्येक कवीच्या विभागाच्या सुरुवातीला पुन्हा एकदा त्या कवीविषयी प्रास्ताविक लिहिले आहे. ग्रंथाच्या शेवटी निवडलेल्या प्रत्येक कवितेवर टीप लिहून कविता सुगम केल्या आहेत.

केशवसुतसंप्रदायातील उपरोक्त पाच कवींच्या काव्याचा एकत्रित अभ्यास करण्यासाठी प्रस्तुत ग्रंथ उपयुक्त आहे.

वि. दा. वासमकर

**पाच संतकवी : तुळपुळे, शं. गो. प्रथमावृत्ती श्रीमंत राजेसाहेब सांगली यांच्या पुरस्काराने 'अध्यात्मविद्या मंदिरा' तर्फे प्रसिद्ध १९४८, दुसरी आवृत्ती : प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, १९६२.** संत ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम व रामदास महाराष्ट्रातील या पाच संतश्रेष्ठांच्या जीवनकार्याचे त्यांच्या तत्त्वज्ञानाचे व वाङ्मयाचे सर्वांगीण विवेचन करणारा ग्रंथ उपरोक्त पाच संतकवी अंतरी एक असले तरी प्रत्येकास स्वतःचे वेगळे वैचारिक व वाङ्मयीन अधिष्ठान आहे. त्या दृष्टीने प्रत्येक संतकवीचे स्वतंत्रपणे विवेचन करून त्या सर्वांमध्ये ऐक्यभाव पाहण्याची दृष्टी ग्रंथकारांनी ठेवल्याने लेखकाची एक स्वतंत्र तात्त्विक भूमिकाही या ग्रंथात तयार झाल्याची दिसते.

ग्रंथामध्ये प्रत्येक संतकवीचे चरित्र, त्याचे वाङ्मय, तत्त्वज्ञान, नीती मीमांसा व परमार्थमार्ग अशा पाच अंगांनी विवेचन आले आहे. दोन ज्ञानदेवांची कल्पना, संत नामदेवाचे पूर्वचरित्र्य, संत तुकारामाच्या चरित्रातील अद्‌भूत घटना, अनेकदृष्ट्या वादग्रस्त असलेले रामदासांचे चरित्र या सर्वांचा परामर्श ऐतिहासिक प्रामाण्य, विविध विद्वानांच्या मते यांच्या आधारे घेतलेला आहे.

ग्रंथाची भाषा रसाळ आणि गोडी लावणारी असून जागोजाग संतवचनांची औचित्यपूर्ण पखरण आढळते. प्रमुख संतांचे व्यक्तित्व व कार्य, त्यांचे तत्त्वज्ञान आणि वाङ्मय या दृष्टीने अभ्यासनीय असा मौलिक ग्रंथ.

मोहन पाटील

**पांडव प्रताप : श्रीधर.** १७व्या शतकात रामायण महाभारतावर प्रदीर्घ काव्यरचना करणारा 'हरिविजय' 'रामविजय' या ग्रंथाचा कर्ता श्रीधर नाझरेकर यांचा वैशिष्ट्यपूर्ण, लोकप्रिय ग्रंथ.

या ग्रंथाच्या कालाचा उल्लेख खुद्द श्रीधरने 'विजयनाम' संवत्सरी । ग्रंथ झाला पंढरपुरी । शके सोळाशे चौतीस निर्धारी । ग्रंथ आकारातें आला । असा केलेला आहे. प्रत्यक्ष पांडुरंगाने आपणास वेळोवेळी लेखनास प्रवृत्त केले असाही उल्लेख तो करतो.

महाभारताच्या कथाभागावर आधारलेली पांडव कथा सांगताना ग्रंथकर्त्याने पांडवांची पराक्रमकथा, पांडवांवरील संकटे, पांडवांचे कौरवांशी झालेले युद्ध व त्यात त्यांना मिळालेला विजय याचे वर्णन केलेले असून ६४ अध्याय असलेल्या या ग्रंथाची ओवीसंख्या १३,३९७ इतकी आहे. अनेक प्रसंग वर्णिताना श्रीधराने एकनाथ मुक्तेश्वर यांच्या कल्पना घेऊन ग्रंथ सजवल्याचे विशेषत : रचनेवर एकनाथांचा प्रभाव असल्याचे जाणवते.

ग्रंथाची भाषा काही ठिकाणी संस्कृतप्रचुर, जड वाटत असली तरी एकंदर रचना स्वच्छ, साधी बहुजनसमाजाला समजेल अशी आबालसुबोध आहे. त्यामुळेच हा भाविकांच्या नित्य पाठातील संग्राह्य ग्रंथ ठरला आहे. रेखीव व्यक्तिचित्रण, सुभाषितांची पेरणी, भक्तिमहिमा, लोकरुची, नैतिक उपदेश ही ग्रंथांची आणखी काही वैशिष्ट्ये.

मोहन पाटील

**पांढरे केस, हिरवी मनें : घाटे, वि. द. प्र. आ. १९५९, तिसरी आवृत्ती, १९७४. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई-४.** आयुष्याच्या अंगणात संध्याछाया खेळत असताही, रंगेल, रगेल, बाणेदार, छंदिष्ट वृत्तीतील ताजा टवटवीतपणा जोपासणाऱ्या आणि आपल्याच बेहोशीत मनस्वी जीवन जगणाऱ्या वयाने वृद्ध परंतु मनाने चिरतरुण अशा विविध व्यक्तिचा व्यक्तींच्याचित्रांचा एक अनोखा संग्रह.

मराठी ललितगद्य लेखनाचा उत्तम नमुना म्हणून सुख्यात असलेल्या या संग्रहात सामान्य व असामान्य थरांतील अठरा व्यक्तींची जीवनकमले लेखकांनी उलघडून दाखवली आहेतच;

त्याशिवाय व्यक्तींच्या बाह्यवर्तनाबरोबर त्यांच्या अंतर्मनात तळाशी लपलेल्या भावनांचे पदरही सुटे करून दाखवले आहेत.

सतत चाळीस वर्षे मद्याची साग्रसंगीत मैफल रंगवणारे आणि अचानक केवळ जिद्दीपायी मद्य सोडण्याची भीष्मप्रतिज्ञा करणारे 'अप्पाजी', 'जगापुढे हात पसरणार नाही' हे मुलीचे शब्द ऐकण्यासाठी मृत्युशय्येवर तळमळणारी व तसे वचन मिळताच शांतपणे चिरनिद्रा घेणारी 'दत्तांची आई' या व्यक्तिरेखा जिव्हाळी लागतात तशीच गाण्याच्या धुंदीत जगणाऱ्या 'गुलाब बाई' ही लक्षात राहतात. या संग्रहात 'आचार्यांचे मृत्यूपत्र' 'गुरुजी (एक स्मशान नाट्य)' असे वेगळे प्रयोगशील अंगाने जाणारे लेखही आहेत.

खोट्या जगाचा मुखवटा झुगारून देणारी आणि आपल्याच मस्तीत जगून दुसऱ्यांच्या जीवनांत सुगंध फुलवणारी घाटे यांची ही चिरतरुण माणसं लक्षणीय आहेत. मर्मज्ञ रसिकता, चार दोन वाक्यातून जिवंत व्यक्तित्व उभी करणारी काव्यात्म भाषा हे या लेखनाचे वैशिष्ट्य आहे.

मोहन पाटील

**पाणकळा : दिघे, र. वा. (रघुनाथ वामन). प्रकाशक : र. वा. दिघे, पुणे, १९३९.** मराठी कादंबरी विश्वाला नवी दिशा देणारी कादंबरी. 'पाणकळा' निसर्ग आणि माणूस यांच्यातील नात्यांचा अर्थपूर्ण प्रत्यय घेण्याच्या प्रयत्नामुळे, कादंबरीचे वेगळेपण.

'पाणकळा'मध्ये विशिष्ट भूप्रदेश, त्यांनी घडवलेली माणसे, त्या माणसांचे तेथल्या निसर्गाशी असलेले नाते याने समृद्ध असलेले ग्रामीण जीवन केवळ दृक्-प्रत्ययाने चित्रित करण्याऐवजी आंतरिक अनुभवातून अविष्कृत झाले आहे.

कादंबरीमध्ये व्यक्तिमत्त्वांचे दोन गट एक सात्त्विक माणसांचा सद्भावनेने आणि चांगल्या मूल्यांच्या जपवणुकीसाठी त्याग करणाऱ्यांचा तर दुसरा तामसी वृत्तींच्या माणसांचा 'पाणकळा' मध्ये या दोन्ही वृत्तींचे दर्शन-वारकरी शेतकरी भुजाबा व त्यांची आप्त मंडळी एकीकडे तर रंभाजी व त्याची माणसे दुसरीकडे सत्प्रवृत्ती व खल प्रवृत्तीचे दर्शन. कृषीजीवन निसर्गावर विशेषत: 'पाणकळ्यावर' (पावसाळा) कसे सर्वस्वी अवलंबून आहे याचे दर्शन - चित्रण.

निसर्गवर्णनाने रेखीव आणि दृक् प्रत्यय देणारी-जानपद भाषेतील वेचक शब्दमण्यांनी अलंकृत कृषीजीवनाचा अनुभव घेणारा हा कादंबरीकार स्वत:ला 'शेतकी कादंबरीकार' म्हणवितो.

'सराई', 'रानजाई', 'आई आहे शेतात', 'पड रे पाण्या' इत्यादी र. वा. दिघे यांच्या गाजलेल्या कादंबऱ्या. प्रादेशिक कादंबरी विश्वाचे एक अग्रणी शिलेदार म्हणून र. वा. दिघे परिचित.

भरतेश्वर पाटील

**पाणपोई : यशवंत. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे, पहिली आवृत्ती, १९५१.** यशवंत दिनकर पेंढारकरांचे रविकिरण मंडळातील स्थान महत्त्वाचे आहे. त्यांना 'राजकवी' हा किताब मिळाला आणि सर्वांत जास्त लोकप्रियता लाभली. 'यशवंती', 'यशोधन', 'भावमन्थन', 'यशोगन्ध', 'यशोनिधी', 'यशोगिरी', 'ओजस्विनी' व 'पाणपोई' हे त्यांचे स्फुट काव्याचे मुख्य संग्रह.

'पाणपोई', या काव्यसंग्रहाला वि. स. खांडेकर यांची प्रस्तावना असून, या काव्यसंग्रहात कौटुंबिक, सामाजिक, प्रेमविषयक, संकीर्ण, आत्मदर्शी व ध्येयदर्शी अशा विषयांवरील एकूण ६० कविता समाविष्ट आहेत.

यशवंतांची प्रतिभा आत्मपर असून ही आत्मपरता एक प्रकारच्या कडवट निराशेने ग्रासून टाकलेली दिसते. जीवनातल्या दु:खाचे चित्रण करणाऱ्या कारुण्यपूर्ण कविता लिहणारे यशवंत वीरत्वाला आवाहन करणाऱ्या आणि दुर्दम्य आशावादाने रसरसलेल्या कविताही लिहीतात. हे या संग्रहातील 'तुरुंगाच्या दारात', 'हा अफाट सागर पुढे', 'बाणा' इ. कवितांतून आढळून येते.

मानवतेच्या दु:खाचे वर्णन करताना यशवंतांच्या कल्पनेला चढणारी उपरोधाची धार आणि त्यांच्या वाणीत संचारणारा आवेश 'हा बालक बसला कागद टरकावीत', 'सावध-सावध', 'युगंधराचे पालुपद' इ. कवितांत दिसतो.

या संग्रहातील प्रीतीच्या रसरशीत कवितांच्या जोडीला 'आई' सारखी करुणरसप्रधान कविता मराठी (भावकोमल) रसिकांच्या हृदयाला आजही हेलावून सोडणारी अशी आहे.

यशवंत चव्हाण

**पाणी : मर्ढेकर, बा. सी. प्रकाशक : युगवाणी प्रकाशन, मुंबई, १९४८.** बा. सी. मर्ढेकर हे एक श्रेष्ठ नवकवी, कलावादी समीक्षक आणि प्रयोगशील कादंबरीकार आहेत.

'रात्रीचा दिवस' आणि 'तांबडी माती'प्रमाणेच 'पाणी'ही कादंबरीसुद्धा संज्ञाप्रवाही पद्धतीने लिहिली आहे.

सदोबा, सदोबाचा मुलगा तुकाराम व तुकारामाचा मुलगा विठोबा यांच्या म्हणजे भगतपूर नावाच्या एका खेड्यातल्या एका कुटुंबाच्या तीन पिढ्यांच्या जीवनावर आणि त्यांच्या व पर्यायाने त्या खेड्यातील लोकांच्या जीवनावर दोन महायुद्धांचे व धरण बांधण्याच्या योजनेचे जे परिणाम होतात त्याचे चित्रण या कादंबरीत येते.

"विठूच्या मनोव्यापाराचे संज्ञाप्रवाही पद्धतीने जे वर्णन आले आहे ते लेखकाच्या वर्णनशक्तीच्या सामर्थ्याचे द्योतक आहे" असे अ. ना. देशपांडे म्हणतात.

प्रस्तुत कादंबरीचा वाचकाच्या मनावर जो परिणाम होतो तो हा की, जगातील निरनिराळ्या प्रभावी शक्तींनी निर्माण केलेल्या प्रवाहात मानवप्राणी नुसता अगतिक होऊन वाहत जातो.

संज्ञाप्रवाही पद्धतीचा एक चांगला नमुना म्हणून 'पाणी' या कादंबरीचा उल्लेख करता येईल.

वि. दा. वासमकर

**पानदान : सबनीस, वसंत. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९५९.** वसंत सबनीसांच्या तेरा विनोदी लेखांचा 'पानदान'हा संग्रह त्यांचा पहिलाच संग्रह आहे. "जीवनात साध्या साध्या गोष्टींकडे किंवा घटनांकडे थोडे गमतीने पाहिल्यास मनोरंजन होते व बरीच विनोदस्थळे हाती लागतात, असे अनुभवास येते. त्यातूनच हे 'पानदान' तयार झाले, ते रसिकांपुढे सरकावीत आहे. वाचकांची रसिकता उदंड आहे म्हणूनच ह्या 'पानदाना'तील तो रमेल व रंगेल अशी आशा वाटते." 'रसिकवरा !' ह्या शीर्षकाखालील प्रस्तावनेत लेखकाने म्हटल्याप्रमाणे ह्या विनोद लेखसंग्रहातील लेख दैनंदिन जीवनातील छोट्या छोट्या प्रसंगांवर आधारलेले आहेत. हे अनुभव सांगणारा 'मी' गोष्टीवेल्हाळ, सभोवतालच्या व्यक्ती प्रसंग-घटनांकडे मिस्कीलपणे पाहणारा, प्रसंगी स्वतःची फजिती सांगणारा 'मी' आहे. इतरांवर दोषारोपण करण्यापेक्षा त्यांच्या उणिवा व आपल्या मर्यादांचे कथन करण्यात त्याला रस आहे. आपले वेगवेगळ्या स्वभावाचे शेजारी, कपडे शिवून देणारा शिंपी, औषधोपचार करणारे वैद्य यांच्याविषयी लेखकाला आपण गमतीदारपणे लिहावे, असे वाटते. आपली काटकसर करण्याची वृत्ती, रविवार साजरा करण्याची कल्पना, घर बांधण्याच्या संकल्पना यांविषयी पण सबनीसांनी गमतीदारपणे लिहिले आहे. प्रस्तुत लेखसंग्रहातील 'पानदान' हा लेख पान खाण्याच्या छंदाविषयीचा लेख आहे. स्वतःची पान खाण्याची आवड, तांबूल सेवनाचे फायदे, तांबूल सेवनाचे सांस्कृतिक महत्त्व, विड्यांचे व पानांचे प्रकार इत्यादींबद्दल लेखकाने खूप बारकाइने लिहिले आहे. 'मी तो गुलाम भारवाही.' आणि 'सरळसोट आणि सुप्त' हे दोन लेख कौटुंबिक जीवनातील अनुभवांवर आधारलेले आहेत. पत्नीची शिस्तप्रियता, नवऱ्याचे दोष काढण्याची तिची जन्मजात सनातन सवय, तिचा काटकसरी स्वभाव यांविषयी खोचकपणे लिहून झाल्यावर तिच्या सुगरणपणाचे कौतुक करताना म्हणतो, "जन्मोजन्मी हीच किंवा थोडी सुधारलेली पण अशीच रुचकर बायको मिळावी असे जेवणानंतरच्या गुंगीत वाटल्याशिवाय राहात नाही. कारण चूल मांडल्यापासून कायम राहिलेला असा हाच एक गुण तिच्यात आहे. बाकीचे गुण तिच्या भाषेत 'चुलीत' गेले आहेत." 'सरळसोट आणि सुप्त' या लेखात घरात वावरणाऱ्या उंदरांविषयीचे नर्मविनोदी निवेदन आहे. स्वतःच्या मनातही एक उंदीर दडलेला आहे, असे विधान शेवटी करतो. 'पानदान' ह्या पहिल्या विनोदी लेखांच्या संग्रहातील 'मी'चे नाते आधीच्या लघुनिबंधातील 'मी'शी काही प्रमाणात जोडता आले तरी वसंत सबनीसांच्या भविष्यकाळातील विनोदी लेखनाचे सामर्थ्य 'पानदान' या लेखसंग्रहात दिसून येते.

वि. शं. चौघुले

**पालखीचा गोंडा : कानिटकर, काशीबाई. प्रकाशक : गणेश महादेव आणि कंपनी, ६०८, सदाशिव पेठ, पुणे शहर, आवृत्ती, १९२८.** हरिभाऊंच्या कादंबऱ्यांपासूनच स्त्रीजीवनाविषयक प्रश्नांची चर्चा कादंबरीतून होत राहिली. पुढे काही स्त्री लेखिकाही कथा कादंबरी लेखन करू लागल्या. त्यापैकी एक म्हणून काशीबाई कानिटकरांचा उल्लेख केलेला आढळतो. 'आनंदीबाई जोशी यांचे चरित्र', 'रंगराव' ही कादंबरी आणि 'चांदण्यातील गप्पा', 'शिळोप्याच्या गप्पा' हे संग्रह अशी पुस्तके प्रसिद्ध.

'पालखीचा गोंडा' ही संपादित कादंबरी असून एका संस्थानच्या राणीने प्रौढ स्त्रियांसाठी उघडलेल्या विद्यालयाचा आणि राणीच्या समाजसेवेचा परिचय या कादंबरीतून होतो. हे संस्थान प्रत्यक्ष पाहण्यासाठी लेखिका स्वतः जाते आणि तेथील कार्य पाहून थक्क होते.

संस्थानातील गतभर्तृक, दुर्दैवी स्त्रियांसाठीच केवळ हे विद्यालय उघडलेले असते. त्याचे नाव शिबिका विद्यालय. विद्यालयात ज्ञानाबरोबरच दुर्दैवी स्त्रियांनी स्वकर्तृत्वाने जीवनात उभे राहावे यासाठी त्यांना विविध प्रकारचे धंदेशिक्षण देण्याचीही सोय असते. त्याचा लाभ अनेक स्त्रियांना होऊन त्यांना जगण्याचा मार्ग सापडतो. विद्यालयात एका खोलीत रिकामी पालखी राणीने ठेवलेली असते. त्या पालखीत कोणा देवाची मूर्ती नाही, का पादुका नाहीत. ती मोकळीच. गतभर्तुकांचे सूत्रकचिन्ह म्हणून ठेवण्यात आलेली ही रिकामी 'पालखी' प्रचलित वैवाहिक स्थिती कायम ठेवून स्त्रियांनी स्वकर्तृत्वाने समाजसेवा करावी असा उपदेश देणारी आहे.

मोहन पाटील

**पासंग : देशपांडे, कुसुमावती. प्रकाशक : नागपूर प्रकाशन, नागपूर, प्र. आ. १९५४.** मोजक्या निर्मितीचा वैशिष्ट्यपूर्ण परिणाम मराठी साहित्यावर घडवणाऱ्या, १९६१ साली ग्वाल्हेर येथे भरलेल्या त्रेचाळिसाव्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अध्यक्षा कुसुमावती देशपांडे यांचा संग्राह्य टीकाग्रंथ, मराठी कादंबरी 'पहिले शतक', हा समालोचक ग्रंथ, 'मोळी' कथासंग्रह, 'गाधान्ह', 'मध्यरात्र', 'चंद्रास्त'हे ललितलेखसंग्रह इ. त्यांची साहित्यसंपदा प्रसिद्ध आहे.

काळाच्या निकषांवर टिकून राहिलेले त्यांचे मौलिक समीक्षालेखन मराठी टीका विचारात आलेल्या सुस्पष्टतेचा व सखोल व्यासंगाचा प्रत्यय आणून देणारे असून 'पासंग' टीकालेखसंग्रहात १९४८ पासून ते १९५३ पर्यंतच्या पाच वर्षांत प्रसिद्ध झालेले लेख व भाषणे समाविष्ट आहेत.

'नवभारतातील कला व मध्यवर्ग', 'आधुनिक मराठी कादंबरीचा उत्क्रांती मार्ग', 'मराठी वाङ्मय समीक्षा : सौंदर्याची नवप्रतीती, मी का लिहिते ?' 'कवींची काव्यदृष्टी' इ. समाविष्ट लेखांमधून त्यांच्या पौरात्य-पाश्चात्त्य साहित्याभ्यासाचे सखोल दर्शन घडते. केशवसुतांच्या 'नवा शिपाई', 'आम्ही कोण ?' या कवितांचे रसग्रहण त्यांनी समरसून मांडले असून विशेषतः काव्यविषयावर भर देणाऱ्या या लेखात कलांतर्गत आत्मनिष्ठेचे महत्त्व त्या सांगतातच पण त्याहीपेक्षा केशवसुतांच्या

आत्मनिष्ठेला प्राप्त झालेल्या सामाजिक अधिष्ठानाचा त्या अधिक गौरव करतात.

पाश्चात्त्य वाङ्मयाच्या व टीकादृष्टीच्या परिशीलनातून भारतीय साहित्यविचारांच्या व आधुनिक मराठी साहित्याच्या कक्षा रुंदावणारा महत्त्वाचा टीकाग्रंथ.

**पिराजी पाटील : धनुर्धारी (टिकेकर, रामचंद्र विनायक) प्रकाशक : स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, संपादक : आनंद यादव, पहिली आवृत्ती, १९०३, संपादित आवृत्ती, १९९७.** 'पहिली मराठी ग्रामीण कादंबरी' म्हणून या कादंबरीचा उल्लेख केला जातो. या कादंबरीची अर्पणपत्रिका अत्यंत सहनशील व दुष्काळाने होरपळून निघालेल्या देश व भाषाबंधूंना उद्देशून लिहिली आहे. पुस्तकाला लेखकाने वेगळी प्रस्तावना न लिहिता तिचा समावेश कथानकाच्या प्रारंभी व उपसंहारात केला आहे.

लेखकाला या कादंबरीचा नायक 'पिराजी पाटील' एका स्टेशनवर विशिष्ट परिस्थितीत भेटतो आणि लेखकाने जिज्ञासा दाखविल्यावरून आपली सर्व हकिकत सांगतो ही हकिकत म्हणजे या कादंबरीचे कथानक होय.

एकूण १३ प्रकरणात विभागलेल्या या कादंबरीत शेतकऱ्याला कोणत्या नैसर्गिक व मानवी आपत्तीशी तोंड द्यावे लागते याचे चित्रण आले आहे. स्वतः गावचा पाटील ही हकिकत सांगत असल्यामुळे त्याच्या गावची समग्र हकिकत आणि अंतरंगही आलेले आहेत. दुष्काळात एका खेड्याची वाताहत कशी होते, त्या खेड्याला तेथील माणसांसह तेथील पाटील सावरण्याचा कसा प्रयत्न करतो, यातून ब्रिटिश अमदानीतील कंगाल झालेले खेडे, तेथील पाटील, त्याचे गणगोत, त्याचे घरगुती संबंध, त्याचे सावकाराशी, सरकारी नोकरांशी, खेडुतांशी असलेले संबंध व त्यातून निर्माण झालेले ताण याचे चित्रण सहजपणे आलेले आहे. त्या ओघातच विविध स्वभावाची माणसे आलेली आहेत. सरकारी नोकर, पोलीस अधिकारी, ख्रिस्ती पाद्री, घरची गडीमाणसे, पतिव्रता यांचे स्वभाव जाता जाता रेखाटले गेले आहेत. या सर्वांतून १९व्या शतकाच्या उत्तरार्धातील एक व्यग्र, उदास, पोखरलेले, उद्‌ध्वस्त झालेले दीनवाणे खेडे मनासमोर उभे राहते. दुष्काळ हा त्या खेड्याच्या पाचवीलाच पुजल्यासारखा झाला होता. त्या दुष्काळाचे चित्रही प्रभावीपणे आले आहे.

मनोरंजकता, चमत्कृतीप्रधानता, घटनाप्रधानता, याचे कोठेही चित्रण करण्याचा प्रयत्न केला नाही. त्यामुळे ही प्रभावीपणे सामाजिक वास्तव रेखाटणारी उत्कृष्ट कादंबरी निर्माण झाली आहे. कथानकातील निवेदन प्रामाणिक असल्याने भाषाही साधी सोपी बोलीभाषेला जवळची अशी आहे.

थोड्याफार फरकाने आजही दुष्काळग्रस्त खेड्याचे हेच रूप आपणास पाहावयास मिळते. म्हणूनच या कादंबरीतील ग्रामीण वास्तव हे त्रिकालाबाधित आहे असे वाटते.

यशवंत चव्हाण

**पुण्यप्रभाव : गडकरी, राम गणेश. प्रकाशक : रम्यकथा प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९१६.** या नाटकास गडकऱ्यांनी छोटेखानी प्रस्तावना लिहिलेली असून प्रस्तावनेमध्ये नाटकाच्या विषयाविषयी व प्रकृतिविवेचनाविषयी त्यांनी सांगितलेले नाही.

उदात्त व आदर्श चरित्राचे चित्रण करण्यासाठी गडकऱ्यांनी 'पुण्यप्रभाव'हे एक कल्पनाप्रधान नाटक लिहून बुद्धीपेक्षा भावनेचा, विचारापेक्षा विकारांचा प्रभाव अधिक असतो, तसेच पुरुषपेक्षा स्त्रिया अधिक सामर्थ्यवान, धैर्यवान, कर्तृत्ववान असून आपल्या पुण्याईच्या बळावर पुरुषांची पापबुद्धीही नष्ट करतात असे या नाटकात दाखवून दिले आहे.

भूपाल, वृंदावन, ईश्वर, वसुंधरा, कालिंदी ही नाटकातील प्रमुख पात्रे असून वसुंधरेशी विवाह न झाल्याने सुडाने पेटलेला वृंदावन कालिंदीशी विवाह करून सर्वांना गाफिल ठेवून एक कपट कारस्थान रचतो. आपला दुष्ट हेतू साध्य करण्यासाठी तो काहीही करण्यास तयार होतो. पण अखेर वसुंधरेच्या पतिव्रत्येच्या 'पुण्यप्रभावा'ने त्याचा क्रूरपणा, निष्ठुरता गळून पडते. नाटकाचा शेवट सुखात्म आहे.

मराठी रंगभूमी आणि नाटक यांच्या परिसरात तोपर्यंत जे जे चमत्कृतिपूर्ण, कुतूहलजनक, प्रभावी, यशस्वी आणि लोकप्रिय ठरले होते. ते सारे नाटकात एकत्रित करावयाचे व स्वतःच्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीने त्याला नव्या आणि वेगळ्या स्वरूपात सजवून वाचकांना त्याचे पुनर्दर्शन घडवायचे असा प्रयत्न नाटककार गडकऱ्यांनी या नाटकात केलेला आहे.

अलंकारिक पल्लेदार संवाद, मार्मिक विनोदाची प्रसंगपरत्वे केलेली निर्मिती, अभिनव कल्पनाविलास, गुंतागुंत ही गडकऱ्यांच्या इतर नाटकांतून आढळणारी सारी वैशिष्ट्ये याही नाटकात हजेरी लावतात. हे नाटक सहा अंकी असून प्रत्येक अंकात किमान चार व कमाल सहा प्रवेश असून नाटकात एकूण लहान-मोठी अशी ४९ पदे आहेत.

यशवंत चव्हाण

**पेर्तेव्हा : (अनिल) आत्माराम रावजी देशपांडे. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, आवृत्ती दुसरी, १९५९ (प्रथम प्रकाशन १९४५).** आत्माराव रावजी देशपांडे ऊर्फ कवी अनिल हे एक अत्यंत महत्त्वाचे कवी. त्यांचे आठ कवितासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. प्रस्तुत काव्यसंग्रहात एकूण अडतीस कविता असून त्यांपैकी अठ्ठावीस कविता छंदोबद्ध रचना असणाऱ्या व दहा कविता मुक्तछंदामध्ये आहेत. त्यांपैकी झळ, प्रीतीची रीत, चिरयौवन, प्रीती तुझी माझी, दर्शन, श्रीज्ञानेश्वरांच्या समाधीपाशी, प्रेम आणि जीवन, विशेष आणि पेर्तेव्हा या महत्त्वाच्या कविता. प्रीतिभावना, निसर्गभावना आणि समाजभावना हे सर्वही अनिलांच्या काव्यातून व्यक्त होते. या

प्रयोगशील कवीने कलेचा व जीवनाचाही विचार केल्याचे त्यांच्या कवितेतून जाणवते. या संवेदनाक्षम कलावंताच्या मनाची व्याकुळता, 'मला आवडते वाट वळणाची' या 'वाट' या कवितेतून व्यक्त होते. 'या ऐहिक जगात सर्वत्र आनंदाचे जीवनच आहे' हा विश्वास 'प्रेम आणि जीवन' या काव्यात त्यांनी व्यक्त केला आहे. चिरतरुण वृत्तीचा हा कवी विशेष कवितेत, 'एकेक आहे तो क्षण, ऊन रक्ताने अनुभवलेला' हा जीवनानुभव व्यक्त करीत आहे. 'नवी बीजें पेरा, नव्या आशा धरा'हे पावश्या पक्षाचे आशावादी गाणे लिहिणाऱ्या कवीने मुक्तछंदात्मक काव्यरचना करण्याचा प्रयोग केला आहे. पृष्ठ क्रमांक १०६ ते ११७ यांमध्ये कवीनेच लिहिलेली टिपणे आहेत. काव्यरचना समजण्याचे दृष्टीने या टिपणांचा उपयोग होतो.

वासुदेव सावंत

**पोपटपंची : उपाध्ये, जयकृष्ण केशव. प्रकाशक : महाराष्ट्र पब्लिशिंग हाऊस लि., पुणे, १९२९.** ज. के. उपाध्ये यांच्या 'पोपटपंची'या संग्रहात त्रेचाळीस स्फुट कविता समाविष्ट आहेत. त्यांचे 'लोकमान्यचरित्रामृत' ह्या दीर्घ काव्याने त्यांना महाराष्ट्रात प्रसिद्धी मिळवून दिली. विविध विषयांवरील भावगीते असलेल्या 'पोपटपंची' संग्रहात 'शुक कौतुक!' ह्या शीर्षकाखाली श्री. नि. चाफेकरांची प्रस्तावना आणि कवी गिरीशांचा परिचयपर लेख आहे. "शुकचंचूप्रमाणे प्रस्तुत काव्यसंग्रह आटपशीर व मोहक असून तिच्यातून निघणाऱ्या उद्‌गारांप्रमाणेच 'पोपटपंची'तही आलेल्या विषयांची विविधता, आकर्षक व श्रवणीय झाली आहे," या शब्दांत चाफेकरांना ज. के. उपाध्ये यांचा गौरव केला आहे. ' पोपटपंची ' या संग्रहातील कवितांचे चार गटांत विभाजन करता येते. धार्मिक किंवा तात्त्विक, प्रेमविषयक, राष्ट्रीय आणि विनोदी या चार प्रकारांतील कवितांमध्ये ज. के. उपाध्ये यांच्या व्यक्तिमत्त्वाचे प्रतिबिंब उमटले आहे. कवीची वृत्ती धर्मप्रवण असून त्याला हिंदू धर्म व हिंदूसंस्कारांविषयी अभिमान आहे. कवीला केवळ धर्माविषयी अभिमान आहे असे नाही; त्याला भारत भूमी, भारतीय परंपरेबद्दलही अभिमान आहे. 'गीतराघव' ही गीतमालिका, 'स्वतंत्र हिंदुस्थान', 'भारत भाग्योदय', 'तरुण भारतास' ह्या कवितांचा या संदर्भात निर्देश करता येईल. ईश्वरशरणता, ईश्वरभक्ती, ईश्वराच्या अस्तित्वाचा शोध, ईश्वर संकल्पनेची व्यापकता हे विशेष 'ईशव्याप्ती', 'दर्शनोत्कंठा', 'चित्तचोर', 'निर्देश' या कवितांत आढळून येतात. ज. के. उपाध्ये यांच्यां प्रेमविषयक कवितांत शुद्ध भक्तीचे सात्त्विक, सरळ आणि नैसर्गिक रूप पाहावयास मिळते. 'प्रेमगीत म्हणजे पती-पत्नींच्या सात्त्विक भावनांचे गीत'ही संकुचित कल्पना कवीच्या भावनात्मक आविष्कारामागे नाही. प्रेमभावनेला असलेली वत्सलतेची छटा 'चिमणा श्रीकृष्ण', 'बाळ', 'आई आणि बाळ', 'आनंद आला आनंद!', 'लीला' या कवितांमध्ये प्रकट झाली आहे. ज. के. उपाध्ये ह्यांच्या विनोदी कवितांना उपरोधाची डूब मिळाली आहे. 'बावळट बाळू' ह्या कवितेत एका बावळट मुलाचे शब्दचित्र कवीने रेखाटले आहे. 'ढ' या कवितेतील किंवा 'कवीते करिन तुला मी ठार' व 'शाहीर' या कवितांतील उपरोध-उपहास हा उपाध्ये यांच्या काव्यशैलीचा विशेष आहे. कवीच्या कवितेची भाषा सफाईदार आणि प्रासादिक आहे. त्याच्या ओवी रचनेवर एकनाथ, रामदासांच्या काव्याचा परिणाम झाला आहे. 'विराणी'सारख्या कवितेवर संत तुकारामांच्या शैलीचा प्रभाव आहे. एकाच वेळी आध्यात्मिक, गूढगुंजनपर, कौटुंबिक, विनोदी अशा अनेकविध भावच्छटांचे दर्शन घडवणाऱ्या 'पोपटपंची' ह्या काव्यसंग्रहात ज. के. उपाध्ये यांचे व्यक्तिमत्त्व पारदर्शीपणे प्रकट झाले आहे.

वि. शं. चौघुले

**प्राचीन गीतभांडार : जोशी, ना. ग. प्रकाशक : मौज प्रकाशनगृह, मुंबई, १९५९.** ' प्राचीन गीत भांडार ' हा प्राचीन व मध्यकालीन मराठी कवींच्या भावकाव्यात्म निवडक गीतांचा संग्रह आहे. या काळातील कवींच्या हृदयाला जे अनुभव भिडले त्या अनुभवांना कवींनी काव्यरूप दिले. ना. ग. जोशी यांनी संपादित केलेल्या प्राचीन गीत संग्रहात सोमेश्वर, म्हाइंभट, दामोदर पंडित, महदंबा, मुकुंदराज, ज्ञानेश्वर, नामदेव, जनाबाई, चोखामेळा, एकनाथ, तुकाराम, रामदास, बहिणाबाई, वामन पंडित, रघुनाथ पंडित, विठ्ठल बीडकर, निरंजन माधव, अमृतराय, सोहिरोबानाथ, महिपतिनाथ, रामजोशी, होनाजी, सगनभाऊ, गंगू हैबती, माणिकप्रभू, माधव, कृष्ण केशव, अनामिक कवी, प्रेमाबाई अशा सुमारे २१३ कवी-कवयित्रींच्या निवडक रचनांचा समावेश प्रस्तुत संग्रहात ना. ग. जोशी यांनी केला आहे. महानुभाव पंथीय कवी, संतकवी, पंडित कवी, पदरचनाकार, शाहीर अशा विविध प्रकारच्या कवींच्या रचनांचा समावेश असल्यामुळे ' प्राचीन गीत भांडार ' हा गीतांचा संग्रह प्रातिनिधिक झाला आहे. या संपादनाला ना. ग. जोशी यांची विवेचक, विस्तृत प्रस्तावना आहे. प्राचीन व अर्वाचीन काव्यदृष्टी, जुन्या कवितेची वैशिष्टे, प्राचीन कवितेमधील भावगुण, भक्ती काव्यातील चिंतनशीलता, गीतरचना करणाऱ्या कवींची संवेदनशीलता इत्यादी पैलूंची चर्चा संपादकांनी प्रस्तावनेत साक्षेपाने केली आहे. ज्ञानेश्वरांचे प्रतिभासामर्थ्य, नामदेवांचे शब्दलावण्य, भानुदासांचे संवेदनात्मक अनुभवविश्व, तुकारामांची भावोत्कटता, रामदासी काव्यातील भाषेचे सामर्थ्य अशी वेगवेगळ्या काव्य घटकांची केलेली चर्चा, ना. ग. जोशी यांची रसिकता आणि व्यासंगाचा प्रत्यय देणारी आहे. कवींचा आणि गीतांचा क्रम संपादकांनी शक्यतोवर कालानुक्रमे देण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु ज्या ठिकाणी परंपरेचा धागा जोडला गेला असेल आणि रचनेचे समान सूत्र असेल तिथे अपवाद करून गीते एकत्रच दिली आहेत. पुस्तकाच्या शेवटी दिलेल्या टिपांत कवींची उपलब्ध झालेली माहिती, गीतांतील काही बारकावे, कठीण शब्दांचा संदर्भानुसार जुळणारा अर्थ, क्लीष्ट शब्दांचे साधार स्पष्टीकरण, पद्यरचनेतील काही गमतीजमती यांविषयी संपादकांनी मर्मज्ञपणे लिहिले आहे. याशिवाय,

वेच्यांच्या पहिल्या ओळींची सूची आणि ६५ संदर्भ ग्रंथांची सूची दिली आहे. यापूर्वी मराठीतील अभ्यासकांनी प्राचीन कवितेचे मूल्यमापन बव्हंशी धार्मिक भूमिकेतून केले होते. आधुनिक काळात प्राचीन काव्याकडे आस्वादक भूमिकेतून पाहिले जाऊ लागले आहे. ना. ग. जोशी यांनी घेतलेल्या रसडोळस आणि आस्वादक भूमिकेमुळे 'प्राचीन गीतभांडार' हे संपादन एक मौलिक संपादन ठरते.

वि. शं. चौघुले

**प्राचीन मराठी संतकवी (खंड पहिला) : आजगावकर, जगन्नाथ रघुनाथ. प्रकाशक : कमला भास्कर आजगावकर, मुंबई, १९५७.** सगळी जुनी मराठी कविता, संतचरित्रपर ग्रंथ, हस्तलिखिते, पोथ्या, बाडें, भारत इतिहास संशोधन मंडळाचे अहवाल, महाराष्ट्र साहित्य-पत्रिका, केसरी सारख्या वृत्तपत्रातून जुन्या कवींविषयी प्रसिद्ध झालेली माहिती, अख्यायिका अशा निरनिराळ्या उपलब्ध साधनांचा चिकित्सा-पूर्वक अभ्यास करून परिश्रमपूर्वक, महाराष्ट्र-भाषाभूषण जगन्नाथ रघुनाथ आजगावकर यांनी महाराष्ट्र कवीचरित्राचे ३००० पृष्ठांचे ११ भाग पन्नास वर्षांत प्रसिद्ध केले. आर्थिक ओढाताण, कौटुंबिक अस्वास्थ्य, तसेच पाठीशी कोणतीही संशोधन संस्था उभी नसताना साधारण १९०२ पासून १९५५-५७ सालापर्यंत प्राचीन मराठी कवींवर सातत्याने पन्नास वर्षे संशोधनपर लेखन करून प्राचीन मराठी वाङ्मयाला मूलभूत संदर्भ उपलब्ध करून देण्याचे हे आजगावकरांचे कार्य संशोधकांस सर्वश्रुत आहे.

त्यांच्या 'प्राचीन मराठी संतकवी' या ग्रंथाचे चार खंड असून पहिल्या खंडाची खुद्द आजगावकरांनी सुधारून वाढविलेली आवृत्ती त्यांची स्नुषा सौ. कमळा भास्कर आजगावकर यांनी प्रकाशित केली आहे. या खंडात आद्यकवी मुकुंदराजापासून महाकवी मुक्तेश्वरापर्यंतच्या प्राचीन कवींची चरित्रे व त्यांचे वाङ्मय समालोचन समाविष्ट आहे. प्रत्येक छोट्यामोठ्या कवींचे, अख्यायिकासह संगतवार चरित्र देणे, चरित्रपर वादा-विषियीच्या प्रश्नांचा ऐतिहासिक पुराण्यांच्या आधारे, कधी तारतम्याने मागोवा घेऊन त्या त्या कवींची जागा वाङ्मयाच्या इतिहासात मुक्रर करणे, कवींच्या ग्रंथातील महत्त्वाचे वेचे देणे आणि कवींच्या काव्याचे परीक्षण करून त्याचे महत्त्व निश्चित करणे असे एकंदर ग्रंथाचे स्वरूप आहे.

लेखकाने कवींची चरित्रे लिहिताना कोठून कोणती माहिती मिळाली त्याचा स्पष्ट उल्लेख केल्यामुळे संशोधनातील विश्वसनीयता वाढली असून ग्रंथाची भाषा अतिशय रसाळ व प्रासादिक असल्याने ग्रंथ वाचनीय झाला आहे. प्राचीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना उपयुक्त असा हा महत्त्वाचा संदर्भ ग्रंथ आहे.

मोहन पाटील

**प्रेम की लौकिक : भाटे, गोपाळ चिमणाजी. प्रकाशक : महाराष्ट्र साहित्य ग्रंथमाला, मुंबई पहिली आवृत्ती, १९२३.** ही कादंबरी म्हटल्यास आत्मवृत्त, म्हटल्यास कादंबरी अशा कोटीतील आहे. दोनदा विधुरावस्थेचा प्रसंग ओढवलेले सुधारकाग्रणी बाळासाहेब हे आधीच्या विवाहापासून झालेली मुलेबाळे असताना सुद्धा समाजाच्या प्रगतीच्या आड येणारा जातीभेदाचा पर्वत जमा पार करून आपली बालमैत्रीण असलेल्या परजातीच्या इंदुमती नावाच्या विधवेशी तिसरे लग्न करतात व अशा रितीने प्रेम की लौकिक या प्रश्नात प्रेमाच्या बाजूने सक्रिय निर्णय देतात असा या कादंबरीचा विषय आहे.

एकूण ३३ प्रकरणांत लिहीलेल्या या कादंबरीत तत्कालीन सामाजिक स्थिती, रूढी-परंपरा लक्षात घेता या कादंबरी नायकाच्या वाट्यास आलेल्या संकटांना नायक कसा सामोरा गेला याचे चित्रण केले आहे.

सुधारकी विचारांचा प्रचार करणारी आत्मसंतोषपर कादंबरी.

यशवंत चव्हाण

**फकिरा : साठे, अण्णा भाऊ. प्रकाशक : सुरेश एजन्सी, पुणे, पहिली आवृत्ती, १९५९, विसावी आवृत्ती जानेवारी, २००२.** 'फकिरा' ही अण्णा भाऊंची वाचकप्रिय कादंबरी होय. या कादंबरीमध्ये लेखकाने आपली कैफियत मांडली आहे, त्यामध्ये ते म्हणतात, "फकिराविषयी थोड सांगाव म्हणून लिहित आहे ते असं की, ही कादंबरी केवळ माझ्या प्रतिभेनं निर्माण केली नाही. प्रतिभेला सत्याचं जीवनाचं दर्शन नसेल तर प्रतिभा, अनुभूती हे शब्द निरर्थक आहेत असा माझा अनुभव आहे....." वाङ्मयीन दृष्टिकोन-भूमिका व्यक्त करणारी अशी ही कैफियत. या कैफियतीमधून 'फकिरा'च्या लेखनामागील त्यांचा उद्देश त्यांच्या अपेक्षा- त्यांची भूमिका स्पष्ट होते.

गावासाठी कटून मरणाऱ्या, मांग जमातीतील शूर पिता-पुत्रांची रोमहर्षक कहाणी, हे या कादंबरीचे कथासूत्र आहे.

अण्णा भाऊंच्या उग्रमंगल प्रतिभेने केलेला अटीतटीचा प्रयत्न 'फकिरा'मध्ये ओसंडून राहिला आहे. उपेक्षितांच्या अंतरंगातील हिंमत, त्यांच्या मनातील व्यथांचा आगडोंब. उपेक्षांचे ठणके, निराशेची भेसूरता, त्यातून उत्पन्न झालेले क्रौर्य आणि सत्त्व जोपासण्यासाठी पिसाळून जाऊन समोरच्या विरोधी सामर्थ्याची तमा न बाळगता अखेरच्या क्षणापर्यंत झुंजू इच्छिणाऱ्या दलित-बंडखोर, मांग, रामोशी, महार जमातीच्या मनातील कडवटपणा आणि त्वेष यांचे दर्शन घडविण्याचा असीम प्रयत्न हे या कादंबरीचे प्राणतत्त्व.

भरतेश्वर पाटील

**फुलवात : देशपांडे, आत्माराम रावजी. प्रकाशक : वाग्विलास मंडळ लि., पुणे, १९३२.** रविकिरण मंडळाच्या भरभराटीच्या काळातही त्याच्या संस्कारापासून अलिप्त राहून

स्वतःचे वेगळेपण जपणारे कवी म्हणून आत्माराम रावजी देशपांडे ऊर्फ अनिल यांचा उल्लेख केला जातो. 'दशपदी', 'भग्नमूर्ती', 'निर्वासित चिनी मुलास', 'सांगाती' हे काव्यसंग्रह विशेष प्रसिद्ध आहेत. मुक्तछंद मराठीत रुजविण्याचा त्यांनी यशस्वी प्रयत्न केला.

'फुलवात'हा भावगीतांचा संग्रह आहे. अनिलांनी १९२० ते १९३१ या कालावधीत लिहिलेली ३४ भावगीते या संग्रहात आली आहेत.

हृदयीच्या अंधारात। लावियेली फुलवात।
तुवा आपले हाती। उजळली दिव्य ज्योती।।

असे 'फुलवात'चा भावगीतात ते म्हणतात. कवीला 'ज्योत' आणि 'फुलवात' या शब्दांद्वारे मांगल्य सुचवायचे आहे. 'घरी' या भावगीतात घरी वाट पाहत असलेल्या पत्नीचे चित्रण येते. या भावगीतावर रे. टिळक यांच्या 'कुणास्तव कुणीतरी' या कवितेचा प्रभाव जाणवतो—

"जाहल्या तिन्हीसांजा। दीप गगनी लागले। घरी शिणवील डोळे। कुणीतरी।।" असे कवी आर्ततेने म्हणतो. 'आनंद' हे भावगीत बालकवींच्या 'आनंदी आनंद' या कवितेची आठवण करून देते.

"थकले रे डोळे माझे
वाट तुझी पाहता. . . ."

या ओळींनी सुरू होणारे भावगीत आजही रसिकांना मोहिनी घालत असते.

ह्या भावगीत संग्रहाच्या शेवटी काही गीतांचे स्वरलेखन दिले आहे.

प्रस्तुत भावगीत संग्रहाला देशपांडे यांनी विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे. या प्रस्तावनेत जुनी आणि नवी कविता, आधुनिक काव्य आणि आत्मप्रत्यय, आधुनिक काव्य आणि गूढवाद इ. प्रश्नांची साहित्यशास्त्रीय भूमिकेतून चर्चा केली आहे.

भावगीतांचे स्वरलेखन आणि साहित्यचर्चात्मक प्रस्तावना हे या ग्रंथाचे महत्त्वाचे वैशिष्ट्य सांगता येईल.

वि. दा. वासमकर

**फुलांची ओंजळ : बी (गुप्ते, नारायण मुरलीधर). प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती १९३४.** नारायण मुरलीधर गुप्ते ऊर्फ 'बी'हे मराठीतील ख्यातनाम कवी आहेत. 'चाफा'ही त्यांची अतिशय गाजलेली गूढगुंजनपर कविता आजही रसिकांना आकर्षित करते.

'फुलांची ओंजळ' हा काव्यसंग्रह १९३४ मध्ये प्रथम प्रकाशित झाला. पहिल्या आवृत्तीत एकूण ३८ कविता समाविष्ट होत्या. १९४१ मध्ये प्रकाशित झालेल्या दुसऱ्या आवृत्तीत 'पिकले पान' या शीर्षकाखाली ११ नवीन कवितांचा समावेश करण्यात आला.

सर्व कविता या विचारप्रेरक व तात्त्विक स्वरूपाच्या आहेत. सूक्ष्म अवलोकन, अखंड आत्मचिंतन आणि दीर्घ निदिध्यासाच्या जोरावर विचारमंथन करून 'बी' यांनी या कविता लिहिल्या आहेत. 'फुलांची ओंजळ' या कवितेत हे विश्वचक्र कोणत्या ध्येयाकडे चालले आहे हे सांगितले आहे. 'डंका' कवितेत समाजाच्या उद्धारासाठी वेळोवेळी अवतरणाऱ्या बंडवाल्या महात्म्यांचा गौरव आणि जयजयकार केला आहे. भारतवर्षातील सद्य:कालीन दुर्धर, राजकीय व सामाजिक परिस्थितीचे निरीक्षण व चिकित्सा 'ह्यात काय संशय' या कवितेत पाहावयास मिळते.

या संग्रहातील सर्व कवितांमध्ये विषय, विचार व भाषा यांचे ऐश्वर्य व वैभव पाहावयास मिळते. प्रल्हाद केशव अत्रे आणि वामन नारायण देशपांडे यांनी लिहिलेल्या प्रस्तावनांमुळे कविता संग्रहाच्या आकलनास मदत होते. 'बी' यांचा पिंड तत्त्वज्ञानी कवीचा असल्याची साक्ष या संग्रहातील कवितांच्या आशयावरून पटते.

वि. दा. वासमकर

**फुलोरा : रेगे, पुरुषोत्तम शिवराम. प्रकाशक : ज. शि. रेगे, मुंबई, १९३७.** 'फुलोरा'या काव्यसंग्रहात पु. शि. रेगे यांच्या पूर्वप्रसिद्ध, सुधारलेल्या आणि अप्रकाशित पन्नास कवितांचा समावेश आहे. संग्रहात समाविष्ट केलेल्या कवितांपैकी 'राणी', 'फुलमाळी', 'घटका प्रेमाची', 'चोरांच्या ग रानामधीं', 'जीवलता', 'फुलें सोनियाचीं' व 'वायु भरारा' ह्या सात कवितांचे स्वरलेखन दिले आहे. पं. विष्णू दिगंबर पलुस्कर यांच्या पद्धतीप्रमाणे शीला माधव नेरूरकर यांनी हे स्वरलेखन केले आहे. परिशिष्ट १ मध्ये KARMA हो आंग्ल कवी वॉल्टर द ला मेअर यांची रूपांतरित इंग्रजी कविता आणि परिशिष्ट २ मध्ये पु. शि. रेगे यांची मैत्रीण केठ-राधा साळझ् यांच्या जर्मन कवितेचा मराठी अनुवाद आहे. पु. शि. रेगे यांच्या कवितांमध्ये अभंग, ओवी, चंद्रकांत, मायामंगला, दाशरथी या जाती असे विविध रचनाप्रकार आहेत. 'फुलोरा' काव्यसंग्रहातील कविता भावगीतात्मक आहेत. काव्यात्मक भाववृत्तीच्या आविष्कारा-साठी रेग्यांच्या कवितेने पात्राची मनोवृत्ती, प्रेमजीवनातील हळुवारपणा अशी वेगवेगळी रुपे घेतली आहेत. रेग्यांच्या भाषेला अकृत्रिम आणि सहजसाधी लय आहे. तिच्यात काही संस्कृत शब्दांचे अस्तित्व असले तरी तिच्यात अल्पाक्षर रमणीयत्व आणि आल्हादकताही आहे. 'अभिसारिका'ही कविता त्या दृष्टीने प्रातिनिधिक कविता आहे. कातळावरून मार्ग काढताना, काजळ्या रात्रीच्या वेळी जीव भरून येत असताना कवीची प्रकट झालेली भावविभोर अवस्था प्रत्ययकारी ठरते. 'चाळा', 'चाफ्याच्या झाडाखालीं', 'राणी' यांसारख्या कविता समकालीन मराठी कवितांच्या प्रवाहात लक्ष वेधून घेणाऱ्या कविता आहेत. 'फुलोरा'या काव्यसंग्रहाला आत्माराम रावजी देशपांडे तथा कवी अनिल यांची प्रस्तावना आहे. अशा चिमुकल्या कविता-संग्रहाचे मराठी कवितांच्या संसारात स्थान काय, असा प्रश्न विचारणाऱ्या चिकित्सक टीकाकारांना उत्तर देताना आत्माराम रावजी देशपांडे यांनी म्हटले आहे —"काव्यप्रेमी रसिकांना अशा संग्रहाचे कार्य काय हे सहजच कळून येईल. मानवी

अनुभवाचे क्षेत्र वैयक्तिक अनुभूतींनेच वाढते; वैयक्तिक अनुभूतींनेच त्यात विविधता येते, त्याचे सौंदर्य वाढते, त्या दृष्टीने भावगीतांची निर्मिती जितकी अधिक व अधिकांकडून होईल तितकी इष्टच आहे. कवीचा स्वतःचा दृष्टिकोन अर्थात आणखी वेगळा असतो..... जीवनानंदाने हृदय बहरून आले की आतील भाव ओसंडू लागतात." प्रस्तावनेत कवी अनिलांनी म्हटल्याप्रमाणे पु. शि. रेगे यांच्या 'फुलोरा' संग्रहातील कवितांत पु. शि. रेगे या सौंदर्यवादी, संवेदनशील कवीचे हृदय बहरून आले आहे.

वि. शं. चौघुले

**बटाट्याची चाळ : देशपांडे, पु.ल. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई, दुसरी आवृत्ती, १९६१.** पुलंच्या ललित लेखनामध्ये सर्वात गाजलेलं आणि त्यांच्या नावाशी कायमचं जोडलं गेलेले ललित लेखन म्हणजे 'बटाट्याची चाळ'. ती चाळ एकट्या पुलंची, एकट्या मुंबईची न राहता अखिल मराठी रसिकांची होऊन गेली आहे.

'बटाट्याची चाळ'मध्ये पुलंनी मुंबईच्या मध्यमवर्गीय चाळ संस्कृतीचे चित्रण सूक्ष्मपणे केले असून मध्यमवर्गीय मराठी संस्कृतीचे विडंबन - पल्लेदार व आकर्षक पद्धतीने केलेले आहे. जीवनातल्या नानाविध प्रवृत्तीचे दर्शन घडविणारे चित्रण. वाड्मयीन वास्तव व जीवनातील वास्तव याचे ही दर्शन पुल घडवितात.

चाळीला इतिहास आहे. ती इतिहासाची साक्षीदार आहे. चाळीनं पहिली कायदेभंगाची चळवळ, बेचाळीसचा लढा, दुसरे महायुद्ध, स्वातंत्र्यप्राप्ती, पहिल्या प्रजासत्ताक दिनाची रोषणाई आणि नंतरची स्वातंत्र्याची फरफट - अशा सर्व घटना पाहत, नाना जातीच्या, पंथाच्या वृत्तीच्या - प्रवृत्तीच्या चाळकऱ्यांना घेऊन उभी आहे. या चाळीत अनेक वल्ली व्यंगचित्रणात्मक व्यक्तिरेखांच्या रूपाने वावरतात. सर्व लेख स्वतंत्र पण चाळीशी सर्व लेखाचे नाते. सर्व लेख स्वतंत्रपणे ही विनोदी लेख म्हणून लक्षात राहण्याजोगे आहेत.

'असा मी असा मी', 'खोगीर भरती', 'नस्ती उठाठेव', 'हसवणूक', 'अपूर्वाई', 'पूर्वरंग' इ. पु. ल. देशपांडे यांची लोकप्रिय पुस्तके.

'बटाट्याची चाळ'मधील अनेक व्यक्तिसमूह व त्यांचे परस्पर संबंध यामधून येणारा विनोद अत्यंत प्रसन्न व मनाला सुखद वाटणारा. विनोदातून वाचकांना चिंतनशील बनविण्याचे सामर्थ्य पुलंचे.

भरतेश्वर पाटील

**बदलापूर (आमचा गाव) : चापेकर, नारायण गोविंद. प्रकाशक : आर्यसंस्कृती मुद्रणालय, पुणे-२, आवृत्ती १९३३.** कसबे बदलापूर तर्फे चोण, तालुका कल्याण, जिल्हा ठाणे या गावाच्या आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक पाहणीचा साद्यंत तपशीलवार अहवाल असे या ग्रंथाचे स्वरूप असून खुद्द लेखकानेच प्रारंभी 'हा माझा ग्रंथ म्हणजे बदलापूरचे गॅझेटियरच होय' असे नमूद केलेले आहे. १९२६ च्या 'विविध ज्ञानविस्तारा'तून या ग्रंथाचा पहिला लेख प्रसिद्ध झाला. पुढे जवळजवळ आठ वर्षे या ग्रंथाचे इतर लेख प्रकाशित होत राहिले. ग्रंथामध्ये बदलापूरच्या गावगाड्यातील पाटील, कुलकर्णी, कारू-नारू, अलुते-बलुते अशा सर्व जातीसमूहातील लोकांची आर्थिक, स्थावर-जंगम स्थिती, त्या घरांतील सदस्य संख्या, गुराढोरांची संख्या, त्यांचे रोजगार, उत्पन्न, अन्य मार्गाने मिळणारे उत्पन्न, खर्च, कर्जे आणि शिल्लक अशा सर्व कागदोपत्री नोंदींची तपशीलवार माहिती रकानेवार दिलेली असून त्याशिवाय विविध जातीतील लग्नप्रथा, चालरिती, धार्मिक कृत्ये, लोकांच्या सवयी, दारू, रोगराई, सर्प, जन्म-मृत्यू असा भरगच्च तपशीलही दिला आहे. एका गावाच्या प्रत्यक्ष पाहणीचा चक्षुर्वैसत्यं असा हा प्रमाण अहवाल असल्याने ग्रंथाचे महत्त्व अनन्यसाधारण असून खूप परिश्रम घेऊन ही माहिती प्रसिद्ध करण्याचे ग्रंथकाराचे प्रयत्न कौतुकास पात्र आहेत.

ग्रंथात सर्पदंशावर, रोगराईवर लोकवैद्यकातील उपाय त्या त्या वनस्पतींच्या नावानिशी व औषधांच्या मात्रांनिशी दिलेले आहेत ते बघून लेखकाचा बहुश्रुतपणा, चौकसबुद्धी आणि असाधारण शहाणपण या गोष्टींचा प्रत्यय जागोजाग येतो.

एका गावाचा 'सर्वे' या ग्रंथात आला असला तरी, भाषा, इतिहास समाजशास्त्र, लोकसाहित्य, अर्थशास्त्र इ. अनेक विषयांच्या अभ्यासकांसाठी हा उपयुक्त संदर्भ ग्रंथ आहे.

मोहन पाटील

**बंदिशाळा : यशवंत. प्रकाशक : कौलगेकर, विष्णू वासुदेव. पहिली आवृत्ती, १९३२.** यशवंत दिनकर पेंढारकर हे रविकिरण मंडळातील एक महत्त्वाचे कवी. 'यशवंती', 'यशोधन' इ. स्फुट काव्याबरोबरच 'जयमंगला', 'बंदिशाळा', 'काव्यकिरीट' ही खंडकाव्येही त्यांनी लिहिली आहेत.

'बंदिशाळा' हे खंडकाव्य रविकिरण मंडळाचे अठरावे पुस्तक असून खुद्द कवीने या खंडकाव्याची प्रस्तावना लिहिली आहे. आणि कवी गिरीश यांनी या खंडकाव्याचे रसग्रहण केले आहे. नोकरीच्या निमित्ताने बालगुन्हेगारांच्या बंदिशाळेतील जीवनाचे कवीला जवळून अवलोकन करता आले. या अवलोकनातून मुख्यतः हे काव्य उदयास आले.

बंदिशाळेत येऊन पडलेल्या एका संजीवाची आणि दुर्दैवी मातेची करुणकथा या खंडकाव्यात चित्रित केली असून आईवडिलांचे मुलांवरील संस्कार किती महत्त्वाचे आहेत हे पटवून देण्याचा प्रयत्न यामध्ये आहे. तसेच राष्ट्राच्या घटनेत मुलांची माणसे, माणसांचा समाज व समाजाचे राष्ट्र बनत असते. म्हणूनच मुलांची जपणूक, संवर्धन, त्यांच्या शीलाची घडण, त्यांचे ध्येयवादित्व या गोष्टींना राष्ट्र घडणीत किती महत्त्व आहे हे सांगितले आहे.

प्राचीन खंडकाव्याचे रचनातंत्र फारसे न पाळता भावगीतांच्या साखळीतून कथानकाची गुंफण करून कवीनं मराठीत 'खंडकाव्य' ही रचना प्रस्तुत केली हे या काव्याचे महत्त्व होय.

यशवंत चव्हाण

**बंधनाच्या पलीकडे : देशपांडे, पुरुषोत्तम यशवंत. प्रकाशक : अ. स. गोखले, पुणे, १९२७.** 'बंधनाच्या पलीकडे' ही पु. य. देशपांडे यांची कादंबरी. 'प्रेम' या संकल्पनेचा वेगळा आविष्कार घडवणारी ही कादंबरी आहे. देशपांडे यांच्या समकालीन कादंबरीतील प्रणयभावनेच्या चित्रणापेक्षा प्रस्तुत कादंबरीतील प्रेमाचे चित्रण निराळे आहे. त्याला वैचारिकतेची डूब मिळाली आहे. कादंबरीचे कथानक तसे सरळ साधे आहे. त्यात फारशी गुंतागुंत नाही, भर आहे तो पात्रांच्या मनातील वैचारिक आंदोलनांना. नागपूरच्या बाबासाहेब देशमुखांचा मुलगा प्रभाकर वडिलांच्या विरोधाला न जुमानता मैना ह्या वेश्येशी लग्न करतो. तो वडिलांची किंवा समाजाची पर्वा करीत नाही. 'मनुष्याला पडणारी मनुष्यत्वाची ओळख म्हणजे प्रीती', अशी तो प्रेमाची व्याख्या करतो. प्रभाकरप्रमाणेच मेडिकल कॉलेजमध्ये शिकणारी त्याची बहीण शांती ही अरुणकुमार घोष ह्या बंगाली मित्राशी विवाह करते. बाबासाहेब ह्या दोन्ही लग्नांना प्रखर विरोध करतात, कारण ते परंपराभिमानी, धर्माचा कडवा अभिमान बाळगणारे, वैयक्तिक स्वातंत्र्याची पायमल्ली करणारे हट्टी गृहस्थ आहेत. मुलांच्या वर्तनाचा आणि पतीच्या वागण्याचा ताण सहन न झाल्यामुळे त्यांची पत्नी लक्ष्मीबाई मरण पावते. उद्‌विग्न झालेले बाबासाहेब घर सोडून जातात, वानप्रस्थाश्रम स्वीकारतात. कालांतराने त्यांना वैश्विक, जातनिरपेक्ष, निखळ, निःस्वार्थी प्रेमाचे महत्त्व पटते. ते घरी येतात. मैनेशी बोलतात, तिची वैचारिक झेप आणि तिच्या पुरोगामी भूमिकेला असलेले तात्त्विकतेचे अधिष्ठान पाहिल्यावर ते भारावून जातात. आपली चूक त्यांना उमगते. त्यांच्या विचारांत परिवर्तन होते. 'शाश्वत सुखाचा मंत्र, चैतन्यमय सत्याचे वसतिस्थान' हृदयाच्या निर्मल भावात 'बंधनाच्या पलीकडे' आहे, हे चिरंतन सत्य शेवटी त्यांना पटते. पु. य. देशपांडे यांना आयुष्याच्या सुरुवातीपासून आध्यात्मिक, तात्त्विक विचारांचे आकर्षण होते. त्यामुळेच आपल्या लेखनात प्रेमाच्या शारीरिक, वासनामय, क्षणिक सुखमय बाजूपेक्षा तिच्यातील आदर्श, चिरंतन मूल्यांना महत्त्व द्यावे, असे त्यांना वाटते. त्यामुळेच वासनेतून निर्माण होणारी प्रेमाची रूपे या कादंबरीत दिसत नाहीत. कादंबरीतील सर्व ताण, विरोध वा संघर्ष मूलतः विचारांचा असतो. पात्रांच्या मुखातून व्यक्त होणारे विचार त्यांच्या भावनिक विकासाला वाव देत नाहीत. सारे आवेग आणि आवेश कल्पनेतून साकार होतात, शब्दांच्या आतषबाजीतून व्यक्त होतात. 'बंधनाच्या पलीकडे' या कादंबरीची कलादृष्ट्या ही मर्यादा असली तरी एका वेश्येशी विवाह करून नायकाने आपली प्रेमविषयक स्वतंत्र आणि सनातन भूमिका प्रकट करणे हे या कादंबरीचे वैशिष्ट्य ठरते. त्यामुळेच समकालीन कादंबऱ्यांत ही कादंबरी वेगळी ठरते.

**वि. शं. चौघुले**

**बनगरवाडी : माडगूळकर, व्यंकटेश. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई, पहिली आवृत्ती १९५५, दहावी आवृत्ती १९८३.** मराठी कादंबरी विश्वातील लक्षवेधी कादंबरी म्हणून या कादंबरीचा उल्लेख केला जातो. मराठी ग्रामीण कथेला नवकथेच्या युगात स्थान निर्माण करून देणाऱ्या व्यंकटेश माडगूळकरांनी 'बनगरवाडी' ही प्रादेशिक कादंबरी लिहून 'माणदेशा'ला मराठी वाङ्मय विश्वात अजरामर करून ठेवले. ही कादंबरी मराठी प्रादेशिक कादंबरीतील महत्त्वाचा टप्पा आहे. कथानकाची व्याप्ती लहान पण आशयघन अवकाश तसेच मानवी जीवन आणि निसर्ग यांचे अतूट नाते कादंबरीला संपन्नता आणते.

'राजाराम' मास्तर म्हणून धनगर वस्तीत बनगरवाडीत येतो. मुलं नसलेल्या शाळेत हजर होतो. वाडीच्या धनगराच्या सोबत-समवेत राहून त्यांच्या सहकार्याने शाळा सुरू करतो. त्यांच्याच मुलांना शिकवतो. बनगरवाडी दुष्काळाने उजाड झाल्यावर बदली झाल्याने तो बनगरवाडी सोडून निघून जातो. एवढेच या कादंबरीचे कथानक सांगता येईल.

परंतु मास्तराच्या दृष्टीतून टिपलेली 'बनगरवाडी' जेव्हा लेखक डोळ्यासमोर चित्रमय रूपात साकारतात, तेव्हा माणसांचे, प्राण्यांचे, निसर्गाचे एक सजिवंत विश्वच उभे राहते.

येथले मेंढपाळाचे जग गबाळे, अनागर, गलिच्छ असे आहे. येथील माणसे वाट्याला आलेले दारिद्र्य तिखट जाळ ऊन-ऊन कालवणासारखे भुरकतात. 'आपण उद्या मरणार' असे अंतर्ज्ञान असलेला कारभारी, 'आमचं खुळं आलं माघारी' असं नवऱ्याबद्दल सांगणारी स्त्री, विश्वास अजाण आयबू, दुष्काळात बैल विकायला नेणारा पण तो न विकताच परत येणारा शेतकरी, पेरणीच्या वेळी नांगराला जुंपून घरी तिला प्रेमाने तुडवीत बसलेला शेकू, अडाणी धनगर, अंजी, रामोशी यांच्याबरोबर शेरडं, बसकी घरं, ती शाळा, निसर्गसृष्टीतील ऋतूप्रमाणे बदल इ. रूपे सगळी एकमेकांत मिसळून जातात आणि जाणवत राहते ती फक्त 'बनगरवाडी'.

बनगरवाडीच्या भाषेला येथल्या माणसांचे भावविश्व सहज व्यक्त करता आले, ते साध्या, सरळ पण चटका लावणाऱ्या भाषाशैलीमुळेच.

**भरतेश्वर पाटील**

**बहिणाबाईची गाणी : चौधरी, बहिणाबाई. पॉप्युलर प्रकाशन मुंबई, पहिली आवृत्ती १९५२, तिसरी आवृत्ती १९७८.** 'अरे संसार संसार, जसा तवा चुल्ह्यावर' माणसा माणसा ! या अमर ओळी लिहिणाऱ्या, 'अक्षर'ओळख नसलेल्या बहिणाबाईच्या कविता सरळ आणि सोज्वळ आहेत. जुन्या पिढीच्या संस्कारात वाढलेल्या या कवयित्रीने आपल्या काव्याने

स्त्री मनाच्या अगदी स्वाभाविक स्वरूपाची ओळख करून दिली. शिक्षणाचा लाभ नसतानाही संस्कारक्षम मनातून त्यांना काव्य स्फुरले. ईश्वरावर निष्ठा, सांसारिक कर्तव्यातच पूर्ण समाधान, सुखदु:खाकडे काहीशा तटस्थपणे पाहण्याची वृत्ती इ. गुणांमुळे हे काव्य उठावदार बनते.

अतिशय साधी भाषा, व्यवहारातील अतिशय साध्या प्रसंगाचा अत्यंत समर्पक उपयोग, सूक्ष्म दृष्टीमुळे मूळचे अभिजात काव्य परिणामकारक होते. कवयित्रीच्या 'खानदेशी' बोलीमुळे काव्याला एक सौंदर्य लाभले आहे. कोटीबाज आणि उपरोधिक विनोदाबरोबरच शब्दांची मौज ही त्या साधतात. प्रत्येक गाण्यात प्रतिमांची मांडणी, त्यांची चढती योजना, यमके आणि अनुप्रास, साधेपणा, सुंदरपणा ही गाण्यांची बलस्थाने मराठी मनाला मोहिनी घालील आणि स्तिमित करून टाकील असा भाषेचा विचाराचा आणि कल्पनेचा विलक्षण गोडवा-काव्यात, गाण्यात आहे.

भरतेश्वर पाटील

**बहुरूपी : कोल्हटकर, चिंतामण गणेश. प्रकाशक : ह. वि. मोटे, पहिली आवृत्ती १९५७, तिसरी आवृत्ती १९८३, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई.** मराठीतील ज्येष्ठ नाट्यअभिनेते चिं. ग. कोल्हटकर यांचे हे आत्मचरित्र असून यामध्ये स्वगत, पूर्वार्ध, उत्तरार्ध व भरतवाक्य असे विभाग पाडले आहेत. याशिवाय ह. वि. मोटे ' आभार ' दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना व रंगभूषेपूर्वी इत्यादी मजकूरही समाविष्ट आहे.

कोल्हटकर ज्या नाटककारांच्या सहवासात वावरले त्या नाटककारांच्या माध्यमातूनच आपला नाट्यप्रवास व जीवनप्रवास कथन करतात. या नाटककारांपैकी कोणी वडिलांची वत्सलता दाखविली, तर काहींनी गुरुतुल्य मार्गदर्शन केले, काहींचा प्रेमळ बंधुभाव प्रत्ययाला आला, तर काहींनी जिव्हाळ्याने स्नेहभाव दाखविला. त्याचप्रमाणे नाटकाच्या निमित्ताने ज्या व्यक्ती भेटल्या, काही प्रेक्षणीय स्थळे पाहिली त्यांचे प्रसंगनिमित्ताने कोल्हटकरांनी केलेले चित्रण तसेच नाट्यव्यवसायाच्या महत्त्वाच्या अंगाचे व प्रगतीचे समालोचन. हा या लेखनातील अभ्यासयोग्य भाग वाटावा.

या आत्मचरित्राच्या पूर्वार्धात कृ. प्र. खाडिलकर, न. चिं. केळकर, अ. ब. कोल्हटकर, वा. गो. जोशी इत्यादी २३ नाटककारांचा ऊहापोह असून राम गणेश गडकरी यांना स्वतंत्र स्थान दिले आहे. उत्तरार्धात मो. ग. रांगणेकर, ग. दि. माडगूळकर, पु. ल. देशपांडे, भा. वी. वरेरकर इ. नऊ नाटककार. शेवटी 'भरतवाक्य' व 'बळवंत संगीत मंडळी' व रंगभूमीसंबंधी आणखी काही ही प्रकरणे आली आहेत.
ग्रंथात नाटककारांचे फोटो, त्यांची हस्ताक्षरे दिली असून काही नाटकातील छायाचित्रेही आहेत. तसेच 'द्रौपदी'मधील उतारा, श्री. कृ. कोल्हटकरांचे पात्र, यशवंतराव खरे यांचे 'उग्रमंगळ' संबंधीचे पत्रही दिले आहे.

मराठी नाट्यवाङ्मयाच्या वाटचालीचा इतिहास समजावून घेण्याच्या दृष्टीने उपयुक्त ग्रंथ.

यशवंत चव्हाण

**बळी : शिरुरकर, विभावरी. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, पहिली आवृत्ती १९५०, नववी आवृत्ती १९९९.** विभावरी शिरुरकर यांनी 'हिंदोळ्यावर', 'विरलेले स्वप्न', 'जाई', 'दोघांचे विश्व' या कादंबऱ्यातून स्त्री जीवनाचा वेध घेतला. 'बळी'मध्ये मात्र सर्वांपेक्षा वेगळ्या अशा समाजातील एका उपेक्षित जगाचे वास्तव समर्थपणे रेखाटण्याचा प्रयत्न केलेला आहे.

मांग-गारुडी समाजाच्या दु:खाचे, त्यांच्यातील ओंगळपणाचे, त्यांच्या पशुपातळीवरील जीवनाचे चित्रण करणाऱ्या या कादंबरीत या समाजाच्या भीषणतेचे स्वरूपही फार व्यापकतेने आले आहे. गुन्हेगार ठरविलेल्या समाजाच्या मनीमानसी मुरलेली लाचारी, रक्तात असलेली गुन्हेगारी आणि आपल्या-पेक्षा निराळेपणा दाखवू पहाणाऱ्याला कवटाळून आपल्यातच ओढून जिरवू पाहणारी आत्मघातकी प्रवृत्ती अशा अनेक प्रकारच्या ओढाताणीत 'आबा'सारख्या भावतरल तरुण कसा बळी पडला याचे चित्रण या कादंबरीत केले आहे.

कादंबरीतील व्यक्तिचित्रण प्रभावी आहे. आबा', 'चांगुणा', 'गेण्या', 'संतू', 'नामी', 'जाई', 'त्रेण्या', 'भागवत गुरुजी' इत्यादी सर्वच व्यक्तीरेखा वाचकांच्या समोर बाह्यवर्णनाशिवाय उभ्या राहतात.

इंग्रज काळात 'मांग-गारुडी' समाजाला गुन्हेगार ठरवून कंपार्टमेंटमध्ये कोंडले होते. त्या कोंडवाड्यात मनुष्यहीन जीवन जगणाऱ्या जन्माने व कायद्याने उपेक्षित अशा दुहेरी कुंपणात जगणाऱ्या माणसांचे एक अपूर्व जग ही कादंबरी समर्थपणे दाखवून देते.

यशवंत चव्हाण

**बारी : देसाई, रणजीत. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे-२. पहिली आवृत्ती १९५९, दुसरी आवृत्ती १९७७.** या कादंबरीला स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर काळाची पार्श्वभूमी असून सुतगट्टीच्या बारीच्या आश्रयाने राहणाऱ्या दुर्लक्षित बेरड जमातीचे चित्रण कादंबरीकाराने केले आहे.

दाट गहिऱ्या जंगलाने वेढलेली, भर दुपारीही अंधारून यावे अशी ही बारी. याबारीच्या आश्रयाने बेरड जमात राहते, वाढते. म्हणूनच या बारीवर या जमातीचे जीवापाड प्रेम. बारीतून येणाऱ्या-जाणाऱ्या बैलगाड्यांची लूट करून आपला उदरनिर्वाह ही जमात चालवते. लुटमारीचा धंदा करणारी पण तितकीच प्रामाणिक, दिलेल्या शब्दाला जागणारी, ही जमात स्वातंत्र्यपूर्व काळात गुण्यागोविंदाने या जंगलात, कडेकपारीत जगत असते. परंतु स्वातंत्र्यानंतर सर्वोदय केंद्र वाडीत सुरू होते. काळ बदलतो. बदलत्या काळाच्या सुसाट वाऱ्याने बेरडांचे पूर्वजीवन बदलून

जाते. रूपानं, गुणानंही. एकेकाळी बैलगाड्यांनी केलेल्या चाकोऱ्यांचे पट्टे घेऊन, आजूबाजूच्या जंगलराईने, अंगावरच्या लाल धुळीनें धुंद झालेली आणि शिट्या-किंकाळ्यानी रात्री-अपरात्री जागी असणारी ही बारी आता तोंडाला डांबर फासून रात्रंदिवस मोटारीची घरघर ऐकत निपचित पडून राहते.

स्वातंत्र्याच्या नव्या मुल्यप्रस्थापनेनंतर 'बेरड' जमाती सारख्या एका पारंपरिक जीवनपद्धतीचा ऱ्हास कसा झाला हे शैलीदार रंजक कथानकाच्या बांधणीतून चित्रित करणारी कादंबरी आहे.

यशवंत चव्हाण

**बालकवींची समग्र कविता : संपादक : पाटणकर, भा. ल., नाशिक., प्रकाशक : रामकृष्ण बुक डेपो, पहिली आवृत्ती १९४२, पाचवी आवृत्ती १९६२.** 'बालकवींच्या समग्र कविता' या संग्रहात, संपादक भा. ल. पाटणकर यांनी बालकवींच्या उपलब्ध सर्व कविता समाविष्ट केल्या आहेत. बालकवी केशवसुत कालखंडातील एक महत्त्वाचे कवी. या संपादित ग्रंथात बालकवींच्या कुंडलीसह त्यांचे जीवनचरित्र सूक्ष्मपणे रेखाटले असून बालकवींशी संबंधित हयात व्यक्तींना भेटून त्यांच्याशी चर्चा करून माहिती घेऊन केलेली जीवनचरित्राची मांडणी आढळते.

'कवितांचे समालोचन' या लेखात बालकवींच्या काव्य वैशिष्ट्याचा एकत्रित विचार संपादक सविस्तरपणे मांडतात.

मराठी काव्यात निसर्गकवी म्हणून बालकवींचे स्थान अढळ आहे. निसर्ग सृष्टी वर्णनामध्ये त्यांची प्रतिभा बहरते. 'निर्झर', 'संध्यातारका', 'फुलपाखरु', 'फुलवेली' अशासारख्या कविता निसर्गातील वस्तुंमूळे स्फुरल्या असल्या तरी वर्ण्य वस्तूंवर मानवी धर्माचे, भावनादिकांचे आरोप करून त्यांच्या द्वारे कोमल अशा भावनांचा सुंदर आविष्कार या काव्यामधून कवीने केला आहे. निसर्ग व्यवहाराशी एकरूप होऊन केलेली ही काव्यरचना.

'श्रावणमास', 'फुलराणी', 'औदुंबर', 'अरुण', 'बालविहग' इ. निसर्ग कविता अजरामर ठराव्यात. 'रागोबा आला',' चिवचिव चिमणाताई' या बालगीत रचनेबरोबर 'पारवा', 'खेड्यातील रात्र', 'उदासीन' इ. उदास-नैराश्य वृत्तीच्या कविताही या संग्रहात समाविष्ट आहेत.

या संग्रहाच्या ७व्या भागात परिशिष्टे जोडली असून समग्र बालकवींच्या अभ्यासास उपयुक्त असे हे पुस्तक आहे.

भरतेश्वर पाटील

**बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांचे जीवनवृत्त व लेखसंग्रह, संशोधक व संपादक : गणेश गंगाधर जांभेकर, प्रकाशक : गणेश गंगाधर जांभेकर, लोकशिक्षण कार्यालय, १९९/५, सदाशिव पेठ, पुणे २. आवृत्ती १९५०.** मराठी वृत्तपत्राचे जनक, 'दर्पण'कार बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांच्या व्यक्तित्वाचा आणि कर्तृत्वाचा सर्वांगीण परिचय करून देणाऱ्या, शताब्दी-स्मारक रूपात चार खंडात प्रसिद्ध झालेला आणि जुन्या मुंबई राज्याचे मुख्यमंत्री ना. श्री. बाळ गंगाधर खेर यांचे प्रोत्साहन लाभलेला मराठीतील एक महत्त्वाचा ग्रंथ.

आधुनिक महाराष्ट्राचे जनक म्हणून संबोधलेले जांभेकर अतुल गणिती व निष्णात ज्योतिषी होते. त्यांना प्राच्य व पाश्चात्त्य अशा बारा भाषा अवगत होत्या. व्याकरण, भूगोल, इतिहास, गणित इ. विषयांवर त्यांनी ग्रंथरचना केली. तसेच पाठभेदयुक्त ज्ञानेश्वरी यांनी प्रथम प्रकाशित केली. मराठी गद्याला योग्य वळण लावणारे ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध पावलेले जांभेकर पुराणेतिहास संशोधकही होते. तसेच स्त्री शिक्षण, बालविधवांचे पुर्नविवाह यांसारख्या सामाजिक कार्यात त्यांनी धैर्यशील समाजसुधारकाची भूमिका बजावली.

या ग्रंथामध्ये त्यांच्या जीवनकार्याच्या पटाबरोबरच मराठी व इंग्रजी भाषांतील उपलब्ध मुद्रित मूळ साहित्य, जांभेकरांची लहान-मोठी पुस्तके, इतिवृत्ते, नीलपीठे, कॅलेंडरे, कॅटलॉग आदी नानाविध संदर्भ साहित्याची सामग्री आढळते. ग्रंथाचे चार खंड योजले असून खंड-१मध्ये उपोद्‌घात (चरित्र साहित्याचो अवलोकन) खंड-२मध्ये इंग्रजी व मराठी निवडक लेख. खंड-३मध्ये चरित्र साहित्य (सटीक) तर खंड-४मध्ये चरित्र व काळ अशी [illegible] केलेली आहे.

बाळशास्त्री जांभेकरांच्या मराठी व इंग्रजी हस्ताक्षरांचे नमूने छायाचित्रात छापले असून ते आश्चर्य वाटावे इतके सुबक, एकटाकी व कोरीव आहेत. 'दर्पण'च्या पहिल्या अंकाचे मुखपृष्ठ ही समाविष्ट केलेले आहे.

एकंदर, 'पेशवाईनंतर पहिल्या तीस वर्षांचा महाराष्ट्राचा इतिहास बराचसा काल्पनिक व तर्कप्रधान बनला होता. तो खऱ्या मार्गावर आणून ठेवण्याचे कार्य या ग्रंथाद्वारे साधले आहे'. हा त्र्यं. शं. शेजवलकरांचा या ग्रंथाविषयीचा अभिप्राय ग्रंथ पाहता यथायोग्य वाटतो.

मोहन पाटील

**बेबंदशाही : औंधकर, वि. ह. प्रकाशक : गणेश कृष्ण बोडस, पुणे, पहिली आवृत्ती १९२४.** औंधकराचे हे पहिले नाटक. संभाजीच्या दुर्दैवी जीवनावरील हे नाटक असल्याने संभाजीच्या असाधारण आयुष्यक्रमावर आधारलेल्या कथानकावर एखादे परिणाम-कारक नाटक पाहण्याची सर्वसाधारण रसिकांची अतृप्त राहिलेली उत्कंठा 'बेबंदशाही' ने पूर्ण केली. गडकऱ्यांच्या नाटकातील काल्पनिक पात्रांच्या ठिकाणी ऐतिहासिक पात्रेच घेऊन संभवनीय वाटतील अशा प्रसंगाची योजना या नाटकात औंधकरांनी केलेली आहे. मात्र संभाजीच्या उद्दात व्यक्तिमत्वाचे दर्शन घडविण्यात या नाटकाला म्हणावे तितके यश आलेले दिसत नाही.

या नाटकाचे वैशिष्ट्य असे की, ऐतिहासिक काळाचे मर्म ओळखून तदनुसार कथानकाची रचना करण्याचे चातुर्य, अनुकूल असे वेचक उठावदार प्रसंग योजून ते सफाईदार रितीने

रंगविण्याची हातोटी, निकराचे संवाद मोजक्या शब्दांनी जोरदार भाषेत घालण्याचे कसब इ. गोष्टी नाट्यकृती म्हणून लक्षात भरत असल्या तरी संभाजीची विषयासक्ती रंगविण्याची नाटककाराची धडपड नापसंतीचा सूर उमटविणारी वाटते.

या नाटकाला त्र्यंबक सीताराम कारखानीस यांची प्रस्तावना आहे.

यशवंत चव्हाण

**ब्राह्मणकन्या : केतकर, श्रीधर व्यंकटेश. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती १९३०, पुनर्मुद्रण १९७६.** केतकरांची ही एक सामाजिक कादंबरी. कादंबरीच्या वाचकांना प्रारंभीच लेखकाने ही कादंबरी पुन: पुन्हा वाचण्याचे आवाहन केले असून पुन:पुन्हा वाचण्याने लेखकाचे रहस्य अधिकाधिक कळत जाईल असे ते म्हणतात.

ब्राह्मणकन्येचा विषय पुण्यातील तत्कालीन सत्य घटनेवरून घेतला असला तरी त्याला कल्पनेची डूब दिलेली दिसते. अशिष्ट मानल्या जाणाऱ्या स्त्री-पुरुष संबंधाला केंद्रस्थानी ठेवून ही कादंबरी लिहिली आहे. ' कालिंदी ' ही एक सुशिक्षित तरुणी, ती एका अविवाहित स्त्रीची नात. तिचा पिता ब्राह्मण भित्रा, बुझरा सुधारक आहे. तो व्यवसायाने वकील आहे. त्याचा पक्षकार शिवशरण याच्या बरोबर कालिंदी पळून जाते व त्याची रखेली म्हणून राहते. त्याच्यापासून तिला मुलगाही होतो. त्यानंतर शिवशरण तिला सोडून देतो. निराश्रित झालेल्या कालिंदीला तिची मैत्रीण आश्रय देते. पुढे मुंबईत नोकरी करत असताना तिचा रामराव नावाच्या मजूर पुढाऱ्याशी विवाह होतो. हे या कादंबरीचे कथानक.

कादंबरीतील घटनाचक्रातून सामाजिक प्रश्न मांडण्याचा प्रयत्न कादंबरीकार करतात. जातिसंस्था, कुटुंबसंस्था, जातिसंस्कार, सामाजिक प्रतिष्ठा वगैरे अंतर्भूत प्रश्नांची गुंतागुंत, भावी समाजरचना, स्त्री पुरुषसंबंध, लग्नाशिवाय स्त्रीस प्रजोत्पादनाचा हक्क इ. विषय या कादंबरीत कथानकाच्या अनुषंगाने मांडले आहेत. व्यक्तिनिष्ठ कल्पनांना गौणत्व देऊन समाजनिष्ठ विचार व भावनांची गर्दी करणाऱ्या या कादंबरीची भाषाशैली विचारवाहक आहे.

ही कादंबरी प्रथम 'विद्यासेवक' या मासिकातून १९२७ साली क्रमशः प्रकाशित झाली. नंतर १९३० मध्ये भारतगौरवमाले तर्फे ती पुस्तकरूपाने प्रकाशित झाली. तिच्यामध्ये एकूण ४४ प्रकरणे असून पृष्ठसंख्या ३२६ इतकी आहे. 'वैजनाथस्मृती' या प्रकरणात भावी समाज रचनेचे विचार विस्ताराने मांडले असून आदर्श समाज रचनेच्या स्वप्नांना आवाहन करणारी ही केतकरांची कृती आहे.

यशवंत चव्हाण

**भक्तिमार्गप्रदीप : संपादक : पांगारकर, लक्ष्मण रामचंद्र, प्रकाशक : केशव भिकाजी ढवळे, मुंबई, १९०४.** 'भक्तिमार्गप्रदीप' हे ल. रा. पांगारकर यांनी संपादित केलेले संतांच्या काव्यातील वेच्यांचे संपादन आहे. महाराष्ट्रातील ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदास ह्या संतांनी आणि त्यांच्याप्रमाणे इतर संतांनी कर्मयोग आणि ज्ञानयोग यांची सांगड घालून भक्तिमार्गाचा महाराष्ट्रभर प्रसार केला. त्याला अनुलक्षून 'भक्तिमार्गप्रदीप'च्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत पांगारकर म्हणतात, "प्रस्तुत काळी धर्मजागृतीची स्पष्ट चिन्हे दृगोचर होत आहेत. सर्व प्रकारच्या आपत्तीतून तारणारा एक धर्मच आहे. आचार, विचार आणि श्रद्धा या तिघांची संगती कायम ठेविली तरच धर्मोत्कर्ष होतो. विधिवशात प्राप्त झालेल्या स्थितीत निरंतर ईश्वरध्यान व नामस्मरण करीत राहिल्यास चित्तशुद्धी होते व प्राणी ईश्वरी प्रसादाला पात्र होतो. ईश्वरी प्रसादाशिवाय जन्म निष्फळ होय. ह्या सर्वाला परमसहाय्यभूत होणारी संतांची वचने आहेत. 'काहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासे आदरें करोनियां' असे तुकोबाराय सांगतात. मराठी कवितेतला बराचसा उत्कृष्ट भाग प्रस्तुत वेच्यांत आला आहे." संपादकांनी पुस्तकाची विभागणी प्रात:स्मरण, ईश्वरप्रार्थना, सद्‌गुरू स्तवन, संत माहात्म्य, नामसंकीर्तन, परमार्थ विचार व अमृतबिंदू अशा सात गटांत केली आहे. ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध वगैरे मोठेमोठे ग्रंथ नित्य वाचनात ठेवून प्रभातकाळी किंवा रात्री शुचिर्भूत होऊन देवासमोर बसून शुद्ध भावाने या पुस्तकातले वेचे म्हणावेत तसेच संतांचे एकवचन वचन म्हणजे एक मूक व्याख्यान असते म्हणून मुलांसह या पुस्तकातील वेच्यांचे पठण करावे, असा सल्ला प्रापंचिकांना पांगारकरांनी दिला आहे. 'भक्तिमार्गप्रदीप' या पुस्तकात भूपाळ्या, आरत्या, हरिपाठाचे अभंग, रामरक्षा, करुणाष्टके, संतांची ईश्वर स्तुतीपर कवने, मनाचे श्लोक, चर्पटपंजरिका, द्वादश पंजारिका व पांडवगीतेमधील निवडक श्लोक इत्यादींचा समावेश आहे. शेवटच्या 'अमृतबिंदू' या प्रकरणात संतवाणीतील मननीय अशा विचारसूत्रांचा समावेश केला आहे. 'भक्तिमार्गप्रदीप'च्या धर्तीवर अनेक पुस्तके नंतर प्रकाशित झाली पण प्रारंभीच्या एकवीस वर्षांत केवळ महाराष्ट्रातच नव्हे तर मद्रास, रंगून, क्वेट्टा आणि आफ्रिकेतील लाखो भाविकांपर्यंत ल. रा. पांगारकरांनी संपादित केलेला हा संग्रह पोचला. "या पुस्तकामुळे धर्मशिक्षणाच्या कामाला मोठीच मदत झाली आहे"या शब्दांत 'विविधज्ञानविस्तार' या अग्रगण्य मासिकाने 'भक्ति-मार्गप्रदीप' या संपादनाचा गौरव केला आहे.

**वि. शं. चौघुले**

**भंगलेले देऊळ: माडखोलकर, गजानन त्र्यंबक. प्रकाशक : मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई-४, पहिली आवृत्ती १९३४, सहावी आवृत्ती १९७१.** माडखोलकरांची ही सामाजिक कादंबरी, कादंबरीच्या प्रारंभी माडखोलकरांची साहित्यसूची दिली असून या कादंबरीला डॉ. वि. भ. कोलते यांची दीर्घ प्रस्तावना आहे.

या 'पात्रमुखी' कादंबरीला खुद्द लेखकाने 'एका मानिनीची आत्मकथा' असे म्हटले आहे. अनसूया भागवत ही ती मानिनी असून तिने आपल्या विवाहपूर्व आणि विवाहोत्तर चरित्राची आणि चारित्र्याची कहाणी स्वतःच निवेदन केलेली आहे. अरू, दिनू, मनू या संवगड्यांबरोबर तिने घालविलेले बालपण, यावेळी अरुण विषयीची तिच्या मनात निर्माण झालेली आसक्ती, तिचे अरुणवरील वासनायुक्त प्रेम तर त्याचे अनुवरील तथाकथित वासनारहित प्रेम, तिचा झालेला प्रेमभंग, नंतर कालिंदीच्या मध्यस्थीने तिचा अनिरुद्धशी झालेला परिचय- प्रेम- नंतर विवाह, विवाहानंतर अनुभवलेले सुखोपभोग, मग अनुची सुरू झालेली बाळंतपणे, त्यामुळे ओसरू लागलेले तिचे यौवन व म्हणून पांगलेली अनिरुद्धची भोगासक्त मनोवृत्ती उपकारबुद्धीने म्हणून अनुनेच घरात आणून ठेवलेल्या विधवा पण सुंदर व तरुण मनूच्या मनावर अनिरुद्धाच्या भोगासक्तीने मिळवलेला विजय, त्यांचे चालू झालेले विलास आणि त्यामुळे मानिनी अनसूयेवर ओढावलेला घराबाहेर पडण्याचा प्रसंग हे या कहाणीतील काही महत्त्वाचे दुवे.

"विवाह संस्थेचे हे 'देऊळ' भंगलेले असेल, भ्रष्ट झालेले असेल तर तुमच्या कल्पनेप्रमाणे त्याचा जीर्णोद्धार करा, पण ते अजिबात पाडून टाकून मानवजातीच्या हाती स्वैराचाराची सनद मात्र देऊ नका" असा संदेश सांगणारी माडखोलकरांची आटोपशीर व बांधेसूद कादंबरी.

यशवंत चव्हाण

**भाऊसाहेबांची बखर : संपादक : पठाण, यू. म. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे नवी संपादिक आवृत्ती १९७५.** या बखरीचा लेखक 'कृष्णाजी शामराव असावा असे श्री. का. ना. साने यांना वाटते. तर तो चिंतामणी गोविंद असावा असे श्री. श. ना. जोशी यांनी संपादिलेल्या प्रतीवरून दिसते,' अशी नोंद यू. म. पठाण करतात.

पानिपतच्या रणसंग्रामाची हकिकत देणारी ही एक उत्कृष्ट बखर होय. भाऊसाहेबांची बखर वाङ्मयगुणांनी अतिशय परिणामकारक अशी आहे.

बखरीचा मुख्य विषय पानिपतचे युद्ध, मराठेशाहीच्या इतिहासातील रोमहर्षक प्रसंग, युद्ध वर्णनामध्ये बखरीचा मोठा भाग व्यापलेला असून- पानिपत युद्धपूर्व मराठ्यांनी उत्तरेत केलेल्या राजकारणाचे चित्रणही यात आहे. या बखरीमध्ये अनेक घडामोडींचा सूक्ष्मपणे आढावा बखरकार घेतो. पानिपत रणसंग्रामानंतर नजीकच्या काळात लिहिली गेल्याने 'समकालीन बखर' म्हणून महत्त्व.

युद्ध वर्णन करणारी ही बखर रोमहर्षक पद्धतीने लिखाण-बद्ध केल्याने- ती आकर्षक झाली आहे. कुंभेरीच्या वेढ्याची हकिकत, जयाप्पाचा खून, मल्हार होळकरांची मुत्सद्देगिरी, नजीबखानचे कारस्थान, 'बचेंगे तो और भी लढेंगे' हे दत्ताजीचे उद्‌गार यांसारख्या घटना प्रसंगाने बखरीचे स्वरूप विलोभनीय व्यक्ती, वस्तू आणि घटना वर्णन अतिशय नेमक्यापणाने केल्यामुळे बखरीला रेखीवपणा प्राप्त झाला आहे. प्रस्तुत बखरीची एक स्वतंत्र पण रसरसलेली भाषा शैली अंगभूतच असल्यामुळे सौंदर्य वाढले आहे.

अर्थपूर्ण वाक्ये, नाट्यात्मकता, सुभाषितांची पखरण, आकर्षक उपमा-दृष्टान्तादी अलंकार इ. मुळे बखरीची भाषा प्रासादिक. 'भाऊसाहेबाची बखर' ही प्राचीन मराठी बखर वाङ्मयातील वाङ्मयगुण संपन्न अशी बखर, स्वभावदर्शन, वर्णन कौशल्य, रसाविष्काराच्या दृष्टीने ही सरस.

भरतेश्वर पाटील

**भागवत टीका : बहिरा जातवेद.** श्रीमद्‌भागवताच्या दशम-स्कंधावर पहिली मराठी टीका लिहिणारा बहिरा पिसा अथवा बहिरा जातवेद (१४वे शतक) हा नाव आणि चरित्र व काल यांच्या दृष्टीने आजही वादाचा विषय होऊन राहिला आहे. महाराष्ट्र सारस्वतकार भावे, द. वा. पोतदार, श्री. मा. कुलकर्णी, डॉ. कोप्पळ, डॉ. रा. चिं. ढेरे, डॉ. मोरजे इ. संशोधकांनी या कवीविषयी लेखन केले आहे. 'बहिरवी' अथवा 'भैरवी' ही त्याने रचलेली भागवताच्या दशमस्कंधावरील टीका अद्याप अप्रकाशित असून या ग्रंथाची ओवीसंख्या सुमारे २५०० असावी. हा कवी एकनाथपूर्वकालीन असून संभवतः नामदेवांचा समकालीन असावा. १४वे शतक हा स्थूलमानाने या कवीचा काळ गृहीत धरण्यास हरकत नसावी.

'बहिरवी' अथवा 'भैरवी' टीका अद्याप अप्रकाशित असल्याने संशोधकांनी दिलेल्या काही उतार्‍यांच्या आधारानेच या कवीच्या कवित्वासंबंधी अंदाज बांधणे शक्य आहे. कवीने मूळ श्लोकावर आवश्यक तेवढे भाष्य केलेले नसून कथाभागात स्वतःच्या प्रतिभेच्या योगाने भर घालून विस्तार केला आहे. रुक्मिणीस्वयंवराचा त्याने अडीच हजार ओव्यांचा विस्तार केला आहे. तथापि, 'श्लोकी' नाही या विस्ताराने असेही नमूद करण्यास तो विसरत नाही. हा विस्तार कंटाळवाणा नसून श्रेष्ठ प्रतीच्या कवित्वशक्तीची साक्ष देणारा आहे, 'गुरू आणि वाग्देवी' यांचा प्रसाद लाभल्याने 'आज्ञापिलो श्रीकृष्णाना : जेणे रसाळ बोलविले :' हे कवीचे उद्‌गार केवळ आत्मप्रौढी निदर्शक वाटत नसून वास्तवाचे निदर्शक आहेत. उपलब्ध उतार्‍यांवरून या कवीला शृंगार रसाचा परिपोष उत्तम रितीने साधला आहे हे लक्षात येते.

भागवताच्या दशमस्कंधावरील पहिली मराठी टीका या दृष्टीने मराठी वाङ्मयात 'भैरवी' टीकेचे महत्त्व आहेच. त्याबरोबरच एकनाथपूर्वकालातील एक रससिद्ध कवी या दृष्टीदेखील 'बहिरा पिसाचा', 'बहिरा जातवेद' यांस मराठी आख्यानकवीत महत्त्वाचे स्थान दिले पाहिजे.

**भागवत दशमस्कंध टीका : बीडकर, एकनाथ.** श्री. अ. का. प्रियोळकरांना बीडच्या पाटांगण देवस्थानात भागवत दशम स्कंधावरील एक टीका पाहावयास मिळाली होती. "प्रस्तुत एकनाथाच्या नावावरील दशमस्कंधाच्या बाबतीत वाङ्मयपारभृत्याचे कपट कल्पिण्यापेक्षा पुढील एखाद्या एकनाथाने जनार्दन हा आपला गुरू मानून जुन्या एकनाथाने जे कार्य केले नाही, ते दशमस्कंधाच्या रचनेचे कार्य सुरू केले असे मानणे योग्य वाटते." असे त्यांनी अनुमानिले होते. (म. सं. प. जाने. ६१) आता ही रचना जनीजनार्दन शिष्य एकनाथ बीडकराची (अंदाजे इ. स. १५७८ ते १६४८) आहे हे मान्य झाले आहे. या टीकेचे ३७ अध्याय असून ओवीसंख्या ३३९७ आहे. या ग्रंथांतीच्या ओवीवरून ग्रंथकर्त्यांच्या दृष्टीने ही टीका अपूर्ण आहे असे म्हणावे लागेल.

**भारतवर्षीय चरित्रकोश (खंड १ ते ३) : संपादक : सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, प्रकाशक : भारतीय चरित्रकोश मंडळ, पुणे १९३२ ते ४६.** 'भारतवर्षीय चरित्रकोश' हा सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनी तयार केला आहे. याचे प्राचीन, अर्वाचीन आणि मध्ययुगीन असे ३ खंड असून ते अनुक्रमे १९३२, १९३७ व १९४६ या वर्षी प्रसिद्ध झाले. तीन खंडांची मिळून २,९०० पृष्ठे असून १९,००० हून अधिक व्यक्तींची चरित्रे आकारविल्हेने आली आहेत. या चरित्रात भारतातील सर्व भागातील, सर्व संस्थानातील, सर्व क्षेत्रातील प्रमुख व्यक्तींची चरित्रे आली आहेत. विदेशी पंडितांचीदेखील चरित्रे घेतली आहेत. या खंडाचे परिवर्धित, नवे संस्करण दोन भागात, चौदाशे पृष्ठांत प्रकाशित करण्याचा संकल्प असून त्यातील एक भाग १९६८मध्ये प्रकाशित झाला. तसेच या खंडाचे परिवर्धित हिंदी संस्करण, बाराशे पृष्ठांचे १९६४मध्ये प्रकाशित झाले आहे.

'मध्ययुगीन चरित्रकोशात' मौर्य चंद्रगुप्तापासून शेवटच्या बाजीरावापर्यंतच्या काळातील (इ. स. पूर्व ३२१ ते इ. स. १८१८) व्यक्तींची चरित्रे आहेत.

'अर्वाचीन चरित्रकोशात' इ. स. १८१८ पासून १९४५ पर्यंतच्या काळातील व्यक्तींची चरित्रे आली आहेत. कोणत्याही क्षेत्रात विशेषत्वाने चमकलेल्या निवडक व्यक्तींची चरित्रे या कोशात दिली आहेत. कोशाचे स्वरूप भारतवर्षीय असले, तरी महाराष्ट्रातील व्यक्तींची चरित्रे इतर प्रांतातील व्यक्तींच्या चरित्रापेक्षा अधिक आहेत.

**भारतीय मानसशास्त्र अथवा सार्थ व सविवरण पातंजल योगदर्शन : कोल्हटकर, कृष्णाजी केशव. प्रकाशक : केशव भिकाजी ढवळे, मुंबई ४०० ००४, प्र. आ. १९५१.** 'योगदर्शन महर्षिवेदव्यास' या सन्मानित ग्रंथाचे कर्ते कृष्णाजी केशव कोल्हटकर यांचा, मानसशास्त्रातील काही प्रश्नांचा अभ्यास करून त्या दृष्टिकोनातून योग सिद्धान्ताचा विस्तृतपणे ऊहापोह करणारा तौलनिक स्वरूपाचा ग्रंथ.

या ग्रंथामध्ये लेखकांनी योगसूत्रांचे अत्यंत सोपे व विस्तृत विवरण करून त्यातील कठीण आशयाचे सुलभीकरण करून योगमार्गाला राजमार्गाचे स्वरूप प्राप्त करून देण्याचा प्रयत्न केलेला असून, वेदान्ताने सांगितलेला 'ब्रह्ममयजगत्' सिद्धांत व योगाने सांगितलेली निर्विकल्प समाधीची पूर्णावस्था या दोन्ही गोष्टी एकरूप कशा आहेत हे सत्य अनेक प्रमाणे देऊन स्पष्ट केले आहे.

योगशास्त्राबद्दलच्या माणसांच्या अनेक भ्रामक कल्पनांचा निरास करून अखेरीस मनःस्वास्थ्य, आरोग्य आणि आत्मसाक्षात्कार या त्रिवेणीचा एकसूत्री विचार मांडणारा, मानसशास्त्र व योगशास्त्रदर्शन यांचा तौलनिक अभ्यास मांडणारा महत्त्वाचा ग्रंथ.

**मोहन पाटील**

**भारतीय लोकसत्ता : सहस्रबुद्धे, पु. ग. प्रकाशक : मेसर्स लोखंडे आणि जोशी, पुणे, १९५४.** २६ जानेवारी १९५० रोजी भारतात सार्वभौम लोकसत्ताक शासनाची स्थापना करून भारतीयांनी एका नव्या युगात पदार्पण केले. जुने युग अंधश्रद्धा, शब्द प्रामाण्य, विषमता व पारतंत्र्याचे होते. नवे युग व्यक्तित्वाला प्राधान्य देणारे, बुद्धिप्रामाण्य, समता व मानवी स्वातंत्र्याचा पुरस्कार करणारे आहे. जुन्या युगापासून नव्या युगापर्यंतचा बौद्धिक, मानसिक व स्वातंत्र्याचा प्रवास हा महाराष्ट्रातील मराठीचे एक नामवंत प्राध्यापक आणि ज्येष्ठ व्यासंगी विचारवंत पु. ग. सहस्रबुद्धे यांच्या अभ्यास आणि मनन चिंतनाचा हा विषय आहे. आपल्या दीर्घकाल चाललेल्या अभ्यासातून 'भारतीय लोकसत्ता' हा वैचारिक ग्रंथ पु. ग. सहस्रबुद्धे यांनी सिद्ध केला आहे. अनियंत्रित राज्यसत्तेपासून लोकसत्तेच्या किंवा लोकशाहीच्या युगात येण्यासाठी समाजाच्या धार्मिक, सामाजिक, राजकीय व आर्थिक जीवनात आमूलाग्र परिवर्तन घडावे लागते, अशी लेखकाची मनोधारणा आहे. 'मानवाची प्रतिष्ठा, व्यक्तित्व, बुद्धिप्रामाण्य, सामाजिक व आर्थिक समता या लोकशाहीच्या मूलभूत तत्त्वाचे स्वतंत्रपणे विवेचन करण्यापेक्षा लोकसत्तेच्या प्रस्थापनेसाठी प्रयत्नशील असलेल्या राजा राममोहन रॉय यांच्यापासून पंडित जवाहरलाल नेहरूपर्यंतच्या भारतभूमीतील ज्या ज्या थोर पुरुषांनी प्रयत्न केले त्यांचे ऐतिहासिक भूमिकेतून विश्लेषण विवेचन करणे, हा प्रस्तुत ग्रंथाचा हेतू आहे. भारतातील लोकशाहीचा इतिहास म्हणजे गेल्या शंभर दीडशे वर्षांचा इतिहास आहे. त्या इतिहासाचा परामर्श घेण्यासाठी लेखकाने आपल्या प्रतिपादनाची पंधरा प्रकरणांत विभागणी केली आहे. भारतात प्राचीन काळी लोकसत्ताक राज्यपद्धती होती किंवा नाही, याची चर्चा लेखकाने पहिल्या प्रकरणात केली आहे. गेल्या शतकापासून भारतात झालेल्या सांस्कृतिक प्रवासाचा आढावा दुसऱ्या प्रकरणापासून घेण्यात आला आहे. मानवत्वाची प्रतिष्ठा, समतेचा महामंत्र व भौतिक अधिष्ठान या तीन प्रकरणांत, धर्मसत्ता यांच्याशी

राममोहन रॉय, न्या. रानडे, महात्मा जोतिबा फुले, गोपाळ गणेश आगरकर या धुरिणांनी कसा लढा केला व कोणती नवी तत्त्वे प्रसृत केली याचे विवेचन आहे. त्यानंतरच्या दोन प्रकरणांत लोकमान्य टीळक, महात्मा गांधी व नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या प्रतिकार शक्तीचे विवरण लेखकाने केले आहे. गांधी-वादातील अर्थव्यवस्थेची तत्त्वे, जवाहरलाल नेहरूंचे समाजवादी अर्थशास्त्र आणि गांधीजींचे ग्रामप्रधान अर्थशास्त्र यांची तुलना हे पुढील प्रकरणांतील प्रतिपाद्य विषय आहे, त्यानंतर लेखकाने मार्क्सवाद, समाजवाद व साम्यवाद यांचे भारतीय लोकशाहीच्या संदर्भात मूल्यमापन केले आहे. शेवटच्या सात प्रकरणांत, स्वातंत्र्य प्राप्तीनंतरच्या काळातील नव्या लोकशाहीच्या प्रगतीची वाटचाल कशी झाली याचे सोदाहरण विवेचन लेखकाने केले आहे. याशिवाय, भारताचे लोकसत्ताक किंवा लोकशाही शासन संपन्न, समर्थ आणि खऱ्या अर्थी सामर्थ्यशाली होण्यासाठी आपल्या जीवनाची सर्वांगीण पुनर्घटना होणे आवश्यक आहे ती पुनर्घटना कोणत्या तत्त्वांवर व्हावी आणि त्यासाठी शासनाने कोणते प्रयत्न केले आहेत याचा साधक-बाधक परामर्श लेखकाने घेतला आहे. लोकसत्ताक राज्यपद्धतीचे प्रयत्न भारतात कितपत यशस्वी झाले आहेत याची मीमांसा वस्तुनिष्ठ भूमिकेतून सहस्रबुद्धे यांनी केली आहे. मुळात 'वसंत' मासिकात मार्च, १९४५ ते मार्च, १९५३ या आठ वर्षांच्या कालावधीत 'लोकसत्ता' ह्या विषयाचे विवेचन लेखकाने क्रमशः केले होते. प्रस्तुत ग्रंथ सिद्ध करताना लेखकाने मूळ लेखनावर पुन्हा संस्करण केले, त्यात काही फेरबदल केले आहेत. काही माहिती नव्याने समाविष्ट केली आहे. वर्तमानपत्रे, मासिके, मराठी, इंग्रजी, संस्कृत ग्रंथ आणि थोर पुरुषांची समर्पक अवतरणे यांचा त्यासाठी आधार घेतला आहे. सन व आकडेवारी देताना चूक होऊ नये, यासाठी पुरेशी दक्षता घेतली आहे. आपले विवेचन वादग्रस्त विषयावर असल्यामुळे ग्रंथाचे मूल्यमापन करताना वैयक्तिक, पक्षीय, जातीय आणि धार्मिक अभियान आड येण्याची शक्यता लेखकाने व्यक्त केली आहे. मात्र आपले विवेचन पूर्वग्रह, अभिनिवेशापासून दूर ठेवून ते पूर्णतः वस्तुनिष्टपणे केल्याची ग्वाही त्याने दिली आहे. लोकायत्त शासनावर खरी श्रद्धा असलेली ब्रिटन व अमेरिका ही दोनच राष्ट्रे सध्या अस्तित्वात आहेत. त्यात भारतासारख्या एका महान राष्ट्राची भर पडली आहे. कालपुरुषाने भारताला लोकसत्ताक राज्यपद्धती यशस्वी करण्याची संधी दिली आहे. भारतीय तरुणांमध्ये लोकसत्ता दृढ करण्यासाठी तनमनधन अर्पण करण्याची इच्छा निर्माण होवो, असा आशावाद आपल्या गंभीर वैचारिक ग्रंथाच्या शेवटी पु. ग. सहस्रबुद्धे यांनी व्यक्त केला आहे. अभ्यासपूर्ण, वस्तुनिष्ठ, तार्किक विवेचन आणि लोकसत्ताक राज्यपद्धतीच्या स्वीकाराबद्दल वाटणारी कळकळ यांमुळे पु. ग. सहस्रबुद्धे यांचा ' भारतीय लोकसत्ता ' हा एक महत्त्वाचा ग्रंथ ठरतो.

वि. शं. चौधुले

**भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास : राजवाडे, वि. का. (प्रथम प्रसिद्धी, संशोधक पत्रिका, १९४८, सर्व लेख एकत्रित पुस्तकरूपात प्रसिद्ध ३१ डिसेंबर १९७६.) प्रकाशक : प्रागतिक पुस्तक प्रकाशन, पुणे.** उभा महाराष्ट्र पायाखाली घालून, असंख्य ऐतिहासिक कागदपत्रांचे सूक्ष्म दृष्टीने वाचन करून, ऐतिहासिक स्थळांना प्रत्यक्ष भेटी देऊन देश व कालमान यांचा तारतम्याने विचार करून, 'मराठ्यांच्या इतिहासाची साधनें' २२ खंडात प्रसिद्ध करणारे वि. का. राजवाडे विसाव्या शतकाच्या उंबरठ्यावरील एक वादळी व्यक्तिमत्त्व होते. 'भाषांतर मासिक', 'ज्ञानेश्वरीतील मराठी व्याकरण', तसेच 'राधा माधव विलासचंपू' व 'महिकावतीची बखर' ही दोन संपादने त्यांच्या नावे नोंद आहेत. आर्यपूर्व व आर्योत्तर संस्कृतीचा समग्र चिकित्सिक इतिहास लिहिण्याची राजवाड्यांची मनिषा होती. ती अपुरी राहिली. त्याचे स्फुल्लिंग ' भारतीय विवाह संस्थेचा इतिहास ' या इतिहास शास्त्रीय व समाजशास्त्रीय संशोधनपर लेखसंग्रहात प्रकर्षाने दिसून येते.

या ग्रंथात ' स्त्री-पुरुष समागमंक सबंधक कित्येक अतिप्राचीन आर्य चाली ', ' स्त्रियांचे वंश प्रवर्तकत्व व प्रजापिता संस्था ', ' अग्नी व यज्ञ ', ' आर्थत्याची एक आर्ष चाल ', असे चार अभ्यासपूर्ण निबंध असून ' विकार-विचार प्रदर्शनाच्या साधनांची उत्क्रांती ' हा भाषाशास्त्रीय व पुरातत्त्व अभ्यासाच्या आधारे चिकित्सा मांडणारा महत्त्वपूर्ण निबंध ग्रंथात शेवटी जोडला आहे. ग्रंथामध्ये इतिहासाचार्यांनी अभ्यासाची पूर्वतयारी म्हणून काढलेली टिपणे जशीच्या तशी दिलेली आहेत.

या निबंधाच्या लेखन प्रपंचाकरिता व्यासकृत महाभारत व हरिवंश या आद्यग्रंथाचा आधार घेतला असून इतिहासशास्त्र, समाजशास्त्र, भाषाशास्त्र, पुरातत्त्वशास्त्र यांच्या साधार पुराव्यानिशी लेखकांनी आपली मते नोंदवून निष्कर्ष काढले आहेत. अतिशय प्रौढ संस्कारक्षम भाषा, गाढ वैचारिकता आणि शास्त्रशुद्ध रोखठोक विश्लेषण हे या संग्रहाचे वैशिष्ट्य असून विविध अभ्यासशाखांच्या संशोधनास सहाय्यभूत ठरावा असा महत्त्वपूर्ण ग्रंथ.

मोहन पाटील

**भारतीय संस्कृती : पं. सातवळेकर, श्री. दा., प्रकाशक : वसंत श्री. सातवळेकर, स्वाध्याय मंडळ, पारडी, १९५२.** भारतीय संस्कृती म्हणजे वैदिक संस्कृती हे अत्यंत ठामपणे मांडून बुद्ध संस्कृतीचे खंडन करणारा विवेचक ग्रंथ. ह्या ग्रंथातील ५० लेख्यांमध्ये काही वैदिक व बुद्ध मंतव्ये दिली असून काही कथा कशा-कशा बदलत गेल्या हे दिले आहे. तसेच विभिन्न संस्कृतीच्या संकराने आनंदवादी तत्त्वज्ञान, कलुषित, दूषित कसे झाले आहे हे दाखविले आहे. ह्या सर्व लेखांमधून वैदिक तत्त्वज्ञान हे सर्वप्रकारे बौद्ध तत्त्वज्ञानापेक्षा मौलिक व श्रेष्ठ कसे आहे, हे स्पष्ट केले आहे. वैदिक परमेश्वराचा आदर्श, विश्व हे परमेश्वराचे रूप, आशावादी वैदिक धर्म, विश्व व व्यक्ती, विश्व सेवेसाठी राज्य शासन, राजकारण, गुरुकुलीय शिक्षणाचे

स्वातंत्र्य इ. विषयाच्या आधारे भक्ती ही वैदिक काळात उद्योगप्रधान होती व मुक्तीची उदात्तता बुद्धानंतर कशी बदलली हे मांडले आहे. धर्माची सर्वव्यापक कल्पना व मानवी जीवन कसे त्यात सामावले आहे, हे एका लेखात अत्यंत योग्य प्रकारे सिद्ध केले आहे. ह्या पन्नास लेखांत काही कथा आहेत, तर काही सिद्धान्त आहेत. शंकासमाधानाचे (प्रश्नोत्तर) रूपानेही शेवटी चर्चा केली आहे. भारतीय संस्कृतीच नव्हे तर भारतीयत्वाच्या अभ्यासकास अत्यंत उपयोग असा हा ग्रंथ आहे.

**भारतीय संस्कृती : साने गुरुजी. प्रकाशक : रत्नाकर अनंत कुलकर्णी, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयनगर, आंबील ओढा, पुणे ४११ ०३०, प्रथमावृत्ती १९३७, अठरावे पुनर्मुद्रण १९९९.** मराठीमध्ये वाचकप्रिय असलेल्या 'श्यामची आई' या कादंबरीचे लेखक सानेगुरुजींनी 'भारतीय संस्कृती' या वैचारिक ग्रंथाचे लेखन केले आहे.

या ग्रंथाच्या प्रस्तावनेमध्ये एका सामान्य माणसाने सामान्य जनांकरिता लिहिलेले हे पुस्तक आहे. असे ग्रंथकर्ते सानेगुरुजी विनम्रपणे नमूद करतात. त्यामुळे 'भारतीय संस्कृती' या शब्दातील अनाकलनीय जडत्व नष्ट होते. सामान्यांना समजेल अशा शब्दात ग्रंथरचना असल्यामुळे हा ग्रंथ लोकप्रिय झाला आहे.

अद्वैत, बुद्धी, ऋषी, वर्ण, कर्म, पुरुषार्थ, अहिंसा, मूर्तिपूजा इत्यादींसारख्या गहन विषयांवरील चिंतन या ग्रंथात साध्या-सोप्या व व्यवहारी भाषेत मांडल्यामुळे वाचकांना मूळ विषयाचे सुलभ आकलन होते.

विवेकपूर्ण विचार, धर्मनिरपेक्ष भूमिका, ज्ञान-विज्ञानाचा योग्य समन्वय इ. मूळे मानवतावादी दृष्टिकोन भारतीय संस्कृतीचा आहे, ही भूमिका सानेगुरुजी या ग्रंथाद्वारे वाचकांच्या मनावर ठसवतात.

या ग्रंथातील बऱ्याच विषयांवर आचार्य विनोबा यांच्या विचारांचा प्रभाव लेखक मान्य करतात. सरळ साधी-सोपी भाषाशैली, सुभाषिते, संस्कृत श्लोक, संत वचने, रामायण-महाभारतातील दाखले इ. मुळे हा ग्रंथ आकर्षक झाला असून तो वाचनीय ठरला आहे.

भरतेश्वर पाटील

**भारतीय साहित्यशास्त्र : देशपांडे, ग. त्र्यं. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९५८.** मुंबई मराठी साहित्य संघात १९५३ साली वामन मल्हार जोशी व्याख्यानमालेत दिलेल्या पाच व्याख्यानांवर संस्कार करून तयार केलेला भारतीय साहित्यशास्त्रावरील मराठीतील अत्यंत मौलिक ग्रंथ. वा. वि. मिराशींसारख्या श्रेष्ठ संस्कृत पंडिताची प्रस्तावना याला लाभली आहे.

ग्रंथाच्या पूर्वार्धात भरतपूर्व कालापासून जगन्नाथच्या काल-खंडापर्यंत म्हणजे १३व्या शतकापर्यंतच्या साहित्यशास्त्राचा नेटका आढावा घेतला असून दुसऱ्या भागात विविध साहित्य सिध्दान्ताचे सोदाहरण विवेचन केले आहे.

संस्कृत काव्यशास्त्राचा व्यवस्थित आढावा घेणारे मराठीतील सर्वांत महत्त्वाचे पुस्तक म्हणून या ग्रंथाला मान्यता मिळाली असल्याने त्याला बीजग्रंथाचे महत्त्व लाभले आहे.

**भावगंध : देशमुख, मा. गो. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, १९५५.** 'वाङ्मय समीक्षात्मक तत्त्वविचार' असे स्पष्टीकरण करणाऱ्या उपशीर्षक दिलेला प्रामुख्याने सैध्दांतिक समीक्षा लेखांचा संग्रह. तीन लेख व ग. त्र्यं. माडखोलकर यांची प्रस्तावना यांची दुसऱ्या आवृत्तीत भर. भारतीय साहित्यशास्त्रातील 'रस' ही संकल्पना आधुनिक साहित्याचे सौंदर्यग्रहण करण्यास कशी अपुरी पडते हे दाखवून भावगंध या निबंधात लेखकाने रसापेक्षा व्यापक अशी 'भावगंध' ही संकल्पना मांडलेली आहे. 'भावगंध' या संकल्पनेत इमोशन, फिलिंग, एक्स्प्रेशन या सर्वांचा समावेश केलेला असून या संकल्पनेच्या आधारे काव्यप्रतीतीचा आणि काव्याच्या आत्मनिष्ठ व वस्तुनिष्ठ अंगाचा व्यापकपणे विचार करता येतो अशी भूमिका मांडलेली आहे. 'भावगंध-चर्चा' या प्रकरणात 'भावगंध' सिद्धान्तावर घेतले गेलेले विविध आक्षेप व मतभेद नमूद करून त्यांचे खंडन व स्वमत समर्थन केलेले आहे.

अन्य १४ निबंधांतून साहित्यविषयक विविध प्रश्नांचा विचार करून स्वत:च्या काही लक्षणीय मतांचे प्रतिपादन केलेले आहे. अभ्यासू आणि रसिक दोघांनाही नवी दृष्टी व विचार देणारा लेखसंग्रह या दृष्टीने महत्त्व.

**भावतरंग : मायदेव, वा. गो. प्रकाशक : परचुरे प्रकाशन, मुंबई, १९३२.** वासुदेव गोविंद मायदेव यांच्या या कविता-संग्रहामधील कवितांत प्रसाद आणि ऋजुता हे प्रमुख गुण आढळतात. 'इज हवाग आय सी एस.' आणि 'कवीच्या पत्नीची तक्रार' या कविता मायदेवांच्या गायनशैलीमुळे खूप गाजल्या. त्यांची हिंदभूमीवरील कविता तत्कालीन तरुणांच्या वर्तुळात फार लोकप्रिय झाली होती. मायदेव यांचे नाव फुलामुलांचे कवी म्हणून विशेष प्रसिद्ध आहे.

**भावनिर्झर : मायदेव, वा. गो. प्रकाशक : मायदेव वासुदेव गोविंद, पुणे, पहिली आवृत्ती १९३८.** या काव्यसंग्रहात मायदेव यांच्या यापूर्वीच्या प्रकाशित झालेल्या संग्रहातील शिशुगीते व १९३८ पर्यंतच्या ८ ते ९ वर्षांतील अप्रकाशित स्फुट कविता संग्रहित केल्या असून 'सुवर्णपदकासाठी' व 'नाकानथिचे भांडण' दोन मोठ्या कविताही या संग्रहात समाविष्ट केल्या आहेत. एकूण ६६ कवितांचा हा काव्यसंग्रह. काव्यसंग्रहाच्या शेवटी टिपामध्ये काही कवितेच्या निर्मितीची पार्श्वभूमी सांगितली आहे. उदा. 'नाकानथिचे भांडण' ही कविता इंग्रजी कवी कौपर याने चष्म्यावरून नाक व डोळे यांचे झालेले भांडण एका कवितेत वर्णिले आहे. त्याच धर्तीवर ही कविता रचली आहे.

या संग्रहातील कवितेत अत्यंत साधेपणा असून त्या निरलंकृत अशा आहेत. मात्र त्यांची जी शिशुगीतातील अभिनयगीत आहेत ती मात्र सरस आहेत.

यशवंत चव्हाण

**भावबंधन : गडकरी, राम गणेश. प्रकाशक : रत्नप्रभा प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती १९१९, पुनर्मुद्रण १९८८.** नाटककार गडकऱ्यांचे हे पाच अंकी संगीत नाटक. शीर्षक पृष्ठावर 'श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या पद्यासह' असा उल्लेख आहे. या नाटकात एकूण ४२ पदे आहेत. हे गडकऱ्यांचे शेवटचे नाटक.

एका पक्क्या कपटी खलनायकाच्या हाती एक भाबडा पापभिरु म्हातारा सापडला आहे, या कल्पनेवर एक सुंदर आणि अत्यंत चटकदार कॉमेडी लिहू पाहणारे गडकरी कॉमेडीतून बाहेर पडून जीवनाच्या खोल आणि गंभीर भावप्रवाहात घेऊन जाणारी एक समर्थ नाट्यकृती निर्माण करतात.

धनेश्वराचा मुनीम घनश्याम हा मानी आहे. हा धुंडिराजाच्या मालतीला मागणी घालतो. धनेश्वराची मुलगी लतिका याबद्दल त्याचा अपमान करते. घनश्याम चिडून निघून जातो. पण या अपमानाचा सूड उगविण्याची प्रतिज्ञा करूनच ! लतिका, मालती, धुंडिराज, धनेश्वर या सर्वांना आपल्या एका कपटकारस्थानात ती गोविते. अर्थात हे सर्व कारस्थान शेवटी फसते.

या नाटकात कॉमेडीच्या खेळकर, सुखद, रंगछटा आहेत आणि त्याहूनही कितीतरी अधिक प्रमाणात प्रहसनाच्या भडक रंगानी प्रवेशाच्या प्रवेश रंगून काढले आहेत. नामांतर, वेशांतरे, भाषांतरे याचा मनमुराद खुला खेळ आहे. विनोदाच्या सुरूपतेबरोबरच विरूपतेलाही येथे मोकळी वाट करून दिलेली आहे. पण हे सारे असूनही ह्या नाट्यकृतीचा गाभा मानवी हृदयाची आत्मिक नाती आणि त्यांची जपणूक करताना भोगावे लागणारे आत्मक्लेश यांनी दाटून गेलेला आहे.

व्यक्तिचित्रांचे सुरेख दर्शन, सुरम्य भाषाशैली, चटकदार संवाद ही या नाटकाची वैशिष्ट्ये असून शृंगार, करूण, हास्य हे रस त्यांनी आपल्या नाटकात प्रभावीपणे चित्रित केले आहेत. सामाजिक दुःखाच्या, व्यथांच्या चर्चेपेक्षा भावनोत्कट प्रसंगाचे चित्रण, मनस्वी स्वभाव रेखाटन आणि प्रभावी भाषाशैली हीच त्यांच्या नाट्यकृतीची प्रधान लक्षणे होत.

यशवंत चव्हाण

**भावार्थ रामायण : एकनाथ.** भावार्थ रामायण ही संत एकनाथांची अखेरची रचना आहे. या ग्रंथाची पाच कांडे व युद्धकांडाचे ४४ अध्याय त्यांनी रचले व नंतर त्यांचे देहावसान झाले. उर्वरित भाग त्यांचा शिष्य गावबा यांनी पूर्ण केला असा प्रवाद आहे. उपलब्ध प्रतीवरून ४४व्या अध्यायापर्यंतची रचना एकनाथांची (२) ४५ ते ९० हे अध्याय बहुधा गावबांचे (३) त्यातील ५४वा अहिरावणाख्यानाचा अध्याय जयरामसुताचा आणि (४) उत्तरकांड अन्य कवीचे अशा चार व्यक्तींचा हातभार त्यास लागलेला दिसतो.

जुलमी शाहांच्या कचाट्यात सापडलेल्या लोकांच्या मनात स्वधर्मप्रेम, स्वाभिमान व क्षात्रवृत्ती जागृत करण्याच्या दृष्टीने रावणाच्या बंदीखान्यात पडलेल्या देवांची सुटका करणाऱ्या कोदंडधारी रामाची कथा एकनाथांनी निवडावी हे अतिशय समयोचित होते. मराठीत आलेली व लोकप्रिय झालेली ही पहिलीच पौराणिक कथा होय, या दृष्टीनेही तिचे महत्त्व आहे. भावार्थरामायण हे मूळ वाल्मीकिरामायणाला सर्वसाधारणपणे धरून असले तरी त्यात मुळात नसलेल्या पुष्कळ गोष्टी एकनाथांनी घातल्या आहेत.

भक्तीच्या भूमिकेतून हे सारे लेखन केलेले असून ते अधिक रंजक रोचक व्हावे म्हणून नवी प्रसंगनिर्मितीही केली आहे.

नाथांच्या वर्णनात प्रसाद व भक्तिप्रेम हे गुण प्रकर्षाने दिसतात. त्यांची भाषा सहजरम्य व सुबोध असून सौष्ठव, माधुर्य व ओजस्विता हे गुणही त्यांच्या शैलीत यथाप्रमाण आढळतात.

**भावीण : बोरकर, बा. भ. प्रकाशक : बांदोडकर पब्लिशिंग हाऊस, सालशेत, गोवा, पहिली आवृत्ती, १९५०, तृतीय आवृत्ती, १९८६.** सौंदर्यवादी काव्यदृष्टीने बा. भ. बोरकरांनी लिहिलेली ही कादंबरी. यामध्ये स्वतःच्या देवदासी या जन्मजात व्यवसायाला विटलेल्या शुद्ध विचाराच्या-सतित्वाचा ध्यास घेतलेल्या-त्यागमय भक्तिभाव अंगी बाणलेल्या, प्रणयाकुल वृत्तीच्या, सात्त्विक शेवंती नावाच्या भाविणीची ही हृदयस्पर्शी कथा आहे. या कथेत क्षुद्र वासनांना कोठेच थारा नाही. ऋषीच्या सानिध्यानंतर तिचा त्याग व तिची कर्तव्यनिष्ठा पणास लागून तिचे व्यक्तित्त्व अधिकच खुलते.

शेवंतीव्यतिरिक्त अंताशेट, रंजना, फ्रेड, केशव यांचे व्यक्तिचित्रण अतिशय उठावदार, 'भावीण' शेवंती इतरांपेक्षा आदर्श आहे ; असे बोरकरांना दाखवायचे आहे.

गोमंतकाची पार्श्वभूमी आणि मृदू भाषाशैलीमुळे कादंबरीच्या मूळच्या सौंदर्यात अधिकच भर पडली आहे. या कादंबरीला कलात्मक यश लाभले आहे.

भरतेश्वर पाटील

**भाषाप्रकाश : रामकवी. संपादक : शं. गो. तुळपुळे, प्रकाशक : पुणे विद्यापीठ प्रकाशन, पुणे, १९६२.** संस्कृत 'अमरकोशांच्या' धर्तीवर अनुष्टुभ वृत्तात रचिलेल्या या पद्यबद्ध मराठी शब्दकोशाचा कर्ता तंजावरचा रामकवी हा असून त्याचा रचनाकाल सुमारे अडीचशे वर्षांपूर्वीचा आहे. कवी स्वतःला कृष्णातीरच्या 'कोळे नृसिंहदेवाचा दास' म्हणवितो. हा कोश त्याने 'देशान्तरीच्या देशस्थासाठी,' म्हणजे महाराष्ट्रातून देशांतर करून दक्षिणेत तंजावर प्रांती स्थायिक झालेल्या मराठी भाषिकांसाठी रचिला आहे. या कोशाचे एकूण २३ वर्ग पाडण्यात

आले असून त्यांची नावे अनुक्रमे प्रार्थना (वर्ग) संकेत, दान, शब्दादी, वाग्वर्ग, संख्या, रूपादी, काल, नानार्थ, अंग, नर प्रकृति, पक्षीखग-मृगादी, जलादी वनौषधी, अन्नादी, व्यवहार, वस्त्र, जगती, सेना, बुद्धी, देवतादी, कारेगार व गोधन अशी आहेत. अर्थात हा कोश विषयवारीने रचिलेला आहे. वरीलपैकी ५ वर्ग अपूर्ण असून एकूण कोशही अपूर्णच राहिलेला दिसतो. कोशारंभी कवीने आपण 'ज्ञानेश्वर्या-दिकाधारे' ही रचना करीत असल्याचे म्हटले आहे. त्यामुळे ज्ञानेश्वरीतील अनेक शब्द कोशात आहेत. एकूण शब्दसंख्या सुमारे ४,५०० आहे. मराठी भाषेचा हा पहिला शब्दकोश असावा.

**भाषाशुद्धी-विवेक : पटवर्धन, माधवराव. प्रकाशक : आर्यसंस्कृती मुद्रणालय, पुणे, १९३८.** भाषाशुद्धी या विषयावर माधवराव पटवर्धन यांनी परिश्रमपूर्वक लिहिलेले पुस्तक. १९२५ च्या सुमारास महाराष्ट्रात मराठी भाषेच्या शुद्धिकरणाची चळवळ सुरू झाली होती. मराठीत अन्य भाषांतून आलेल्या शब्दांना बहिष्कृत करून तिच्या शुद्ध रूपाची जोपासना करावी, हा विचार त्या चळवळीमुळे बळावत होता. भाषाविषयक आंदोलनाच्या काळात मा. त्र्यं. पटवर्धन (कवी माधव जूलियन) यांनी वादविषयक केलेल्या भाषणांच्या प्रस्तुत पुस्तक हा संग्रह आहे. वादविवादाच्या या खंडनमंडनाच्या वेळी जी भाषणे केली जातात त्यांतील जिव्हाळा व तटस्थपणा पुस्तकात येणार नाही असे वाटल्यामुळे मूळ लेख आणि भाषणे नंतर एकत्र करताना काही शाब्दिक सुधारणा लेखकाने केल्या आहेत तसेच मूळ लेखनाचा संकोच व विस्तार केला आहे. प्रस्तावनेत पटवर्धन म्हणतात गद्य लेखांचा हा माझा पहिलाच संग्रह आहे. ललित गद्य लेखनाची आवड म्हणून काही हे लेख लिहिण्यात आले नव्हते. सार्वजनिकरीत्या अमुक एक गोष्ट सांगितली पाहिजे असे जेव्हा मनाला वाटले तेव्हा कष्टपूर्वक ती गोष्ट मी सांगून टाकली. परिस्थितीची निकड लागूनच मी लेख लिहिले व भाषणे केली. या गोष्टी माझ्या हातून घडतील असें मला कधीच वाटले नव्हते. लेखकाने पुस्तकाची मांडणी अकरा प्रकरणांत केली आहे. ती प्रकरणे अशी : (१) मराठीवरील भयंकर संकट, (२) मराठी भाषेतील शुद्धिकरण, (३) मराठी शब्दांचा पुरस्कार, (४) सावरकरी भाषाशुद्धीची चिकित्सा, (५) भाषाशुद्धीचे रहस्य, (६) स्वभाषेतील शब्दांकडे पाहण्याची विशिष्ट दृष्टी, (७) भाषाशुद्धिवाद्यांची भूमिका, (८) भाषाशुद्धीचे माहात्म्य, (९) भाषाशुद्धीची घोषणा, (१०) आमचा साहित्य संसार, (११) भाषाशुद्धिकरणाचे तारतम्य. पुस्तकाच्या शेवटी मराठीतील बहिष्कार्य दीड हजार उर्दू शब्दांचा कोश दिला आहे. तिथे मूळ उर्दू शब्दाला योग्य मराठी प्रतिशब्द लेखकाने दिला आहे. माधवराव पटवर्धनांनी मराठी भाषेची तीन अंगानी हानी झाल्याचे नमूद करून भाषाशुद्धीविषयी स्वतःची भूमिका मांडली आहे. मराठी वाङ्मयात येणाऱ्या शब्दांकडे दुर्लक्ष होणे, अशिक्षित समाजातील प्रचलित बोलींमध्ये असलेले अर्थपूर्ण शब्दांचे महत्त्व विचारात न घेणे, मराठी शब्दघटकांकडे व शब्दसिद्धींकडे दुर्लक्ष होणे या तीन कारणांमुळे मराठी भाषेची हानी होत असल्याचे लेखकाने निदर्शनास आणले आहे. आपल्या भाषाशुद्धिविषयक मतांचे समर्थन करीत असताना लेखकाने वि. दा. सावरकर, कृ. पां. कुलकर्णी, श्री. के. क्षीरसागर, श्री. ना. बनहट्टी, स. बा. हुदलीकर, न. चिं. केळकर इत्यादी समकालीन अभ्यासकांच्या आक्षेपांचा परामर्श घेतला आहे. मराठी भाषेच्या शुद्धतेचा आग्रह धरणाऱ्या पटवर्धनांनी आपल्या विचारांच्या पुष्ट्यर्थ असंख्य उदाहरणे दिलेली आहेत. मराठीतील अन्य भाषांतील शब्दांच्या स्वीकृतीमागील स्वतःची भूमिका साधक बाधकपणे मांडली आहे. त्यामुळे प्रस्तुत पुस्तकातील लेखकाचे समतोल विवेचन आणि कष्टाळू वृत्ती यांचा प्रत्यय येतो. "माधवराव पटवर्धन हे तत्त्वनिष्ठ तथापि व्यवहारप्रेमी, उपयुक्ततावादी व परिवर्तनी आहेत " अशा शब्दांत न. चिं. केळकरांनी लेखकाच्या कार्याचा गौरव केला आहे. मराठी भाषेच्या अस्तित्वाच्या चर्चेप्रमाणेच तिच्या शुद्धतेची चर्चा सर्वच काळात सुरू असते. माधवराव पटवर्धनांचे त्यांच्या ह्या संगातून सिद्ध झालेले 'भाषाशुद्धिविवेक' हे पुस्तक या चर्चेच्या वेळी उपयुक्त ठरणारे संदर्भ पुस्तक म्हणून महत्त्वाचे आहे.

वि. शं. चौघुले

**भिल्लीणीची बोरे : परांजपे, शकुंतला. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, १९४४.** या ललितलेखसंग्रहात त्यांचे विविध विषयांवरील ललित लेख प्रसिद्ध झालेले आहेत. माझी प्रेतयात्रा, शेळीची शिकार, पावसाचा कोट, हरवलेली छत्री, उधार आणि उसनवार वगैरे ललित लेख वाचनीय आहेत.

या पुस्तकाची लेखनपद्धती साधी-सरळ असून यातील काही लेखांमध्ये स्वभावोक्ती हा गुण ठळकपणे दिसतो. यातील सारे लेखन विनोदी व खेळकर पद्धतीने केलेले आहे.

**भोसलेवंशचरित्र : बाबुराय.** ही मराठीतील एकमेव शिला-लिखित बखर आहे. तंजावरच्या बृहदीश्वराच्या देवळात ही बखर शिलालिखित स्वरुपात आढळते. तसेच बाबुराय हा शरफोजीचा चिटणीस असल्याची माहितीही बखरीत दिली आहे. तिचा लेखनकाल शके १७२५ (इ.स. १८०३) असा आहे. या बखरीत तंजावरच्या भोसले घराण्याचा इतिहास निवेदिला आहे. तिच्यात शिवछत्रपतींपूर्वीच्या १४ पिढ्यांची माहिती दिली असून श्रीनारायणादी सूर्यवंशातील पौराणिक व्यक्तींशी या घराण्याचा संबंध बखरकाराने जोडला असल्याने हा तपशील अनैतिहासिक वाटतो. मालोजी ते धाकटे शाहूमहाराज ही या घराण्याची महाराष्ट्रीय परंपरा व व्यंकोजी शरफोजीपर्यंतची तंजावरी परंपराही या बखरीत वर्णिली आहे.

यादव-शहाजी युद्ध, अफझल वध, संभाजी-औरंगजेब भेट ही या बखरीतील वर्णने अत्यंत रेखीव व चित्रमय आहेत.

इतिहासात नसलेले काही प्रसंग (शिवाजी महाराज गुप्तपणे तंजावरच्या किल्ल्यात जातात व तेथून व्यंकोजीला निरोप पाठवितात इ.) या बखरीत येतात, पण त्यांना ऐतिहासिक आधार नसल्याने ते विश्वासार्ह वाटत नाहीत.

बखरकाराची लेखनशैली अलंकारयुक्त असून ती डौलदार आहे. बखरकार या घराण्याचा आश्रित असल्याने अर्थातच त्याने या घराण्याविषयी अत्यंत जिव्हाळ्याने व आदराने लिहिले आहे. श्री. टी. सांबमूर्तीराव यांनी इ.स. १९०७ मध्ये ही बखर प्रसिद्ध केली.

**भ्रांतिकृतचमत्कार : प्रधान, बजाबा रामचंद्र. प्रकाशक : इंडियन प्रिंटिंग प्रेस, मुंबई, १८७८.** 'भ्रांतिकृतचमत्कार' हे 'Comedy of Errors' या शेक्सपियरच्या नाटकाचे भाषांतर असून नाटककार मंडळीकडून प्रयोग करण्याकरिता म्हणून हे भाषांतर केले गेले. रसिकजन मनोरंजनार्थ हे पुस्तक तयार केले असे लेखकाचे म्हणणे असून चटकदार संवाद व सोपी भाषा हे या नाटकाचे वैशिष्ट्य आहे. या पाच अंकी नाटकात १८ पात्रे आहेत. या नाटकात स्थळांची नावे कोकणपट्टीतील समुद्रकाठच्या प्राचीन शहरांची घेतलेली आहेत. भाषांतर देशरिवाजास अनुसरून ठेवण्याकरिता कित्येक ठिकाणी पात्रांचे संवाद मूळच्याहून काही निराळ्या तऱ्हेने लिहिण्याचा प्रयत्न केलेला आहे.

**मखमालीचा पडदा : देसाई, वसंत शांताराम. प्रकाशक : व्हीनस बुक स्टॉल, पुणे, १९४७.** मराठी रंगभूमीची गेल्या पन्नास वर्षांतील वाटचाल जवळून पाहणारे, रसिक व नाटककार वसंत शांताराम देसाई यांच्या आठवणी व आख्यायिकातून साकारलेल्या रंगभूमीच्या विकासाचा, वैभवाचा व अवनत-स्थितीचा आलेख, त्यात सर्वश्री कृ. प्र. कोल्हटकर, टेंबे, देवल, गडकरी, अत्रे या नाटककारांच्या व बालगंधर्व, बोडस, भाऊराव, गणपतराव जोशी, हिराबाई व जोत्स्ना भोळे इ. नटनट्यांच्या नाट्यकर्तृत्वाचा साक्षेपी आढावा त्यांनी घेतला आहे. तसेच नाटककार म्हणून स्वतःच्या विकासाच्या वाट-चालीचाही वेध आहे.

आपल्याला आवडलेले नट, नाटककार व नाट्यकला यांचा पुनःप्रत्यय देण्याबरोबरच विचारांना चालना देण्याचेही महत्त्वाचे कार्य करणाऱ्या या आठवणी रंजक व रसाळ आहेत.

**मतिरत्नाकर : कपाटे, दिवाकर मुनी. प्रकाशक : शंकर नरहर जोशी, पुणे.** महानुभाव पंथाचे तत्त्वज्ञान विशद करणारा हा ओवीबद्ध ग्रंथ प्रथम दिवाकर-मुनीने लिहिला. (शके १५१९, इ. स. १५९७) तेव्हा त्याचे नाव 'मतप्रबोध' असे होते आणि त्यात सुमारे ८०० ओव्या होत्या. पुढे शके १६१७ (इ.स. १६९५) मध्ये कोणा गोपाळदासाने तो वाढविला आणि त्याला 'मतरत्नाकर' असे नवीन नाव दिले. हा वाढावा करणारा गोपाळदास म्हणजे गोपाळमुनी दर्यापुरकर असण्याची शक्यता आहे. पण ते कसेही असले तर या ग्रंथाचे नाव 'मतरत्नाकर' किंवा 'मतप्रबोध' हेच आहे. कारण तो मुरारीमल्लाच्या 'दर्शन-प्रकाश' या ग्रंथाच्या धर्तीवर असून त्यात महानुभावेतर मतांचे खंडन केले आहे. त्याचा शेवटही 'इतर मत खंडणे, स्वमत प्रतिष्ठापित मतप्रबंध रत्नाकर' या शब्दांनी झाला असून त्यावरूनही ग्रंथाचे मूळ नाव स्पष्ट होते. त्या नावातील 'मत' चे 'मति' कसे व केव्हा झाले ते कळत नाही. या ग्रंथाचा परिचय ना. ब. जोशी यांनी करून दिला आहे. (महानुभाव मासिक, १५-३-४).

**मधुकर : भावे, विनोबा. प्रकाशक : श्री. बजाज जमनालाल वर्धा, १९३६.** विनोबा भावे यांनी 'महाराष्ट्र धर्म' या साप्ताहिकात १९२४-२७ या काळात लिहलेल्या काही विशिष्ट लेखांचा संग्रह. यात ४० लेख आणि ९ प्रासंगिके समाविष्ट. तत्कालीन प्रसंगानुसार लिहिलेल्या या स्फुट लेखांमध्ये विविधता आणि व्युत्पन्नता आहे. विनोबांच्या सर्वोदयप्रणीत विचारांचा उगम यातील काही लेखांत आढळतो. प्रौढशिक्षण, साक्षरता, सुतकताई, स्वच्छता, आश्रमशाळा, त्याग आणि दान, ग्रामसुधारणा, जीवन-शिक्षण, अस्पृश्यतानिवारण, इ. विषयांवर लेखन. याखेरीज कृष्णभक्तीचा रोग, कवीचे गुण, मते आणि मतप्रचार, संतांचा भागवतधर्म, तुलसी रामायण, कै. राजवाडे यांसारखे चिरंतन विचारधारा असलेले अनेक लेख लक्ष वेधून घेतात. शब्दवेधी, कोटित्व हे विनोबांच्या लेखनाचे विशेष येथे दिसतात.

**मराठी-इंग्रजी कोश : संपादक : मोल्सवर्थ, जे. टी. साहा. जॉर्ज व थॉमस कॅन्डी. प्रकाशक : गव्हर्न्मेंट ऑफ बॉम्बे, मुंबई, आवृत्ती पहिली १८३१.** मराठीतील शब्दकोश वाङ्मयातील हा प्रारंभीचा, महत्त्वाचा द्वैभाषिक कोश मोल्सवर्थ यांनी जॉर्ज कॅन्डी व थॉमस कॅन्डी यांच्या साहाय्याने संपादित केला. हा कोश तयार करताना एतद्देशीय शास्त्री लोकांचे पुष्कळ साहाय्य घेतले आहे. मराठी भाषेला आधुनिकतेचा स्पर्श देण्याच्या कार्याचा पाया घालण्याचे मोठे श्रेय मोल्सवर्थच्या या कोशाला आहे. मराठी भाषेच्या विकासाच्या अभ्यासाचे हा कोश एक उत्तम साधन आहे. मराठीतील हा पहिला बृहद्‌कोश. पुढील शब्दकोशांचा पाया या शब्दकोशाने घातला. सन १८३१ च्या याच्या पहिल्या आवृत्तीत सुमारे ४०,००० शब्द आहेत. १८५७ च्या दुसऱ्या आवृत्तीत सुमारे ६०,००० शब्द आहेत.

या कोशरचनेमागे व्यापक व समावेशक धोरण आहे. यात जसे संस्कृत शब्द आहेत, तसे लौकिकातीलही शब्द आहेत. घरगुती वापरातील, परिचित, अपरिचित, स्थानिक बोलीतील किंवा सर्वसामान्य, ग्राम्य किंवा नागर, शुद्ध, अशुद्ध अशा सर्व स्वरूपाच्या शब्दांचा संग्रह यात केला आहे. जरूर तेथे शब्दांच्या वापराची उदाहरणे दिली आहेत. या शब्दकोशाला डॉ. जे. विल्सन यांचा 'Notes on the Constitutent Elements, the Diffusion & the application of the Marathi Language.' हा निबंध जोडला आहे. मोल्सवर्थ यांची कोशाला प्रस्तावनाही आहे. प्रस्तावनेत त्यांनी 'It (this work) was

undertaken from a desire to promote the propagation of the glorious Gospel' असे म्हटले आहे. तरी मराठी भाषेच्या विकासाच्या दिशेने या कोशाने फार मोठे काम केले आहे.

या कोशाची १८५७मध्ये निघालेली दुसरी आवृत्ती अधिक महत्त्वाची आहे. १८५७ मधील या आवृत्तीचे पुनर्मुद्रण शुभदा सारस्वतने प्रकाशित केले आहे.

१९व्या शतकात परक्या लोकांनी इकडील भाषांचे जे कोश तयार केले त्यात मोल्सवर्थचा मराठी-इंग्रजी कोश आणि मानियर विल्यम्सचा संस्कृत-इंग्रजी कोश सर्वोत्कृष्ठ आहेत. असा प्रख्यात संशोधक प्रा. अ. का. प्रियोळकर यांचा अभिप्राय आहे.

सु. रा. चुनेकर

**मराठी कादंबरी : तंत्र आणि विकास : बापट, प्र. वा. आणि गोडबोले, ना. वा. प्रकाशक : प्रभाकर वासुदेव बापट, ग्वाल्हेर प्रकाशक, दु. आ. १९५७, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९३८.** हा ग्रंथ प्रथम १९३८ साली प्रकाशित झाला. श्री. बापट यांच्या मृत्यूनंतर श्री. गोडबोले यांनी या ग्रंथात भर घालून दुसरी आवृत्ती १९५७ साली प्रकाशित केली.

कादंबरी या वाङ्मय प्रकाराचा तंत्र स्वरूप व भूमिका अशा अनेक अंगांनी चिकित्सा करणारा हा महत्वाचा ग्रंथ. सुरुवातीस या वाङ्मय प्रकाराचे महत्त्व सांगून पाश्चात्त्य देशात यांचा विकास कसा झाला त्याचे वैशिष्ट्यपूर्ण विवेचन, त्यानंतरच्या प्रकरणांतून कादंबरी लेखनाच्या विविध भूमिका व कादंबरीचे कथानक, स्वभावरेखन, वातावरण व भाषाशैली या महत्त्वाच्या घटकांचे विवरण, त्यानंतर ऐतिहासिक कादंबरी, राजकीय कादंबरी, सामाजिक कादंबरी व गुप्त पोलिसांच्या कथा या वेगवेगळ्या प्रकारच्या कादंबऱ्यांचे स्वरूप सोदाहरण स्पष्ट करण्याचा प्रयत्न, सातव्या प्रकरणात मराठी कादंबरीचा विहंगम पद्धतीने घेतलेला अभ्यासपूर्ण आढावा, आठव्या, नवव्या व दहाव्या प्रकरणांतून प्रमुख मराठी कादंबरीकारांच्या कलाकृतींची करून दिलेली धावती ओळख असे या ग्रंथाचे स्वरूप आहे. या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे परिशिष्टात भगिनी-भाषांमधील प्रमुख कादंबरीकारांचा करून दिलेला परिचय. कादंबरी या वाङ्मय प्रकाराचा व मराठी कादंबरीचा थोडक्यात पण अभ्यासपूर्ण रितीने आढावा घेताना मराठी कादंबरीमधील बदलत्या स्वरूपाचे पण मार्मिक दर्शन घडते.

म. ना. अदवंत

**मराठी कादंबरी : पहिले शतक १८५०-१९५० : देशपांडे, कुसुमावती. प्रकाशक : मुंबई मराठी साहित्य संघ प्रकाशन, पहिली आवृत्ती १९५३-१९५४, दुसरी आवृत्ती १९७५ (दोन्ही भाग एकत्र).** मराठी कादंबरी संदर्भ विश्वातला हा महत्त्वपूर्ण ग्रंथ. समीक्षणात्मक भूमिकेतून मांडलेल्या या ग्रंथात मराठी कादंबरीचा वाङ्मयीन इतिहास आहे. या ग्रंथातील लेख प्रथम व्याख्यान रूपाने नंतर ग्रंथनिविष्ठ करण्यात आले आहेत. या ग्रंथाची मांडणी दोन भागांत आहे.

पहिल्या भागात, प्रस्तावनेसह कादंबरीचा उगम, ऐतिहासिक कादंबरी, हरी नारायण आपटे, वाचकवर्गाची वाढ, वामन मल्हारांचे युग, तत्त्वप्रधान कादंबरी या विषयावरील सविस्तर चर्चात्मक लेख आहेत. मराठी कादंबरी वाङ्मय विश्वाच्या प्रारंभ काळाची वाटचाल, त्या कालखंडातील कादंबऱ्या व त्यांची लेखन दृष्टी याविषयी विवेचन. सामाजिक कादंबरीची निर्मिती-वाचक वर्गाची दृष्टी, वामन मल्हार, श्री. व्यं. केतकर यांच्या तत्त्वप्रधान व समाजशास्त्रीय कादंबऱ्यांचा आढावा.

दुसऱ्या भागात-कलावादाचे पुरस्कर्ते ना. सी. फडके यांच्या कादंबरी विश्वाचे व जीवनवादी दृष्टिकोनाने लेखन करणाऱ्या वि. स. खांडेकरांच्या कादंबरी वाङ्मयाची समीक्षणात्मक मीमांसा करताना त्या प्रवाहातील व कालखंडातील- पु. य. देशपांडे, ग. त्र्यं. माडखोलकर, बोकील ते क्षीरसागर; त्या कालखंडातील लेखिका विभावरी शिरुरकर, काशीबाई कानिटकर, गीता साने, प्रेमा कंटक, मालतीबाई दांडेकर या लेखिकेच्या वाङ्मयीन (कादंबरी) विश्वाचा आढावा घेतला आहे.

कादंबरी वाङ्मय प्रकारातील वेगळ्या वाटांचा विचारही या ग्रंथात आहे. मराठीतील भाषांतरित कादंबरी व आजची कादंबरी व यांचाही विचार या ग्रंथात आहे.

भरतेश्वर पाटील

**मराठी घटना : रचना, परंपरा : मंगरूळकर, अरविंद अर्जुनवाडकर, कृष्ण श्रीनिवास. प्रकाशक : देशमुख प्रकाशन, पुणे-२, प्रथम आवृत्ती १९५८.** या ग्रंथाचे तीन विभाग पाडलेले असून शीर्षकानुसार घटना या पहिल्या विभागात मराठी भाषेची जडणघडण म्हणून वर्ण, लिपी, संधी तसेच नाम, सर्वनाम, अव्यय, समास, प्रयोग, इ. व्याकरणाचे विवेचन आलेले असून दुसऱ्या 'रचना' या विभागात मराठी वाङ्मयाचे स्वरूप, काव्यमीमांसा, रसविचार, अलंकार, म्हणी आणि वाक्प्रचार यांच्याबरोबरच परिच्छेद लेखन, संवाद लेखन, पत्रलेखन इत्यादी व्यावहारिक मराठीचे निबंधन केलेले आहे. आणि 'परंपरा' या तिसऱ्या विभागात साधारण १९५५ पर्यंतचा मराठी वाङ्मयाचा सुबोध सारभूत इतिहास अंतर्भूत केला आहे.

विशिष्ट अभ्यासक्रमांस अनुसरून लिहिलेला विद्यार्थी आणि अध्यापक यांना उपयुक्त असा ग्रंथ.

मोहन पाटील

**मराठी दोलामुद्रिते : संकलन : सहस्रबुद्धे, पु. ह. प्रकाशक : मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयासाठी महाराष्ट्र ग्रंथ भांडार मुंबई, प्रथम आवृत्ती १९४९, दुसरी आवृत्ती १९६५, संपादक : सुरेंद्र गावस्कर, तिसरी आवृत्ती १९९५, संपादक : डॉ. गंगाधर मोरजे.** उपलब्ध असलेल्या व अधिकृत क्रमपुस्तकांत किंवा नियतकालिकांत नोंद असलेल्या मराठीतील सन, १८६७ साल अखेरपर्यंतच्या मुद्रित ग्रंथांची वर्णनात्मक संयुक्त नामावली या ग्रंथात समाविष्ट आहे.

या दोलामुद्रितांचा प्रारंभ कै. प्रा. अ. का. प्रियोळकर यांनी केला. ते मुंबई मराठी संशोधन मंडळाचे संचालक होते. त्यांच्या कुशल व चौकस मार्गदर्शनाखाली १९४९ साली हा महत्त्वाचा व अभ्यासनीय ग्रंथ प्रकाशित झाला. या ग्रंथाच्या पहिल्या व दुसऱ्या आवृत्तीत ८४४ नोंदी असून, तिसऱ्या आवृत्तीत डॉ. गंगाधर मोरजे यांनी १०५६ नोंदीपर्यंत ही संख्या नेली आहे.

प्रत्येक मुद्रित ग्रंथाची नोंद करताना ग्रंथकार, ग्रंथाचे नाव, प्रकाशन स्थळ, सन, ग्रंथाच्या पृष्ठाचा आकार, प्रस्तावना पृष्ठसंख्या अधिक मूळग्रंथाची पृष्ठे आणि एकूण पृष्ठसंख्या अशी क्रमवार शिस्त पाळली आहे. इ. स. १८०५ पासून १८६७ पर्यंतच्या मराठीतील 'Incuabula' (पाळण्यातील पुस्तके-दोलामुद्रिते) ची नामावली यात असून अव्वल इंग्रजीच्या काळातील ग्रंथांच्या संदर्भशोधनास माहितीपर ग्रंथ.

मोहन पाटील

**मराठी नाट्यसृष्टी सामाजिक नाटके : दांडेकर, वि. पां. प्रकाशक : डॉ. वि. पां. दांडेकर, बडोदे १९५८.** या ग्रंथामध्ये इ.स. १८५९ ते १९५७ पर्यंतच्या जवळजवळ १०० वर्षांत गाजलेल्या व न गाजलेल्या सुमारे ५०० सामाजिक नाटकांचा परामर्ष घेण्याचा लेखकाचा प्रयत्न आहे. मराठी नाटकांचे सुधारणा-विरोधी युगातील नाटके, समन्वय युगातील नाटके व नवयुगातील नाटके असे तीन विभाग सदर ग्रंथात पाडलेले आहेत. प्रथम नाटककाराचा परिचय, त्यानंतर त्याचे नाट्यगुण-दोष यांचे दिग्दर्शन, मग त्याच्या नाटकाचे परीक्षण असा या ग्रंथाचा पूर्वार्ध आहे. उत्तरार्धात काही प्रमुख नाटककार वगळता उरलेल्या सामान्य नाटककर्त्यांच्या नाटकांचा धावता आढावा घेतलेला आहे. तपशिलाचा बिनचुकपणा, ओघवती व लालित्यपूर्ण भाषा या दृष्टीने हा उत्तम संदर्भग्रंथ आहे. 'सामाजिक नाटकातील मराठी समाज' 'सामाजिक नाटकाचे मूळ' आणि उप-संहारातील 'मराठी रंगभूमीची तंत्रदृष्ट्या व गुणदृष्ट्या झालेली उत्क्रांती' हे भाग लक्षणीय आहेत. मराठी नाट्यसृष्टीचे गेल्या शंभर वर्षांतील साक्षेपी समालोचन करणारा हा ग्रंथ आहे.

रत्नाकर आनंदराव पतंगे

**मराठी भाषा - उद्गम आणि विकास : कुलकर्णी, कृष्णाजी पांडुरंग. प्रकाशक : भिडे कमलाबाई, मॉडर्न बुक डेपो, पुणे-२, पहिली आवृत्ती १९३३, चौथी आवृत्ती १९६३.** मराठी भाषेच्या अभ्यासाच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त असलेल्या या ग्रंथात कृ. पा. कुलकर्णी यांनी भाषेच्या अभ्यासाची सामान्यतत्त्वे देऊन भाषा उत्पत्तीच्या सिद्धान्ताची चर्चा केली आहे. तसेच उच्चारप्रक्रिया, अर्थप्रक्रिया, अर्थशक्ती, पोटभाषा व बोलीभाषा यांचाही विचार केला आहे. तसेच पौर्वात्य व पाश्चात्त्य भाषाभ्यास पद्धती, ऐतिहासिक व तौलनिक भाषाभ्यास पद्धती इत्यादींचा विचार केला आहे. पूर्वपीठीकेत—पूर्ववैदिक, वैदिक, संस्कृत, पाली, प्राकृत अपभ्रंश या अवस्थातून मराठी भाषेचे मूळ शोधण्याचा प्रयत्न केला आहे. मराठी व इतर प्राकृत उद्भव भाषाचा आढावा चौथ्या प्रकरणात घेतला आहे. मराठीचा उत्पत्ती विशद करताना पाली व इतर प्राकृत भाषा, मराठीची उत्पत्तीकाल ठरविण्याची साधने, वैद्य-गुणवाद व महाराष्ट्रातील वसाहती यांची चर्चा केली आहे. मराठीचे कालिकभेद या प्रकरणात यादवकालीन, बहामनीकालीन, शिवकालीन, पेशवेकालीन व आंग्लकालीन भाषांचा सर्वांगीण विचार केला आहे.

मराठी भाषेचे प्रांतिक भेद व इतर भेद या प्रकरणात मराठीच्या बोलीचा प्रांतानुसार, जातीनुसार, व्यवसायनुसार विचार केला आहे. मराठीची वर्णप्रक्रिया या प्रकरणात महाराष्ट्रीयांची उच्चारशुद्धी, मराठीतील स्वतंत्र वर्ण तसेच स्वर, व्यंजन प्रक्रियेचा सविस्तर विचार केला आहे. व्याकरण या प्रकरणात रूपसमृद्धी, शब्दप्रकार, विभक्तीप्रत्यय, प्रयोग, काळ इत्यादींचा विचार विस्ताराने केला आहे.

या ग्रंथाची अर्पणपत्रिका कै. विसूभाऊ राजवाडे यांच्या पुण्यस्मृतीस अर्पण केली आहे. या आवृत्तीला पहिल्या व चौथ्या आवृत्तीची लेखकाची छोटेखानी प्रस्तावना जोडली आहे. एकूण नऊ प्रकरणे असलेल्या या ग्रंथाची पृष्ठसंख्या ४२० इतकी आहे. ग्रंथाच्या प्रारंभी आधारभूत ग्रंथाची यादी (इंग्रजी व मराठी ) दिली आहे तर ग्रंथाच्या शेवटी परिशिष्ट, नकाशे, लोकसंख्या, भारतीय भाषा हे तक्ते वगैरे दिले आहेत.

हा ग्रंथ मराठी भाषेच्या अभ्यासास अत्यंत उपयुक्त असा आहे.

यशवंत चव्हाण

**मराठी रंगभूमीचा इतिहास-खंड १ : बनहट्टी, श्री. ना. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, १९५७.** १८४३ ते १८७९ ह्या कालखंडातील मराठी रंगभूमीचा इतिहास या खंडात आला आहे.

'रंगभूमी मराठी जनतेचे प्रेमानिधान' ह्या प्रकरणात मराठी रंगभूमी हा सर्वस्वी देशी वाण आहे, भारतीय एकतेचे सोज्ज्वळ प्रतिबिंब आहे, महाराष्ट्रीयांच्या सामाजिक एकतेचे साधन आहे, जातीय भावनेप्रमाणे वर्गीय उच्चनीचतेच्या भावना सपाट करणारी शक्ती आहे ही लक्षणे सांगितली आहेत. तिचा गुणविशेष म्हणजे, परिवर्तनशीलता आणि महाराष्ट्रीयांच्या गुण-दोषांचे प्रतिनिधित्व करणे, नाटकांशी, संगीताशी सांगड आणि करमणुकीचे साधन ही तिच्या लोकप्रियतेची कारणे होत.

मराठी रंगभूमी आणि तिचे कानडी मूळ, दाक्षिणात्य नाट्यकला आणि तंजावरच्या भोसले राजाची मराठी नाटके विष्णुदासांचे पौराणिक नाटक ह्या प्रकरणानंतर रंगभूमीच्या निर्मितीचे श्रेय कोणाकडे ? या महत्त्वाच्या प्रकरणात रंगभूमीच्या उगमावर हक्क सांगणारे सूर-दशावतार व गोमंतकाविषयीचा दावा हे महत्त्वाचे मुद्दे चर्चिले आहेत.

विष्णुदासांचा नाट्यव्यवसाय, इचलकरंजीकर मंडळी आणि दातारशास्त्री, रंगभूमीचा विकास व प्रसाद, उत्तरकालीन नामवंत नाटकमंडळ्या, नाटकवाल्याचे चारित्र्य व दानत, पौराणिक नाट्याच्या परिणत स्वरूप आणि आंतरिक तत्त्व, रंगभूमी आणि आंग्लविद्याविभूषित वर्ग, रंगभूमीचे बाह्यांग आणि उपप्रकरण, रंगभूमीचा व्यवहार आणि नाटकमंडळ्यांची अंतर्व्यवस्था, ह्या प्रकरणामधून मराठी रंगभूमीच्या विकासाचा इतिहास आला आहे. १८४३ ते १८७९ ह्या काळातील मराठी रंगभूमीचे स्वरूप स्पष्ट करणारा संशोधनपर ग्रंथ.

उदय खानोलकर

**मराठी लोकांची संस्कृती : कर्वे, इरावती. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, १९५१.** मुंबई मराठी साहित्यसंघात कै. वामनराव जोशी स्मृतीदिनानिमित्त दिलेल्या व्याख्यानांचा हा संग्रह. याला डॉ. सुमित्र मंगेश कत्रे यांची छोटी प्रस्तावना आहे. संस्कृती म्हणजे काय ?, मराठी लोकांची भूमी, मराठी लोकांचा पिंड, मराठी कुटुंब, महाराष्ट्राची वसाहत व भाषा या सहा प्रकरणांत महाराष्ट्राच्या प्रारंभीच्या संस्कृती-विषयीचे विवेचन करताना, भारतीय संस्कृती व महाराष्ट्र संस्कृती यांचा ऊहापोह व पुढील प्रकरणांतून मानववंश शास्त्रसिद्धान्त प्रमाण, तौलनिक विचार या दृष्टीने विषयाची सुलभ, सोदाहरण व स्पष्ट मांडणी केली आहे. महाराष्ट्रातील लोक, त्यांची शारीरिक ठेवण, वर्ण, वंश, भाषा, सणवार, आचार-विचार, कुटुंब अशा अनेक अंगांचा विचार करून समाज व संस्कृतीचे विश्लेषण केले आहे. आपले म्हणणे स्पष्ट करण्यासाठी नकाशे, भिन्न वंशीय माणसांच्या आकृत्या, चेहेरे व डोके यांचे आलेख, केस, डोक्याचा घेर, सापेक्ष प्रमाण, नाकाची उंची, सापेक्ष लांबी, रुंदी, वरच्या जबड्याच्या लांबीचे प्रमाण, चेहरा व डोके यांच्या रुंदीचे प्रमाण यांचा तौलनिक तक्ता यांचा वापर केला आहे. लेखिकेने महाराष्ट्राच्या विविध भागातील भिन्नभिन्न जातिजमातींच्या एकूण ३,०५४ माणसांची मापे घेऊन आपले निष्कर्ष काढले आहेत. महाराष्ट्रीय समाज हा हजारो वर्षांपासून या ठिकाणी येत राहिलेल्या भिन्नवंशीय, भिन्न धर्मीय लोकांचे मिश्रण असून त्यांच्यात वरचेवर धर्मांतरे व वर्णसंकर होत राहिला असल्याचे सिद्ध होते. तरीपण ताठ राहण्याची, वागण्याची वृत्ती सर्व मराठी जातीत दिसून येते. या संस्कृतीची निर्मिती कोणा एका जमातीची नसून सर्वांची आहे व तिची जोपासना करायची झाल्यास सर्वांनी एक झाले पाहिजे, रक्ताची सरमिसळ झाली पाहिजे असे लेखिकेचे प्रतिपादन. मराठी समाज व संस्कृतीच्या आकलनास आवश्यक असा एक अभ्यासपूर्ण ग्रंथ.

चंद्रशेखर कपाळे

**मराठी व्याकरणावर निबंध : चिपळूणकर, कृष्णशास्त्री. प्रकाशक : रामचंद्र भिकाजी ढवळे, मुंबई, प्र. आ. १८९३, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, दु. आ. १९७१.** चिपळूणकर पुण्याला ट्रेनिंग कॉलेजचे प्राचार्य असताना मराठी व्याकरणावरील पंचवीस निबंध त्यांनी विद्यार्थ्यांना वर्गात शिकवले. पुढे तेच निबंध शालापत्रकात लिखित स्वरूपात प्रसिद्ध झाले. त्याचे ग्रंथरुप म्हणजे 'मराठी व्याकरणावर निबंध' होय.

पहिल्या निबंधात व्याकरणाच्या प्रयोजनाचे प्रतिपादन करून दुसऱ्या निबंधात त्यांनी मराठी कवितेच्या भाषेचाही विचार व्याकरणामध्ये करावयास हवा हा विचार मांडला आहे. तसेच व्याकरणातील शब्दांचा अर्थ, वर्णविचार, शब्दांच्या जाती, प्रयोग, इत्यादी क्रमशः एक-एक विषय घेऊन दादोबा पांडुरंग तर्खडकरांनी घेतलेल्या भूमिकेशी विषयानुरूप आपले मतभेदही नोंदवले आहेत.

मराठी व्याकरणाचा सखोल अभ्यास करू इच्छिणाऱ्यांस अनन्यसाधारण असा हा व्याकरणशास्त्रावरील जुना ग्रंथ आहे.

मोहन पाटील

**मराठी स्त्री : संत, दु. का. प्रकाशक : स्कूल आणि कॉलेज बुक, स्टॉल, कोल्हापूर, प्रथमावृत्ती, १९५७.** डॉ. दु. का. संत हे चिंतनशील वृत्तीचे संशोधक म्हणून परिचित आहेत. 'कलानीनिवाद', 'साहित्य आणि संस्कृती' इत्यादी ग्रंथाचे त्यांनी लेखन केले आहे.

प्रस्तुत प्रबंध त्यांनी मुंबई विद्यापीठाच्या पीएच.डी. पदवीसाठी लिहीला होता.

ब्रिटीश राजवटीत निर्माण झालेल्या मराठी साहित्यात स्त्रीजीवनाच्या विविध अंगोपांगाचा ऊहापोह झाला, त्याची चिकित्सक पाहणी करणे हा प्रस्तुत ग्रंथाचा हेतू आहे. त्यासाठी त्यांनी या ग्रंथाचे दोन भाग करून पहिल्या भागात ललितेतर आणि दुसऱ्या भागात ललित साहित्यात चित्रित झालेल्या स्त्रीजीवनाचे चित्रण चिकित्सकदृष्टीने त्यांनी तपासले आहे. स्वीकारलेल्या दृष्टीकोनामुळे प्रस्तुत ग्रंथ व्यापक आणि सर्वंकष स्वरूपाची मांडणी करणारा झाला आहे.

के. ना. वाटवे यांनी "'मराठी स्त्री' या ग्रंथात डॉ. संतांचे सर्व बुद्धिगुण आणि त्यांचा गाढ व्यासंग याची प्रचिती पानोपानी येते" असा अभिप्राय व्यक्त केला आहे.

प्राचीन काळापासून ब्रिटीश राजवटीपर्यंतच्या स्त्रीजीवनाचा आढावा घेऊन त्याच्या उत्कर्षापकर्षाची मीमांसा करणारा व भविष्यकालीन प्रगतीची दिशा दाखविण्याचा प्रयत्न करणारा ग्रंथ म्हणून प्रस्तुत शोधग्रंथाचा उल्लेख करता येईल.

वि. दा. वासमकर

**मराठीचा नाट्यसंसार : खांडेकर, वि. स. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, प्रथम आवृत्ती १९४५, दुसरी आवृत्ती १९७७.** १८५७ ते १९४५ अशा साधारण नव्वद वर्षांतील मराठी नाट्यसृष्टीचा परामर्श खांडेकरांनी या ग्रंथात घेतला आहे. सुमारे सव्वादोनशे पृष्ठांच्या या ग्रंथामध्ये तीन भाग पाडले असून पहिल्या भागात मराठी नाटकांच्या बहराच्या काळातील किर्लोस्कर, देवल, कोल्हटकर, खाडिलकर, गडकरी

आणि मामा वरेरकर यांच्या नाट्यकृतींचे आणि प्रयोगसाफल्याचे सोदाहरण विवरण आले असून दुसऱ्या भागात १९३५ ते १९४५ या दशकातील अत्रे, रांगणेकर, वरेरकर यांच्या नाटकांनी मराठी रंगभूमीला प्राप्त करून दिलेला विशेष लौकिक दृष्टोत्पत्तीस आणून दिला आहे. तर तिसऱ्या भागात १९५७ साली साताऱ्यात भरलेल्या नाट्यसंमेलनातील अध्यक्षीय भाषण आणि १९७९ च्या डॉ. भालेराव गौरव ग्रंथाच्या निमित्ताने लिहिलेला लेख यांचा समावेश केला आहे.

ग्रंथामध्ये खांडेकरांनी देवल इत्यादींच्या नाट्यतंत्राच्या खुळ्यांचे सोदाहरण विवेचन करताना त्यांच्यातला नाट्यवेडा प्रेक्षक नजरेआड केलेला दिसत नाही ते लेखनात पदोपदी आढळून येते. सुमारे नव्वद एक वर्षातील मराठी नाटककारांची व मराठी रंगभूमीची चिकित्सक मांडणी करून भविष्यातील मराठी नाटक आणि रंगभूमीविषयीची चिंता व चिंतन प्रकट करणारा ग्रंथ.

मोहन पाटील

**मराठीची कहाणी : नांदापूरकर, ना. गो. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९४७.** आद्यकवी मुकुंदराजापासून तुकारामापर्यंतच्या मराठी वाङ्मयाचे दर्शन या पुस्तकातील १५ कहाण्यातून मोठ्या वैशिष्ट्यपूर्ण भाषाशैलीत घडविले आहे. मराठी भाषा व वाङ्मय यांचा सर्वसामान्य परिचय रसाळ भाषेत वाचकांना करून दिला आहे. या कहाण्यांतून समाज प्रबोधन व ज्ञान या दोन्ही गोष्टी साधण्याच्या निमित्ताने आपल्या मायबोलीचा, मराठी भाषेचा जयजयकारच त्यांना येथे अभिप्रेत आहे. या कहाण्या मराठी सारस्वत संपन्न करणाऱ्या थोर संतांच्या आहेत. मराठी शारदेच्या मानसकन्यांचा सन्मान करणाऱ्या अशा आहेत.

विमल भालेराव

**मराठे आणि इंग्रज : केळकर, न. चिं. प्रकाशक : मॉडर्न बुक डेपो, पुणे, १९१८.** हे प्रबंधात्मक पुस्तक मान्यता पावलेले, लोकप्रिय पुस्तक आहे. ऐतिहासिक विवेचनात्मक अशा वाचनीय पुस्तकाचा आदर्श म्हणून या पुस्तकाचा निर्देश करावा लागेल. १९१८ साली मराठेशाहीच्या अस्ताला १०० वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने केळकरांनी प्रस्तुत ग्रंथ लिहिला. मराठे आणि इंग्रज या दोघा प्रतिस्पर्धी राज्यकर्त्यांच्या गुणावगुणांचे साधार, सुबोध आणि निर्भीडपणे विवेचन.

प्रस्तुत प्रबंधाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग असून प्रत्येक भागात पाच-पाच प्रकरणे आहेत. पहिला भाग मुख्यतः इतिहासाने व्यापलेला आहे, तर दुसऱ्याचे स्वरूप विवेचनात्मक आहे. समग्र ग्रंथ वाचनीय आणि विचारप्रवर्तक आहे. छत्रपती, पेशवे, त्यांचे सरदार किंबहुना भारतीय समाज इंग्रजांच्या तुलनेत कोणकोणत्या बाबतीत उणे पडला आणि इंग्रजांनी कोणत्या गुणांच्या जोरावर मराठ्यांवर मात केली याची केळकरकृत मीमांसा वाचकाला अंतर्मुख करणारी आहे. या ग्रंथाला वासुदेवशास्त्री खरे यांची प्रदीर्घ सडेतोड प्रस्तावना आहे.

म. श्री. दीक्षित

**मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष : रानडे, महादेव गोविंद. (भाषांतरकार : नरहर रघुनाथ फाटक), प्रकाशक : महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई १९६४.** मूळ ग्रंथ इंग्रजी भाषेत 'Rise of the Maratha Power' ('मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष' भाषांतरकार : आपटे, रामचंद्र मोरेश्वर आणि इनामदार, रामचंद्र नरसिंह. प्रकाशक : वि. गो. विजापूरकर, श्रीसमर्थ प्रसाद छापखाना, कोल्हापूर, प्रकाशन कालाचा उल्लेख नाही. आवृत्ती २ री, १९१२ 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष' भाषांतरकार : आपटे, रामचंद्र मोरेश्वर, इनामदार, रामचंद्र नरसिंह. प्रकाशक : शंकर नरहर जोशी, चित्रशाळा प्रेस, पुणे).

न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांनी एम.ए., एल. एल.बी. या पदव्या मिळविल्या होत्या. काही काळ ते इंग्रजी भाषेचे प्राध्यापक होते. नंतर त्यांनी नाशिक, पुणे, सातारा या शहरात न्यायाधीश म्हणून काम पाहिले. त्यांनी पुढे मुंबई उच्च न्यायालयातही न्यायाधीश म्हणून काम पाहिले. न्या. रानडे यांना महाराष्ट्रात सर्वमान्य अग्रेसरत्व लाभले होते. महाराष्ट्रातील समाजसुधारणेचे अग्रणी असा बहुमान त्यांना लाभला होता. मराठी भाषा, वाङ्मय आणि मराठ्यांचा इतिहास या विषयी त्यांनी अत्यंत मूलभूत अशा प्रकारचे लेखन केले आहे. राजनीतिज्ञ, अर्थशास्त्रज्ञ, वाङ्मयप्रेमी, विवेकी उदारमतवादी धर्मसुधारक असे हे महान व्यक्तिमत्त्व होते.

प्रस्तुत पुस्तक हे मराठ्यांच्या इतिहासासाठी अत्यंत महत्त्वाचे असे पुस्तक आहे. इंग्रज राज्यकर्त्यांना मराठ्यांचा खरा इतिहास कळावा म्हणून हा ग्रंथ त्यांनी इंग्रजी भाषेत लिहिला. आपली सर्व शक्ती बुद्धी त्यांनी या ग्रंथावर केंद्रित केली होती.

मराठा इतिहासाचे उत्तम तऱ्हेने केलेले तात्त्विक मूल्यमापन आणि निष्कर्ष या ग्रंथात आढळतात. सत्त्वाची जागृती, ऐक्य प्रवर्तक बुद्धी मराठी माणसात कशी होती याचे दर्शन त्यांनी या ग्रंथात घडविले आहे. प्रस्तुत काळात जितकी मराठा इतिहासावर साधने उपलब्ध आहेत. तितकी साधने न्यायमूर्तींच्या काळात उपलब्ध नव्हती, तरीही भावी इतिहासकार इतिहासकारांच्या समोर या ग्रंथाने त्यांनी एक प्रतिमा निर्माण केली आहे. 'एका ग्रंथातूनच नवनवीन ग्रंथांची निर्मिती होते' ही उक्ती त्यांनी सार्थ ठरविली आहे.

या ग्रंथात एकूण बारा प्रकरणे आहेत. पहिल्या प्रकरणातच या सर्व ग्रंथाचा सारांश त्यांनी दिला आहे. शेतीचे दृष्टान्त त्यांनी दिले असून, दुसऱ्या प्रकरणाचे नाव 'जमीन कशी तयार केली', तिसऱ्या प्रकरणाचे नाव 'बीज कसे पेरले?' अशी आहेत. दुसऱ्या प्रकरणांत 'महाराष्ट्रालाच स्वराज्य का साधलें' भौगोलिक अनुकूलता, समतोल समाजरचना, धार्मिक सहिष्णुता इत्यादी

विचार केला आहे. तिसऱ्या प्रकरणात मुसलमानी राज्ये, पोर्तुगीज इत्यादी हालहवाल असून, निजामशाहीतील श्रीमान शहाजी महाराजांची कामगिरी विशद केली आहे. चौथ्या प्रकरणांत शिवाजी महाराजांचे चारित्र्य (तिसऱ्या प्रकरणात शिवाजी महाराजांवर बालपणी झालेल्या संस्कारांची माहिती आहे.) त्यांचे सहकारी आणि मुसलमान समाजात हिंदू धर्माविषयी निर्माण होत असलेला आपलेपणा इत्यादी माहिती आहे. पाचव्या प्रकरणात शिवाजी महाराजांची कामगिरी, आदिलशहाशी झालेला संघर्ष, अफजलखान याचा वध ही माहिती आहे. सहाव्या प्रकरणांत महाराजांच्या मोगलांशी लढाया, शाहिस्तेखान-जयसिंग आणि आग्र्याहून सुटका या विषयीचे वर्णन येते. शिवाजी महाराजांच्या राज्यकारभारावरही या प्रकरणात विस्तृत विवेचन आहे. संतमहंताच्या कामगिरीचा परामर्श आठव्या प्रकरणात आहे. तसेच, रामदासानी 'महाराष्ट्र धर्म' हा शब्द का वापरला याची माहिती आहे. नवव्या प्रकरणांत श्रीसंभाजी महाराजांचा वध, राजाराम महाराजांचे जिंजीस प्रयाण व औरंगजेबासी युद्ध याचे वर्णन आहे. शाहू महाराजांची कैदेतून सुटका व बाळाजी विश्वनाथाच्या मदतीने राज्य उभारल्याची माहिती दहाव्या प्रकरणात आहे. अकरावे प्रकरण चौथाई, सरदेशमुखी या हक्कांचे तपशिलाने वर्णन आहे. बारावे प्रकरण मराठ्यांच्या दक्षिण भारतातील वसाहतीविषयक वृत्तान्ताचे आहे.

**मर्ढेकरांची कविता : मर्ढेकर, बाळ सीताराम. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९५९.** मर्ढेकरांच्या आधी प्रसिद्ध झालेल्या 'शिशिरागमन' (इ. स. १९३९), 'काही कविता' (१९४७), 'आणखी काही कविता' (१९५१) या तीन कवितासंग्रहातील कवितांबरोबरच उपलब्ध सर्व असंग्रहित कवितांचे संकलन. युगप्रवर्तक कवी म्हणून मर्ढेकरांचा कसा विकास होत गेला याचे स्पष्ट दर्शन या संग्रहात होते. 'शिशिरागमना'तील संकेतिक स्वरूपाच्या स्वच्छंदतावादाकडे झुकणाऱ्या, अनुकरणशील मुख्यतः प्रेमविषयक कवितांतही मर्ढेकरांतील श्रेष्ठ कवीचे बीजरूपाने दर्शन होते. काही कवितांमधील कवितात त्यांचा आत्मविश्वास, शब्दयोजनेची धिटाई, स्वप्नील प्रेमसृष्टीचा अभाव, तीव्र संवेदनक्षमता, सिनिसिझम, यंत्र-युगावरील अश्रद्ध भाष्य, आयुष्याचा विनातक्रार केलेला स्वीकार, संतश्रेष्ठ तुकारामाला साजेशी आर्तता, जिव्हाळा, श्रद्धा, करुणा, निवृत्तीपर आत्मचिंतन, करुणहास्य तसेच विडंबन यांचा वापर या गोष्टी विशेष आढळतात. 'काही कविता' प्रसिद्ध झाल्यानंतर मर्ढेकरांना नवकवींचे अग्रणी हे स्थान प्राप्त झाले. मर्ढेकर शब्दकळेची प्रस्थापना तेव्हापासून झाली.

मराठी कवितेला नवे वळण देणारा कवितासंग्रह या दृष्टीने महत्त्व.

**महापुरुष ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर (चरित्र व पत्रव्यवहार) : पारसनीस, द. बा. प्रकाशक : बाळाजी सखाराम आणि कंपनी, निर्णयसागर प्रेस, मुंबई, १९००.** ब्रह्मेंद्रस्वामी हे छत्रपती शाहू महाराज आणि पेशवे यांना गुरूतुल्य होते. पारसनीस यांना सातारा येथील राजघराण्यातील पत्रव्यवहार, धावडशी येथील व पिंपरी येथील दप्तरांमधील पत्रव्यवहार आणि अन्य कागदपत्रे उपलब्ध झाली व त्यातील ३७५ पत्रांचा उपयोग करून हे चरित्र लिहिले. स्वामींची गणना समर्थांच्या कोटीत करून पारसनीसांनी ब्रह्मेंद्रस्वामी हे राजकारण कुशल असे परमहंस साधू असल्याचे दाखविले आहे. पुढे वि. का. राजवाडे यांनी मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड ३ मध्ये त्यांना उपलब्ध झालेल्या कागदपत्रांवरून पारसनीसांचा दृष्टिकोनाबद्दल मतभेद दर्शविल्याचे आढळते.

भिमराव कुलकर्णी

**महापूर : चिंदरकर, वि. द. प्रकाशक : रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबई, १९४२.** 'महापूर' ही वि. द. चिंदरकरांनी लिहिलेली ग्रामजीवनाचे चित्रण असलेली कादंबरी आहे. 'महापूर' या शीर्षकाखाली "दक्षिण कोकणातील एका खेड्यातील काही दृश्ये" या शब्दांत आपल्या कादंबरीचे वैशिष्ट्य लेखकाने कंसात नमूद केले आहे. कोकणच्या पार्श्वभूमीवर साठ वर्षांपूर्वी लिहिलेल्या या कादंबरीचा निर्देश मराठीतील आरंभी लिहिलेल्या कादंबऱ्यांच्या संदर्भात आवर्जून केला जातो. लेखकाने म्हटल्याप्रमाणे वीस दृश्यांची मालिका आहे. 'महापूर'मध्ये मध्यवर्ती व्यक्तिरेखा महादेव ठाकूर ही आहे. महादेव ठाकूर लहानपणीच कोकणातले अनगाव नावाचे खेडे सोडून मुंबईस येतात. स्वकष्टावर शिकून वकील होतात. कोर्टात जात असताना एका इंग्रज सार्जंटने केलेल्या अपमानामुळे संतप्त होऊन वकिली सोडतात. कॉन्ट्रॅक्टरचा व्यवसाय सुरू करून अमाप पैसा मिळवितात. एकुलता एक मुलगा जगन्नाथ इंग्लंडला शिक्षण घ्यायला जातो. पत्नीचे आधीच निधन झालेले असते. १९३०च्या सुमारास महात्मा गांधींनी दिलेल्या आदेशानुसार समाजसेवा करण्याच्या हेतूने ते आपल्या गावी कोकणात येतात. जातिभेद, अज्ञान, गरिबांचे शोषण, आर्थिक विषमता अशा काही समस्यांची सोडवणूक करण्याचा ते प्रयत्न करतात. त्यांचा ध्येयवाद न पटलेली, दाजिबा कुलकर्णी फौजदार यांच्यासारखी माणसे ठाकूरांना विरोध करतात ; तर सुरबा चाकरमानी, अर्जुन महार, भगवान सुतार त्यांना सहकार्य देतात. महादेव ठाकूर यांच्या शाळा सुरू करणे, सुत कातणे, शिवाशिव नाहीशी करणे या कामात यश येत नाही. सर्व समस्या अधिकच तीव्र होतात. महादेव ठाकुरांच्या मुख्य कथानकाबरोबरच सुरबा चाकरमान्यांची मुलगी भागी व भगवान सुताराचे प्रेमप्रकरण आणि अर्जुन महाराच्या आंबेडकरी चळवळीत सहभागाची हकिकत अशी दोन उपकथानके कादंबरीत आहेत. विदेशातून आलेला जगन्नाथ आणि महादेव ठाकूर यांचे नदीला आलेल्या महापुराच्या पार्श्वभूमीवर खटकेबाज संभाषण होते. जगन्नाथला वडिलांचे आदर्शवादी विचार फारसे पटत नाहीत. "तुमच्यासारखी प्रयोग

करणारी माणसे आज आपल्या देशात असली पाहिजेत. उद्या देश स्वतंत्र झाला की, त्यांचे प्रयोग मार्गदर्शक झाल्यावाचून राहणार नाहीत", या शब्दांत जगन्नाथ वडिलांच्या ध्येयवादी भूमिकेला दुजोरा देतो. बेडकाला नेहमी गट्ट करणारा सर्प डोकीवर बसायला देऊन स्वतःसाठी जागा शोधत असल्याचे सर्वांना दिसते. या सूचक घटनेने कादंबरीचा शेवट होतो. आदर्शवाद, ध्येयवाद, तत्त्वनिष्ठा व गांधीवादी विचारसरणीचा पुरस्कार करणारी वि. द. चिंदरकर यांची 'महापूर' ही कांदबरी एक वाचनीय कादंबरी आहे.

वि. शं. चौघुले

**महाभारत : माधवस्वामी.** माधवस्वामींनी रचिलेले हे मराठी महाभारत ग्रंथाच्या नावाला साजेसे प्रचंड आहे. त्याची १८ नव्हे तर २१ पर्वे असून एकूण अध्यायसंख्या ९२६ आणि ओवीसंख्या ८८,२७४ म्हणजे सुमारे लाखाच्या घरात आहे. या प्रचंड महाकाव्याची रचना इ. स. १७०३ ते १७०७ अशी चार वर्षे चालू होती. त्यांच्या ४ संपूर्ण हस्तलिखित प्रती तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयात आहेत. आदिपर्वाच्या ५ ते ७ या तीन अध्यायांत या संपूर्ण भारताचा सारांश दिला आहे. आपण महाकाव्य रचीत आहो, याची जाण कवीला असून, त्याने आपल्या या महाभारताला 'विश्वकोश' म्हटले आहे. व्यक्तिचित्रण, वर्णने, संवाद यात त्याचा हातखंडा असून पुनरुक्ती व पाल्हाळ पुष्कळ असले तरी हे एकूण काव्य निःसंशय श्रवणीय झाले आहे. आपल्या विस्तृत व ऐसपैस रचनेचे समर्थन माधवस्वामींनी 'ओवीरामायणांत' केले आहे.

माधवस्वामींचे हे प्रचंड आणि पाल्हाळिक महाभारत संपूर्णपणे प्रसिद्ध होणे अशक्यप्राय आहे. परंतु त्यातील सुमारे २०० पृष्ठे भरतील एवढा निवडक भाग, व. वि. पारखे यांनी विस्तृत प्रस्तावनेसह छापून प्रसिद्ध केला आहे. (माधवस्वामींची आख्यानक कविता, सुनिता प्रकाशन, डोंबिवली, जि. ठाणे, १९७४).

शं. गो. तुळपुळे

**महाराष्ट्र काव्यदीपिका : पं. लक्षधीर.** महानुभव पंडित लक्षधीर यांचें पूर्वाश्रमीचे नाव बळराज आभरराव असे होतें. त्यांचा काळ १७ वे शतक (सु. शके-१५५३, इ. स. १६२१) हा असावा. ते भास्करभट्ट बोरीकर परंपरेतील होते. महानुभाव पंथीयांनी अनेक प्रकारचे साधनग्रंथ लिहिले. तशा प्रकारचा हा छंदशास्त्रविषयक छोटेखानी साधनग्रंथ असून त्याचे स्वरूप एखाद्या प्रकरणासारखे आहे. या प्रकरणात एकूण ५६ ओव्या आहेत. त्यात (पंथीय) कवींना मार्गदर्शन करण्यासाठी 'ओवी' या छंदाचे सोदाहरण विवेचन केले आहे. लघुचरणी, युक्ता, दीर्घा आणि अतिदीर्घा या प्रकरणांप्रमाणेच साडेतीन, चार, साडेचार आणि पाच चरणी ओव्यांचीही या प्रकरणात माहिती दिली आहे. या काव्याचे संपादक श्री. ह. ना. नेने यांनी 'संशोधनलेखसंग्रह' भाग-२ या आपल्या ग्रंथात केले आहे.

नजमा पठाण

**महाराष्ट्र धर्माचे प्रणेते : कै. पु. म. लाड, व्याख्यानमाला, पब्लिकेशन डिव्हिजन, आकाशवाणी, ६ मार्च १९५८, आकाशवाणी, मुंबई केंद्र.** संत तुकारामांच्या अभंगांचा धांडोळा घेऊन अभ्यासकवृत्तीने "श्रीतुकारामबावांच्या अभंगांची गाथा" (सरकारी प्रत) सिद्ध करणारे, जुन्या मुंबई सरकारचे चीफ सेक्रेटरी, संत वाङ्मयाचे गाढे अभ्यासक कै. पुरुषोत्तम मंगेश लाड यांच्या महान सेवेच्या स्मृतीप्रीत्यर्थ आकाशवाणी, मुंबई केंद्राने २४ मार्च १९५८ ते २९ मार्च १९५८ या कालावधीत, संत वाङ्मयावरील जी सहा महत्त्वपूर्ण व्याख्याने 'स्मारक व्याख्यानमाला' म्हणून प्रसारित केली त्यांचे संकलन करून हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यात आला आहे.

या ग्रंथामध्ये, प्रा. शं. दा. पेंडसे, प्रा. न. र. फाटक, प्रा. वि. भि. कोलते, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, डॉ. कमलाबाई देशपांडे या विद्वान वक्त्यांनी दिलेली संत ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास, संत कवयित्री इत्यादी महत्त्वाच्या संतांविषयी दिलेली अभ्यासपूर्ण भाषणे समाविष्ट असून " महाराष्ट्रातील संतांच्या कार्याचे यथार्थ मूल्यमापन " करणाऱ्या प्रा. ग. बा. सरदार यांच्या विचारप्रवर्तक व्याख्यानाने समारोप केलेला आहे.

मध्ययुगीन संतांची कामगिरी, त्यांचे वाङ्मयीन कार्य, त्यानिमित्ताने समाजात घडलेले सामाजिक व सांस्कृतिक प्रबोधन समजावून देणारा महत्त्वाचा ग्रंथ.

मोहन पाटील

**महाराष्ट्र प्रयोगचंद्रिका : व्यंकटमाधव.** 'महाराष्ट्र प्रयोग चंद्रिका' हा व्याकरण ग्रंथ असून तंजावरकडील व्यंकटमाधव हा त्याचा कर्ता आहे. लेखकाचा काळ अंदाजे इ. स. १८२७ असा आहे.

व्यंकटमाधव ह्यांनी हा व्याकरण ग्रंथ मुळात संस्कृत भाषेत लिहिला आहे. पाणिनींच्या धर्तीवर ग्रंथरचना केलेली असून पाणिनीप्रमाणेच सूत्रे रचलेली आहेत. त्या सूत्रांवर संस्कृतातून संक्षिप्त वृत्ती म्हणजे टीका आहे. तिच्याचखाली मराठी विवरण व उदाहरणे आणि त्यांचे स्पष्टीकरण मराठीतून केलेले आहे. सूत्रांतूनही मराठी शब्द आलेले आहेत. सूत्रांची संख्या २२७ असून सात गटात त्यांची विभागणी केलेली आहे.

व्यंकट माधवांसमोर प्रमाण मराठीची कल्पना असावी, असे वाटते. संधीचा विचार करताना, ग्रंथकाराने शब्दांच्या उच्चारांस अनुसरून मांडणी केलेली आहे. प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर यांनी प्रस्तुत ग्रंथ संपादित करून प्रसिद्ध केला आहे.

तु. शं. कुलकर्णी

**महाराष्ट्र भाषेचे व्याकरण : तर्खडकर, दादोबा पांडुरंग. प्रकाशक : टॉम्स ग्रेहाम प्रेस मुंबई, १८५७ (प. आ.).**

दादोबा पांडुरंग तर्खडकर यांचे 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' हे व्याकरणावरील पुस्तक १८३६ साली प्रसिद्ध झाले. १८३६ साली गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यात ही पहिली आवृत्ती शिळा छापावर छापली होती. बाळ गंगाधरशास्त्री जांभेकरांच्या शिफारशीवरून तिची दुसरी आवृत्ती १८५० साली प्रसिद्ध करण्यात आली. या व्याकरणग्रंथाच्या सातव्या आवृत्तीमध्ये बाळशास्त्री जांभेकरांच्या इंग्रजी अभिप्रायातील काही भाग तर्खडकरांनी समाविष्ट केला आहे. कारण मध्यंतरीच्या काळात प्रस्तुत ग्रंथावर बरीच टीका झाली होती. सहाव्या आवृत्तीत लेखकाने नवे नियम व नवी प्रकरणे समाविष्ट केली आहेत. आपल्या भाषेसंबंधीच्या कार्याविषयी सातव्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत तर्खडकरांनी म्हटले आहे.— "अलिकडेस मागल्या पंचवीस वर्षांपासून सर्व लोकांचा भर इंग्लिश भाषा शिकण्यात फार वाढत चालल्यामुळे स्वभाषेविषयी त्याच मानाने मोठी अनास्था वाढत चालली आहे ; ही उघड अत्यंत शोचनीय गोष्ट माझ्या दृष्टीपुढे असतां, हा असा स्वभाषा सुधारण्याविषयी व्यर्थ परिश्रम करणे हा माझा शुद्ध वेडेपणा आहे असे जरी मला हस्तामलकासारखे ढळढळीत दिसत आहे, तरी जीस मी जननीप्रमाणे मानितो, त्या आपल्या स्वभाषेची शेवटपर्यंत सेवा केल्यावाचून माझ्याने राहवत नाही." या व्याकरणावरील पुस्तकाची लेखकाने व्याकरणशास्त्राची व्याख्या आणि त्याचा उपयोग, २ वर्ण विचार, ३ शब्दविचार, ४ सांधित शब्द विचार, ५ कारकविचार, ६ वाक्यरचना, ७ लेखनपद्धती, ८ वाचनविचार, ९ व्याकरण पदच्छेद करणे—व्याकरण सांगणे या प्रकारे नऊ खंडात विभागणी केली आहे. इंग्रजी आमदानीच्या प्रारंभीच्या काळात जी व्याकरणविषयक पुस्तके मराठी व इंग्रजी भाषाभ्यासकांनी तयार केली त्यांत दादोबा पांडुरंग तर्खडकर यांचे 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' हे एक महत्वाचे पुस्तक आहे. म्हणून मराठी 'भाषेचे पाणिनी' ह्या शब्दांत त्यांचा गौरव केला जातो.

वि. शं. चौघुले

**महाराष्ट्र भाषेचे व्याकरण : फडके, गंगाधरशास्त्री. प्रकाशक : प्रेरा. यांचा छापखाना, आ. २री, मुंबई, १९३८.** अर्वाचीन मराठी भाषेचे हे आद्य व्याकरण होय. गंगाधरशास्त्री हे संस्कृत तज्ज्ञ असून इंग्रज सरकारने भारतातील देशी लोकांच्या शिक्षणासाठी स्थापन केलेल्या 'बॉम्बे नेटिव्ह स्कूल ॲण्ड स्कूल बुक सोसायटी' (ऑगस्ट १८२२) मध्ये प्रमुख पंडित म्हणून काम करीत होते. याच संस्थेत काम करणाऱ्या सर्वश्री क्रमवंत घरणने जन्हवेकर आदि पंडितांच्या सहकार्याने व कॅ. जॉर्ज जर्व्हिस यांच्या प्रेरणेने हे व्याकरण १८२५ च्या सुमारास रचण्यास सुरुवात झाली व १ जानेवारी १८३६ या दिवशी त्याची पहिली आवृत्ती सिद्ध झाली. या व्याकरणाच्या प्रस्तावनेत गंगाधरशास्त्रींनी व्याकरणरचनेचा विस्तृत इतिहास दिला असून तो मूलग्रामी व महत्वपूर्ण आहे. संस्कृत भाषेच्या आधाराने व पुणे प्रांतीची मराठी भाषा मुख्य मानून तयार केलेल्या या व्याकरणाचे पहिले स्वरूप गुरुशिष्यसंवादात्मक होते. तिसऱ्या आवृत्तीत हे स्वरूप बदलले गेले. या व्याकरणावर इंग्रजी भाषेचा परिणाम नाही, हे याचे वैशिष्ट्य होय. या व्याकरण ग्रंथात एकूण २२ प्रकरणे असून शब्द व त्याच्या जाती, लिंग, वचन, विशेषणे, सर्वनामे, क्रियापदे, अव्यये व वाक्यरचना अशा विषयांचा विचार आलेला आहे. प्रस्तावनेत गंगाधरशास्त्रींनी म्हटल्याप्रमाणे हे व्याकरण इतर देशी भाषांना आदर्श ठरले व १८४० मध्ये याचे गुजराथी भाषांतर प्रसिद्ध झाले. या व्याकरणाच्या एकूण चार आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या.

म. म. पेठे

**महाराष्ट्र शब्दकोश : संपादक : दाते, य. रा.; कर्वे, चि. ग.; चांदोरकर, आबा; दातार, चि. शं. प्रकाशक : महाराष्ट्र कोशमंडळ, पुणे १९३२ ते १९३८.** मराठीतील एकूणच शब्दकोशातील सर्वांत महत्त्वाचा प्रमाण, समावेशक शब्दकोश म्हणजे 'महाराष्ट्र शब्दकोश', हा मराठी-मराठी शब्दकोश होय. अनेक प्रकारच्या प्रतिकूल परिस्थितीत या कोशाचे काम हाती घेऊन संपादक-मंडळाने तो पुरा केला. याच्या सात खंडामध्ये-मिळुन एक लाखांवर शब्दांचे यात विवेचन आहे. माहितीपूर्ण, संशोधनात्मक, विवेचक प्रस्तावना हे या कोशाचे एक वैशिष्ट्य आहे. या सात विभागांना सात विस्तृत प्रस्तावना आहेत.

ज्ञानेश्वरपूर्व महानुभावीय वाङ्मयात आढळणारे शब्द, शाहिरी काव्यातील शब्द, ज्ञानेश्वर व त्यांच्या नंतरच्या काळातले संतकवी त्यांच्या काव्यात आढळणारे शब्द, ऐतिहासिक कागदपत्रे व बखरी यांतील शब्द, पंडित कवींच्या काव्यातील शब्द, तसेच अव्वल इंग्रजी अंमलातील व अर्वाचीन काळातील गद्य व पद्य ग्रंथातील शब्द या सर्वांचा संग्रह या कोशात केला आहे. तसेच वऱ्हाडी, नागपुरी, अहिराणी, कोंकणी इ. बोलीतील शब्द; सोनार, सुतार, लोहार, कृषी, वाणिज्य इ. व्यवसाय व व्यावसायिक यांच्याशी संबंधित शब्द, व्यवहारातील सर्व शब्द या सर्वांचा समावेश करण्याचा प्रयत्न या कोशात केलेला आहे. केवळ शुद्ध स्वरूपातीलच नाहीत, तर अपभ्रष्ट रूपाचाही येथे समावेश केलेला आहे. त्या दृष्टीने अभिजात शब्दांचाच समावेश करणे हे कोशाचे काम नसून "कोश म्हणजे केवळ भाषेतील शब्दांचा संग्रह असावा" हे मत स्वीकारले आहे.

या कोशात प्रथम शब्द, नंतर त्याचे व्याकरण, आवश्यक तेथे व्युत्पत्ती, विविध अर्थ आणि त्या शब्दांचा उपयोग असलेले साहित्यातील अवतरण एवढे दिले आहे.

सु. रा. चुनेकर

**महाराष्ट्र सारस्वत : भावे, विनायक लक्ष्मण. प्रथम आवृत्ती १८९८, प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन प्रा. लि., मुंबई, सहावी आवृत्ती १९८२. (पुरवणी : शं. गो. तुळपुळे, खंड-१ व खंड-२).** या सुप्रसिद्ध ग्रंथाची ९८ पृष्ठांची निबंधवजा पहिली आवृत्ती वि. गो. विजापूरकर यांच्या 'ग्रंथमाला' या मासिक

पुस्तकात इ. स. १८९८-९९मध्ये प्रसिद्ध झाली होती. प्राचीन मराठी वाङ्मयाचा धावता आढावा आणि तोही त्रोटक व प्राचीन पद्यासंदर्भात असे या ग्रंथाचे स्वरूप होते. १९१९ साली दुसरी आवृत्ती आणि १९२४ व १९२६ साली तिसरी आवृत्ती दोन भागांत प्रसिद्ध झाली. श्रीयुत भावे यांच्या मृत्यूनंतर या ग्रंथाच्या १९८२ पर्यंत आणखी तीन आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या. शेवटच्या तीनही आवृत्त्यांना डॉ. शं. गो. तुळपुळे यांची चिकित्सक पुरवणी जोडली आहे.

प्राचीन मराठी वाङ्मयाचे नवे नवे संशोधन प्रकाशात येत असून भिन्न भिन्न दृष्टिकोनातून लिहिलेले मराठी वाङ्मयाचे इतिहासपर ग्रंथ प्रकाशित होत असताही या ग्रंथाची उपयुक्तता आजही कमी झालेली नाही ; हे या ग्रंथाचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल.

मराठीच्या पूर्वपीठिकेपासून पेशवाई अखेरीच्या कवीपर्यंतचा मराठी वाङ्मयाचा एक हजार पृष्ठांचा इतिहास नव्या संशोधनाची जोड देत व सारस्वतकारांच्या कविकाव्यविषयक मतांस कोठेही धक्का न लावता पुरवणीकारांनी अभ्यासकांस उपलब्ध करून दिला त्याचेही मोल या ग्रंथामध्ये जाणवते.

मराठी वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांमध्ये, अध्यापकांत आणि वाङ्मयेतिहासाच्या संशोधकांत सर्वप्रिय असलेला ग्रंथ म्हणून ग्रंथाचा लौकिक.

मोहन पाटील

**महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी : सरदार, गं. बा. प्रकाशक : गं. बा. सरदार, पुणे १९४१.** गं. बा. सरदार हे समाजशास्त्रीय स्वरूपाचे चिंतन करणारे वैचारिक लेखक आहेत. 'अर्वाचीन गद्याची पूर्वपीठिका ' (१९३७) हा त्यांचा पहिला महत्वाचा ग्रंथ. त्यानंतर 'महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी' ह्या प्रस्तुत ग्रंथातील, चरित्रमाला महाराष्ट्र साहित्यपत्रिकेत क्रमशः प्रसिद्ध झाली.

प्रस्तुत ग्रंथात भाऊ महाजन, लोकहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी, जोतीराव फुले, विष्णुशास्त्री पंडित या लोकोत्तर समाज पुरुषांची चरित्रे संक्षिप्त रूपात सरदारांनी रेखाटली आहेत. या 'माला' पूर्वकालीन महापुरुषांच्या अलौकिक व्यक्तिमत्वाची व उज्ज्वल कार्याची लोकांना थोडी तरी कल्पना आणून द्यावी, हा सरदारांचा हे पुस्तक लिहिण्यामागचा हेतू आहे.

भाऊ महाजन (गोविंद विठ्ठल ऊर्फ भाऊ महाजन) हे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील निःस्पृह व विद्वान संपादक म्हणून ख्याती पावले होते. त्यांनी मराठी नियतकालिक वाङ्मयाचा पाया घातला हे सांगून सरदारांनी भाऊ महाजनांच्या प्रभाकर पत्राची सुरुवात व त्यातील भाऊ महाजनांच्या लेखांची चर्चा केली आहे. त्यानंतर या ग्रंथात लोकहितवादींचे चरित्र येते. लोकहितवादी हे 'महाराष्ट्रातील राष्ट्रवादाचे आद्य प्रवर्तक' आहेत असे सरदार म्हणतात. विष्णुबुवा ब्रह्मचारी (विष्णू भिकाजी गोखले) हे वैदिक संस्कृतीचे, हिंदू धर्माचे तडफदार व कुशल प्रचारक म्हणून त्यांच्या कार्याची माहिती नंतरच्या प्रकरणात येते. महात्मा जोतीबा फुले हे महाराष्ट्राचे पहिले कर्ते सुधारक कसे होते याचे तपशिलाने वर्णन 'ज्योतिराव फुले' या प्रकरणात येते. विष्णुशास्त्री पंडित हे आणखी एक महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी कसे आहेत, ते कर्ते सुधारक कसे आहेत या बरोबरच विष्णुशास्त्री पंडितांच्या ग्रंथांची यादीही सरदारांनी दिली आहे

रानडे, चिपळूणकरांच्या सार्वजनिक कार्याबद्दल सर्वांनाच आदर आहे. परंतु त्यांच्याही अगोदर अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत, यशापयशाची फिकीर न करता ज्यांनी समाजहितासाठी हाडाची काडे केली त्यांची उपेक्षा करणे मुळीच इष्ट नाही, असे सार्थ उद्‌गार सरदार काढतात.

'माला'पूर्व काळातील हे समाजसुधारक असले तरी त्यांच्या विचारांची आजच्या काळातही तितकीच आवश्यकता आहे. यासाठी प्रस्तुत ग्रंथांचे महत्त्व कालातील आहे.

वि. दा. वासमकर

**महाराष्ट्रीय ज्ञानकोश : संपादक : केतकर, श्री. व्यं. प्रकाशक : महाराष्ट्र ज्ञानकोश मंडळ, पुणे १९२० ते १९२७.** 'आंध्र-विज्ञानसर्वस्वाम' या तेलगू ज्ञानकोशाचे काम केतकरांनी जवळून पाहिले. त्यातून स्फूर्ती घेऊन ते ज्ञानकोशाच्या कार्याकडे वळले.

१९२० ते १९२७ या आठ वर्षांत तेवीस खंड काढून त्यांनी ज्ञानकोशा चे काम पूर्ण केले. 'ज्ञानकोशा'चे पहिले ५ खंड प्रस्तावना खंड आहेत.

'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' हा केवळ ज्ञानसंग्रह नव्हे तर, भाषिक, सांस्कृतिक, आर्थिक, राजकीय उत्थानाचे ते एक प्रधान साधन आहे, अशी केतकरांची धारणा आहे.

परकीय शासन, आर्थिक भरभक्कम पाठिंबा नाही अशा स्थितीत एक व्यक्ती राष्ट्रीय निष्ठा, व्यापक दृष्टी यांच्या बळावर केवढे प्रचंड कार्य करू शकते. एक अतूट दीर्घजीवी परंपरा निर्माण करू शकते याचे डॉ. केतकरांचा 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' हे उज्ज्वल उदाहरण आहे. 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'ने महाराष्ट्रात कोशकारांची परंपरा उभी केली.

सु. रा. चुनेकर

**माईसाहेब : कुलकर्णी, ना. वि. प्रकाशक : बलवंत प्रकाशन, मुंबई, १९२१.** ना. वि. कुलकर्णी यांना 'माईसाहेब'ने एक यशस्वी नाटककार म्हणून स्थान मिळवून दिले. सावत्र आईच्या जाचामुळे अगतिक बनलेली उत्तम आणि कमला ही भावंडे आणि यातून त्यांची युक्तीने सुटका करणारा अमृतमामा यांची ही कहाणी. सावत्र आई माईसाहेब आणि तिच्या शहाला काटशह देणारा अमृतमामा हेच या नाटकाचे आधारस्तंभ. व्यक्तिचित्रणाच्या दृष्टीने माई, अमृतमामा आणि पाताळयंत्री केशव यांचे चित्रण ठीक. बाळबोध पद्धतीची आणि बांधेसूदपणाचा अभाव असलेली रचना हा लेखनातील दोष. सावत्रपणाच्या छायेखाली असलेले घर आणि देश दोन्ही सुखाने नांदू शकत नाहीत हे अमृतमामाचे स्वगत तत्कालीन वातावरणाशी जुळणारे असेच आहे.

वसंत नरहर कुबेर

**माचीवरचा बुधा : दांडेकर, गो. नी. प्रकाशक : मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई, पहिली आवृत्ती १९५१, द्वितीय आवृत्ती नोव्हेंबर १९७०.** लेखकाला असलेल्या निसर्ग ओढीचे दर्शन या कादंबरीतून घडते ; निसर्गच प्रमुख पात्र बनला आहे. संपूर्ण आयुष्य मुंबईसारख्या महानगरात घालवून—निसर्गाची हाक ऐकून तो अस्वस्थ होतो. त्याला अस्वस्थ करणारी मातीची हाक इतकी जबरदस्त की—प्रेमळ मुलगा, सेवाशीलवृत्तीची सून, सुखात दिवस घालवता येण्यासारखी परिस्थिती हे सर्व झुगारून त्याला आईच्या कुशीत जावं असं वाटू लागंत-अन् बुधा आपल्या गावी येतो. आपुलकीच्या आत्मविश्वात बुधा मोहरतो. श्रम करू लागतो. अधू दृष्टीच्या बुधाची दृष्टी ठाकराच्या निसर्गातील झाडपाल्याने सुधारते. निसर्गातील पशु-पक्षी यांच्या सानिध्यात दिवस जातात. सर्वच प्राण्यांविषयी बुधाच्या मनात सहानुभूती. निसर्गाच्या सानिध्यात, संवेदनशील बुधा हरवून जातो. बुधा मातीच्या सेवेतच मरतो. निसर्गाच्या विविध रूपांतून बुधाचे जीवन समृद्ध आत्मिक अनुभूतीनं संपन्न बनते.

निसर्गाशी तन्मय झालेल्या माणसाचं व्यक्तिमत्त्व रेखाटणे ही अवघड गोष्ट. पण यात दांडेकर यशस्वी झाले आहेत. निसर्गाच्या सहवासाची ओढ असणारा बुधा माणसांच्या सहवासालाही भुकेला होता. निसर्ग ओढीतून लिहिली गेलेली ही कादंबरी वाचनीय.

भरतेश्वर पाटील

**माझा प्रवास अथवा १८५७ सालच्या बंडाची हकिकत : गोडसे, (वरसईकर), विष्णुभट बिन बाळकृष्णभट. संपादक : चिंतामण विनायक वैद्य, प्रकाशक : दामोदर सावळाराम आणि मंडळी, मुंबई १९०७, आवृत्ती २री, भा. इ. सं मंडळ, १९६८.** अलिबाग जिल्ह्यात, पेण तालुक्यातील वरसई गावचे विष्णुभट गोडसे आपले काका रामभट यांच्यासह, स्वतःच्या व बंधूच्या लग्नकार्यामुळे कुटुंबावर झालेल्या कर्जाचा भार मोठ्या यज्ञकार्याच्यायोगे द्रव्यलाभ मिळवून हलका करावा या आशेने हिंदुस्थानात (उत्तरेत) जातात. ग्वाल्हेरच्या बायजाबाई शिंदे यांनी आरंभलेल्या सर्वतोमुखी यज्ञाकरिता गेलेले उभयता काका-पुतणे उत्तरेत अचानक उसळलेल्या १८५७ च्या बंडाच्या धामधूमीत सापडतात. द्रव्यलाभ दूरच पण पुढे इंग्रजांशी युद्धाच्या भयंकर वणव्यात सापडून कसेबसे प्राणावरील संकट निभावून दक्षिणेत येतात त्याची रोमहर्षक प्रवासकहाणी गोडसे भटजींनी या ग्रंथात सांगितली आहे.

कादंबरी, प्रवासवर्णन, आत्मचरित्र अशा कोणत्याच रूढ वाङ्मयप्रकारात या ग्रंथाचे स्वरूप चपखलपणे बसवता येत नाही, हेच या लेखनाचे मोठे वैशिष्ट्य आहे. या लेखनाला १८५७ च्या बंडाची, झाशीच्या निर्णायक लढाईची विस्तृत अशी चक्षुर्वैसत्यंम पृष्ठभूमी लाभल्याने ग्रंथास एक व्यापक ऐतिहासिक मूल्य प्राप्त झाले आहे. ही हकिकत गोडसे भटजींकडून लिहवून घेऊन ती जगासमोर आणण्याचे पुण्यकार्य पदरी बांधणारे कै. चिं. वि. वैद्य यांनी ग्रंथास 'सत्तावन सालच्या बंडाची बखर'या नावाने संबोधले आहे.

लेखकाची भाषा बखरीच्या वळणाने जाणारी व दार्शनिक आहे. साजिवंत व्यक्तिचित्रणे, प्रसंगचित्रणातले बारकावे, माहितगार, जिज्ञासू वृत्तीने टिपलेली जीवनरहस्ये, स्थलवैशिष्ट्ये, कालमानाचा विचार आणि धार्मिक, आध्यात्मिक वृत्ती ही या ग्रंथाची वैशिष्ट्ये. अव्वल इंग्रजीच्या काळातील मराठी प्रवासचित्रणपर ग्रंथ म्हणून हे लेखन महत्त्वाचे आहे.

मोहन पाटील

**माझा संगीत-व्यासंग : टेंबे, गोविंद स. प्रकाशक : किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी, आवृत्ती, १९३९.** थोर संगीतकार आणि नाटककार गोविंदराव टेंबे यांच्या संगीतकलेचा परिचय करून देणारा ग्रंथ. गोविंदरावांना अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत संगीताचा व्यासंग करावा लागला. कै. पांडोबा वस्ताद, वाईकर मंडळी यांच्यामुळे संगीताविषयी गोडी वाढली. प्रारंभी केदारलिंग प्रासादिक मेळ्यातही त्यांनी हजेरी लावली. ग्रंथात आपल्या संगीतव्यासंगाच्या निमित्ताने, देवल क्लबचे संस्थापक केशव बळवंत देवल, रहिमतखाँ साहेब, वस्ताद फैज महंमद खान, बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर, कृष्णराव मोरे, विष्णू दिगंबर पलुस्कर इ. संगीत क्षेत्रातील दिग्गज व्यक्तिंची गायकी, व्यासंग आणि अंतरंग उलघडून दाखवले आहेत. कलेच्या उपासना मार्गावर भेटलेल्या व्यक्ती आणि संस्था यांचा उत्तम परिचय करून देणारा भारतीय संगीत क्षेत्रातील एका महत्त्वाच्या संगीतकाराच्या संगीत-अभ्यास दर्शविणारा संग्राह्य ग्रंथ.

मोहन पाटील

**माझी जन्मठेप : सावरकर, वि. दा. प्रकाशक : सारस्वत प्रिंटिंग ॲण्ड पब्लिशिंग कंपनी, मुंबई, १९२७.** स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर यांचा आत्मचरित्रपर ग्रंथ. अंदमानच्या कारागृहात सावरकरांनी दहा वर्षे जे कष्टप्रद जीवन दुर्दम्य आत्मबलाच्या जोरावर भोगले त्या जीवनाचे करुणोदात्त, स्फूर्तिप्रद दर्शन या आत्मचरित्रपर ग्रंथात आहे. सशस्त्र क्रांतिकारकांच्या हालअपेष्टांची ही प्रेरणादायी कहाणी ग्रंथ-रूपाने प्रसिद्ध होताच इंग्रजी शासनाने ती जप्त केली. पण पुढे खेर मंत्रिमंडळाने जप्ती उठविली आणि १९४७ मध्ये मुंबईच्या परचुरे-पुराणिक आणि मंडळीने त्याची द्वितीयावृत्ती काढली. कालांतराने समग्र सावरकर साहित्यात हा ग्रंथ समाविष्ट झाला. १९६८ मध्ये बाळ सावरकरांनी या ग्रंथाची संस्कारित-संपादित काढलेली आवृत्ती अभ्यासकांना विशेष उपयुक्त आहे. सावरकरांच्या अंगची सारी गुणाढ्यता 'माझी जन्मठेप'या ग्रंथात फुलून आली आहे. त्यांची उत्कट देशभक्ती, कविमन,

आव्हानात्मक बुद्धिवाद, समाजसुधारणेची आणि संघटनेची कळकळ आणि या सर्वांपेक्षाही प्रखर विचारगर्भता इ. गुणांचा प्रत्यय येऊन वाचक भारावून जातो. 'मराठी वाङ्मयाचे लेणे' अशा शब्दांत काका कालेलकरांनी या ग्रंथाचा गौरव केला आहे.

म. श्री. दीक्षित

**माझी जीवनकथा : देशपांडे, गंगाधरराव. प्रकाशक : मौज प्रकाशन, मुंबई, १९६०.** उत्तर कर्नाटकात सामाजिक, राजकीय जागृती व संघटना करणारे गंगाधरराव देशपांडे यांचे आत्मचरित्र. १९व्या शतकाचा उत्तरार्ध व विसाव्या शतकाच्या पुर्वार्धातील रूढी, चालीरीती, सामाजिक-राजकीय घडामोडी यांचे दर्शन यात घडते. पुराणपंथीय कानडी कुटुंबातून येऊन समतावादापर्यंतचा लेखकाचा प्रवास, त्यांचे टिळक-युगातील कार्य, क्रांतिकारकांशी संबंध, नंतर असहकारितेच्या चळवळीतील सहभाग असा व्यापक जीवनपट असल्यामुळे त्या युगाचे, तत्कालीन घटनांचे यथातथ्य दर्शन यात घडते.

ऊर्मीला दळवी

**माझे पुराण : कर्वे, आनंदीबाई. प्रकाशक : केशव भिकाजी ढवळे, गिरगाव, मुंबई. प्र. आ. जून, १९४४.** ११ मार्च १८८९ साली पंडिता रमाबाईंनी शारदासदन ही मुलींची शाळा उघडली. त्या शाळेची पहिली विद्यार्थीनी म्हणजे आनंदीबाई कर्वे या होत. 'माझे पुराण' या आठवणींपर आत्मकथनात त्यांनी निरलसपणे आपल्या आठवणी व अनुभव सांगितले आहेत. 'माझे पुराण'मधील 'बालपण' या प्रारंभीच्या प्रकरणातच '.... आपल्या आयुष्यातील काही गोष्टी लिहून काढल्यास वाचनीय होतील, असे माझ्याही मनात आले म्हणून हे लिहित आहे' असा भूमिकेविषयी स्पष्ट खुलासा केलेला आढळतो.

बाया कर्वेचा प्रथम विवाह देवरूख येथील नातूंशी झाला. नातू जमीनदार घराणे, शेतकरी. लग्न लहानपणी झालेले. पतीचा पुरता परिचय नाही. अशा स्थितीत नातूंचे निधन. पण बायांची सासू प्रेमळ. तिने बायांना मुलगा मानले आणि सासरीच वाढवले. परंतु पुढे बाया कर्वेना आपण 'विधवा' आहोत हे समज आल्यावर कळले. मग केशवपनाचा भयंकर अनुभव. बाया म्हणतात- "लहानपणी नवरा मेल्यामुळे मला त्याचे दु:ख झाले नाही. विधवापणाची खरी जाणीव मला त्या दिवशी झाली." हिंदू स्त्रीच्या वाट्याला आलेल्या त्या वेळच्या अघोरी चालीचा मनावर झालेला परिणाम त्यांनी तितक्याच तीव्रतेने मांडला आहे. प्रकरणा प्रकरणातून आयुष्यातील अनुभव सांगताना बाया कर्वेनी दाखवलेली तटस्थवृत्ती लक्षात भरते.

११ मार्च १८८३ रोजी आनंदीबाईंचा महर्षी धोंडो केशव कर्वेशी पुनर्विवाह झाला. आणि कर्व्यांच्या कार्यात त्या सहभागी झाल्या. दयाभावना, निराच्छवृत्ती या गुणांनी ही आत्मकहाणी वाचकांच्या मनाचा वेध घेते. ८० पृष्ठांच्या या छोट्या आत्मपर पुस्तकास 'नमन' या शीर्षकाखाली सौ. कावेरी कर्वे यांची प्रस्तावना आहे. महर्षी कर्वेसारख्या महत्त्वाच्या व्यक्तीच्या सहचारिणीने लिहिलेले आत्मकथन म्हणून ग्रंथाचे आकर्षण आहेच त्याखेरीज तत्कालीन जागृत स्त्रीची मानसिकता समजून घेण्यासही या ग्रंथाची अधिक उपयुक्तता वाटते.

मोहन पाटील

**माझे रामायण : तुळजापूरकर, दत्तो अप्पाजी. प्रकाशक : दत्तो अप्पाजी तुळजापूरकर, मुंबई, पहिली आवृत्ती १९२७.** तत्कालीन कादंबरी जगतात गाजलेली 'सर्ग' रूपात लिहिलेली तुळजापूरकरांची ही एकुलती एक कादंबरी.

या कादंबरीत उषाताई देशपांडे नावाच्या एका सुशिक्षित स्त्रीची आत्मकथा आहे. १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धापासून जालीयनवाला बागेच्या हत्याकांडापर्यंतच्या प्रदीर्घ कालखंडातील प्रमुख व्यक्ती आणि प्रसंग यांचे चित्रण या कादंबरीत आले आहे. तत्कालीन राजकीय, धार्मिक, सामाजिक अशा विविध घटनांचे सविस्तर वर्णन तुळजापूरकरांनी केले असून फलज्योतिष, ग्रामसुधारणा, गृहव्यवस्था, संस्थानातील कारभार, हिंदी स्त्रीयांची सुधारणा, आदर्श मासिकांची योजना, सॉलिसिटर लोकांच्या धंद्याचे स्वरूप, हिंदूधर्म, चापेकर बंधू, रॉलट ॲक्ट इ. अनेकविध प्रश्नांची सविस्तर चर्चाही केलेली आहे.

या कादंबरीत पत्र, संवाद, निवेदन या कथनपद्धतीचा कादंबरीकाराने उपयोग केला असून ५९२ पृष्ठांच्या या कादंबरीला 'अवाढव्य इतिहास प्रसिद्ध वाडा' असेही संबोधण्यात आले आहे.

यशवंत चव्हाण

**माझ्या आठवणी व अनुभव : शिंदे, विठ्ठल रामजी. प्रकाशक : वत्सला साहित्य प्रकाशन संस्था, पुणे, १९४० (पूर्वार्ध १८७३-१९०३) १९४४ (भाग-२रा-१९०३-१९१०) १९९९ आवृत्ती, शाश्वत साहित्यमाला, शुभदा सारस्वत प्रकाशन, पुणे-२.** विसाव्या शतकातील अव्वल दर्जाचे सच्चे समाजसुधारक, समतोल विचारवंत, अस्पृश्योद्धारक महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या चरित्राचा, चारित्र्याचा, त्यांच्या उत्तुंग सामाजिक कार्याचा मनावर ठसा उमटवणारा प्रांजळ आठवणींचा हा ग्रंथ आहे. भारतातील अस्पृश्यतेचा प्रश्न वारंवार मांडून राष्ट्रीय सभेच्या माध्यमातून त्याला राष्ट्रीय महत्त्वाच्या प्रश्नाचे स्वरूप प्राप्त करून देण्याची कामगिरी महर्षी शिंदे यांनी पार पाडली तरीही ते महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी ठरले याविषयीची खंत अनेक विचारवंत पुन:पुन: प्रकट करतात.

महर्षी शिंदे यांनी लिहिलेला हा ग्रंथ प्रथम वत्सला प्रकाशन संस्थेच्या ज. बा. जगताप यांनी प्रकाशित केला. आता शाश्वत साहित्य मालेमार्फत तो उत्कृष्ट बांधणीसह व डॉ. आनंद यादव यांच्या विस्तृत प्रस्तावनेसह नव्याने प्रकाशात आला आहे. सुमारे साडेचारशे पृष्ठांच्या या चरित्रग्रंथास आधीच्या प्रथम आवृत्तीची कै. यशवंतराव चव्हाण यांनी लिहिलेली आदरांजली व डॉ. वि. भि. कोलते यांची चिकित्सक प्रस्तावना जोडली असून, ग्रंथछपाई सुबक आहे.

ग्रंथात महर्षी शिंदे यांनी आपल्या कुटुंब परिवाराच्या त्यातूनही मातोश्री यमुनाबाई यांच्या सहृद्य आठवणी समरसतेने सांगितल्या आहेत. आपले प्राथमिक, माध्यमिक, महाविद्यालयीन शिक्षण, आरंभीची धर्मसेवा, भारतीय निराश्रित साह्यकारी मंडळींचा तपशीलवार वृत्तांत या बाबींना लेखनात विस्तृत स्थान दिलेले आढळते. धर्म आणि समाज यांजविषयी समतोल भूमिका घेऊन अस्पृश्यांचे उन्नयन करण्याची ठाम भूमिका महर्षी शिंदे यांनी स्वीकारली होती. ती व्यापकही होती. परंतु या आठवणीपर ग्रंथात लेखकाचा त्या संदर्भातील कोणताही पवित्रा नाही.

समाजकार्यातील खडतर प्रवास, अवहेलना, धमक्या इत्यादी तपशील ग्रंथात तटस्थपणे जसाच्या तसा आला असून महर्षी शिंदेंनी त्या विषयीची कटुता वाढवलेली नाही. प्रार्थना समाजाच्या द्वारे ब्राह्म धर्माचा प्रचार आणि अस्पृश्यता निवारण ही महर्षींच्या कार्याची प्रमुख अंगे उलघडून दाखविणारा एक सामाजिक दस्तऐवज म्हणून संग्राह्य ग्रंथ.

मोहन पाटील

**माणदेशी माणसं : माडगूळकर, व्यंकटेश. कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, ऑगस्ट, १९४९, चौथी आवृत्ती, ऑगस्ट, १९५९.** मराठी ग्रामीण कथाविश्वाला बळ देणारी कथा व्यंकटेश माडगूळकरांनी लिहिली. त्यांची कथा माणदेशच्या अस्सल कसदार मातीतून निर्माण झाली आहे. या मातीवरच तिचा पिंड पोसला आहे. या मातीतल्या माणसांच्या कथा 'माणदेशी माणसं'या कथांमधून प्रकट होणाऱ्या, ग्रामीण जीवनविश्वाचा परीघ लहान असला तरी विलक्षण संपन्न आहे ; वैचित्र्यपूर्ण आहे. त्यात अनेक प्रकारची माणसे येतात. अनेक घटना घडतात. या संग्रहात सोळा व्यक्तिरेखा आहेत. लेखक सुखदु:खाचे दर्शन भावनाविवश न होता करतात. माणदेशच्या परिसरातील व्यक्तींचे दारिद्र्य, त्यांचा भोळेपणा, त्यांची कणखरवृत्ती, त्यांचा अडाणीपणा व विकारसुलभता, त्यांच्या समजुती व त्यांच्या मनात दडून राहिलेला मानवतेचा अंश या सर्वांचे दर्शन या कथाविश्वात होते.

'बकऱ्यावानी पाला पाचोळा' खाऊन जगणारा धर्मा रामोशी, 'जलमभर असंच दळिंद्री राहून अमी मसणवटाला जायचं' असे आर्ततेचे उद्‌गार काढून देवाला जाब विचारणारा रामा मैलकुली, दारिद्र्यामुळे धरफोडीच्या मोहात फसून माणसांतून व समाजातून उठलेला शिवा माळी व दारिद्र्याने खचून गेलेला, देणेकऱ्यांची तोंडे चुकवीत गल्ली बोळाने कचेरीकडे जाणारा व बायकोचे दुर्वर्तन नजरेस पडताच अफू खाऊन जीव देऊ पाहणारा, पण मुलांसाठी मला जगवा म्हणणारा रघू कारकून, उद्दाम कोंडिबा गायकवाड, बेरकी मुर्दाड शिदा चांभार, 'मी वेडा हाय काय ?' असं दीनपणे विचारणारा मुलाण्याचा बकस, इत्यादींची व्यक्तिचित्रे स्वभाववैशिष्ट्यांसह जिवंतपणे वाचकांसमोर साकारतात.

भरतेश्वर पाटील

**माणसांच्या गोष्टी : अग्निहोत्री, अंबादास. प्रकाशक : मौज प्रकाशन, मुंबई, १९५६.** या कथासंग्रहात एकूण २५ कथा आहेत. कथामाध्यमातून व्यक्तिचित्रे रेखाटन हे या संग्रहाचे वैशिष्ट्य. निवडक प्रसंगातून माणसांच्या गमतीदार गोष्टी ते सहजपणे सांगतात. आबांचा मुलगा नारायण, दत्तूचे काका, आजोबांची महाद्वाड दत्तक बहीण, माणसात जमा नसलेला ओगले, सुखदु:खाच्या झोक्यात सापडलेली आत्या, वेडा बाळकृष्ण, गांवभावजी, उगाचच दु:ख करीत बसणारे भाऊ, सात मुली झाल्यामुळे भांबाऊन गेलेले गोविंदराव, ह्या व्यक्तींच्या गोष्टी मनाला चटका लावणाऱ्या आहेत. साधी सोपी संवाद-प्रधान भाषा, मध्यमवर्गीय माणसांच्या जीवनातील अनुभवांचे चित्रण आणि आटोपशीरपणा यामुळे कथा वेधक झाल्या आहेत.

गं. बि. नेर्लेकर

**मालीच्या मूर्ती, मूळ हिंदी : बेनीपुरी, रामवृक्ष. मराठी अनुवाद : कर्णिक द्वा. भ. प्रकाशक : साहित्य अकादमीसाठी पॉप्युलर बुक डेपो, मुंबई-७, प्रथमावृत्ती १९५७.** हिंदी साहित्यामध्ये श्रेष्ठ शैलीकार म्हणून ज्यांचा लौकिक आहे ; त्या रामवृक्ष बेनीपुरी यांच्या 'माटी की मूर्ती' या गाजलेल्या पुस्तकाचा मराठी अनुवाद.

समाजवादी विचारांकडे ओढा असणाऱ्या बेनीपुरींनी प्रारंभीच्या काळात बालसाहित्यकार म्हणून कीर्ती मिळवली. नाट्य, चरित्र, वैचारिक लेखन अशा विविधस्वरूपी लेखनांतून राजकीय क्रांतीविषयीचे विचार प्रभावीपणे प्रकट केले. या सर्वांहून त्यांचा खरा परिचय उत्कृष्ट नाटककार आणि अद्‌भूत शब्दशिल्पकार म्हणूनच आहे. त्याचे प्रत्यंतर या ग्रंथात येते.

या संग्रहातील 'कानात चांदीची बाळी घालणारी, सदैव चैतन्याचे हसू हसणारी 'रझिया' बांगडीवाली आणि तिचे पवित्र निरागस प्रेम ; तसेच अबलेच्या रक्षणास धावून गेलेल्या शूर 'बलदेवसिंहाचे' क्षुद्र मरण ही व्यक्तिचित्रे हृदयाला चटका लावून जातात.' कथनकाराची भक्कम बैठक, ताजी टवटवीत भाषा, माणसाविषयी अपार करुणा या गुणांमुळे इतरही 'मंगर', 'परमेसर', 'बैजूमामा' अशी सगळीच व्यक्तिचित्रे सुंदर उतरली आहेत. माडगूळकरांच्या माणदेशी माणसांची आठवण करून देणाऱ्या या व्यक्तिचित्र संग्रहाचा मराठी अनुवाद अनुवादकांनी उत्कृष्ट केलेला आहे. या मूळ हिंदी भाषेतल्या कथा मराठी मनाला मराठीतल्या वाटतात.

मोहन पाटील

**माधवानुज : संपादक : मोडक, चिं. का. प्रकाशक : गणेश महादेव आणि कंपनी, मुंबई, १९२४.** कै. डॉ. काशिनाथ हरी मोडक ऊर्फ माधवानुज यांची कविता चिंतामण काशिनाथ मोडक यांनी संग्रहित करून प्रकाशात आणली. माधवानुजांच्या १२५ कवितांचा हा संग्रह. याला श्री. म. माटे यांची प्रस्तावना असून कवीचे संपूर्ण चरित्र सुरुवातीला जोडलेले आहे.

माधवानुजांची कविता प्रामुख्याने बोधपर आहे. निसर्गवर्णन, ऐतिहासिक प्रसंगांचे चित्रण, स्थलवर्णन, प्रासंगिक विषय असे त्यांच्या काव्याचे विषय. त्यांच्या 'दुष्काळ', 'दगड फोडतांना', 'गाय विकत देताना', 'थंडी' यासारख्या दुष्काळावर लिहिलेल्या कवितांतून येणारा सामाजिक आशय महत्त्वाचा आहे. 'दीपविसर्जन' व 'कृष्णाकोयना संगम' या त्यांच्या विशेष लोकप्रिय झालेल्या कविता होत. मायकेल दत्त यांच्या 'तारेची प्रणयपत्रिका' व 'शकुंतलेची प्रणयपत्रिका' या कवितांचा व रवींद्रनाथ टागोर यांच्या 'गीतांजली'चा केलेला स्वैर अनुवाद त्यांनी केला आहे. प्रसादपूर्ण भाषा, तत्त्वचिंतनाची आवड आणि बोधवादाची भूमिका हे त्यांच्या काव्याचे प्रमुख विशेष. केशवसुत कालखंडातील एका महत्त्वाच्या कवीचा संग्रह म्हणून ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचा.

म. ना. अदवंत

**मानसपूजा आणि इतर गोष्टी : कोल्हटकर, प्रभाकर श्रीपाद. प्रकाशक : गणेश महादेव आणि कंपनी, पुणे, १९२८.** या संग्रहात 'मानसपूजा', 'निष्प्रेम आयुष्य', 'कैद्यांची मुले', 'गरिबांची दुःखे' आणि 'समाजसेवक' अशा ५ गोष्टी आहेत. तत्कालीन सर्वसामान्य वाचकांच्या अभिरुचीचे रंगरूप काय असेल याचा अंदाज या गोष्टीसंग्रहावरून येतो.

१९२० नंतरच्या काळात तरुण स्त्री-पुरुषांच्या मनात जी नवी रोमॅन्टिक प्रेमभावना अंकुरित होत चालली होती, तिची स्फुट-अस्फुट दर्शने प्रस्तुत संग्रहात घडतात. बहुतेक गोष्टींना मुंबईतील मध्यमवर्गीय महाराष्ट्रीय वसतिस्थानांची पार्श्वभूमी लाभली आहे. पहिल्या महायुद्धानंतरच्या पांढरपेशा वर्गात जी विधी-गती या गोष्टींतून प्रकट होते, ती वास्तवपूर्ण उतरली आहे.

गो. म. कुलकर्णी

**मी : आपटे, हरी नारायण. प्रकाशक : सर्व्हिडिया प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९१६. पाचवी आवृत्ती, १९६५.** हरिभाऊंची ही ध्येयप्रवण सामाजिक कादंबरी. कादंबरीच्या प्रारंभी लेखकाची छोटेखानी प्रस्तावना आहे. तसेच प्रकाशकाचे 'दोन शब्द' व हरिभाऊंचे अल्पचरित्रही आहे.

हरिभाऊंनी सामाजिक कार्यकर्त्यांना कार्यप्रवण करणारी आपली 'मी' ही कादंबरी १८९५-९६ च्या सुमारास आपल्या 'करमणूक' पत्रातून क्रमशः प्रसिद्ध केली. नंतर ती १९१६ मध्ये पुस्तकरूपाने अवतरली. ही कादंबरी ७२ प्रकरणांत विभागली असून हिची पृष्ठसंख्या ४४८ इतकी आहे.

स्वहिताचा विचार न करता देशहित प्रधान मानावयास हवे, अविवाहित राहून तरुण पुरुषांनी देशासाठी तन-मन-धन समर्पण करावयास हवे, गावोगावी फिरून ज्ञानाचा सत्य विचारांचा प्रसार ध्येयवादी तरुणांनी करावयास हवा असा काहीसा नवा, प्रखर ध्येयवादाचा मार्ग हरिभाऊंच्या 'मी' या कादंबरीतील 'भावानंद'हा नायक चोखाळताना दिसतो. सुंदर व गुणी मुलीशी विवाह न करता भावानंद स्वदेश-सेवेसाठी ब्रह्मचर्यव्रताची शपथ घेतो, मठाची स्थापना करतो आणि अविरत श्रमाने अल्पवयात मृत्यू पावतो हे या कादंबरीचे कथानक.

कादंबरीतील पात्रसृष्टी मध्यमवर्गीय ब्राह्मण कुटुंबातील आहे. त्यामुळे या काळातील ब्राह्मण कुटुंबातील संस्कार, रूढी, परंपरा इत्यादींचे चित्रणही कथानकाच्या अनुषंगाने चित्रित झाले आहे. या कादंबरीतील 'सुंदरी'चे करुणरम्य दर्शन आजही वाचकांना अस्वस्थ करणारे आहे.

कादंबरीची भाषा पाल्हाळिक व अनेकदा विस्कळीत झाल्यासारखी वाटते. पण कथानकाचे सूत्र सुटलेले नाही. स्वभावरेखाटन, संवाद, वातावरण निर्मिती व वास्तवाचे पूर्ण भान हे कादंबरीचे मुख्य विशेष.

यशवंत चव्हाण

**मी कसा झालो ? : अत्रे, प्र. के. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४. आवृत्ती पहिली, ३० ऑगस्ट १९५३, आवृत्ती-आठवी, १३ ऑगस्ट १९९२.** प्रल्हाद केशव अत्रे महाराष्ट्रातील अष्टपैलू व्यक्तिमत्व 'मी कसा झालो ?' या आत्मचरित्रात्मक ग्रंथातून आपल्या विविध क्षेत्रातील कर्तबगारीचे आत्मगौरवात्मक शब्दात केलेली मांडणी मनोवेधक आहे.

'मी कसा झालो ?'मध्ये अत्रे यांनी आपल्या व्यक्तिमत्त्वातील विविध रूपांचे दर्शन घडविले आहे. कवी, विडंबनकार, विनोदीलेखक, शिक्षक, पत्रकार, पटकथाकार, नाटककार, वक्ता, राजकारणी इ. रूपातील आत्मपैलूंचे दर्शन घडविणारे हे वाङ्मयीन शोधन आहे.

अत्र्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि मनाचा खरा गाभा 'मी कोण आहे ?' या अखेरच्या प्रकरणात प्रकट होतो. हे प्रकरण विलक्षण संवेदनाक्षम आणि काव्यात्म बनले आहे. या प्रकरणामध्ये कृतज्ञतापूर्वक आपल्या भावना व्यक्त करताना एका हळव्या व्यक्तिमत्त्वाचे अनोखे दर्शन घडते. विविध क्षेत्रातील स्वतःच्या कामगिरीचा आढावा अत्यंत जिव्हाळ्याने, परखडपणे व तद्रूप होऊन अत्रे घेतात.

या आत्मचरित्रातून अत्रे यांच्या व्यक्तिमत्त्वाबरोबरच पुणे शहराचे सांस्कृतिक व्यक्तित्त्वही चांगल्या तऱ्हेने प्रकट झाले आहे.

या ग्रंथाला १९५३-५४ चे सरकारी पारितोषिकही मिळाले आहे.

भरतेश्वर पाटील

**मी घेतलेल्या मुलाखती (अथवा वादसंवादातील व्यक्तिदर्शने) : पर्वते, त्र्यं. वि. प्रकाशक : नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई, १९४०.** त्र्यं. वि. पर्वते यांनी विविध क्षेत्रांतील सुप्रसिद्ध व्यक्तींच्या घेतलेल्या मुलाखतींचा हा संग्रह. याच्या उपनामावरून व्यक्तिदर्शने घडविण्याचा लेखकाचा

मानस असावा, परंतु मुलाखत हा रिपोर्टिंगचा प्रकार मानून त्याविषयी प्रस्तावनेमध्ये लेखकाने चर्चा केली आहे.

या मुलाखती सादर करताना लेखकाचा भर व्यक्तीचे खाजगी जीवन दाखविण्यावर आहे. या मुलाखतींमध्ये व्यक्तींचे बाह्यवर्णन, स्वभावाचे चित्रण, आवडी-निवडी व थोडे कर्तृत्वदर्शन घडविले आहे.

वसंत नरहर कुबेर

**मीठभाकर : ठोकळ, गजानन लक्ष्मण. प्रकाशक : ठोकळ ग. ल., ठोकळ प्रकाशन, ६२, बुधवार, पुणे, पहिली आवृत्ती १९३८, चौथी आवृत्ती १९६०.** कथा, कादंबरीकार ग. ल. ठोकळ यांचा पहिला प्रादेशिक कवितांचा संग्रह. पहिल्या आवृत्तीचे मीठभाकर हे नाव बदलून मीठभाकरी हे संग्रहास नाव देण्यात आले. पहिल्या आवृत्तीत गट पाडून कविता छापल्या होत्या. या आवृत्तीत एकूण १०० कविता आहेत. त्यामध्ये ज्ञानपदगीत व सुनिता प्रकारची कविता आहे. तसेच वेगवेगळ्या छंदातील कविता व काही गझलही आहेत.

'मीठभाकर'मधील कविता ग्रामीण जीवनानुभवांचा वास्तवपूर्ण आविष्कार घडविते. आपण जे जगलो जे भोगले ते ग्रामजीवन कवितेतून आविष्कृत करावे या प्रेरणेतून ठोकळांची ग्रामीण कविता लिहलेली दिसते. कविने ग्रामीण माणसाला बोलते केले असून त्यांच्या 'लक्षुमी', 'मोटंवरलं गाणं', 'जात्यावरलं गाणं', 'गरिबाचा पाहुणचार', 'गरिबाचा संसार' यांसारख्या कविता लक्षणीय आहेत. मनःपूर्वक काव्यनिर्मितीच्या प्रयत्नात त्यांनी 'सुनिता' हा नवा रचना प्रकार शोधून प्रायोगिक मूल्य वाढवले आहे. त्यांच्या या काव्यप्रकारात सहा ओळींचे बंधन असून, पहिल्या चार ओळी पार्श्वभूमीसाठी व पाचव्या आणि सहाव्या ओळींमध्ये कलाटणी येते. या काव्यप्रकाराचे संस्कृत वाङ्मयातील सुभाषितांशी साम्य दिसते.

ठोकळांची ग्रामीण कविता इतरांच्या तुलनेत अधिक सच्ची आहे. ग्रामीण कवितेला मराठी वाङ्मयात स्वतंत्रपणे प्रस्थापित करणारा व तिला प्रतिष्ठा प्राप्त करून देणारा हा पहिला ग्रामीण कविता संग्रह या दृष्टीने महत्त्व.

यशवंत चव्हाण

**मुक्ता आणि इतर गोष्टी : शेळके, शांता ज. प्रकाशक : अनंत मोरेश्वर पुराणिक, पहिली आवृत्ती १९४४.** 'वर्षा', 'रूपसी', 'गोंदण' इ. काव्यसंग्रह प्रसिद्ध असलेल्या शांता शेळके यांचा हा लघुकथांचा संग्रह. या संग्रहाला श्री. म. मोटे यांची प्रस्तावना असून लेखिकेचे निवेदनही जोडले आहे.

संग्रहातील कथा विशिष्ट भावनांचा किंवा घटनांचा आविष्कार करण्याच्या हेतूने लिहिल्या गेलेल्या दिसतात. यातील 'वाढते वय'ही कथा 'यशवंत'च्या १९४४ च्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली होती. त्यांच्या या संग्रहात 'इंद्रधनुष्य', 'सूड', 'मुक्ता', 'रानझुडूप', 'पौर्णिमेचा उन्माद'या कथा समाविष्ट केल्या आहेत.

सामान्य स्त्रीविषयक अनुकंपा हे या कथांचे वैशिष्ट्ये असून भाषा काव्यात आहे.

यशवंत चव्हाण

**मुक्तात्मा : माडखोलकर, गजानन त्र्यंबक. प्रकाशक : मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई-४, पहिली आवृत्ती १९३३, चौथी आवृत्ती, १९७०.** 'मुक्तात्मा'ही माडखोलकरांची पहिली कादंबरी राजकीय आहे. या आवृत्तीला खुद्द लेखकाचे निवेदन असून ३४ प्रकरणांत विभागलेल्या या कादंबरीची पृष्ठसंख्या ३३४ इतकी आहे. निवेदनामध्ये लेखकाने या कादंबरीचे समकालीनांनी केलेले थंड स्वागत आणि तिच्यावर घेण्यात आलेल्या आक्षेपांचा आढावा घेऊन टीकाकारांचा प्रतिक्रियांचा थोडक्यात वेध घेतला आहे.

टिळकांच्या नंतरच्या कालखंडातील राजकारणाची चर्चा कादंबरीत कथानकाच्या ओघात आली आहे. जहाल-मवाळ, राष्ट्रीय-प्रागतिक, गांधींचे राजकारण व त्यांचे विरोधक, नवीन समाजवाद, इतिहास संशोधनात रमलेले पण देशभक्तांच्या गुप्त बातम्या सरकारला पुरविणारे रावबहादूर देशमुख अशा काही समकालीन राजकीय विचारांचा व व्यक्तीचित्रांचा निर्देश या कादंबरीत आहे.

तरुणपिढी व वडील पिढीच्या भिन्नरंगी जीवनप्रवाहाचे चित्रण करणे हाच या कादंबरीचा मुख्य हेतू दिसून येतो. साम्यवादाच्या भूमिकेवरून कादंबरीतील नायक चंद्रशेखर आर्थिक आणि सामाजिक समस्यांची चर्चा कादंबरीत आवेशाने करताना दृष्टीस पडतो. त्या समस्या काही अद्यापही सुटलेल्या नाहीत.

माडखोलकरांच्या संस्कृत साहित्याच्या अध्ययनाचा फार मोठा परिणाम कादंबरीतील भाषाशैलीवर जाणवतो. ऐतिहासिक आणि वैचारिक अशा दोन्ही दृष्टिंनी ही कादंबरी आजही नव्या पिढीला वाचनीय ठरावी.

यशवंत चव्हाण

**मुक्तामाला : हळबे, लक्ष्मण मोरेश्वरशास्त्री. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, प्र. आ. १८६९, ति. आ. १८७१, नववी आवृत्ती १९५९.** मराठी अद्‌भूतरम्य कादंबरीचे जनक असा लक्ष्मण शास्त्री यांचा लौकिक असून मुंबईच्या 'परमहंस' मंडळीत ते 'आस्थेवाईक' सदस्य होते. १८६२ मध्ये मुंबईत सुरू झालेल्या 'इंदुप्रकाश' पत्राच्या सुरुवातीच्या व्यवस्थापकांपैकीही ते एक होते. बडोद्याच्या खंडेराव महाराज गायकवाड यांचेकडून त्यांना वर्षासन सुरू होते. त्यांची दुसरी 'रत्नप्रभा' कादंबरीही लोकप्रिय ठरली.

'मुक्तामाला' या १४५ पृष्ठांच्या कादंबरीत, 'शांतवर्मा या जहांगिरदाराची कन्या मुक्तामाला हिचा विवाह राज्यातील दुय्यम प्रधान धनशंकर याच्याशी होतो. त्यामुळे शांतवर्माच्या जहागिरीवर डोळा ठेवून असलेल्या शुक्लाक्ष या शांतवर्माने सांभाळलेल्या तरुणाचा बेत फसतो. म्हणून तो गुप्तपणे मुक्तामालेचा नाश करण्याचा दुष्टावा सुरू करतो. अखेरीस

अनेक कपटकारस्थानातून व जीवावर बेतलेल्या प्रसंगातून योगायोगाने सुटून मुक्तामालेची धनशंकराशी भेट होते.' असा ढोबळ आशय घेऊन कमालीचे गुंतागुंतीचे आणि अद्‌भूतरम्य कथानक या कादंबरीत गुंफले आहे. संस्कृत वळणाची रचना शैली, ऐतिहासिक वातावरणाच्या छटा आणि तत्कालीन वर्तमानातील सामाजिक प्रश्न यांची सरमिसळ करून या कादंबरीच्या अद्‌भूताचे रसायन तयार झाले आहे.

कादंबरीतील बहुतेक घटना योगायोगावर किंवा अपघातावर आधारलेल्या असल्या तरी तत्कालीन अद्‌भूतरम्य कादंबरी जगतात, केवळ ऐतिहासिक क्रमानेच नव्हे तर गुणक्रमानेही अग्रपुजेचा मान या कादंबरीला मिळाला होता ; त्याचे सारे श्रेय कादंबरीच्या रचनातंत्राला द्यावे लागते. कादंबरीच्या १९५९ पर्यंत नऊ आवृत्त्या प्रसिद्ध झालेल्या आहेत.

मराठीतील पहिली अद्‌भूतरम्य कादंबरी म्हणून अभ्यासनीय.

मोहन पाटील

**मुखवटे : माडखोलकर, गजानन त्र्यंबक. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, पहिली आवृत्ती १९४०, दुसरी आवृत्ती, १९६१.** प्रियदर्शन व त्याचे पंडित सहकारी यांच्यामधील संघर्षाला लोकशाही व हुकुमशाही यातील विशाल संघर्षाचे स्वरूप देण्याचा प्रयत्न लेखकाने या राजकीय स्वरूपाच्या कादंबरीत केला असून गांधीयुगातच सत्य, अहिंसा व अंतःशुद्धी याचा कसा पद्धतशीर पाडाव होत आहे याचे प्रतिपादनही ओघाओघाने केलेले आढळते.

'कांता' कादंबरीतील कथानकाचा हा उत्तरार्ध आहे. या कादंबरीत प्रियदर्शनच्या प्रधानमंत्रिपदाच्या स्वीकारापासून त्यांच्या राजकीय मृत्यूपर्यंतचा भाग आला आहे. या कादंबरीचे कथानक मध्यप्रदेशात गाजलेल्या खरे प्रकरणावर आधारलेले आहे. तत्कालीन राजकीय परिस्थितीला या प्रकरणाने बराच हादरा बसला असला तरी तो मध्यप्रदेशापुरताच होता व त्या प्रकरणाच्या मुळाशी काही महत्त्वपूर्ण तत्त्वे असण्याऐवजी वैयक्तिक चुका, हेवेदावे व वैमनस्यच होते. यामुळे या कथेला केवळ एका कुटिल राजकारणी डावाच्या चित्रणाचे स्वरूप आले आहे.

माडखोलकरांचे राजकीय विचारमंथन दृष्टोत्पत्तीस आणून देणारी कादंबरी.

यशवंत चव्हाण

**मुद्राराक्षस नाट्यकथा : विशाखादत्त.** विशाखादत्त या संस्कृत नाटककाराच्या 'मुद्राराक्षस'नाटकातील कथानकाचा गाभा ऐतिहासिक घटनाधारित आहे. या कथानकातील घटनांचा सूत्रधार चाणक्य असून चंद्रगुप्ताच्या सर्व विरोधकांचा विनाश करणे आणि राक्षसाला चंद्रगुप्ताचे अमात्यपद स्वीकारायला भाग पाडणे हे त्याच्या डावपेचाचे उद्दिष्ट आहे. या नाटकाची कथा तंजावरच्या प्रतापसिंह भोसल्यांनी ७६५ ओव्यात निबद्ध केली आहे. संस्कृत नाटकांच्या कथा स्वभाषेत आणण्याचा त्यांचा हा प्रयत्न मराठीत पहिलाच आहे. या रूपांतराचे धोरण मुळाचे भाषांतर करणे हा आहे.

शं. गो. तुळपुळे

**मुंबईचे वर्णन : माडगावकर, गोविंद नारायण. प्रकाशक : इंदुप्रकाश छापखाना, मुंबई, प्रथम आवृत्ती १८६३.** भूगोलाचे पुस्तक म्हणून केलेले आणि मुंबईचा इतिहास सांगणारे खास पुस्तक. या पुस्तकास शिक्षण खात्याने त्या वेळचे प्रमुख हॉवर्डसाहेब यांची इंग्रजी प्रस्तावना जोडली असून दुसऱ्या आवृत्तीस न. र. फाटक यांची प्रस्तावना आहे.

ग्रंथात मुंबईच्या सामाजिक जीवनाची, विविध अंगांची पुरेशी माहिती असून अन्य माहितीनेही हा ग्रंथ सजलेला आहे. त्यामध्ये मुंबईतील स्थलवर्णन, तेथील लोक, न्यायखाते, लष्करी खाते, गर्व्हनर, पोर्तुगिजांच्या गोष्टी, रॉयल एशियाटिक सोसायटी, बॉम्बे असोसिएशन, इ. संस्था तसेच, टपालखाते, शाळा, ग्रंथालये, देवळे, मशिदी, यात्रा, उरूस, सण यांचीही माहिती दिली आहे.

विविध उद्योगधंदे, पारशी-मारवाडी समाज, त्यांतील कर्तृत्ववान व्यक्ती, विष्णुबाबा ब्रह्मचारी यांचाही परामर्श या ग्रंथात घेतलेला असून माहितीने विपुल असा दुर्मीळ ग्रंथ वाटतो.

लेखकाची चौकसबुद्धी, बहुश्रुतपणा, परिश्रम इत्यादी गुण या लेखनामागे स्पष्ट दिसून येतात. एक दुर्मीळ संग्राह्य ग्रंथ म्हणून या ग्रंथाची उपयुक्तता.

मोहन पाटील

**मूर्तिज्ञान : बाईदेवदास. संपादक : ह. वा. नेने, नागपूर, १९३६.** महानुभाव पंथीयांच्या नित्यपाठातील हे गद्य प्रकरण बाईदेवदासाच्या नावावर मोडते. प्रकरण आटोपशीर असून त्यात श्रीचक्रधरांच्या मूर्तीचे अवयव वर्णन व 'लीळाचरित्रा'तील त्या त्या अवयवासंबंधी आलेल्या लीळांचे उल्लेख आहेत. महानुभाव मतानुसार श्रीचक्रधर स्वामी म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वरावतार. मूळचा निरावयव व निराकार पण कृपावश. सावयव, साकार झालेला साहजिकच त्याने स्वीकारलेले 'मायापूर' म्हणजे मानवी शरीर, सर्वांगसुंदर आणि सर्वसमर्थ असणारच. त्यांचे हे भाविकपणाने केलेले वर्णन आहे.

शं. गो. तुळपुळे

**मृदगंध : करंदीकर, विंदा. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९५४.** 'स्वेदगंगा' (१९४९) या पहिल्या संग्रहात पुरेशी स्पष्ट नसलेली वैचारिकता व चिंतनात्मक प्रयोगशीलता कवीच्या या संग्रहात स्पष्टपणे जाणवते. त्यामुळे 'मृदगंध' हा करंदीकरांच्या कवितेच्या विकासक्रमातला एक महत्त्वपूर्ण टप्पा ठरतो. दुःखी, शोषित माणसाविषयीच्या सहानुभवातून निर्माण झालेली चीड व वेदना यामुळे करंदीकरांमध्ये सुरुवातीच्या काळात साम्यवादी तत्त्वज्ञानाचे आकर्षण होते, हेही 'मृदगंध'-

मधल्या 'माझ्या मना बन दगड', 'यंत्रावतार', 'ती जनता अमर आहे' यांसारख्या काही प्रसिद्ध कवितांवरून दिसते. 'ये यंत्रा, ये यंत्रा, संहारित नवदानव, निर्मित ये नवमानव, उद्‌घोषित नवमुल्ये, उद्‌घोषित क्रांतिपाठ — ॐ क्रांतिः, क्रांतिः, क्रांतिः' अशा ओळीतून त्याचप्रमाणे 'हे आईनस्टाईन' '$\sqrt{\;}$—,' अशा काही कवितातून प्रखर विज्ञाननिष्ठा दिसते.

'मृदगंध'मध्ये काही प्रेमकविता आहेत. 'स्त्री'त्वाचा शोध घेताना त्याचप्रमाणे लैंगिक इंद्रियानिष्ठ अनुभूतींचा, त्यातील गुंतागुंतीचा शोध घेताना त्याकडे समग्र जीवनानुभवाचा एक अपरिहार्य घटक म्हणून करंदीकर पाहतात.

वैचारिक व भावनिर्भर, चिंतनशील तरीही उत्कट व मर्ढेकर-प्रणीत नवकवितेला अनेक प्रकारे समृद्ध करणारी कविता 'मृदगंध'मध्ये आढळते. या दृष्टीने महत्त्वाचा कवितासंग्रह.

प्रभा गणोरकर

**मेंदी : संत, इंदिरा. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई. पहिली आवृत्ती १९५५.** स्त्री मनातील उत्कट, सूक्ष्म हळव्या भावनांना इंदिरा संतांनी शब्दरूप दिले. इंदिरा संतांची प्रतिभा अत्यंत तरल, सूक्ष्म आणि सर्वस्वी स्वतंत्र. त्यांची कविता सांप्रदायिक नाही. आपली वाट आपल्याच पद्धतीने आक्रमणारी कविता. 'दिवंगत पतीशी अखंड प्रेमसंवाद' करते. प्रीती व निसर्ग हे त्यांचे जिव्हाळ्याचे काव्यविषय. त्यांच्या कवितेतील निसर्ग बहुतेक प्रीतीच्या पार्श्वभूमीवर येतो.

मेंदी, दुःख तुझे, मोरपीस, शिकवलेस तू, कुब्जा, वाट पहाते, मृण्मयी यांसारख्या कविता मनात रेंगाळतात.

मृगजळ, रंगबावरी, बाहुल्या हे त्यांचे इतर काव्यसंग्रह.

भरतेश्वर पाटील

**मोचनगड : गुंजीकर, रा. भि. प्रकाशक : नॅशनल, मुंबई, पहिली आवृत्ती १८७१, चौथी आवृत्ती १९६५, प्रकाशक : स. कृ. पाध्ये, व्हीनस प्रकाशन, पुणे.** १८६७ पासून विविधज्ञानविस्तारातून ही कादंबरी प्रथम क्रमशः प्रसिद्ध झाली. ही मराठीतील पहिली ऐतिहासिक कादंबरी मानली जाते. प्रत्यक्षात क्रमशः सोळा प्रकरणांतील कादंबरीत ऐतिहासिक भाग थोडा असून कल्पित भागच पुष्कळ आहे. गुंजीकरांनी या लेखनाला 'कल्पित गोष्ट' हे नाव दिले होते.

मोचनगडमधील कल्पित एका विशिष्ट इतिहासकाळाशी संलग्न असून, शिवकाळातील एका विशिष्ट स्तबकाला जिवंत करण्यात कादंबरीकार यशस्वी झाला आहे. कादंबरीतील जामगावचा जुनावाडा, रात्री पिशाच्याच्या भीतीने लहान मुलांना दडपून निजवणाऱ्या आजीबाई, सटव्या शिलेदाराचे वर्णन व त्याची थट्टा, दरोडेखोराशी झटापट इ. प्रसंगांची वर्णने जुन्या काळाची आठवण करून देतात. यातील श्राद्ध वाढले, चोरा आधी मोट उचलणे यासारखे शब्दप्रयोग आज अपरिचित वाटणारे आहेत.

न्यायमूर्ती रानडे यांनी A Note on the growth of marathi literature (१८९८) या आपल्या निबंधात मराठी भाषेतील सर्वोत्कृष्ट दहा कादंबऱ्या म्हणून जे ग्रंथ पुढे केले आहेत त्यामध्ये गुंजीकरांची 'मोचनगड'चा समावेश आहे.

कादंबरीच्या सुरुवातीस अ. का. प्रियोळकरांनी गुंजीकरांचे चरित्र व वाङ्मय याचा परिचय करून दिला असून, प्रियोळकरांनी मुंबईच्या वाङ्मयसेवा मंडळापुढे २९ ऑगस्ट १९८३ रोजी केलेले भाषणही जोडले आहे.

यशवंत चव्हाण

**मोठे मासे छोटे मासे : देशपांडे, पु. ल. प्रकाशक : सुरेश राऊत, १९५७.** एकांकिका संग्रह. शहरांत वाढणारी गर्दी, अन् त्यामुळे दुर्मीळ होत चाललेला निवांतपणा यांचे दर्शन 'सारं कसं शांत शांत'मध्ये दोन प्रेमिक पुण्याला पर्वतीच्या टेकडीवर विवाहआधी भावी जीवनाची स्वप्ने पाहण्यास जातात. तिथे दोन शब्द बोलणे कसे अशक्य होते याचे नाट्यमय दर्शन ननाट्य व नवनाट्याचा उपहास करणारी, दोषांवर नेमके बोट ठेवणारी एकांकिका. सदू आणि दादू व मानवी स्वभावाचे, त्याच्या मूळ स्वार्थी व ढोंगी स्वभावाचे दर्शन घडवणारी एकांकिका 'मोठे मासे छोटे मासे' मानवी स्वभावदर्शन, शहरी जीवनातील दुखण्यावर ठेवलेले नेमके बोट, प्रवाही भाषा, विनोदाचा सुजाण वापर व खटकेबाज नाट्यमय संवाद यांमुळे मराठी एकांकिकांच्या प्रवाहात वेगळे वैशिष्ट्य असणारा संग्रह.

शरद दळवी

**मोर एलएल.बी. प्रहसन अथवा अप्रबुद्धतरुणक्रिया आणि त्याचे परिणाम : भागवत, नारायण हरी. प्रकाशक : शंकर नारायण भागवत, इंदुप्रकाश छापखाना, १८८२.** मराठीतील अतिशय गाजलेली आणि कोर्टकचेऱ्या झालेला फार्स. मोरू नावाच्या सुधारकाग्रणी आपल्या वडिलांची अप्रतिष्ठा करून स्वतः लग्न ठरविण्यासाठी कोकणात जातो तेव्हा त्याने इंग्रजी शिक्षणापोटी केलेले हास्यास्पद चाळे यात अतिरंजित स्वरूपात वर्णिले आहेत. आधुनिक सुशिक्षितांचे थेर नायकाच्या रुपाने वर्णिले आहेत. भाषा प्रौढ असून इंग्रजी वाक्यांची मनसोक्त खैरात आहे. शिक्षणामुळे तरुणात आलेला बेछूटपणा व दौर्बल्य यांची भडक चित्रे आहेत. स्वप्नावस्थेने तरुणांच्या स्वास्थ्याची झालेली राखरांगोळी व त्यांच्यामध्ये निर्माण झालेली स्त्रीविन्मुखता उपरोधाने चित्रीत केली आहे. रतीशय्येवर गर्भाशय, स्तन, संभोगक्रिया यांची शास्त्रीय चिकित्सा करणाऱ्या नायकाचे चित्र रंगवून लेखकाने सुधारकांची भरमसाठ निंदा केलेली आहे. या फार्सच्या अनेक आवृत्त्या निघालेल्या असून, पहिल्या तीन आवृत्त्यातून लेखकाने परिष्करणे केली आहेत.

भीमराव कुलकर्णी

**मॅझिनी : सावरकर, विनायक दामोदर. प्रकाशक : ग. दा. सावरकर, १९०७.** 'जोसेफ मॅझिनी यांचे आत्मचरित्र व राजकारण' या नावाने १९०७ मध्ये प्रसिद्ध झालेले वि. दा. सावरकर यांचे पुस्तक त्यांचे थोरले क्रांतिकारक बंधू ग. दा. सावरकर यांनी प्रथम प्रकाशित केले. इंग्रजी सत्तेविरुद्धच्या तत्कालीन असंतोष ध्यानी घेता या स्फोटक पुस्तकाला अन्य प्रकाशक मिळणे शक्य नव्हते. पुस्तकात मॅझिनी आणि गॅरिबाल्डी या दोघा इटालियन देशभक्तांनी ऑस्ट्रियाविरुद्ध जो सशस्त्र स्वातंत्र्यलढा दिला त्याची प्रेरक साद्यन्त हकिकत आहे. पण हे अनुवादित पुस्तक गाजले नि लवकरच जप्त झाले ते सावरकरांच्या ओजस्वी, दाहक, स्वातंत्र्योन्मुख करणाऱ्या प्रदीर्घ प्रस्तावनेमुळे. पुढे बऱ्याच वर्षांनी अखेर मंत्रिमंडळाने बंदी उठवल्यामुळे व्हीनस बुक स्टॉलने १९४६ मध्ये त्याची दुसरी आवृत्ती प्रकाशित केली.

भीमराव कुलकर्णी

**यमुनापर्यटन : पदमनजी, बाबा प्रकाशक : बाबा पद्मनजी, मुंबई १८५७.** श्री. बाबा पदमनजी (मुळे) यांची 'यमुनापर्यटन' ही कांदबरी. हे मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचे जनक म्हणून ज्ञात होते. खेरीज ते कोशकार, निबंधकार म्हणूनही ओळखले जातात. डॉ. विल्सन, श्री. रॉबर्ट निस्बिट या ख्रिस्ती धर्मप्रचारकांचा सहवास त्यांना लाभला. ख्रिस्ती धर्माच्या स्वीकृतीनंतर त्यांनी फ्री चर्च मिशनच्या शाळेत शिक्षक या नात्याने काम केले. 'बैबल सोसायटी', 'ट्राक्ट सोसायटी' या ख्रिस्ती संस्थांत संपादकाचे काम त्यांनी केले. त्यांच्या संपादनाखाली 'नवा करार' हे पुस्तक प्रसिद्ध केले गेले. ऐक्यवर्धक पत्रिका, सत्यदीपिका या नियतकालिकांचे संपादनही त्यांनी केले. श्री. पदमनजींनी शालेय पाठ्यपुस्तके संपादिली. जवळजवळ शंभर पुस्तकांचे त्यांनी लेखन केले. 'अरुणोदय' हे त्यांचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे.

इंग्रजी राज्याच्या कारकीर्दीतील उच्च दर्जाचे निबंधकार म्हणून त्यांनी ख्याती संपादिली.

कादंबरी हा वाचकांना अत्यंत प्रिय असलेला वाङ्मयप्रकार या कथनातील कल्पितही वाचकाना वास्तव वाटते. त्यातूनही कादंबरीच्या अनेक प्रकारांपैकी सामाजिक कादंबरी वाचकांना प्रामुख्याने आवडते. अशा प्रकाराचा लेखनप्रकार आजही लोकप्रिय आहेच.

श्री. पदमनजींची 'यमुनापर्यटन' ही कालानुक्रमे मराठीतील पहिली सामाजिक कादंबरी. या कादंबरीस श्री. दादोबा पांडुरंग यांनी मूळ संस्कृत भाषेत प्रस्तावनापर निबंध लिहिला आहे. ही नायिकाप्रधान कादंबरी आहे. यमुना ही या कादंबरीची नायिका. मिशनरी शाळेत शिक्षण झाल्याने ख्रिस्ती धर्माबद्दल आकर्षण असलेल्या यमुनेचे विनायकराव यांचेशी लग्न होते. विनायकराव व यमुना पर्यटनाला निघतात आणि या पर्यटन कालात तिचा अनेक विधवांशी संपर्क येतो आणि या विधवा त्यांच्या दु:स्थितीचे वर्णन यमुनेकडे करतात. त्र्यंबक ते नागपूर, नागपूर ते पंढरपूर, पंढरपूर ते सातारा आणि सातारा ते त्र्यंबक हा उभयतांचा प्रवासमार्ग यामध्ये गोदूची आत्महत्या, वेणूने केलेले विधवेच्या जीवनाचे वर्णन, नागपूरच्या विनायकरावांच्या मित्राच्या (दौलतराव माने) मामेबहिणीचे, त्यांच्या घराण्याला पुनर्विवाह मान्य नसल्याने पुराणिकाबरोबर केलेले पलायन, पंढरपुरात मंदिराच्या पुजाऱ्याबरोबर बदकर्म करणारी विधवा, सातारा मार्गावर विधवेला कसे कुमार्गाला लावले जाते याचे वर्णन करणारी भिक्षेकरी विधवा व जेजुरी मुक्कामी विनायकरावांचा मृत्यू याचे तपशीलवार वर्णन येते. पतीच्या मृत्यूनंतर केशवपनाच्या कृत्यातून यमुना विनायकरावांच्या मित्राच्या व सासऱ्यांच्या मदतीने सुटका करून घेऊन एका ख्रिस्ती गृहस्थाशी विवाह करते.

हिंदू धर्मातील दोष दाखविण्यासाठी, विशेषतः विधवांच्या संदर्भात, या कादंबरीचे लेखन झाले आहे. विधवांविषयीचे हिंदू समाजाचे निर्दय मत, केशवपनासारखी स्त्रीला विद्रूप करणारी पद्धती आणि विधवेवर समाजाचे असलेले लक्ष या विरुद्ध हे लेखन केले गेले आहे. विधवेला अपमानित करणारे कष्टमय विद्रूप जीवनचित्रण या कादंबरीत येते. पात्रांचे आत्मनिवेदन, संवाद, कथन प्रसंगातील कौशल्य आणि स्वभाव रेखाटन याद्वारे संपूर्ण कादंबरी वाचनीय करण्याचे क्रसब श्री. पदमनजी यांना लाभले आहे. समाजातील हा एक अत्यंत वादग्रस्त, प्रक्षोभक आणि ज्वलंत प्रश्न. दु:स्थितीतून आपली सुटका व्हावयाची असल्यास मृत्यू हा एकच पर्याय आपल्यापुढे आहे असे प्रत्येक विधवेला वाटावे ही एक दारुण शोकांतिका आहे. या रूढीविरुद्ध विचारवंतांनी विचार करून समाजाला या प्रश्नी नवा मार्ग सुचवावा, मांडावा असा प्रयत्न श्री. पदमनजींच्या मनात असावा.

**ययाती : खांडेकर, विष्णू सखाराम. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, प्रथम प्रकाशन, १९५९.** विष्णू सखाराम खांडेकर यांची 'ययाती' ही अत्यंत लोकप्रिय कादंबरी असून या कादंबरीस सर्व महत्त्वाची पारितोषिके मिळाली आहेत. १९६० साली साहित्य अकादमीचे दिल्ली पारितोषिक मिळाले. महाराष्ट्र सरकारचे कादंबरी विभागाचे पहिले पारितोषिक या कादंबरीस १९६१ साली लाभले आणि अत्यंत मानाचा असा समजला जाणारा 'ज्ञानपीठ' पुरस्कार १९७४-७५ साठीचा या कादंबरीस मिळाला.

श्री. खांडेकर यांची ही पौराणिक कादंबरी आहे. 'पुराणकथा या साहित्यिकांच्या दृष्टीने सोन्याच्या खाणी आहेत आणि माझ्या इतर कथा-निबंधामध्ये पौराणिक संदर्भ आहेतच' असे त्यांनी नमूद केले आहे. पौराणिक संदर्भावर ही कादंबरी आधारलेली असली तरी या कादंबरीला वर्तमानकालीन संदर्भ आणि आशय आहे. एक नायक (ययाती) आणि दोन नायिका (शर्मिष्ठा, देवयानी) ही या कादंबरीतील प्रमुख पात्रे असली तरी कच हा दुसऱ्या नायकाच्या रूपाने कादंबरीत वर्णिला आहे. इतर सामान्य स्त्रियांप्रमाणे सांसारिक स्त्रीचे रूप देवयानीत

दिसते तर प्रेमाचे प्रतीक म्हणजे शर्मिष्ठा. इंद्रिय सुखाची चिरंतन अतृप्ती आयुष्यभर मनात ठेवणारा सर्वसामान्य माणसाचा प्रतिनिधी या नात्याने ययातीचे वर्णन येते. कच हा निरपेक्ष प्रेमाचा स्वभावधर्म असलेला, संयमी आणि ध्येयवादी विचार असलेला दुसरा नायक या कादंबरीत येतो.

१९१९ सालापासून श्री. खांडेकरांचे लेखन प्रसिद्ध होऊ लागले. आणि या सालापासूनच ययातीविषयीचे विचार खांडेकरांच्या मनात येऊ लागले. सिगमंड फ्राईड, कार्ल मार्क्स, महात्मा गांधी यांच्या विचारांचे पडसाद श्री. खांडेकरांच्या मनावर अधिराज्य गाजवू लागले. १९४२ ते १९५२ या कालखंडात या विचारांचे पडसाद त्यांच्या मनात तीव्रतेने येऊ लागले. चाळीस वर्षे 'ययाती' या विषयावर केलेले चिंतन आणि अनेक समाज सुधारकांच्या विचारांचा प्रभाव, यातून या कादंबरीची रचना झाली. या कादंबरीत श्री. खांडेकरांच्या काव्यमय आणि आलंकारिक भाषेचा प्रत्यय येतोच. श्री. खांडेकरांचा नेहमीचा 'बोध' हा विषय याही कादंबरीत प्रकर्षाने आल्यानेच ही कादंबरी लोकप्रिय आहे. मान्यवर समीक्षकांनी या कादंबरीवर बरीच उलट सुलट चर्चा केली आहे. कादंबरीतील सर्व महत्त्वाच्या पात्रांची 'आत्मनिवेदन'पर रचना हे या कादंबरीचे वैशिष्ट्य आहे.

श्री. वि. स. खांडेकरांनी सुरुवातीस काव्य हा वाङ्मयप्रकार हाताळला असला तरी श्री. खांडेकर हे मुख्यतः कथा आणि कादंबरीकार या नात्याने प्रसिद्ध आहेत. निबंध आणि लघुनिबंध या वाङ्मयप्रकारांचे दर्जेदार लेखनही त्यांनी केले आहे. परंतु या सर्व लेखन प्रपंचाबरोबर त्यांनी अत्यंत दर्जेदार व समृद्ध अशा प्रकारचे समीक्षा/टीका लेखनही केले आहे. 'गडकरी : व्यक्ती व वाङ्मय' (१९३२), 'मराठीचा नाट्यसंसार' (१९४५), 'आगरकर : चरित्र, व्यक्ती आणि कार्य' (१९३२) या ग्रंथांचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. काही मराठी चित्रपटांच्या पटकथाही त्यांनी लिहिल्या आहेत. शब्दप्रभुत्व, काव्यमय-शैलीची आलंकारिक भाषा, कल्पना वैभव यांचा वारसा त्यांनी त्यांचे गुरू श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचेकडून घेतला होता आणि थोड्याफार प्रमाणात त्यांनी या शैलीचे अनुकरण शेवटपर्यंत तसेच ठेवले होते.

**यशवंतराव खरे : आपटे, हरी नारायण. प्रकाशक : आर्यभूषण मुद्रणालय, पुणे, १९१६.** मराठी कादंबरीच्या इतिहासात श्री. हरी नारायण आपटे यांना प्रमुख स्थान आहे. मराठी कादंबरीस भक्कम पाया त्यांनी तयार केला. सुरुवातीच्या साहित्य लेखनाच्या प्रपंचात श्री. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या निधनानंतर त्यांनी लिहिलेल्या 'शिष्यजनविलाप' काव्याची प्रशंसा झाली. श्री. गोपाळ गणेश आगरकर लिखित शेक्सपिअरच्या प्रख्यात 'हॅम्लेट' नाटकाचे भाषांतर 'विकार-विलसित' या कलाकृतीवरील श्री. हरिभाऊ आपटे यांच्या टीकालेखाचे समर्थन केले गेले.

श्री. हरिभाऊ आपटे यांनी १० सामाजिक आणि ११ ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. सामाजिक कादंबरी मालिकेला त्यांनी 'आजकालच्या गोष्टी' असे संबोधिले. पाश्चात्त्य कादंबऱ्यांचे वाचन, पाश्चात्त्य तत्त्वज्ञांच्या ग्रंथांचे वाचन यामुळे झालेल्या प्रगल्भ बुद्धिमत्तेचा वापर करून श्री. आपटे यांनी कादंबरीस वाचकप्रिय बनविले. मराठी कथेचीही उत्तम सुरुवात त्यांनी करून दिली आहे. 'काळ तर मोठा कठीण आला' ही दुष्काळाच्या पार्श्वभूमीवरील एक उत्तम कथा. या कथेचे कालसापेक्ष, वास्तवदर्शी लेखन आजही वाचकांस अंतर्मुख करते.

श्री. हरिभाऊ आपटे यांनी 'करमणूक'पत्राचे संपादन केले आणि पत्रातूनच त्यांच्या काही कादंबऱ्या प्रथम प्रकाशित झाल्या.

यशवंतराव खरे या कादंबरीचा नायक. इतर पात्रांत त्याची आई गंगाबाई, धाकटा भाऊ गोविंदा, नायकाच्या गरीब परिस्थितीने त्याला आश्रय देणारे श्रीमंत, रावबहादूर आडमुठे. यांचा आश्रय सोडल्यावर, ज्यांचा आश्रय मिळतो ते श्रीधरपंत, त्याचा भाऊ गोविंदा याला ज्यांचा आश्रय मिळतो ते अण्णासाहेब गोडबोले यांचे वर्णन येते.

यशवंतरावाचे बालक, युवक आणि पदवी परीक्षेसाठी अभ्यास करणारा तरुण इतक्या कालखंडापुरतेच वर्णन येते. भोवतालची परिस्थिती, व्यक्तिमन, राग-लोभ यामुळे यशवंतरावाच्या जीविताला मिळणारे वळण त्याच्या प्रबळ रागाचा परिणाम स्त्री जातीबद्दलचे त्याचे मत श्री. हरिभाऊ आपटे यांनी व्यक्त केले आहे. बालपणात श्रीमंताघरी झालेला अपमान दारिद्र्यामुळे आहे याची त्याला जाणीव होते. आई प्रेमापायी त्याला बोलते पण ते त्याला पटत नाही. सर्व प्रेम भावंडांना मिळते अशी त्याची समजूत झाल्याने तो घरापासून दुरावतो. इतर अनेक प्रसंगाने स्त्रीबद्दलचे त्याचे मत प्रतिकूल व अनुदार बनते.

तत्कालीन जहाल/मवाळ नेत्यांमध्ये चाललेल्या वैचारिक घटनांचे पडसाद यशवंतरावाच्या मनाच्या चढणी/उतरणीत चित्रित केले गेले आहेत. राजकीय सुधारणा प्रथम महत्त्वाची की सामाजिक सुधारणा प्रथम. लोकांना राज्यकारभारात अधिकार द्यावयाचे की नाहीत ? समाजव्यवस्थेला पोषक अशी कायद्यात सुधारणा मग सामाजिक सुधारणा कराव्यात की आणखी कोणता पर्याय स्वीकारावा ? इत्यादींची चर्चा केली आहे. काही महत्त्वाच्या व श्री. हरिभाऊ आपटे ज्यांच्या सान्निध्यात आले अशा काही व्यक्तींच्या सहवासाचा परिणाम या कादंबरीतील पात्रांचे चित्रण करण्यात झाला आहे असे काही टीकाकारांचे मत आहे. एकंदरीत तत्कालीन समाजजीवनाचे व व्यक्तींचे चित्रण या सामाजिक कादंबरीत आले आहे. ' पण लक्षात कोण घेतो ' ही कादंबरी लिहीत असतानाची श्री. आपटे यांची तादात्म्यता त्यांच्या इतर लेखनात दिसून येत नाही हे जाणकारांचे मत ग्राह्य धरले पाहिजे.

**यशोधन : यशवंत. प्रकाशक : रविकिरण मंडळ प्रकाशन, पुणे, १९२९.** कवी यशवंत (यशवंत दिनकर पेंढरकर) हे १९२३ साली स्थापन झालेल्या रविकिरण मंडळाचे सदस्य. इतर सभासदांच्या तुलनेत कवी माधव जूलियन, गिरीश यांच्या बरोबरीने यशवंतांनी काव्यरचना केल्याचे आढळते. त्यापैकी तेरा संकलित काव्यसंग्रह असून दोन खंडकाव्ये आणि एक महाकाव्य अशी त्यांची साहित्यसंपदा आहे. सुरुवातीस त्यांना कवी साधुदासांचे मार्गदर्शन काव्यलेखनात लाभले. ते बडोदा संस्थानचे राजकवी होते आणि १९६९ साली त्यांना पद्मविभूषण ही पदवी मिळाली. त्यांच्या काव्यावर 'सामाजिक प्रतिष्ठेचा अभाव, आत्मपर, नैराश्यवादी आणि दुःखाचा शाहीर' असे आक्षेप घेतले गेले आहेत. तरीही देशप्रेमाची गीते लिहिणारा 'दऱ्याखोऱ्यातील रांगडा' कवी असेही संबोधिले आहे. त्यांच्या जानपद गीतांनी ते महाराष्ट्रात लोकप्रिय होते. एका काव्यरचनेत आपल्या स्वभावाचा उल्लेख केला आहे, 'माझा स्वभाव बुजरा मज ना धिटाई, संकोचवृत्ति रसनेस जडत्व देई'.

प्रस्तुत 'यशोधन' या काव्यसंग्रहात १०२ कवितांचे संकलन असून या काव्यसंग्रहामुळेच त्यांना लोकप्रियता मिळाली. काव्याचा अभ्यास ज्या वर्गीकरणाने केला जातो त्या म्हणजे प्रेमकविता, सामाजिक कविता, भावगीत, राष्ट्रीय कविता या वर्गीकरणानुसार या काव्यसंग्रहातील काव्याचे वर्ग केल्यास प्रत्येक प्रकारात सुमारे १० कविता येतात. काही जानपद गीतेही यात संकलित आहेत. संकीर्ण आणि जानपद गीतांत पंतोजीची छडी, गुलामाचे गाऱ्हाणे, सारंगीवाला, न्याहारीचे गाणे इ. कविता आहेत. प्रीतिविषयक कवितांत स्थानभ्रष्ट फुलास, तू गेलीस समोरुनी, प्रेमाचे स्मारक, पूर्तता तुझ्याबाचुनी इ. कवितांचा उल्लेख करता येईल. लिलाव ही एक महत्त्वाची सामाजिक कविता. स्वातंत्र्यलक्ष्मीस मुजरा, देहाचा पूल, तुरुंगाच्या दारात, गाऊ त्यांना आरती इ. देशभक्तीपर गीते या संकलनात आहेत.

**युगायुगाचे सहप्रवासी : मनमोहन. प्रकाशक : कॉंटिनेन्टल प्रकाशन, आनंद छापखाना, पुणे, १९४६.** कवी मनमोहनांचे आठ कवितासंग्रह आणि प्रस्तुतचे दीर्घकाव्य इतके काव्यवाङ्मय प्रसिद्ध झाले आहे. तसेच ते कादंबरीकार म्हणूनही प्रसिद्ध आहेत. 'झपुर्झा' या कादंबरीवरील खटल्यामुळे त्यांना अधिक प्रसिद्धी मिळाली. 'आदित्य' हा त्यांच्या निवडक कवितांचा संग्रह. विपुल साहित्य लिहूनही त्यांना मान्यता मिळाली नाही.

पुण्याहून मुंबईला आलेला एक हिंदू तरुण ज्याचा हिंदु-मुसलमान दंग्यात त्याला परिचित असलेल्या उस्मान या व्यक्तीकडून खून होतो. व्यक्ती परिचित असली तरी ही व्यक्ती धर्मवेडाने त्याला सुऱ्याने वार करून ठार करते. या हिंदू व्यक्तीच्या जीवन-मरणाच्या सीमेवर मनात आलेले विचार कवीने विलक्षण कल्पनाशक्ती व संज्ञाप्रवाही तंत्रातून व्यक्त केले आहेत. या हिंदू व्यक्तीचे विचार म्हणजे कवीचेच विचार. मृत्यूजवळ जाताना या तरुणाला त्याचे सर्व जीवन आठवते. मुक्तबंधातली अकराशे ओळींची ही दीर्घ कविता आहे. पुढे उस्मानही हिंदूकडून मारला जातो आणि या दोघानांही पुनर्जन्म मिळतो. मात्र उस्मान हिंदू म्हणून जन्माला येतो आणि हिंदू नायक मुसलमान म्हणून आणि हिंदू-मुसलमान संघर्ष चालूच असतो. हे काव्य म्हणजे काव्यप्रातांतील बंडखोरी मानली जाते. या काव्याने काव्यरचनेची कोणतीही बंधने स्वीकारलेली नाहीत. संयम व औचित्य काव्यरचनेत नाही. अतिवास्तववाद पद्धतीचे हे काव्य आहे. हे काव्य म्हणजे 'बीभत्स' रसाचा नमुना आहे, असा आक्षेप टीकाकारांनी नोंदविला आहे.

**युद्धाच्या सावल्या : माडगूळकर, ग. दि. प्रकाशक : दयार्णव रघुनाथ कोपार्डेकर, पुणे, १९४४.** कवी ग. दि. माडगूळकरांच्या साहित्यविश्वातील हे एकमेव नाटक चिंतामणराव कोल्हटकरांच्या आग्रहाखातर लिहिले गेले. दुसऱ्या महायुद्धाच्या काळातील वाढती महागाई, मानवी स्वत्वाचा शोध घेण्याची सुरू झालेली धडपड, झपाट्याने बदलणारी सामाजिक स्थिती यांचे एका शेतकरी कुटुंबाच्या कथेच्या द्वारे घडविलेले दर्शन, उत्तम दर्जाची मराठमोळी कुणबाऊ भाषा हे नाटकाचे सामर्थ्य. दिलदार प्रामाणिक ज्योती, स्वार्थी दिवाणजी, सरळमार्गी शिवबा ही पात्रे विशेष उल्लेखनीय. ध्येयवादी विचारसरणी प्रतिबिंबित करणारे, आकर्षक असे नाटक.

वसंत नरहर कुबेरे

**योगवासिष्ठ : रंगनाथ मोगरेकर. प्रकाशक : आत्माराम येशवंत, मुंबई, १८८९.** रंगनाथ मोगरेकर हे एकनाथकालीन आनंदसांप्रदायी कवी असून त्यांनी मूळ योगवासिष्ठ ग्रंथाच्या २५ श्लोकांवर भाष्य केले आहे. हा ग्रंथ रंगनाथ मोगरेकर यांनी लिहिला की रंगनाथस्वामी निगडीकर यांनी लिहिला, याविषयी विद्वानांत मतभेद आहेत. पांगारकरांनी हा ग्रंथ रंगनाथस्वामी निगडीकर यांनी लिहिला असल्याचे मत मांडले असून वि. ल. भावे ग्रंथाचे संपादक गोविंदस्वामी दातार, म. म. द. वा. पोतदार व डॉ. शं. गो. तुळपुले यांनी या ग्रंथाचे कर्तृत्व रंगनाथ मोगरेकर यांच्याकडे दिले आहे. मोगरेकरांच्या 'चित्सदानंदलहरी'त हा ग्रंथ मोगरेकरांनी लिहिला असल्याचा उल्लेख असून या दोन्ही ग्रंथांत भाषेचे साम्य आढळते व ही भाषा एकनाथकालीन आहे. या ग्रंथाच्या जगदीश्वरी प्रतीत अधिकच्या १५३ ओव्या असून त्यातही रंगनाथ मोगरेकरांच्या ग्रंथकर्तृत्वाचा उल्लेख आढळतो.

या ग्रंथाची एकूण १० प्रकरणे असून ओवीसंख्या ७,००० आहे. वेदान्त-विचार सुलभ करण्याचा प्रयत्न कवीने या भाष्यग्रंथात केला आहे.

नजमा पठाण

**योगवासिष्ठसार टीका : गोमंतकीय कवी व्यंकट ('अनेक कविकृत भक्तिपरमार्थ कविता' या ग्रंथात समाविष्ट) संपादक : केळकर, नारायण चिंतामण, १९०३ या ग्रंथात**

**समाविष्ट (पृष्ठ १६१-२१३).** आत्मारामानंद नाथांचा शिष्य व्यंकटकवी हा गोव्यातील फोंडा प्रांतातला. त्याचा काल १८ व्या शतकाचा उत्तरार्ध असून त्याचे नाव ब्रदी असे होते. मूळ ३२,००० श्लोकसंख्या असलेल्या संस्कृत योगवासिष्ठाचे सार २२५ श्लोकांत लघुवासिष्ठात आले व त्याची समाक्षरी टीका ६९२ श्लोकांत कवीने केली आहे. या ग्रंथाची भाषा संस्कृतप्रचुर असून या प्रत्येक प्रकरणामध्ये व त्या प्रकरणाचा विषय सांगितलेला आहे. भगवद्गीता, शिवगीता, उपनिषदे व अन्य संस्कृत श्लोक यांचा संदर्भ अनेक ठिकाणी कवीने दिला आहे, यावरून त्याची व्युत्पन्नता दिसते. या ग्रंथाची भाषा प्रसादयुक्त असून सहजसुलभ रचना हे वैशिष्ट्य सांगता येईल. शार्दूलविक्रीडित व इतर वृत्ते व अनुष्टुभ छंदात या काव्याची रचना असली तरी त्यावरून कवीला वृत्तप्रभू मानता येत नाही. छंदाच्या सोयीसाठी यतिभंग व अक्षरांची अदलाबदल हे दोष या काव्यात आढळतात.

म. प. पेठे

**रक्त आणि अश्रू : भावे, पुरुषोत्तम भास्कर. प्रकाशक : ह. कृ. धर्माधिकारी, नागपूर, १९४२.** श्री. पुरुषोत्तम भास्कर भावे यांनी १७ कादंबऱ्या, २६ कथासंग्रह, ८ नाटके, १२ लेखसंग्रह, २ पटकथा इतके लेखन केले आहे. तरीही 'सावधान' आणि 'आदेश' या पत्रात केलेल्या लेखनाचा, काही निवडक लेखांचा हा संग्रह. श्री. भावे कथा-कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध असले तरी 'रक्त आणि अश्रू' हे संकलन असलेले त्यांचे पहिले पुस्तक श्री. भावे यांची सुरुवातीची कारकीर्द पत्रकार या नात्याने सुरू झाली. कट्टर हिंदुत्ववादी पत्रकार म्हणून त्यांना ओळखले जाते. श्री. भावे, सावरकरभक्त असून ते श्री. मुंजे आणि श्री. परमानंद या हिंदुत्ववादी विचारसरणी असलेल्या नेत्यांच्या सहवासातही होते. त्यांच्यावर झालेल्या संस्काराचे प्रभावाचे वर्णन त्यांनी 'प्रथमपुरुषी एकवचनी' या आत्मवृत्तात केले आहे. 'रक्त आणि अश्रू' या पुस्तकास 'मराठी वाङ्मयातले अमूल्य पुस्तक' असे श्री. वि. दा. सावरकर यांनी संबोधिले आहे. श्री. भावे यांना श्री. न. चिं. केळकरांनी भाषाप्रभू असे गौरविले आहे. 'गद्य भावना काव्यात शोभण्यासारख्या, भाषा-शैलीत ओज, तेज, जिव्हाळा असून भाषेचा ओघ महायुद्धाच्या लोंढ्यासारखा आहे' असाही अभिप्राय प्रस्तुत 'रक्त आणि अश्रू' या पुस्तकाबद्दल व्यक्त केला आहे.

प्रस्तुत पुस्तकात एकूण १७ लेख समाविष्ट असून त्यांपैकी (१) कोण कोण आहे माझ्या बरोबर, (२) सहदेवा, थोडा अग्नी आण, (३) बंगाल! करपून गेलेले 'कुसुम' (४) मुस्लिम स्त्रियांची करुण किंकाळी, (५) पिंजऱ्यातील मैनांचा तडफडाट, (६) तिलांजली व प्रतिज्ञा, (७) रक्त आणि अश्रू इत्यादी लेख अत्यंत महत्त्वाचे आहेत.

(१) कोण कोण आहे माझ्याबरोबर हा लेख हैदराबाद मुक्तिसंग्रामाशी संबंधित असून, (२) सहदेवा, थोडा अग्नी आण या लेखात हिंदुत्वाच्या, हिंदुत्वादी विचारसरणीच्या विरोधी असलेल्यांचा समाचार घेतला आहे. (३) बंगाल करपून गेलेले 'कुसुम' या लेखात स्त्रियांवरील अत्याचारासंबंधी लेखन आहे, (४) मुस्लिम स्त्रियांची करुण किंकाळी, (५) पिंजऱ्यातील मैनांचा तडफडाट या दोन लेखांत मुस्लिम स्त्रियांवर होणाऱ्या अत्याचाराचे वर्णन आहे. मुसलमान पुरुषांच्या आकुंचित जुलमी व प्रतिगामी स्वभावामुळे, बुरखा पद्धतीमुळे, बंदिस्त आयुष्यामुळे, शिक्षण व स्वातंत्र्याच्या अभावामुळे मुस्लिम स्त्रियांची गुणसंपदा झाकली गेली आहे. मुस्लिम स्त्रियांतील अज्ञान, गुलामी यासंदर्भात त्यांच्या उद्धाराचा प्रश्न चर्चिला आहे. बहुपत्नीकत्वाची रूढी याचाही विचार आहे. या सर्व कारणाने जनानखान्यात पिचत पडलेली मुस्लिम स्त्रियांची हिंदुस्थानातील शक्ती, संपत्ती प्रगट झाली पाहिजे असा विचार मांडला आहे. 'तिलांजली व प्रतिज्ञा'या लेखात हिंदुस्थान हा सर्वस्वी हिंदूंचा असून हिंदूसाठी हिंदू धर्मासाठी कोणत्या गोष्टींना तिलांजली दिली पाहिजे व हिंदू धर्माच्या उद्धारासाठी कोणत्या प्रतिज्ञा केल्या पाहिजेत याचा विचार केला आहे. या लेखात ज्वलंत हिंदुत्त्वनिष्ठा प्रगट झाली आहे. 'रक्त आणि अश्रू' हा कै. मावकरांवरील श्रद्धांजलीपर लेख. श्री. मावकर हे श्री. भावे यांचे मित्र व 'सावधान'चे संपादक. त्यांच्या मृत्यूनंतर हा लेख 'आदेश'मध्ये प्रसिद्ध झाला. हा एक अत्यंत उत्कट शैलीतील लेख. श्री. मावकरांशी असलेल्या श्री. भावे यांच्या स्वार्थनिरपेक्ष मैत्रीचा उल्लेख असून श्री. मावकरांवर कोसळलेल्या उत्पातांच्या मालिका यांचे उल्लेख असून, श्री. मावकरांच्या रूपाने हिंदूसभेचा मोहरा हरपल्याबद्दल दु:ख व्यक्त केले आहे.

**रंग पात्र्यालिक : रेगे, पु. शि., प्रकाशिका : सौ. सरिता रेगे, मुंबई, १९५८.** स्त्री स्वभावाच्या विविध पैलूंचे दर्शन घडविणाऱ्या तीन नाटिका.

माधवी या शालिवाहन काळातील नाटिकेत एका चित्रकार व त्याच्यावर प्रेम करणाऱ्या तीन स्त्रियांच्या समर्पणाचे, स्वभाव वैशिष्ट्यांचे रेखीव चित्रण आहे. दुसरी 'रंगपांचालिका' महाभारत काळातील विराटराजाच्या कन्येच्या विवाहाविषयी नाटिका आहे. तिसरी 'कालयवन' ही नाटिका कालयवनचे मथुरेवरील आक्रमण, त्यावेळची मथुरावासीयांची कृतघ्न व चंचलवृत्ती दाखविते.

जीवनानुभवातील आशयघनता, स्त्रीचे स्थान व आशयाची एकरूप झालेली भाषाशैली यातून लेखकाचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन स्पष्ट करणाऱ्या मराठीतील महत्त्वाच्या नाटिका.

शरद दळवी

**रणांगण : बेडेकर, विश्राम चिंतामण. प्रकाशक : रा. ज. देशमुख आणि कंपनी, पुणे, प्रथम प्रकाशन १९३९.**

श्री. विश्राम बेडेकर यांची 'रणांगण' ही एकमेव कादंबरी. श्री. विश्राम बेडेकरांची सर्व कारकीर्द ही चित्रपटसृष्टीतील आहे. चित्रपट दिग्दर्शक, पटकथा या नात्याने त्यांची ख्याती आहे. त्यांनी चार नाटके लिहिली असून, त्यांचे 'एक झाड आणि दोन पक्षी'हे वैशिष्ट्यपूर्ण आत्मचरित्र प्रसिद्ध आहे. या ग्रंथास १९८५ साली 'साहित्य अकादमी' दिल्लीचा पुरस्कार लाभला आहे.

चक्रधर विद्वांस आणि जर्मन ज्यू तरुणी हॅर्टा यांच्या जहाजावरील दहा दिवसांचे सान्निध्य चित्रित करणारी ही कादंबरी. या दोन पात्रांचे नायक व नायिका यांचे आंतरिक जीवन दाखवणारी ही भावकथा आहे. या दोघांचे बोटीवरील प्रवासात प्रेमसंबंध निर्माण होतात. नायक नायिकांच्या आत्मनिवेदनातून ही कादंबरी पुढे सरकते. ज्यू हॅर्टाची ही कहाणी समग्र ज्यू समाजाची प्रातिनिधिक कथा होते. नायकाच्या स्मृतिप्रवाहातून युद्धपीडित जगाची परवड, युरोपातील युद्धाची विध्वंसक अवकळा व्यक्त होते. माणसाचे जीवन म्हणजे अनेक आव्हानांचे रणांगण होय, सुंदर हिरवळीचे क्षणातच रणांगण बनते. या कादंबरीत सर्वत्र जहाजावरील वातावरण येते व जहाज आणि समुद्र ही कादंबरीतील पात्रेच बनतात. श्री. बेडेकरांचे अविचल वाङ्मयीन तादात्म्य या कादंबरीत व्यक्त झाले आहे. परिणामकारक शैलीत स्वार्थ आणि विद्वेष व्यक्त करणारी सुबक भाषाशैलीतील मराठीतील अत्यंत महत्त्वाची कादंबरी. या कादंबरीचा महत्त्वाच्या अनेक समीक्षकांनी गौरव केला आहे.

**रसग्रहण : कला व स्वरूप : कुलकर्णी, गो. म. प्रकाशक : स्कूल आणि कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर, प्रथमावृत्ती १९५२.** 'मराठी साहित्यातील स्पंदने', 'खंडनमंडन', 'वाटा आणि वळणे', 'साद-पडसाद', 'मराठी समीक्षेची वाटचाल'इ. समीक्षा ग्रंथांचे कर्ते गो. म. कुलकर्णी हे जीवनवादी विचाराचे समीक्षक म्हणून परिचित आहेत.

'रसग्रहण : कला व स्वरूप' हा गो. म. कुलकर्णी यांचा साहित्य मीमांसा करणारा महत्त्वाचा समीक्षा ग्रंथ आहे. या ग्रंथात एकंदर नऊ प्रकरणे आहेत. प्रास्ताविकात काव्यसृष्टीचे महत्त्व सांगितले असून नंतर काव्याविषयी कोणते गैरसमज आहेत; आणि या गैरसमजातून काव्याची उपेक्षा कशी केली जाते, याची चर्चा आली आहे. त्यानंतर रसिक व रसग्रहणाचे स्वरूप ही प्रकरणे येतात. रसिक व सामान्य वाचक यांच्यात कोणता फरक आहे याची चर्चा करून रसिक म्हणजे सामान्य वाचकांची परिणत अवस्था होय, असे गो. म. कुलकर्णी म्हणतात. रसग्रहणाच्या स्वरूपाची चर्चा करताना रसग्रहण म्हणजे भाष्य असून रसग्रहणाला स्वास्थ्याची जरुरी असते. रसग्रहण म्हणजे टीका नसून हृदयसंवाद असतो असे ते म्हणतात. ' कलाविचार ' या प्रकरणात कलेचा जन्म, कलेचे कार्य काय असते याची चर्चा आली असून कलानंद हा ज्ञानानंदापेक्षा भावनात्मक व मूर्त स्वरूपाचा असल्यामुळे त्याची महती विशेष आहे, असा अभिप्राय ते देतात. त्यानंतर 'काव्यकला आणि तिचा जनक', 'काव्याचे अंतरंग', 'काव्याचे बाह्यांग' ही महत्त्वाची प्रकरणे आहेत. 'कौशल्य सारे रचनेत आहे' या प्रकरणात कवितेची सुरुवात कशी असावी तसेच शेवट कसा करावा ; कवितेला शीर्षक कशा स्वरूपाचे असावे याची चर्चा गो. म. कुलकर्णी यांनी केली आहे. 'काव्यप्रकार' आणि 'रसग्रहणाचे काही नमुने' ही दोन शेवटची प्रकरणेही महत्त्वाची आहेत.

हा समीक्षाग्रंथ मराठी साहित्याच्या अभ्यासकांना उद्बोधक आणि प्रेरक असा आहे.

वि. दा. वासमकर

**रक्षाबंधन : शेट्ये, विश्वनाथ गोपाळ. प्रकाशक : आगाशे, एम. व्ही., पुणे १९२० (पहिली आवृत्ती).** 'रक्षाबंधन' हे वि. गो. शेट्ये यांनी लिहिलेले नाटक १९२०च्या सुमारास रंगभूमीवर आले. त्यावेळचे होतकरू नट नानासाहेब फाटक यांना प्रथमच रंगभूमीवर पदार्पण करण्याची संधी 'रक्षाबंधन' ह्या नाटकामुळे मिळाली. या नाटकातील 'रक्षाबंधन' या शब्दाचा अर्थ 'राखी बांधणे' या प्रचलित अर्थापेक्षा अगदी वेगळा आहे. 'रक्षाबंधन' हा राज्यप्राप्ती व राज्य विकासासाठी केला जाणारा विशिष्ट विधी आहे. गिरिधर महाराजांच्या राज्यातले त्या वेळेचे 'रक्षाबंधन' म्हणजे त्या विधीतील सामग्री नाहीशी झाल्यामुळे कोणकोणत्या घटना घडतात, वैजयंती ह्या गिरिधर महाराजांच्या राज्यात कसा अनर्थ घडतो याचे नाट्यमय दर्शन 'रक्षाबंधन' नाटकात घडते. गिरिधर महाराज कमालीचे लंपट, स्त्रियांविषयी आसक्ती बाळगणारे राजे आहेत. आपल्या राज्यातील कोवळ्या कुमारिकांशी लग्न करण्याचा त्यांना हव्यास आहे. बनसी हा खलपुरुष त्यांना या दुष्टकर्मात साथ देतो. गिरिधर महाराजांना अरुंधती या आपल्या शशांक नावाच्या दिवाणाच्या मुलीशी लग्न करायचे असते. पण दिलीप हा शूर तरुण त्याच्या मित्रासह राजाला विरोध करतो. त्याचा प्रयत्न हाणून पाडतो. राजाची चाकरी करीत असताना 'प्रजासंघ' ही शासन विरोधी संघटना उभी करतो. 'रक्षाबंधन' ह्या चार अंकी नाटकात अनेक प्रवेश आहेत, रहस्यमय घटना आहेत. पात्रांची वेषांतरे आहेत. या नाटकात अरुंधती-दिलीप यांच्याप्रमाणे शरयू-चाणाक्ष यांची उपकथानके आहेत. 'रक्षाबंधन' नाटकाचे चार अंकातील संविधानक गुंतागुंतीचे आहे त्यातील ग्रांथिक आणि कृत्रिम संवादांमुळे नाट्यानुभव परिणामकारकरीत्या मनावर ठसत नाही. अनेक पात्रांची योजना आकलन सुलभतेत अडसर निर्माण करणारी मांडणी या दोषांमुळे प्रयोगक्षमतेच्या दृष्टीने त्यात

अनेक उणिवा आढळून येतात. एक ग्रांथिक व वाचनीय नाटक असे मर्यादित यशच 'रक्षाबंधन' नाटकाला प्राप्त होते.

वि. शं. चौघुले

**रागिणी (अथवा काव्य-शास्त्र-विनोद) : जोशी, वा. म. प्रकाशक : का. र. मित्र, मनोरंजक छापखाना, मुंबई. पूर्वार्ध, दुसरी आवृत्ती १९१५, उत्तरार्ध, दुसरी आवृत्ती १९१६**

श्री. वामन मल्हार जोशी यांच्या वाङ्‌मय संपदेमध्ये पाच कादंबऱ्या, एक स्मृतिचित्रात्मक ग्रंथ, तीन ग्रंथ तत्त्वज्ञान विषयावर आणि तीन समीक्षात्मक पुस्तके यांचा समावेश असून, त्यांचे निरनिराळ्या मासिकांत २६ लेख प्रसिद्ध झाले आहेत. यामध्ये ग्रंथपरीक्षणे, प्रासंगिक लेखन इत्यादींचा समावेश आहे. बा. सी. मर्ढेकर यांच्या 'वाङ्‌मयीन महात्मता' या ग्रंथास त्यांनी प्रस्तावना लिहिली आहे. श्री. वा. म. जोशी तत्त्वज्ञान विषयाचे अभ्यासक आणि याच विषयात त्यांनी एम. ए.ची पदवी संपादन केली होती. या अभ्यासातूनच त्यांनी त्यांच्या कादंबऱ्यात तत्त्वज्ञान विषयाचा ऊहापोह केला आहे. त्यांना 'तत्त्वचिंतक कादंबरीकार' म्हणून ओळखले जाते.

विजयगावातील भाऊसाहेब हे हेडमास्तर, त्यांच्या पत्नी माईसाहेब यांची कन्या रागिणी, भाऊसाहेबांचा भाचा आनंदराव. याच गावातील नानासाहेब हे वकील व त्यांच्या पत्नी लक्ष्मीबाई यांची कन्या उत्तरा. भाऊसाहेब व नानासाहेब मित्र तद्वतच उभयतांच्या कन्या रागिणी व उत्तरा मैत्रिणी. कादंबरीच्या नायिका व उपनायिका. याच गावातील रामशास्त्री सातारकर अथवा शास्त्रीबुवा, भाऊसाहेब, नानासाहेब आणि शास्त्रीबुवा यांच्यात वादविवाद, तत्त्वचिंतनात्मक चर्चा होत. या कादंबरीतील आणखी एक पात्र रावसाहेब गुपचुपे (जहागीरदार) यांचा पुत्र कादंबरीचा नायक भय्यासाहेब नायिकेचा मावसआत्तेभाऊ आनंदराव व भय्यासाहेब मित्र. रागिणी-भय्यासाहेब यांच्या लग्नात भय्यासाहेबांच्या कृपण वृत्तीमुळे अडथळे येतात पण नानासाहेब या लग्नासाठी आर्थिक मदत करतात. नानासाहेब व भाऊसाहेब हे सुधारकी मताचे पण भय्यासाहेबांची प्रवृत्ती धर्माकडे. भय्यासाहेब बोधस्वरूपस्वामींच्या नादाने संसार सोडून पुरश्चरणासाठी जातात. त्यांच्या शोधार्थ शास्त्रीबुवा भाऊसाहेब व रागिणी जातात पण काशीला भय्यासाहेब वारल्याचे कळते. रागिणी विधवा होते. या मंडळीमध्ये अगोदरच शिरलेला जनुभाऊ चकणे हे या कादंबरीतील खलपात्र. उत्तरा किंवा रागिणी यांपैकी कुणाशीही लग्न करून त्यांची संपत्ती बळकावण्यात याचा उद्देश पण तो सफल होत नाही. पण रागिणीविषयी इतरांचे मन कलुषित करण्याचे त्याचे कार्य मात्र साधते. विजयगावकर मंडळी हिमालयाच्या प्रवासास जातात. दरम्यान जनुभाऊ आनंदराव व रागिणी यांच्या संबंधाबद्दल नानासाहेब व आईसाहेब यांच्या मनांत विषाची पेरणी करतो. पण रागिणीने केलेल्या त्याच्या निर्भर्त्सनेमुळे संशयवृत्ती लयास गेल्याने आनंदराव व उत्तरा यांचे लग्न होते. प्रवासात प्रिय ब्रह्मस्वामीशीं या मंडळीची ओळख होते आणि या स्वामींच्या आश्रमात भय्यासाहेब भेटतात. स्वामींच्या आज्ञेने भय्यासाहेब अध्यात्माचे वेड सोडतात व रागिणीचे आणि त्यांचे पुनर्मिलन होते. रागिणी ही एक आदर्श सुशिक्षित स्त्री तर उत्तरा शिक्षितच पण अधिक धीट व निर्भीड आहे. उत्तरा ही आधुनिक स्त्रीची प्रतिमा. रागिणी मर्यादाशील आणि मृदू आहे. मराठी कादंबरी वाङ्‌मयातील नायिकात रागिणीला अग्रस्थान आहे. कादंबरीत जागोजागी नानासाहेब, भाऊसाहेब आणि शास्त्रीबुवा यांच्यात, 'धर्म व कर्तव्य', 'बुद्धी व श्रद्धा', 'ब्रह्म निर्गुण की सगुण ?', 'ईश्वराचे अस्तित्व' या विषयांवर चर्चा होते. 'संसार आनंददायक आहे, किंवा दुःखदायक, दुःख उत्पन्न करण्यात ईश्वराचा कोणता हेतू असावा ?', 'जगात अन्यायाचे वास्तव आहे काय ?' इत्यादी चर्चाही येते. पात्रांच्या या स्वरूपाच्या धर्मशास्त्र, अध्यात्मशास्त्र या विषयांवरील तात्त्विक चर्चेमुळे कथानकाला विस्कळीतपणा आला आहे. अर्थात दृष्टिकोन आणि वृत्ती यांची प्रतिनिधी असलेली पात्रे आहेत. ललित लेखनांत तत्त्वचिंतन असावे किंवा नाही हा वादाचा मुद्दा असला तरी कादंबरीच्या नायिकेच्या-रागिणीच्या वैवाहिक सुखाचे सुंदर चित्रण या कादंबरीत श्री. वा. म. जोशी यांनी केले आहे.

**रांगणेकर आणि मराठी रंगभूमी : गोमकाळे, द. रा. प्रकाशक : विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, नागपूर, १९५०.** या ग्रंथात मराठी रंगभूमीचा १९४० ते १९५० या दहा वर्षांचा आढावा घेऊन, त्यात नाटककार मोतीराम गजानन रांगणेकर यांनी केलेल्या क्रांतिकारक सुधारणा व त्यांचे नाट्यनिर्माता म्हणून स्थान स्पष्ट करण्यात आले आहे. रांगणेकरांच्या 'वहिनी' या नाटकाचे स्थान 'सतरा वर्षे' ही त्यांची एकांकिका वगळल्यास, सर्वश्रेष्ठ आहे हे सांगून त्यांचे विशेष लक्ष नाटकाचे प्रयोग प्रेक्षकांना सर्व दृष्टीने आवडावे याकडे होते, असा ग्रंथकाराचा अभिप्राय आहे. 'आशीर्वाद' 'कुलवधू', 'आजचे संसार', 'पतित एकदा पतित का सदा', 'रंभा', 'लिलाव', 'बडे बाप के बेटे' या नाटकांनी, त्या वेळी मरगळलेली रंगभूमी पुन्हा हातपाय हालवू लागली. या छोट्या खेळकर आणि डोक्यास शीण न देणाऱ्या, संगीत योग्य प्रमाणात व उचित ठिकाणीच वापरलेल्या नाटकांनी व त्यांचे दिग्दर्शक रांगणेकर यांनी मराठी रंगभूमी जिवंत ठेवली असा अभिप्राय व्यक्त करतो. 'पहिली तारीख', 'फरारी', 'मी आणि तू', 'कारकुनाचे स्वप्न' या एकांकिकांचाही परामर्श गोमकाळे यांनी सदर ग्रंथात थोडक्यात घेतला आहे. रांगणेकरांचे नाट्यविषयक कार्य व कर्तृत्व स्पष्ट करणारा असा हा महत्त्वाचा समीक्षाग्रंथ आहे.

रत्नाकर आनंदराव पतंगे

**राजकुंवर : एकबोटे, कृष्णाजी अनंत (सहकारी कृष्ण), प्रकाशक : केशव कृष्णाजी साळवी, १९१५.** या ऐतिहासिक कादंबरीच्या कथानकाला संभाजी महाराजांच्या वधाची पार्श्वभूमी असून, संभाजी महाराजांची बहीण राजकुंवर व तिचा पती गणोजी शिर्के यांच्या परस्पर संबंधाचे तीत चित्रण आहे. वेषांतरे, रहस्यभेद, नाट्यपूर्णता ही तत्कालीन कादंबरीची वैशिष्ट्ये या कादंबरीत दिसून येतात.

वि. शं. चौघुले

**राजसंन्यास : गडकरी, राम गणेश. प्रकाशक : परचुरे पुराणिक आणि मंडळी, मुंबई, १९२६ आवृत्ती ३ री.** राम गणेश गडकऱ्यांच्या अपूर्ण नाटकांपैकी हे एक नाटक. या ऐतिहासिक नाटकाची कल्पना लेखकाला मालवणच्या सिंधुदुर्गावर सुचली. मुख्य व्यक्तीच्या कर्तव्यपरायणतेवाचून अन्य परिस्थितजनांची पुण्याई कुचकामी ठरते. त्यामुळे ज्या व्यक्तीवर जबाबदारी असते तिला तिची जाणीव असणे महत्त्वाचे असते हे या नाटकाचे मुख्य सूत्र होय.

बेडरपणाने मरणाला सामोरा जाणारा शिवपुत्र संभाजी हा या नाटकाचा नायक. इतिहास आणि कल्पिताचे मिश्रण करून संभाजीची व्यक्तिरेखा गडकऱ्यांनी उभी केली व त्यामधून 'राजा म्हणजे जगाचा उपभोगशून्य स्वामी' हे मर्म मांडले. नाटकातील लयबद्ध गद्य भाषा, मोहक शब्दयोजना, काव्यात्म धुंद वातावरण ही मराठी रंगभूमीला व साहित्याला दिलेली देणगी होय.

वसंत नरहर कुबेर

**राजा शिवाजी : कुंटे, महादेव मोरेश्वर, (१) भाग १ ते ३, प्रकाशक : महादेव मोरेश्वर कुंटे, मुंबई, १८६९, (२) भाग ४ ते ६, प्रकाशक : महादेव मोरेश्वर कुंटे, मुंबई, १८७१.** श्री. महादेव मोरेश्वर कुंटे हे कवी, संस्कृत भाषेचे जाणकार, या नात्याने प्रसिद्ध आहेत. त्यांनी शिक्षक आणि मुख्याध्यापक या नात्याने आपला संपूर्ण व्यवसाय केला. 'मन', 'राजाराम महाराज', 'ऋषी' आणि 'राजा शिवाजी' ही त्यांची काव्ये प्रसिद्ध आहेत. महाकाव्यसदृश्य असे 'राजा शिवाजी' हे काव्य निर्मिण्याची त्यांची मनीषा होती व ते या काव्याचे एकूण बारा भाग निर्माण करणार होते. परंतु भाग ०१ ते ०३ हे तीन भाग १८६९ साली आणि भाग ०४ ते ०६ सन १८७१ मध्ये प्रसिद्ध झाले. या काव्यास त्यांनी उप शीर्षकही जोडले होते 'राजा शिवाजी' : नावाची वीररसप्रधान कविता'. व्यवसायामुळे तसेच या काव्यावरील प्रतिकूल टीकेमुळे त्यांचेकडून पुढील भाग म्हणजे ०७ ते १२ हे भाग लिहून झाले नसावेत असा निष्कर्ष आहे. सर्वार्थाने हे काव्य अपूर्ण आहे, त्यातूनही श्रीमन्महाराजाच्या बालपणाचे चित्रण या काव्यात नाही.

या सहा भागांमध्ये काव्याची प्रथम भागाची सुरुवात प्रथेप्रमाणे शारदावंदनाने केली आहे. पन्हाळ्याला सिद्दी जोहरने घातलेला वेढा यातून सुटण्यासाठी महाराजांनी आपल्या फौजेस केलेले क्षात्रधर्माचे आवाहन याचे वर्णन येते. वेढ्यामुळे महाराणी सौ. सोयराबाईंच्या मनात आलेले विचार. महाराज त्यांना अंगीकृत कार्याची जाणीव देतात. श्रीमंत संभाजी महाराजांच्या बाललीला, श्रीमंत सौभाग्यवती जिजाबाई महाराणी यांनी शत्रूचा समाचार घेण्याचा दिलेला आदेश हे वर्णन दुसऱ्या भागात येते. ठिकठिकाणाहून आलेले मराठा वीर नेताजी व तानाजी यांच्या नेतृत्वाखाली स्वपराक्रमाने मुसलमानांचा पराभव करतात हा भाग तिसऱ्या भागात येतो. चौथ्या भागात माघार घ्यावी की शत्रूवर तुटून पडावे या मसलतीसह बहिर्जीचे आगमन, त्याने आणलेला वृत्तान्त, जिजाबाई, संभाजी, यांचे पिलाजीसह रांगण्याकडे गमन, महाराज आणि सोयराबाई किल्ला बहिर्जीसह सोडतात. बाजीप्रभू मोहिमेचे नेतृत्व स्वीकारतात हा भाग येतो. पाचव्या भागात प्रवासाचे वर्णन आहे. हा अरण्यातला खडतर प्रवास आहे. बाजीप्रभूचा अतुलनीय पराक्रम, महाराजांचे सुखरूप आगमन तोफेच्या आवाजाने बाजीप्रभू प्राण सोडतात, त्यांच्या मृत्यूने महाराजाना झालेला शोक इत्यादींचे वर्णन या भागांत आहे. वाडीकर सावंत आणि मुधोळकर, घोरपडे यांचे महाराजांनी केलेले पारिपत्य, श्रीमान महाराज शहाजी महाराजांचे आगमन, बादशहाची माघार, हे वर्णन आहे. महाकाव्याच्या रचनेचे जे निकष आहेत त्यानुसार पात्रवर्णन निसर्गवर्णन आणि इतर अनुषंगिक घटनांचा तपशील यामुळे आणि अत्यंत सोप्या साध्या भाषेत लिहिलेल्या या काव्यास फारशी प्रसिद्धी मिळाली नाही. अर्वाचीन मराठी साहित्याच्या इतिहासाच्या आरंभकालातील हे एक अत्यंत महत्त्वाचे काव्य आहे.

**राणा प्रतापादित्याचे चरित्र : बसू पं. राम राम, मराठी अनु. पं. वैजनाथ शर्मा, (वैजनाथ शिवराम कानफाडे), १८१६.** अर्वाचीन मराठीच्या प्रारंभकाळातील हा ग्रंथ असून पंडित राम राम बसू यांच्या बंगाली भाषेत छापलेल्या पहिल्या ग्रंथाचा हा मराठी अनुवाद आहे. अनुवादक वैजनाथ शर्मा हे कलकत्ता येथील मिशनरी लोकांच्या शैक्षणिक कार्यात सहायक होते. फोर्ट विल्यम कॉलेज, कलकत्ता येथे संस्कृत पंडित म्हणून काम करीत असताना त्यांनी मराठीत ग्रंथरचना केली. या रचनेमुळे त्यांना अर्वाचीन मराठी गद्य रचनेचे प्रवर्तक म्हणून लौकिक प्राप्त झाला.

हा ग्रंथ इ. स. १८१६ मध्ये छापण्यात आला असून मराठीच्या प्रारंभकाळातील पंचतंत्र, हितोपदेश, सिंहासन बत्तीशी या परंपरेतील हा ग्रंथ आहे. या ग्रंथातील भाषा अव्वल इंग्रजी अमदानीतील मराठी भाषा असून लेखक मूळचा नागपूरकडील असल्याने, त्याच्या लेखनातील तिकडील बोलीची छटा जाणवते.

चंद्रकांत धांडे

**राणीचा बाग : वर्टी, अ. वा. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९५०.** जन्मांध उमेला तिचा कुरूप पण विशाल हृदयी पती अतिप्रयत्नांनी दृष्टी देववितो. पण महिन्याभरातच आलेल्या जगाच्या कटू व दुष्ट अनुभवांनी ती पुन्हा आपले डोळे फोडून घेऊन आंधळी होते. जग म्हणजे मानवी रूपात असणाऱ्या विविध प्राण्यांच्या व जनावरांचा राणीचा बाग (पशुसंग्रहालय) आहे ही मध्यवर्ती कल्पना. चमत्कृती व संघर्ष यामुळे नाटकाचे आशयसूत्र ठसठशीतपणे व्यक्त होते.

गो. वि. वैद्य

**रात्र आणि इतर एकांकिका : तेंडुलकर, विजय. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९५७.** सात वैशिष्ट्यपूर्ण एकांकिकांचा संग्रह.

प्रेमभंगाचे शल्य उरी वागवणारा पुरुष आणि गृहिणी जीवनाला मुकलेली वेश्या यांची एका रात्री झालेली भेट, जुनी शल्ये मोकळी करून नवी शल्ये सोबतीलात घेऊन आपापल्या मार्गाने सकाळी केलेली वाटचाल 'रात्र'मध्ये, तर परिकथेतील राजकुमाराची वाट पाहणाऱ्या कुरूप अविवाहित मुलीची कहाणी 'गोष्ट'मध्ये आहे. स्वप्न व सत्य नेहमीच वेगळी असल्याने होणाऱ्या अपेक्षाभंगाचे दु:ख टाळण्याचा प्रयत्न करणाऱ्या तरुणीची कहाणी 'ओळख'मध्ये आहे. अशाच 'काळोख', 'चार दिवस', 'बळी', 'झपूर्झा', 'लोकल' या एकांकिका समाविष्ट आहेत.

जीवनातील गंभीर विषयांची हाताळणी, सूक्ष्म भावदर्शन, अंतिम क्षणी मिळणारी नाट्यमय कलाटणी यांमुळे प्रभावी झालेल्या या एकांकिका वाङ्मयीन व प्रायोगिक दृष्टीने उल्लेखनीय आहेत.

शरद दळवी

**रात्रीचा दिवस : मर्ढेकर बा. सी., प्रकाशक : दि इंटरनॅशनल बुक सर्व्हिस, पुणे, १९४२.** बा. सी. मर्ढेकर हे मराठीतील पहिले नवकवी म्हणून आणि कलावादी भूमिकेची नेटकी मांडणी करणारे सौंदर्यमीमांसक म्हणून ओळखले जातात. 'नटश्रेष्ठ आणि चार संगीतिका' ह्या नाट्यकृती ; 'शिशिरागम' (१९३९), 'काही कविता' (१९४७), 'आणखी काही कविता' (१९५१) हे कवितासंग्रह ; 'रात्रीचा दिवस' (१९४२), 'तांबडी माती' (१९४३), 'पाणी' (१९४८) या कादंबऱ्या ; आणि 'Arts and Man' (१९३७), 'Two Lectures on an Aesthetic of Literature' (१९४४), 'वाङ्मयीन महात्मता' (१९४१), 'सौंदर्य आणि साहित्य' (१९५५) हे समीक्षाग्रंथ प्रसिद्ध आहेत.

'रात्रीचा दिवस' ही मर्ढेकरांची संज्ञाप्रवाही कादंबरी आहे. Stream of consciousness या शब्दाला मराठीत 'संज्ञाप्रवाह' अशी संज्ञा आहे. संज्ञाप्रवाह म्हणजे संपूर्ण मनोविश्लेषण नसून मनोविश्लेषणाचा एक प्रयत्न म्हणता येईल. हा नवा प्रयोग जाणीवपूर्वक करणारे मर्ढेकर हे मराठीतील पहिले लेखक.

या कादंबरीत कथानक क्षीण स्वरूपात आले आहे. कादंबरीच्या नायकाच्या आयुष्यातील बारा तासांच्या कालखंडाचे चित्रण येते. या बारा तासात कादंबरीचा नायक दिग्पाल ऑफिसातून घरी येतो... आंघोळ करतो ... मित्राबरोबर जेवण करतो ... झोपतो ... दुसऱ्या दिवशी ऑफिसात गेल्यावर हरिणी-सेशालच्या विवाहाची वार्ता त्याला कळते ... यंत्रांचा खडखडाट, बातम्या, तारा, भाषांतरे, यांच्या गडबडाटात त्याला प्रेयसीच्या विवाहाचा विसर पडतो ... पडावा म्हणून तो स्वत:ही प्रयत्न करतो, एवढेच कथानक येथे येते.

या कालावधीत दिग्पालचे मन भरकटते आणि बाह्य वास्तवाकडून आपले मन अंत:प्रेरणेकडे वळत असते. येथे 'निवडणे' या बाह्य घटनेकडून निवेदकाचे मन निवडुंगाकडे वळते. बुधकौशिक ऋषीचा कृषी होतो असे केवळ शब्दांच्या साम्यावरच नव्हे तर निवेदकाच्या मनात 'कुलाब्याची दांडी' या कादंबरीवरून 'गोतास काळ' असा परिणामस्वरूप वाक्प्रयोग तयार होतो. निरर्थक शब्दयोजना अनेक ठिकाणी आढळते. अशा शब्दनिर्मितीतून निवेदकाच्या मनाची अवस्था कळू शकते.

मर्ढेकरांच्या या कथात्मक प्रयोगाचे फार अनुकरण झाले नाही.

वि. दा. वासमकर

**रामकृष्ण चरित्र : परांजपे, न. रा. श्रीरामकृष्ण आश्रम, नागपूर, पहिली आवृत्ती, १९२५.** श्रीरामकृष्ण परमहंस यांच्या या चरित्राचे दोन भाग आहेत. या दोन्ही भागात श्रीरामकृष्णांच्या चरित्रातील अनेक घटना व प्रसंग क्रमश: दिलेले आहेत. त्यांपैकी श्रीरामकृष्णांची वेदान्त साधना, श्रीरामकृष्णांची तीर्थयात्रा, साधक भावासंबंधी आणखी काही गोष्टी , श्रीरामकृष्णांची शिक्षणपद्धती, नरेंद्रनाथांची परिचय वगैरे प्रकरणे उल्लेखनीय आहेत.

श्रीरामकृष्ण हे सामान्य साधू नसून श्रीचैतन्य श्रीकृष्ण, येशुख्रिस्त वगैरे महापुरुषांच्या कोटीतील महापुरुष होते असे या चरित्रात श्रीरामकृष्णांचे मोठेपण वर्णन केले आहे.

श्रद्धा आणि विवेचकता या दोन्ही दृष्टींनी हे चरित्र अधिक प्रभावी व यशस्वी उतरले आहे.

सुधा कापरे

**रामजोशीकृत लावण्या : प्रकाशक : रा. श्री. गोंधळेकर, पुणे, १८८९.** शाहीर राम जोशी हे मूळचे सोलापूरचे. घराणे वेदशास्त्रसंपन्न पंडिताचे. परंतु शाहिरांनी आपल्या जीवनातली काही वर्षे तमासगिरांच्या सहवासात काढली, तमाशात काम केले, लावण्यांचे लेखन केले. काही वर्षे पंढरपुरात एका शास्त्रीबुवांच्याकडून संस्कृत भाषेचे अध्ययन घेतले, शाहीर संस्कृत भाषेचे जाणकार होते. त्यांच्या काही संस्कृत रचनाही आहेत.

कालांतराने ते पुराण कीर्तन करतही हिंडले. त्यानी रचलेल्या कवनात पुढील काव्यप्रकारांचाही समावेश आहे. गौळणी, लावण्या, फटके, कटिबंध, आर्या, श्लोक, पदे इत्यादी. लावण्यांचे विषयही विविध आहेत. अध्यात्म, शृंगार, वैराग्य, भगवद्‌भक्तिपर, दैवतवर्णनपर, तीर्थांच्या संबंधी, उपदेश-नीतिपर, स्फुट विषयावर-शृंगारिक लावण्यात पौराणिक आणि लौकिक तसेच कृष्णलीला इत्यादी उत्तान शृंगाराचे वर्णन करणाऱ्या लावण्याही आहेत. छेकापन्हुति अलंकाराचे वर्णन करणारी 'राधासखीसंवादे' ही लावणीही प्रसिद्ध आहे. त्यांनी एकंदर सर्व काव्यप्रकार मिळून १३३ रचना लिहिल्या आहेत. त्यांपैकी काही प्रसिद्ध रचना पुढीलप्रमाणे 'सुंदरा मनामध्ये भरली', 'दो दिवसांची तनु ही साची', 'नरजन्मामध्ये नरा, करुनि घे नरनारायण गडी', 'भला जन्म हा तुला लाधला', 'मनुजा सुखदायक हरिला गावे'. त्यांचे तीन-चार पोवाडे प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणे स्थलवर्णनात पंढरपूर, तुळजापूर गावावरील कवने प्रसिद्ध आहेत.

**रामामृततरंग : रामपंडित. प्रकाशक : आबाजी रामचंद्र सावंत, पहिली आवृत्ती, इ. स. १८९५, बेळगाव, दुसरी आवृत्ती, इ. स. १९५२.** माधवस्वामींचे पुत्र रामपंडित यांनी लिहिलेल्या ' श्रीरामामृततरंग ' नामक ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यात अश्वदैत तत्त्वज्ञानाचे निरूपण केलेले आहे. या ग्रंथाचे प्रथम प्रकाशन आबाजी रामचंद्र सावंत यांनी इ. स. १८९५ मध्ये बेळगाव येथे केले. तंजावर येथील पंडित नागराजराव यांनी इ. स. १९५२ मध्ये त्याचे पुनर्प्रकाशन केले.

श्रीराम हे रामपंडितांचे आराध्यदैवत होते. भवसागरातून तारून नेण्याचे, मुक्तिमार्गास लावण्याचे सामर्थ्य, रामनामात आहे, ह्या श्रद्धेने त्यांनी प्रस्तुत ग्रंथास ' श्रीरामामृततरंग ' असे नाव दिले. ह्या ग्रंथात आत्मज्ञान, पंचीकरण, चिद्‌रूप आत्मा व जडरूपी माया, सूक्ष्म देह, महाकारण देह, प्रपंचस्वरूप, भक्तिलक्षण, आत्मबुद्धीचे स्वरूप व स्वानंदप्राप्ती अशा अनेक विषयांचा परामर्श घेतलेला आहे. ब्रह्मज्ञानाचे निरूपण करतानाही भक्तिमार्ग व भगवंताच्या नामस्मरणावरच कवीने अधिक भर दिलेला आहे. काव्यदृष्ट्या रचना नीरस व रूक्ष वाटते. ग्रंथात पंधरा तरंग आहेत व ओवीसंख्या १८०० आहे.

उषा पुरोहित

**रामायण (रामदासकृत) : प्रकाशक : सुवर्ण, मुंबई, प्रकाशन काल नाही.** समर्थ रामदासांनी लिहिलेले 'रामायण' फक्त सुंदरकांड व युद्धकांड इतकेच आहे. सुंदरकांडाचे १०१ व युद्धकांडाचे १३६२ अशी एकूण १४६३ श्लोकांत रामदासांनी सांगितलेली ही रामकथा आहे. राम हे समर्थ रामदासांचे कुलदैवत होते व मारुती ही शक्तीची देवता असल्याने त्यांचा गुणगौरव रामदासांनी केलेला आहे. त्यातही मूळ रामायणातील मारुतीच्या पराक्रमाचे वर्णन असलेला कथाभाग त्यांनी आपल्या रामायणासाठी निवडला.

रामकथा श्रवण केल्यामुळे बिघडलेले कार्य सफल होते, विघ्ने नाहीशी होतात, रामभक्तांना आनंद होतो, इत्यादी हेतूंप्रमाणे आपल्या भक्तिभावाने परमेश्वराला संतुष्ट करून समाधान मिळवावे या कारणासाठी आपण हे काव्य लिहिले असे रामदासांनी म्हटले आहे. ऱ्हस्व, दीर्घ, यतिभंग इत्यादी गोष्टींची पर्वा न करता रचनेच्या सोयीसाठी भाषा वाटेल तशी वाकविलेली येथे दिसते.

**रावबहादुर दादोबा पांडुरंग (आत्मचरित्र व चरित्र) : संपादक : प्रियोळकर, अ. का. प्रकाशक : केशव भिकाजी ढवळे, मुंबई, १९५८.** पूर्वार्धात स्वतः दादोबांनी त्यांच्या इ. स. १८५७ पर्यंतचे लिहिलेले आत्मचरित्र व नंतरचे १८८२ पर्यंतचे म्हणजे त्यांच्या मृत्यूपर्यंतचे अनेक कागदपत्रांचे संशोधन करून प्रियोळकरांनी सिद्ध केलेले चरित्र अशी या ग्रंथाची दुहेरी मांडणी आहे.

व्याकरणकार व 'शिशुबोध'कर्ते दादोबा यांचे हे आत्मचरित्र व चरित्र. इंग्रजी अमदानीचा आरंभ, तत्कालीन मुंबई, तत्कालीन समाजस्थिती, रुढी, प्रथा यांचे ते चित्रण तर करतेच, पण आयुष्य शिक्षण क्षेत्रांत गेल्यानेच शिक्षक, शिक्षणपद्धतीचा सुरुवातीचा विकास वगैरेची कल्पनाही देते. इंग्रजी आमदानीच्या आरंभीची भारतीय समाजस्थिती समजण्यास उपयुक्त चरित्र—प्रियोळकरांचे आत्मचरित्राचे संपादन व चरित्राचे लेखन त्यांच्या व्यासंगाचा व साक्षेपी संकलन कौशल्याचा परिचय करून देणारे साधार चरित्र-आत्मचरित्र.

ऊर्मिला दळवी

**राक्षसविवाह : क्षीरसागर, श्रीकृष्ण केशव. प्रकाशक : य. गो. जोशी, १९४०.** श्रीकृष्ण केशव क्षीरसागर यांची ही एक दीर्घकथा आहे. सामाजिक प्रतिष्ठेचे निकष लावून ठरविलेल्या विवाहपद्धतीवर टीका करण्याचा लेखकाचा येथे हेतू आहे. आक्रमक भाषाशैलीत, प्रथमपुरुषी निवेदनाने लिहिलेल्या या कथेवर त्यावेळी खूप टीका झाली होती.

गोपीनाथ तळवळकर

**रुक्मिणी : माडखोलकर, ग. त्र्यं. प्रकाशक : मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, १९५९.** एका मध्यमवयीन, प्रतिष्ठित व श्रीमंत घराण्याची कथा. विदर्भातील सामाजिक व राजकीय स्थितीच्या पार्श्वभूमीसह चितारणाऱ्या चार कादंबऱ्यांपैकी पहिली.

विशिष्ट सरंजामी वर्गातील वृत्तिप्रवृत्तीच्या स्त्रीचे रुक्मिणी हे प्रातिनिधिक रूप. वऱ्हाडातील श्रीमंत व सरंजामी घराण्याचे चित्रण कदाचित प्रथमच मराठी वाङ्मयात या कादंबरीद्वारा येते.

शरद दळवी

**रुक्मिणी-स्वयंवर : नरेंद्र. संपादक : कोलते, वि. भि. अरुण प्रकाशन, मलकापूर (वऱ्हाड), दुसरी आवृत्ती १९४९.** नरेंद्र पंडिताचे ‘रुक्मिणी स्वयंवर’ हा ग्रंथ महानुभाव पंथाने पवित्र मानलेल्या सात ग्रंथातील एक आहे. ‘रुक्मिणी’ स्वयंवराचा कर्ता नरेंद्र हा ज्ञानेश्वरांच्या समकालीन कवी आहे. रामदेवराव यादवांच्या राजसभेत ‘रुक्मिणी स्वयंवराचे’ वाचन केल्यानंतर त्यातील रसाळपणामुळे रामदेवाला तो इतका आवडला की तो त्याच्या स्वतःच्या नावाने प्रसिद्ध व्हावा अशी लोभी इच्छा त्याला झाली. त्याने प्रत्येक ओवीला एक सोनटका देईन असेही सांगितले. पण स्वाभिमानी नरेंद्राने ‘ना राजे हो आमचेया कवीकुळा बोलु लागैलः’ असा स्पष्ट नकार दिला आणि रात्रीतून तिघा बंधूंनी या ग्रंथाची नकल केली. ही नकल ८७९ ओव्यांचीच झाली असा इतिहास या ग्रंथाच्या प्रस्तावनेत येतो.

नरेंद्र स्वतः पंथात येण्यापूर्वी रचलेला व त्यानंतर साती ग्रंथात मानाचे स्थान मिळविलेल्या ह्या काव्यग्रंथाचा विषय श्रीकृष्ण आणि रुक्मिणी यांच्या विवाहाची कथा सांगणे हा आहे. या अपूर्ण ग्रंथात रुक्मिणीचे पत्र घेऊन सुदेव ब्राह्मण द्वारकेत प्रवेश करतो इथपर्यंत विवेचन आहे.

नरेंद्राचे ‘रुक्मिणी स्वयंवर’ हा ग्रंथ भावमधुरतेने, रसोत्कटतेने, कल्पनासौंदर्याने व अलंकारप्रचुरतेने सजले एक अतिशय सुंदर काव्य आहे. भाषाभ्यासकांना, काव्यमर्मज्ञांना या ग्रंथात शब्दांचे भांडार आणि रसभावांची कारंजी उडत असलेली दिसतील.” हे श्री. कोलते यांचे विधान या ग्रंथाचे महत्त्व अधोरेखित करते.

वि. दा. वासमकर

**रुक्मिणीहरण : सामराज. संपादक : तुळपुळे गोपाळ विष्णू. प्रकाशक : गोपाळ विष्णू तुळपुळे, . पुणे, १९२४.** सामराज (शामभट आर्वीकर, शामराज) वडील लक्ष्मण, सामराज हा एक शिवकालीन महाकवी. यांचा काळ सन १६२८ ते १६७८. असा मानला जातो. त्याचे मुदेग्लाख्यान हे एक खंडकाव्य असून रुक्मिणीहरण हे त्याचे महाकाव्य मानले जाते. सामराजास आख्यानकवी मानले जाते. सामराज हा पंडित कवीत सर्वश्रेष्ठ मानला जातो.

मराठी कवितेमध्ये संतकाव्य, पंत (पंडित काव्य) आणि शाहिरी काव्य हे ठळक टप्पे आहेत. आख्यान काव्य हा एक आकर्षक वाङ्मयप्रकार आहे. या पंडिती काव्यपरंपरेस महंदबेपासून- मोरोपंताच्या परंपरा आहे असे मानले जाते. यामध्ये महदंबा, एकनाथ, मुक्तेश्वर, सरस्वती गंगाधर, इत्यादींचा उल्लेख केला जातो. सामराजाच्या समकालीन पंडित कवीत नागेश, वामन पंडित, रघुनाथ पंडित, विठ्ठल इत्यादी पंडित कवी आहेत. आख्यान म्हणजे कथन यामध्ये कथन कौशल्य असावे लागते व्यक्तिदर्शन आणि वर्णन सामर्थ्य असावे लागते. कल्पनारम्यता, संसृती टीका आणि धार्मिक हेतु हे विशेषही असावे लागतात. जवळजवळ सर्वच पंडित कवींनी महाभारत, रामायण आणि भागवत ही महाकाव्ये तसेच जैमिनी भारत, पुराणे आणि संस्कृत महाकाव्ये आपल्या काव्यरचनेसाठी आधारभूत धरली आहेत. त्यामुळे संस्कृत भाषेचा प्रभाव असलेली संस्कृतनिष्ठ भाषा, वृत्ते, अलंकार आणि नवरस यांचाही सढळ वापर पंडितकवींच्या रचनेत आहे. सामराजास मराठीचा पहिला महाकवी मानले जाते.

रुक्मिणीस्वयंवर (एकनाथ), रुक्मिणीस्वयंवर (महानुभाव कवी नरेंद्र) रुक्मिणीस्वयंवर (विठ्ठल बीडकर) आणि सामराजाचे रुक्मिणीहरण इत्यादी रुक्मिणीविषयक काव्यांचा समावेश होतो. सामराजाच्या रुक्मिणीहरण काव्यात आठ सर्गांचा समावेश असून या सर्गांची नावे पुढीलप्रमाणे आहेत. कृष्णजन्म, रुक्मिणीजन्म, मदनावस्था, पत्रिकालेख, द्वारकादर्शन, कुंडिनागमन, रुक्मिणीविलाप, रुक्मिण्युपदेश व रुक्मिणीकरण . . . . इत्यादी या सर्वांची मिळून श्लोकसंख्या ११४० आहे. भागवत ग्रंथाच्या, दशम स्कंधातील अध्याय ५२ आणि ५३ हा या काव्याचा प्रमुख आधार आहे. नवरसानी आणि प्रमुख अलंकार व वृत्तांनी सजलेले हे काव्य आहे. सामराजाने सुरुवातीसच वर्तविले आहे की, ‘जे बोलिली भागवती पुराणीं। विस्तारीली जी पुरुषी पुराणी।।’ त्यानंतर सामराजाने हे काव्य रचण्याचे दोन हेतू सांगितले आहेत.

अगत्य नाहीं जनरंजनाचें। लागें तुझें ध्यान निरंजनाचें।
आराधनी अन्य उपाय नाही। समर्पितो याच उपाय नाहीं।।
कथा हे कृष्णाजी सकलजगदानंदजननी। मनोभावें ईचें स्मरण करिजे नित्य सुजनी ।।
प्रसंगे श्रोत्याचें सकळहि महादोंष हरती. यदुत्तसप्रेमें विषयरसगोडी विसरती ।।

यातील नायक श्रीकृष्ण, नायिका रुक्मिणी, नायिकेचे माता, पिता इत्यादी प्रमुख पात्रांचे वर्णन यथातथ्य आहे. रुक्मी, सुदेव, सुदेव पत्नी, खलपुरुष आणि अन्य गौण पात्रांचे वर्णनही योग्यतऱ्हेने चित्रित केले आहे. नायक, नायिकेचे वर्णन, नायिकेच्या विरहाव्यस्थेच्या व्यथा, नायिकेच्या मातेच्या व्यथा यांचेही वर्णन सखोल आहे. ‘स्वभावोक्ती’ अलकारांत वस्तूचे यथातथ्य वर्णन येते हा अलंकार सामराजाचा आवडता अलंकार आहे. दुस्तर संसाराचे वर्णन करताना कवी म्हणतो की,

‘आयुःपयाचा अति गोड प्याला। हळू हळू काळबिडाल प्याला।।’

निसर्गवर्णनात पौर्णिमेच्या चंद्राचे वर्णन खालीलप्रमाणे येते.

तदुपरि उगवे हा चंद्रमा पौर्णिमेचा
अनभिलषित अर्थी होय ये उत्तमेचा।
द्विजपति विसरेना सर्वथा स्वीय दीक्षा,
कर पसरून मागे वक्त्रलावण्यभीक्षा।।

**रुद्रवीणा : कांत, वा. रा. संपादक : प्रतिभा प्रकाशन, औरंगाबाद, १९४७.** या संग्रहात १९३० ते १९४७ पर्यंतच्या वा. रा. कांत यांच्या प्रसिद्ध व अप्रसिद्ध स्फुट कविता संग्रहित केल्या आहेत. यांत स्वातंत्र्यसन्मुख भारताच्या जनजागरणाचे प्रतिबिंब, त्याग, तेज आणि प्रसन्नता ही वैशिष्ट्ये, काही प्रेमगीत आहेत. त्यांत कधी, निराशमनाचे मूकभाव, कधी निर्व्याज प्रसन्नता, कधी प्रणयिनी स्त्रीचे वर्णन इत्यादि विषयांचे मुलायम चित्रण. अर्थवाही, अनुप्रासगर्भ नादमय शब्दरचना कवितांच्या शीर्षकांखालोखालच 'रुद्राक्षकन्या ',' वासणी ', ' भृंगावर्तनीस्वैर ' , ' नववधू 'अशा जाति प्रत्येक कवितेवर दिल्या आहेत.

सौ. वसुंधरा बनहट्टी

**रूपगर्विता आणि सहा गोष्टी : केळकर, दिवाकर कृष्ण (दिवाकर कृष्ण) वाग्विलास मंडळ, हैदराबाद, १९४१.** दिवाकर कृष्ण यांचे पूर्ण नाव दिवाकर कृष्ण केळकर त्यांचे शिक्षण एम.ए.,एलएल.बी.पर्यंत झाले होते. ते हैदराबाद येथे वकील होते. ते कथाकर म्हणून प्रसिद्ध आहेत. ' कथा ' हा वाङ्मय प्रकार बंदिस्तपणामुळे ओळखला जातो. यामध्ये कादंबरीचा पाल्हाळ नाही. यामध्ये अनुभव, पात्र रचना, वातावरण, निवेदन, भाषा यांचा समग्र विचार करून कथालेखन केले जाते.

दिवाकर कृष्णांना मराठी लघुकथेचे शिल्पकार मानले जाते. तरीही त्यांचे कथालेखन अत्यंत अल्प आहे. साधारण २५ ते ३० कथा भावनाविष्कार, भाषेचा प्रयोजक वापर, अनुभवाभिमुख कथा, वातावरण निर्मिती इत्यादी विशेषणे त्यांच्या कथेच्या संदर्भात व्यक्त झाली आहेत. त्यांच्या कथेत स्त्री जीवनाचा अविष्कार झाला आहे, स्त्री मनाचे विविध पैलू व्यक्त झाले आहेत. प्रीतीची विविध रूपे त्यांनी कल्पकतेने चित्रित केली आहेत. त्यांचे तीन कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. पहिला समाधि आणि सहा गोष्टी (१९२७), दुसरा प्रस्तुतचा १९४१ साली प्रसिद्ध झालेला संग्रह, तिसरा १९५५ साली प्रसिद्ध झालेला संग्रह, ' महाराणी आणि इतर कथा '.

प्रस्तुत संग्रहात सात कथा समाविष्ट आहेत. पहिली कथा ' रूपगर्विता '. नायिका पूर्वाश्रमीची आनंदी. पद्माकराशी लग्न झाल्यानंतर पद्मावती नायिकेचे वर्णन अप्रतिम. परंतु नायिका आपला सौंदर्याचा वृथा अभिमान बाळगून आपला नाश करून घेते. ' दंडकारण्यातील प्रणयिनी ' या कथेत नाजूक प्रणयभावनांचा संघर्ष चित्रित केला आहे. ' नीलम ' ' ऋता' आणि ' देवव्रत ' या तीघांची ही प्रणयकथा आहे. आर्यकुळ, दस्यूकुळ यांचे वर्णन तसेच वातावरण निर्मितीसाठी निसर्ग वर्णन हे तपशीलाने या कथेत येते. आर्य-दस्यु संघर्षाचे भावुक कथानक चित्रित केले आहे. ऋता देवव्रत-आणि-नीलम यांच्यासाठी स्वतःला दरीत झोकून देऊन आत्महत्या करते. ' आशाबंध ' या कथेत आशावतीच्या मनात लहानपणापासून शेजारी रहात असलेल्या तरुणाबद्दल प्रीती निर्माण होते. पण ती व्यक्त न करता आल्याने तिचे आयुष्य दुःखमय होते. ' लोकनिंदेचा व्रतभंग ' या कथेची नायिका सुधा सबनीस विवाहानंतरची ' दमयंती देवी ' या नायिकेच्या मोकळ्या वागण्याने समाजात तिच्याबद्दल गैरसमज निर्माण होतात. या संदर्भात नायिकेच्या मनात निर्माण झालेली आंदोलने चित्रित केली आहेत ' दीपगृहावरील मध्यरात्र ' या कथेत कोळी जमातीत जन्मलेल्या परंपराप्रिय, धाडसी तरुणीचे चित्रण येते. संवादासाठी कोकणी भाषेचा अवलंब या कथेत आहे. सुरुवातीला ती नायकाबरोबर संघर्ष करते पण त्याचे तिच्यावरील प्रेम पाहून अंती ती त्याचा स्वीकार करते. नायिकेच्या आई-वडिलांचे तसेच निसर्गाचे यथातथ्य वर्णन प्रसंगानुरूप या कथेत येते. ' अनुराधेचे स्वप्न ' ही कथा अनुराधेची साहजिकच स्त्री जीवनाचे यात चित्रण आहे. अनुराधेचे एका तरुणावर प्रेम असते पण तिचे लग्न मात्र अन्य तरुणा बरोबर होते. प्रियकर सासरी तिला भेटायला येतो यामुळे तिच्या सासरच्या लोकांच्या मनात गैरसमज निर्माण होतो ती गृहत्याग करते व परित्यक्तेचे जीवन जगते. ' मलयागिरीवरील वसंतकाल ' या कथेत आत्तापाद्री खेड्यातील एका विवाहित स्त्रीचे कथन आहे. प्रसंगानुरुप कथेत व्यक्तिचित्रण, निर्सग वर्णन या गावातील समाजाच्या चालीरीतीचे चित्रण यात येते. श्री वि. स. खांडेकर याना दिवाकर कृष्णाच्या मितभाषा व सूचक प्रेमकथांचा मोठा अभिमान वाटत असे. ही कथा त्यांच्या कथाहून सर्वस्वा भिन्न कथा होती आणि नवकथेला आवाहन करणारी होती.

**रूपेरी वाळू : काणेकर, अनंत. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, १९४७.** " रुपेरी वाळू " या पुस्तकाची पहिली आवृत्ती खलिल जिब्रानच्या कणिकांचा अनुवाद म्हणून प्रकाशित झाली. मार्मिकपणा, उपरोध, भेदकदृष्टी,जीवनमूल्यांचे समन्वयी आकलन हे जिब्रानच्य छोट्या कथा परिच्छेदातून नजरेत भरणारे विशेष कालेकरांच्याही या कणिकात आढळून येतात. प्रश्नोत्तरे, मधील विस्मयकारकता, वैशिष्ट्य, माकड, शत्रु, शिंपी, शक्ती, यातील मार्मिक व्याजोक्ती, सौजन्य, भिकारी, मधील उपरोधिकता, शहाणा, स्वातंत्र्य, सौंदर्य, वगैरेतून दिसणारे जीवनदर्शन हे विशेष. त्यावर जिब्रानचा ठसा उमटला आहे.

एकच विचार घेऊन तो अत्यंत थोडक्या शब्दात सौंदर्यपूर्ण-रितीने प्रकट करणे व एखादे तत्त्वदर्शन घडविणे हे जे कणिकांचे वैशिष्ट्य ते येथें दिसते. पुस्तकामध्ये एकूण १८ कणिका आलेल्या असून कल्पना वैचित्र्य आणि अर्थप्रतीति याबाबत त्या सरस आहेत. मानवी जीवनाचे वस्तुनिष्ठ दर्शन, रुपकांचा अवलंब यांचा येथे प्रत्यय येतो. वास्तविक पाहता काणेकरांच्या या कणिका जिब्रानच्या कोणत्याही कणिकांचे अनुवाद नसून त्या स्वतंत्रपणे लिहिल्या आहेत.

सुधा कापरे

**रेंदाळकरांची कविता : खंड प्रथम व द्वितीय (१) प्रथम खंड : प्रकाशक : विठ्ठल हरी बर्वे, आर्यभूषण प्रेस, पुणे. पहिली आवृत्ती १९२४, दुसरी आवृत्ती १९४०. (२) द्वितीय खंड : प्रकाशक : वामन जनार्दन कुंटे, सांगली, १९२८.** एकनाथ पांडुरंग रेंदाळकर यांची समग्र कविता संपादित करण्याचा प्रयत्न वामन जनार्दन कुंटे, सांगली यांनी केला 'प्रयत्न केला' असे म्हणण्याचे कारण रेंदाळकरांची एकूण कविता तीन खंडांत प्रसिद्ध करावयाचे कुंटे यांनी ठरविले होते. परंतु त्यातील दोनच खंड प्रसिद्ध झालेले दिसतात. प्रथम, खंडामध्ये रेंदाळकरांच्या कवितांचे (१) मन्दारमञ्जरी, (२) काव्यकुसुममाला, (३) कर्णमंगल, (४) काव्यगुंफा व (५) स्फुट कविता असे पाच विभाग केले आहेत. द्वितीय खंडात (१) यमुनागीत, (२) कादंबरीरुपांतर, (३) शांतीसोपान, (४) रतिविलाप, (५) विज्ञानसार, (६) श्री अवधूतगीता, (७ नितिमंडन, (८) गंगालहरी, (९) शिरक्यांची तारा, (१०) जाधवांची मंजुळा (अपूर्ण), (११) बाष्पबिंदू, (१२) पद्यपुष्पांजली या खंडकाव्य - दीर्घकाव्यसदृश्य काव्याचा समावेश केला आहे.

रेंदाळकर हे मराठीतील पहिले निर्यमक कवितेचे पुरस्कर्ते म्हणून ओळखले जातात. १८८७-१९२० असा ३३ वर्षांचा अल्पायुष्यकाल लाभलेल्या रेंदाळकरांनी विपुल कविता लिहिली आहे. विसाव्या शतकाच्या सरुवातीच्या काळात विलक्षण वाटणाऱ्या स्त्री-पुरुषप्रेमाचे वर्णन रेंदाळकरांनी निर्भयतेने केलेले दिसते. त्यांची सरुवातीची प्रेमकविता संस्कृत वळणाची दिसून येते.

केशवसुतांच्या प्रभावाने रेंदाळकर प्रेरित झालेले दिसतात. 'केशवसुतास', 'केशवसुत व म्हातारी' या त्यांच्या कवितातून याची साक्ष मिळते. 'शिंग' या काव्यात 'तुतारी' चा पडसाद दिसतो.

" उघडी नयन रम्य उषा हंसत हंसत आली " या सुंदर ओवीने सुरू होणारी 'प्रबोधन' ही कविता पहाटेच्या वातावरणाची सुंदर रम्य चित्र रेखाटते. ती आजही रसिकांना मोहिनी घालते. या कवितेतील रम्य निसर्गवर्णन मनाला उल्हसित करते. अशा उल्हास देणाऱ्या कवितांपेक्षा रेंदाळकरांनी उदासीन वृत्तीचे दर्शन देणाऱ्या कविताच अधिक प्रमाणात लिहिल्या.

रेंदाळकरांनी निर्यमक कविता लिहिण्याचा प्रघात पाडला त्याविषयी ग. त्र्यं. माडखोलकर यांनी प्रस्तुत ग्रंथाच्या प्रथम खंडाच्या प्रस्तावनेत पुढील उद्‌गार काढले आहेत, " रेंदाळकरांविषयी आदरापेक्षा अवज्ञेचे शब्द माझ्या कानावर अधिक पडले होते; आणि त्यांच्या संबंधाने उपेक्षेचीच वृत्ती सामान्यतः दृष्टीस पडे. वस्तुतः नवीन पिढीतील कवींना त्यांच्याविषयी अभिमान वाटला पाहिजे. परंतु, मराठीत निर्यमक कविता लिहिण्याचा प्रघात पाडून, त्यांनी आपला मार्ग किती सुगम केला आहे, याची जाणीव अलीकडील कवींत दिसत नाही."

दारिद्र्य, निष्प्रेम जीवन, गैरसमज, उपेक्षा यांनी ग्रासलेल्या रेंदाळकरांनी एक उत्कृष्ट विलापिका 'अजुनी चालतोचि वाट' नावाची मराठीस दिली आहे. तीत ते कष्टी होऊन म्हणतात,—

> " अजुनी चालतोचि वाट माळ हा सरेना
> विश्रांतिस्थल केव्हा यायचे कळेना !
> त्राण न देहांत लेश, पाय टाकवेना,
> गरगर फिरत अजी होय पुरी दैना !
> .....
> दिन गेले, मास तसे, संवत्सरेही गेली
> निकट वाटते जीवनसंध्या ही आली !
> कुठुनि निघालो, कोठे जायचे न ठावे,
> मार्गातचि काय सकळ आयु सरुनि जावे !
> पुरे ! पुरे ही असली मुशाफिरी आतां,
> या धूळित दगडावर टेकलाच माथा ?

वि. दा. वासमकर

**रेशमांच्या गांठी : कवठेकर, द. र. प्रकाशक : देशमुख आणि कं., पुणे, १९४२.** 'रेशमाच्या गांठी' ही द. र. कवठेकरांची तिसरी कादंबरी. या कादंबरीचे कथानक नाना पाटील व बापू देशमुख या दोन मित्रांच्या परस्पर संबंधांशी त्यांच्यातील संघर्षाशी निगडित आहे. ग्रामीण वातावरणाची पार्श्वभूमी असलेल्या प्रस्तुत कादंबरीत नानांची मालकरीण पारी, नानांची सोशिक पत्नी, पारीचा मुलगा हिऱ्या, नानांची मुलगी मालन, डॉ. मनोहर अशी भिन्नधर्मी पात्रे आहेत. पारीचा भूतकाळ, तिच्या अपत्य संभवाचे रहस्य, नानांविषयी असणारे संशयाचे किल्मिष, नानांच्या पत्नीची मूक सहनशीलता, बापू देशमुखांचा पीळ या घटना-प्रसंगांमुळे व पात्रविशेषांमुळे 'रेशमांच्या गांठी' वाचनीय झाली आहे. त्यातही पारीची स्वामिनिष्ठा, तिने आपल्या आयुष्यातील रहस्याची केलेली जपणूक, तिचा स्वाभिमान, साहसी नि बंडखोर वृत्ती, मुलाविषयी तिला वाटणारा तिरस्कार या स्वभाववैशिष्ट्यांच्या चित्रदर्शी व नाट्यपूर्ण चित्रणामुळे कादंबरी मनाची पकड घेते. आकर्षक भाषा, उत्तम निवेदन शैली, कथानकातील नाट्यपूर्णता उत्तरोत्तर वाढवत नेण्याची लेखकाची हातोटी, या गुणवैशिष्ट्यांमुळे कादंबरी प्रत्ययकारी ठरते. एकामागोमाग एक घडणाऱ्या घटनांची मालिका कवठेकरांनी चित्रमय शैलीत साकार केली आहे. मात्र घटना द्रुतगतीने दाखवण्यात आणि गुंतागुत रहस्यमयतेचे जाळे विणण्याच्या लेखकाच्या हव्यासामुळे कादंबरीतील आशयाला पूर्णपणे न्याय मिळू शकला नाही. काही घटनांत अवास्तवता, भडकपणा व कृत्रिमता आली आहे. कादंबरीचा शेवट सहज स्वाभाविक वाटत नाही. तो ओढूनताणून आणल्यासारखा सांकेतिक वाटतो. कादंबरीच्या प्रारंभीपासून विकसित होत गेलेले कारुण्य विषयाला शेवटी आकस्मिक मिळालेल्या कलाटणीमुळे फिके होते. 'रेशमांच्या गाठी' ही एक वाचनीय आणि रंजक कादंबरी एवढेच वाङ्मयीन मूल्य त्यामुळे शिल्लक राहते.

वि. शं. चौघुले

**लग्नाची बेडी : अत्रे, प्र. के. प्रकाशक : मंगेश नारायण कुलकर्णी, मुंबई १९३६.** प्रल्हाद केशव अत्रे यांचे सदाबहार नाटक. आपल्या समाजात प्रचलित होऊ पाहणाऱ्या विवाह पद्धतींमधील दोषांचे विनोदाच्या साहाय्याने आविष्करण करण्याचा प्रयत्न. लग्नाच्या बेडीत अडकलेल्या विवाहित दांपत्याला सुखाचा संसार करता येण्यासाठी स्त्रियांनी आपले शृंगारिक आकर्षण कायम ठेवून पतीचे मन प्रसन्न ठेवावे आणि पुरुषाच्या अनिवार्य भोगवासना, मोह यांना लग्नाच्या बेडीचे बंधन आवश्यक आहे, असे मार्ग लेखकाने सुचविले आहेत.

एका महत्त्वाच्या विषयाची खेळकर भाषेतून केलेली हाताळणी हा विशेष प्रसंगनिष्ठ, स्वाभावनिष्ठ, शब्दनिष्ठ अशा विनोदाला लाभणारी कारुण्याची किनार कायम ठेवून उत्तम भाषा, प्रसन्न वातावरण, चिरतरुण विषय यातून नाटकाची गोडी वाढविली आहे.

वसंत नरहर कुबेर

**लघुकथा लेखन तंत्र आणि मंत्र : फडके, ना. सी. प्रकाशक : अंजली प्रकाशन, मुंबई, १९५२.** दोन विभागात विभागलेल्या या पुस्तकात पहिला विभाग तंत्रविषयक विविध सिद्धांताचा शोध व त्याचे विवेचन करणारा, तर दुसरा विभाग उत्कृष्ट लघुकथेचे १२ नमुने व त्यांवरील रसग्रहण असा आहे. पहिल्या प्रकरणात तंत्राचा अर्थ, तंत्राची निर्मिती यासंबंधी सामान्य विवेचन आहे. लघुकथा हा वाङ्मय प्रकार वाढ आणि बदल या दोन्ही गोष्टींना अनुकूल असल्याने लघुकथेची निश्चित व निर्णायक व्याख्या करणे कठीण आहे, असे म्हणून इतरत्र लघुकथेची ' प्रतिभासाधन 'मधील व्याख्याच दिली आहे. पुढील प्रकरणात मोपासांच्या ' कंठा ' (The Nakelace) या कथेचे निराळेपण व लघुकथेचा हेतू सामान्यातले असामान्यत्व दाखवणे हाच असतो, हे दाखविले आहे. चवथ्या प्रकरणात लघुकथेचे कादंबरी, नाटक यांसारख्या वाङ्मय प्रकारांशी साम्य नसून चित्रकलेशी असल्याने सजावटीची, तंत्राची तिला जास्त गरज असल्याचे नोंदविले आहे. अन्य प्रकरणांतून लघुकथचे संवाद, भाषा, शेवट इत्यादींचे विवेचन असून नवकथेसंबंधीचे विचार आले आहेत. दुसऱ्या भागातील १२ लघुकथांच्या रसग्रहणातही तंत्रावरच अधिक भर आहे. प्रामुख्याने लघुकथेचा तंत्रदृष्ट्या विचार करून तिची समीक्षा करणारे पुस्तक म्हणून महत्त्व.

विमल भालेराव

**लक्ष्मण बापूजी ऊर्फ भाऊराव कोल्हटकर यांचे चरित्र : शं. बा. मुजुमदार. प्रकाशक : शंकर बापूजी (आ.१, १९०१).** शंकर बापूजी मुजुमदार यांच्या या मूळ पुस्तकात, त्यांच्या सहवासात बरेच दिवस घालविलेल्या व त्यांच्या गुणांची व स्वभावाची ओळख असलेल्या एका — ने लिहिले. असा उल्लेख आहे. भाऊराव कोल्हटकरांच्या मृत्यूनंतर आठ/नऊ महिन्यातच हे चरित्र लिहिण्यात आले. रंगभूमीवरील नटाचे पहिलेच चरित्र.संगीत नायक आणि त्याहीपेक्षा नायिका या भूमिका रंगभूमी गाजविणाऱ्या भाऊरावांच्या कलागुणांचा संक्षेपाने परिचय. भाऊरावांचे अलौकिक सौंदर्य व तेजस्वी गायन यापेक्षा, त्यांच्या स्वभावगुणांमुळे किर्लोस्कर नाटक मंडळीचे नेतृत्व त्यांनी समर्थपणे कसे सांभाळले याबाबतचा तपशील अधिक प्रमाणात दिलेला आहे. भाऊरावांच्या अविस्मरणीय गुणांमुळे समकालीन रसिकमनावर केवढी मोहिनी पडली होती याचे, तत्कालीन वृत्तपत्रातील उताऱ्यांच्या आधारे दर्शन घडविले आहे.

मु. श्री. कानडे

**लीळाचरित्र : म्हाइंभट्ट.** (१) लीळाचरित्र-म्हाइंभट्ट-संपादक : हरी नारायण नेने महाराष्ट्रीय आद्य चरित्रकार महिंद्रभट्ट संकलित लीळाचरित्र : भाग १ ला : एकांक. प्रकाशक : कुंअर राजकुमारी बाबू गोविंद सहाय, नारायण प्रेस, नागपूर १९३६. महाराष्ट्रीय आद्य चरित्रकार महिंद्रभट्ट संकलित लीळाचरित्र पूर्वार्ध खंड १ ला प्रकाशक हरी नारायण नेने, सरस्वती प्रेस, अमरावती, १९३६. महाराष्ट्रीय आद्य चरित्रकार महिंद्रभट्ट संकलित लीलाचरित्र भाग ३ रा पूर्वार्ध खंड २. प्रकाशक : बाबू गोविंद सहाय, सिंगापूर सरस्वती प्रेस, अमरावती १९३७. महाराष्ट्रीय आद्य चरित्रकार महिंद्रभट्ट संकलित लीळाचरित्र भाग ४ था पूर्वार्ध खंड ३ रा. बाबू गोविंद सहाय, नागपूर प्रेस, नागपूर १९३७.

(२) म्हाइंभट्ट : लीळाचरित्र संपादक : डॉ. शं. गो. तुळपुळे प्रकाशक : सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे ०१, एकाक, १९६४ पूर्वार्ध भाग १,२ १९६६, उत्तरार्ध भाग १,२ १९६७.

(३) म्हाइंभट्ट : लीळाचरित्र संपादक : डॉ. वि. भि. कोलते महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई आ. १, १९७८, आ. २, १९७२. (पाठ संशोधित आवृत्ती).

लीळाचरित्र ग्रंथाचा संकलक : म्हाइंभट्ट

या ग्रंथाचा संकलक म्हाइंभट्ट. याला महानुभाव पंथाची दीक्षा श्रीचक्रधरांचे गुरू श्रीगोविंदप्रभू यांच्याकडून मिळाली. याने आपले आयुष्य महानुभाव पंथाच्या सेवेसाठी वाहिले. याला आद्य मराठी ग्रंथकार, चरित्रकार असे संबोधिले जाते. म्हाइंभट्ट हा चतुरस्र, कष्टाळू, प्रामाणिक, भावनिष्ठ, शैलीदार, कल्पक, संग्राहक, सूक्ष्मदृष्टीचा, चरित्रकार म्हणून प्रसिद्ध होता. श्रीचक्रधर स्वामींच्या निर्याणानंतर स्वामींच्या लीळांच्या आठवणी-आख्यायिका त्याने संकलित केल्या. संकलनात एकाकासाठी महदाईसाची मदत. पूर्वार्ध/उत्तरार्धासाठी शिष्य मंडळीची मदत म्हाइंभट्टास लाभली. या ग्रंथात मराठी भाषेचे व्यावहारिक रूप दृष्टोत्पत्तीस येते. या ग्रंथात श्रीचक्रधर स्वामींच्या चरित्राबरोबरच परिवारातील महानुभाव पंथातील सर्व महत्त्वाच्या व्यक्तींची माहिती येते. या ग्रंथात सर्वत्र घरगुती गद्य भाषा अवलंबिलेली आहे. या चरित्र ग्रंथाने महानुभाव पंथाच्या पुढील वाङ्मयाचा पाया रचिला आहे. या लीळा संकलनात श्रीचक्रधर स्वामींच्या शिष्याबरोबरच महानुभाव पंथाचे पहिले

आचार्य श्रीनागदेवाचार्य ऊर्फ भटोबास यांचेही सहकार्य होते. या ग्रंथात श्रीचक्रधर स्वामी सर्व आयुष्य जवळजवळ ' दैनंदिनी ' स्वरूपातच चित्रित केले आहे.

ग्रंथाचे नायक श्रीस्वामी चक्रधर । चांगदेव राऊळ । सर्वज्ञ भडोच येथील राजा मल्लदेव यांचे प्रधान विशालदेव व पत्नी माल्हणदेवी यांचा पुत्र हरिपाळदेव = म्हणजे चक्रधर. ऋद्धिपूर येथे ईश्वरावतार गोविंदप्रभूचे दर्शन. यांनीच त्यांचे नाव ' चक्रधर ' ठेविले. यांचे चरित्र दोन भागात येते पूर्वार्धात पार्थिव चरित्र तर उत्तरार्धात परमार्थाने संपन्न चरित्र. यांची मातृभाषा गुजराती, त्यांचे मराठी संस्कृत भाषेवर प्रभुत्व होते. त्यांना वर्ण-विषमता मान्य नव्हती. त्यांनी महानुभाव पंथाची स्थापना केली व या पंथास स्वतंत्र व स्वयंपूर्ण तत्त्वज्ञान दिले. यांचे चरित्र हेच ' लीळाचरित्र '.

हे चरित्र म्हाइंभट्टाने संकलित केले आहे. हा ग्रंथ तीन भागात असून, एकाक ७४ लीळा, पूर्वार्ध ३५८ लीळा, उत्तरार्ध ४८८ लीळा याप्रमाणे एकूण सुमारे ९५० लीळांचा समावेश या ग्रंथात आहे. या संकलनात म्हाइंभट्टास एकाक संकलनासाठी महदाईसाने मदत केली तर पूर्वार्ध-उत्तरार्धाच्या संकलनासाठी इतर शिष्यमंडळींची मदत झाली. प्राचीन काळात सर्वच ग्रंथ हस्तलिखित स्वरूपात असत, प्रती लिहितांना काही मजकूर अनवधानाने गाळला जातो स्वत: लेखक यामध्ये आपला मजकूर घालतो अशा असंख्य प्रती झाल्यास पाठभेद निर्माण होतात. परकीय आक्रमणात गोंधळ झाल्याने प्रत हरवते. लीळाचरित्राच्या बाबतीत ही घटना घडली असून याचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे :—

प्रथम आरंभी : लीळांचे शोधन : केले पूर्वजाने : माहींभटीं : ।।
दुसरी शोधनी : परशुरामबासांनी : लीळांची करूनी : बंद केला : ।।
मग तीसऱ्याने : सीवाची शोधनी : मुरारीमल्लानी :

चक्रधर स्वामींच्या निधनानंतर त्यांचे शिष्यगण दु:खी अंत:करणाने त्यांच्या जीवनातील स्मृती, त्यांचे विचार त्यांच्या लीळा यांचे स्मरण सुरू ठेवले व यातूनच या ग्रंथाची निर्मिती झाली. यांच्या चरित्राबरोबरच त्यांनी व्यक्त केलेल्या विचारांचे, सुवचनांचे संकलनही प्रस्तुत ग्रंथात आहे.

एकाक (म्हणजे एकाक वृत्ती) या भागात भरवस येथे प्रधान पुत्राच्या मृतदेहात प्रवेश करून अवतार धारण आणि शक्ति-स्वीकार, श्रीनागदेवाचार्यांचे अनुसरण, पैठण येथे आगमन इतका भाग येतो. पूर्वार्धात पैठण येथे त्यांनी स्वीकारलेल्या ' एकान्तातून लोकान्त ' याचे वर्णन आणि त्यांनी निरनिराळ्या ठिकाणी केलेल्या भ्रमणाचा वृत्तान्त येतो. उत्तरार्धात भ्रमण आणि प्रयाण याचे वर्णन येते.

महानुभाव संप्रदायाच्या आध्यात्मिक व तत्त्वज्ञानात्मक विचारांचे प्रेरणास्थान असा हा ग्रंथ आहे. राजकीय, सामाजिक आणि धार्मिक परिस्थितीचे वर्णनही येते. हा ग्रंथ म्हणजे यादवकालीन गद्य भाषेचा अप्रतिम नमुना आहे. चरित्र नायकाचे बहुगुणी व्यक्तिमत्त्व यात साकारले आहे. समाजातील सर्व थरामध्ये चक्रधर स्वामींचा संचार असे. समाजातील स्त्री-पुरुषांना वेधून घेण्याची, आकर्षित करण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती. ग्रंथाची भाषा अत्यंत साधी, सोपी असून मानवी स्वभावाचे उत्तम दर्शन घडविते. ग्रंथाची वर्णनशैली रोचक व वेधक आहे. ग्रंथ आठवणी व आख्यायिका या स्वरूपाचे असल्याने घरगुती गद्याचा, वाक्प्रचार म्हणी यांचाही वापर आहे. चक्रधर स्वामींचे आध्यात्मिक, लौकिक अशा संपूर्ण जीवनाचे दर्शन या ग्रंथात घडते. स्वामी चक्रधरांची वचनेही सदर ग्रंथात असल्याने या ग्रंथात त्यांचाही सहभाग आहे. त्यांच्या सौंदर्याचे वर्णन असे केले आहे.

'रूपसौंदर्य : गौर श्रीमूर्ती : लांब कान : विसाळ नेत्र : '
'आमचे गोसावी साक्षात श्रीकृष्ण चक्रवर्ती : '
'अया : कैसे सौंदर पुरुषु : साक्षात गौरक्षनाथु : '

स्वामींच्या अपार वेधशक्ती संदर्भात खालील वचन आहे—

"स्त्रिया पुरुषाचा ऐसा वेधु नाही : पुरुषां पुरुषाचा काइसा वेधु ?" त्यांची महत्त्वाची काही वचने नमूद केली पाहिजेत :

'स्वातंत्र्य हा मोक्ष : पारतंत्र्य बंध : '
'अनुसरलेया देवो :', 'ईश्वरासि काइं जातिकुळ असे ? '
'ज्ञानवीण वैराग्य काइ करावे बापेया : '
'गुरू-देवासि पाठी देओ नैए :', 'श्रवन, मनन, मथन एणे ज्ञान वाढे : '
'खरुज खाजवी ना तो विरक्त :'
' ज्ञान ते रसरूप : वैराग्य ते वृत्तिरूप : भक्ति ते क्रियारूप :'
' ज्ञान पूज्य : ज्ञानवृद्ध तो सर्वत्र पूज्य : '

स्वामींनी प्रयाणसमयी शिष्यांना उपदेशिले कीं,

" याते तुम्ही आठवा तेव्हळीं हे तुम्हांपासि असे :
धर्मवार्ता प्रसंगे सर्वत्र अवस्थान :"

**लोकमान्य टिळक यांचे चरित्र : केळकर, नरसिंह चिंतामण. (१) पूर्वार्ध सन, १८९९ अखेर (प्रकाशक : नरसिंह चिंतामण केळकर, पुणे, १९२३). (२) उत्तरार्ध : खंड २ : सन १८९९ पासून १९१४ पर्यंत (प्रकाशक : नरसिंह चिंतामण केळकर, पुणे, १९२८). (३) उत्तरार्ध : खंड ३ : सन १९१४ पासून १९२० पर्यंत (प्रकाशक : नरसिंह चिंतामण केळकर, पुणे, १९२८).** साहित्यसम्राट नरसिंह चिंतामण केळकर यांची साहित्यिक कामगिरी सर्वश्रेष्ठ आहे. वाङ्मयाच्या सर्व विविध प्रकारांमध्ये त्यांनी लेखन केले आहे. साहित्यिक, राजकारणी, समाजकारणी, संपादक इत्यादी विविध स्तरांवर त्यांनी मोलाची कामगिरी केली आहे. त्यांनी एकूण १५,००० पृष्ठांचे लेखन केले आहे.

प्रस्तुत बृहद चरित्र हा चरित्र लेखनामध्ये मानदंड मानला गेला आहे. जवळजवळ १९४४ पानांचे हे चरित्र एकूण तीन खंडामध्ये प्रसिद्ध झाले आहे. मराठी वाङ्मयात चरित्र वाङ्मय

प्रकारात इतका मोठा हा एकच ग्रंथ आहे. दाजी नागेश आपटे लिखित महाराजा सयाजीराव गायकवाड : तिसरे यांच्या चरित्राचेही तीन खंड असून याची १३८२ पृष्ठे आहेत. हे दोनच ग्रंथ पृष्ठसंख्या आणि माहिती या दृष्टीने प्रसिद्ध आहेत.

या चरित्राचा पहिला खंड पूर्वार्ध असा असून या खंडात लोकमान्यांच्या जन्मापासून १८९९ पर्यंतच्या कालखंडाचे वर्णन येते. कोल्हापूर प्रकरण आणि पहिली शिक्षा. फर्ग्युसन कॉलेजची स्थापना, डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा राजीनामा, पुण्यातील प्लेगचा अनर्थ, राजद्रोहाचा पहिला खटला, पुनश्च हरि : ॐ ! इत्यादी शीर्षकाची प्रकरणे आहेत.

उत्तरार्ध खंड २, सन १८९९ पासून १९१४ पर्यंतच्या कालखंडातील लोकमान्यांच्या जीवनातील घटनांचे वर्णन या खंडात आहे. या ग्रंथातील सर्वांत महत्त्वाचे प्रकरण खंड २ : भाग ३ ' ताईमहाराज प्रकरण ' या प्रकरणी लोकमान्यांना फार मनःताप भोगावा लागला. पंचांगशोधन, शिवाजी उत्सवाचा प्रसार, वंगभंग चळवळ, स्वदेशी चळवळ व पैसाफंड, सुरतेची राष्ट्रीय सभा, राजद्रोहाचा दुसरा खटला, मंडाले येथील तुरुंगवास इत्यादि घटनांचे वर्णन या खंडात आहे.

उत्तरार्ध खंड ३, सन १९१४ पासून १९२०. मंडालेच्या तुरुंगातून सुटका, चिरोल प्रकरण, विलायती वारी, रौलेट ॲक्ट, गीतारहस्य ग्रंथाचे लेखन, टिळकांचा जाहीरनामा, टिळकांचा संप्रदाय.

लोकमान्यासारख्या महापुरुषाचा दीर्घकालीन सहवास श्री. केळकरांना लाभला. श्री. टिळकांची बुद्धिमत्ता, कर्तृत्व-शक्ति, निग्रही स्वभाव यांचे यथार्थ चित्रण श्री. केळकरांनी या ग्रंथात केले आहे. लोकमान्यांचे व्यक्तिमत्त्व हे अनेक पैलू असलेले व्यक्तित्त्व—शिक्षक, संपादक, ग्रंथलेखक, राजकारणी, समाजकारणी इत्यादी पैलू असलेले व्यक्तिमत्त्व. या सर्व पैलूंना एकत्र गुंफून चरित्र लेखन करण्याची अवघड कामगिरी साहित्यसम्राटांनी अतिशय कष्टाने साधली आहे. टिळकांच्या आयुष्याशी निगडित असलेले प्रसंग त्यांनी योग्य त्या निवेदन शैलीत लिहिले आहेत. या चरित्राच्या रूपाने महाराष्ट्राचा राजकीय / सामाजिक इतिहास त्यांनी लिहिला आहे. लोकमान्य हे विस्तृत चरित्र पुढील चरित्रावर प्रभाव टाकणारे ठरले व लोकमान्यांच्या या चरित्राच्या उत्तरकालीन चरित्रकारांनी या चरित्राचा प्रमुख संदर्भ ग्रंथ म्हणून वापर केला.

**लोकमान्य टिळकांचे केसरीतील लेख-भाग १ ते ४ : प्रकाशक : केसरी-मराठा संस्था, पुणे. प्रकाशन सन क्रमशः भाग-१-१९२२, भाग-२-१९२४, भाग-३-१९२६, भाग-४-१९३०.** भारतीय स्वातंत्र्याचे उद्‌घाते, राष्ट्रीय चळवळीतील जहाल मतवादी भारतीय नेते, प्राच्यविद्याविशारद, उत्तम गणिती लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचा, ' केसरी ' पत्रातून प्रकाशित झालेल्या समग्र लेखांचा सलग चार भागात प्रसिद्ध झालेला संपूर्ण लेखसंग्रह. या चार भागांची एकूण पृष्ठसंख्या २४४७ इतकी असून केसरी-मराठा प्रकाशनाने ते १९२२ ते १९३० या नऊ वर्षांच्या कालावधीत क्रमशः प्रकाशित केलेले आहेत. या संग्रहांच्या चारही भागांना कै. न. चिं. केळकर यांच्या मोजक्या शब्दात पण मर्मग्राही प्रस्तावना आहेत. या लेखांचे पहिले तीन भाग ' राजकीय खंड ' म्हणून तर चौथा भाग संकीर्ण लेखसंग्रहाचा असून त्यामध्ये लोकमान्य टिळकांचे सामाजिक, धार्मिक व वाङ्मयविषयक लेख समाविष्ट केले आहेत.

पहिल्या भागात १८८८ ते १८९९ पर्यंतच्या केसरीतील लेखांचा समावेश असून त्यामध्ये, ' आधी सामाजिक की राजकीय ', ' आशिया खंडातील कारस्थाने ', ' ब्राह्मण ब्राह्मणेतर ', ' राजद्रोह ', ' इंग्रजी राज्यात आम्हास फायदा काय झाला ' हे महत्त्वाचे लेख आहेत तर दुसऱ्या भागातील लेख १८९९ ते १९०५ या ५-६ वर्षांतले असून ' पुनःश्च हरि ॐ ' पासून ' हिंदुस्थानची वाट काय ? ' या लेखांपर्यंत सुमारे १०७ लेख समाविष्ट आहेत ; त्यात प्लेग, दुष्काळ, स्थानिक स्वराज्य, दडपशाही, लष्करी खर्च, कर्झनशाहीचा प्रारंभ असे विषय आले आहेत. केसरी पत्रातील १९०५ ते १९२० या कालावधीत प्रसिद्ध झालेले ७५ लेख तिसऱ्या भागात समाविष्ट असून त्यात ' आणीबाणीची वेळ ', ' राष्ट्रीय सभेच्या कामाची दिशा ', ' दादाभाई सांगणार तरी काय ? ',' स्वराज्य आणि सुराज्य ', ' चोरांच्या उलट्या बोंबा ',' टिळक सुटले पुढे काय ? ', ' उजाडले पण सूर्य कोठे आहे ', ' नवी विटी नवे राज्य ', हे अत्यंत महत्त्वपूर्ण लेख आहेत. आणि चौथ्या भागात सामाजिक, धार्मिक, वाङ्मयीन असे केसरीमधून वेळोवेळी लिहिलेले १२० छोटेमोठे लेख संग्रहित केले आहेत. चारही खंडातील लेखांचा पसारा भव्य असून लोकमान्य टिळकांच्या चतुरस्त्र लेखनीचे आणि त्यांच्या विद्याव्यासंगाचे व प्रतिपक्षी सडेतोड खंडणमंडनाचे ठायी-ठायी दर्शन घडते.

स्वभावोक्ती, प्रसाद, ओज या लेखनगुणांमुळे आणि शास्त्र-तत्त्वज्ञान, गणित इत्यादींच्या विस्तृत व्यासंगाने या चारही खंडातील लेखनास, युक्तिवाद, विश्लेषकता, चिंतनशीलता, विषय समजून देण्याची सहजता, विवेक या गोष्टी लाभल्या आहेत. काही लेखांतील भाषा उच्चकोटीची संस्कृत महाकाव्यासारखी उपमा, उत्प्रेक्षा, रुपक, व्याज या अलंकारांनी मंडित असूनही ती कुठेही शब्दबंबाळ, कृत्रिम अथवा वक्तृत्वाचा पोकळ भास निर्माण करणारी वाटत नाही. लोकमान्य टिळकांच्या राजकीय स्वरूपाच्या लेखात प्रखर राष्ट्रवाद ओतप्रोत भरलेला आहे. स्वदेश, स्वधर्म, स्वाभिमान, लढाऊ बाणा या लोकमान्य टिळकांच्या स्वाभाविक वृत्तीचे प्रत्यंतर लेखालेखांत येत असूनही ते कोठेही लोकशाहीचे मूल्य घसरू देत नाहीत. म्हणूनच ' केसरीतील सर्वच लेखांना भारताच्या उद्योगपर्वा-पर्यंतच्या स्वातंत्र्ययुद्धाचे गद्यमहाकाव्य ' असे जे कै. न. चिं. केळकर यांनी भाष्य प्रकट केले आहे, ते अत्यंत समर्पक आहे.

टिळक युग आणि त्या युगातील भारतीय राजकीय, धार्मिक, सामाजिक व वाङ्मयीन स्थितीगती समजून घेण्यास व अपूर्व विद्याव्यासंगासाठी उपयुक्त असे लेखसंग्रह.

मोहन पाटील

**लोकहितवादींचीं शतपत्रें, लोकहितवादी : गोपाळ हरी देशमुख, संपादक : श्रीपाद रामचंद्र टिकेकर, प्रकाशक : उषा प्रकाशन, औंध १९४०.** लोकहितवादींचे वडील हरिपंत, त्यांचे मूळ आडनाव सिधये. देशमुखीमुळे 'देशमुख'. ते पेशव्यांचे सेनापती बापू गोखले यांचे फडणीस. श्री. गोपाळराव देशमुख स्कूल बोर्डाची परीक्षा उत्तीर्ण झाले होते. त्यांचे इंग्रजी, संस्कृत आणि मराठी भाषांवर प्रभुत्व होते. सुरुवातीच्या सरकारी नोकरीत ते इनाम कमिशनच्या कार्यालयात असिस्टंट कमिशनर होते. नंतर ते अहमदाबाद येथे असिस्टंट जज्ज होते. या काळात त्यांनी गुजराथी, फारसी, हिंदी भाषा अवगत करून घेतल्या. अनेक विषयांची त्यांना आवड होती व त्यांनी अभ्यासिलेल्या विषयांवर प्रभुत्व मिळविले. सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक इत्यादी अनेक विषयांवर लेखन केले. इतिहास हा त्यांचा आवडता विषय होता व या विषयांतही त्यांचे ग्रंथ आहेत.

लोकहितवादींना विचारवंत लेखक असे संबोधिले जाते. लोकांच्या हितासाठी लेखन करणारा वाङ्मयसेवक अशी त्यांची ख्याती होती. अनेक विषयांत प्रावीण्य मिळवलेला हा ध्येयवादी लेखक होता. बुद्धिवाद, उत्कट गद्य शैली, स्पष्ट विचार, विचारांची योग्य मांडणी, सत्याचे स्पष्ट आणि निर्भय प्रतिपादन, तर्कशुद्ध विचार, शुद्ध बुद्धिवाद इत्यादी गुणांनीही त्यांना गौरविलेले आहे. धर्मशास्त्र, मानवाचे सुख, नीतिशास्त्र या विषयांवरचे त्यांचे प्रमुख लेखन आहे. 'धर्मशास्त्र हे ईश्वरप्रणीत नसून ते मानवप्रणीत आहे, सबब यात सुधारणेचा अधिकार मानवास आहे' हा एक विचार त्यांनी मांडला. त्यांचे शतपत्राचे लेखन 'समाजाच्या अवनत अवस्थेचे विदारक चित्र' दाखविणारे आहे.

लोकहितवादींनी श्री. भाऊ महाजन यांच्या 'प्रभाकर' साप्ताहिकामधून १८४८ ते १८५० या काळात शंभराहून अधिक पत्रे 'लोकहितवादी' हे टोपण नाव घेऊन लिहिली.

ग्रंथाचे संपादक श्री. टिकेकर यांनी पत्रांचे विषयानुसारी वर्गीकरण केले असून शिवाय पत्रांची ०१ ते १०८ अशी स्वतंत्र यादी दिली आहे. वर्गीकरणानुसारच पत्रांचे विषय खालील-प्रमाणे :—

१. राजकीय मते (१७ पत्रे), २. विद्यावर्धन (१५ पत्रे) (इंग्रजी विद्या, संस्कृत विद्या, प्राचीन ग्रंथ इत्यादींच्या अभ्यासाविषयी), ३. आचारधर्म (०६ पत्रे), (स्नानसंध्या, देवपूजा इ.), ४. पारमार्थिक (०७ पत्रे), (पंथ, वैराग्य, धर्मसुधारणा), ५. अनिष्ट चाली (१४ पत्रे), (शिमग्याचा दुराचार, शाक्त मार्ग, वाईट चाली, जुन्या समजुती, मद्यपान), ६. ब्राह्मणांचा दांभिकपणा (१३ पत्रे), (ब्राह्मणांचे अज्ञान, महत्त्व, स्वभाव, लोभ इ.), ७. समाजसुधार (०८ पत्रे), (हिंदू लोकांचा आळशी स्वभाव, चार वर्ण, हिंदू लोकांचा व्यापार), ८. विवाहविषयक (१४ पत्रे), (बालविवाह, पुनर्विवाह), ९. संकीर्ण (१४ पत्रे) (वर्ण विचार, जात विचार, दया, नीतिप्रशंसा, अभिमान, भिकारी, ज्ञान हाच पराक्रम इ.)

पुनर्विवाह या विषयावर चार पत्रे असून, यामध्ये पुनर्विवाह म्हणजे स्त्री-पुरुष समानता आणि पुनर्विवाह म्हणजे स्त्री स्वातंत्र्यास मान्यता असा विचार मांडला आहे. या लेखनाचे स्वरूप 'पत्रे' असे असले तरी निबंध लेखनाचा हा उत्कृष्ट नमुना आहे.

**वज्राघात (अथवा विजयनगरचा विनाशकाल) : आपटे, हरी नारायण. प्रकाशक : हरी नारायण आपटे, पुणे, १९१५.** हरी नारायण आपटे यांनी सामाजिक कादंबऱ्यांच्या बरोबर काही ऐतिहासिक कादंबऱ्याही लिहिलेल्या आहेत. कथानकासाठी इतिहासाचा पूर्ण वापर ते करीत होते. परंतु या कादंबरीसाठी इतिहासाचा फारसा वापर झालेला नाही. त्यांना सापडलेली एक टीप आणि हिंदुस्थान रिव्ह्यूमधील एक दंतकथा यावर केवळ हे कथानक उभारलेले आहे. यामुळे रचना आणि त्यातील संघर्ष याचे लेखन करण्यास हरिभाऊंना पुरेसा वाव मिळाला आहे आणि अनेकांनी या कादंबरीस वाखाणले आहे. कादंबरीचा शेवट शोकात्म आहे. विजयनगरचा राजा रामराजा याचा राक्षसतागडी येथे सर्व मुसलमान राजांनी एकत्र येऊन पराभव केला व या हिंदू साम्राज्याचा अंत झाला ही मूळ घटना, यावरच हे कथानक आधारित आहे. हिंदू राजा रामराजा, त्याची मुसलमान प्रेयसी मेहेरजान, दासी मर्जिना, मेहेरजानला रामराजापासून अपत्य झाले पण, ज्याला आपले वडील कोण याची माहिती नसलेला मुलगा रणमस्तखान, रणमस्तखानाची प्रेयसी नूरजहान आणि रामराजाचा सेवक धनमल्ल ही या कादंबरीतील प्रमुख पात्रे. पहिल्याच प्रकरणात राज्य मिळविण्याच्या तीव्र इच्छेपायी रामराजा मेहेरजानचा त्याग करतो. या वेळी ती गर्भवती असते, हे सुरुवातीचे प्रकरण हरिभाऊंनी फार कौशल्याने लिहिले आहे. वीस वर्षांनंतर मेहेरजान मुलासह परतते. रणमस्तखानाची रामराजाच्या दरबारात वकील म्हणून नेमणूक होते. एकदा दरबारात रामराजा एका मुसलमान तरुणीला बुरखा काढायला लावून अपमान करतो. ही तरुणी म्हणजे रणमस्तखानाची प्रेयसी नूरजहान. नूरजहान रणमस्तखानाला या अपमानाचा बदला घेण्यास प्रवृत्त करते. दरम्यान रामराजाला कुंजवनात राहणारी स्त्री आपली प्रेयसी मेहेरजान असून रणमस्तखान आपला पुत्र आहे याची जाणीव होत जाते. आपला बाप कोण याची जाणीव नसलेला रणमस्तखान रामराजाचा सूड घेण्याच्या दृष्टीने प्रयत्नात असतो. दरम्यान विजापूर, गोवळकोंडा, अहमदनगर इत्यादी मुसलमान राजांनी एकत्रित येऊन विजयनगराच्या हिंदू राजावर हल्ला करण्याचे ठरविलेले असते. लढाई सुरू होते. लढाईत रणमस्तखान रामराजाला कपटाने मारून त्याचे मुंडके उडवतो व हे मुंडके प्रेयसी नूरजहान व आई मेहेरजान यांच्या पुढ्यात टाकतो. मेहेरजान दुःखाने जवळच्या पुष्करिणीत उडी टाकून आत्महत्या करते. नूरजहान पित्याची हत्या करणाऱ्या रणमस्तखानाची निर्भर्त्सना करते व त्याला नाकारते सत्याची

जाणीव झाल्याने सैरभैर झालेला खानही नूरजहानसह पुष्करिणीत उडी टाकून आत्महत्या करतो. या कादंबरीत वर्णनास पूर्ण वाव मिळाल्याने सर्व पात्रांचे उत्तम वर्णन हरिभाऊंनी केले आहे. परस्परांतील संघर्ष, त्यांच्या भावभावना यांचेही तपशीलवार चित्रण येते. एका मोठ्या साम्राज्याची अखेर आणि या साम्राज्यात झालेला संघर्ष याची पूर्ण हकिकत आपल्या कल्पनाशक्तीच्या बळावर लिहून हरिभाऊंनी ही कादंबरी वाचनीय व आकर्षक केली आहे.

**वत्सलावहिनी यांचे प्रसिद्ध व अप्रसिद्ध लेख : कोल्हटकर, अच्युत बळवंत. प्रकाशक : अ. ब. कोल्हटकर, १९१५.** 'संदेश' दैनिकाचे संपादक अच्युत बळवंत कोल्हटकर यांनी संदेशाच्या पहिल्याच वर्षात (१९१४) ' वत्सलावहिनी ' या टोपण नावाने लिहिलेली ही पत्रे म्हणजे मराठीतील चुरचुरीत, मार्मिक व चटकदार ललित लेखनाचा उत्तम नमुना होय. ही वत्सलावहिनी आपले मानलेले दीर अच्युतभावजी यांना पत्रे लिहिते. या पत्रातील आशय येथून-तेथून मवाळांच्या राजकीय आणि सामाजिक आचारविचारांची रेवडी उडविणारा आहे. ही वत्सलावहिनी टिळकभक्त आहे, तर तिचे पतिराज आगरकर-रानड्यांचे अभिमानी आहेत. आपल्या पतिराज्यांच्या उत्कट भावनांचे आविष्करण करीत करीत ती इतर सुधारकांच्या आचारविचारांचा मर्मभेद करीत टिळकांच्या जहाल राजकारणाचे रहस्य स्पष्ट करते. या दोन्ही बाजू ती घरगुती, कौटुंबिक जिव्हाळ्याच्या भाषेतून मोठ्या कौशल्याने मांडते. या भाषाशैलीतील स्त्रीसुलभ सहजतेमुळे तिने तत्कालीन वाचकांना व विचारवतांना चांगलेच चकविले.

भीमराव कुलकर्णी

**वंदे मातरम : अत्रे, प्रल्हाद केशव. प्रकाशक : श्री. कृ. ना. सापळे, मुंबई, १९४७.** राजकीय पार्श्वभूमीवर लिहिलेले हे अत्र्यांचे नाटक. १९३७ साली मुंबई प्रांतात हंगामी मंत्रिमंडळ स्थापन झाले. या घटनेचे उमटलेले पडसाद आणि तत्कालीन धार्मिक-सामाजिक प्रश्नांची व व्यक्तिमहात्म्याची चित्रे रंगविण्याचा प्रयत्न नाटकात केला आहे. विविध मत-प्रणालीदर्शक प्रातिनिधीक पात्रे प्रस्तुत नाटकात असून स्वातंत्र्यप्राप्तीसाठी हिंदू समाजाची पुनर्घटना आणि जनतेची एकजूट होणे आवश्यक आहे, हा निष्कर्ष काढला आहे. रोचक मांडणी, तात्कालिक महत्त्वाचा विषय, पात्रांमधील संघर्षावर आधारित विनोद यामुळे त्या काळी हे नाटक गाजले. मात्र रसपूर्ण नाट्याचा अभाव असल्यामुळे नाटकाला मोठे चिरकालिक यश लाभले नाही.

**वनसुधा : वामन पंडित.** वामन पंडिताने लिहिलेल्या या काव्यात त्यांचे पांडित्य आणि कवित्व या गुणांचा प्रत्यय येतो. भागवताच्या दशम स्कंधातील ११ ते १३ अध्यायातील कथाभाग येथे आलेला आहे. आधासुराचा श्रीकृष्णाने केलेला वध हा या काव्याचा विषय आहे. ' वनी खेळती बाळ हे बल्लवाचे, तुरे खोवती मस्तकी पल्लवाचे 'अशा मोहकवर्णनाने या कवितेचा प्रारंभ झालेला आहे. बालगोपालांचा हूडपणा, त्यांनी वनामध्ये श्रीकृष्णाबरोबर केलेल्या विविध क्रीडा इत्यादी या काव्यातील वर्णने चांगलीच रंगलेली आहेत. वामन पंडितांची आकर्षक काव्यरचना म्हणून या आख्यानाचा गौरव केला जातो, लयबद्ध, नादमधुर आणि डौलदार रचनेमुळे हे आख्यान वेधत ठरले आहे. वामनाचा भक्तिभावही या कवितेत व्यक्त झाला आहे. यमकाचा अतिरेक वामन पंडिताच्या कवितेत सामान्यतः दिसत असला तरी 'वनसुधा' या आख्यानात त्याची यमक योजना फारसा रसभंग करीत नाही.

**वयं मोठं खोटं : देशपांडे, पुरुषोत्तम लक्ष्मण. प्रकाशक : ग. पां. परचुरे, मुंबई २दुसरी आवृत्ती १९६०, प्रथम प्रकाशन १९५६.** प्रत्येक लहान मुलाला मोठं होण्याची खूप उत्सुकता असते पण लहानपणातच-धाकटेपणातच खरं सुख असत. हे मार्मिकपणे सूचित करणारे लहान मुलांचे विनोदी प्रहसन.

घरातली सारी मोठी माणसे बाहेर गेल्याने घर मुलांच्या ताब्यात, पण जाताना आजोबांनी दंगा न करता मोठ्या माणसांप्रमाणे वागण्यास सांगितल्याने मुले अक्षरशः तशी वागतात आणि मोठेपणात कोणती व कशी दुःखे आहेत, जबाबदाऱ्या आहेत याचा ती अनुभव घेतात.

मुलांच्या सहज वृत्ती-प्रवृत्तींचे अचूक दर्शन घडवीत लहानपण सुखाचे असते हे सांगणारे विनोदी प्रहसन, बाल स्वभावाचे मार्मिक दर्शन घडवीत असल्याने बालांप्रमाणे थोरांनाही आवडेल असे वैशिष्ट्यपूर्ण व महत्त्वाचे प्रहसन !

**वर्षाव : भावे, पु. भा.प्रकाशकः देशमुख आणि कंपनी, पुणे, १९५८.** निसर्गाने जन्मतःच दिलेली शरीराची व मनाची भूक मारून माणसाला सरळपणे जगता येणार नाही हे ठासून सांगणारी कादंबरी. नायिका कुसुम रसरशीत. भावनाप्रधान व शिकलेली. परंतु वडिलांच्या निष्ठुरपणाने पेठे नावाच्या ओंगळ नपुंसक वकिलाशी लग्न झाल्यामुळे शरीराने व मनाने अतृप्त. शिक्षणाच्या निमित्ताने वाड्यात राहायला आलेल्या घरमालकाशी तरुण मुलाशी अनेक प्रकारे ती जवळीक साधण्याचा प्रयत्न करते. मातृत्वासाठी हापापलेली कुसुम अखेर दाबके नावाच्या नावडत्या शेजाऱ्याला जवळ करते. पेठ्यांनी वेडाच्या लहरीत केलेल्या मारहाणीमुळे त्या सुखालाही ती दुरावते व त्यांच्या मृत्यूनंतर माहेरचा रस्ता धरते. कुसुमच्या अल्प सहवासाची स्मृती लेखक जपून ठेवतो. मानवी जीवनातील कामवासनेचा अस्वस्थ करणारा अविष्कार या कादंबरीत दिसतो.

**वळीव : पाटील, शंकर. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९५८.** ' वळीव ' हा शंकर पाटलांचा चौदा कथांचा संग्रह एक वाचकप्रिय संग्रह आहे. ग्रामीण जीवनाचे चित्रण करणारी कथा, ग्रामसंस्कृतीची पार्श्वभूमी असलेली केवळ विनोदी किस्सेवजा वाचनीय कथाच असते, या संकल्पनेला

शंकर पाटील यांनी लिहिलेल्या कथेने छेद दिला आहे. निखळ विनोदी, व्यक्तिचित्रण प्रधान, कारुण्यपूर्ण घटनांनी भरलेली अशी पाटलांच्या कथेची विविध रूपे प्रस्तुत संग्रहात दिसून येतात. ग्रामीण स्त्री-पुरुषांच्या जीवनातील कारुण्य, त्यांची भावनिक व मानसिक आंदोलने, त्यांचे परस्पर संबंध, त्या संबंधांतील ताणतणाव, त्यांची पारदर्शी-बेरकी-खुनशी-निष्पापरूपे, त्यांच्या विविध भाववृत्तीचे प्रकटणारे रंग या सर्वांच्या चित्रणात शंकर पाटलांची लेखणी रमते. 'वळीव' ही अगदी लहान कथा अनेक भाववृत्ती प्रकट करते. तात्या ह्या म्हाताऱ्या शेतकऱ्याच्या मनात मृत्यूची दाटून आलेली भीती, बायकोविषयी त्याला वाटणारी माया आणि सहानुभूती, निसर्गाचे त्याच्या मनोवृत्तीशी असलेले साम्य, यांचे कथेतील निवेदन प्रत्ययकारी आहे. 'शारी', 'जुगळ्याकाका' या व्यक्तिचित्रणपर कथा आहेत; तर 'शाळा', 'नाटक' या कथांना विनोदी वातावरणाची डूब मिळाली आहे. शंकर पाटलांच्या कथेतले कारुण्य पात्रांच्या मनोव्यथेशी निगडित असते. कधी-कधी कथांचे शेवट कथेतील कारुण्य अधिक गडद करतात. 'भूल', 'सूड', 'कणव', 'खेळ,' 'प्रतीक्षा', 'भान' या कथांचे शेवट त्यादृष्टीने उल्लेखनीय आहेत. कथेच्या करुणार्त शेवटातून घटनेतील अनपेक्षितता, नियतीचे प्राबल्य, वर्ण्य व्यक्तीचा स्वभाव, यांचे दर्शन होते. कथेत काही वेळा कारुण्यपूर्ण वातावरणाचे व विनोदाचे रंग मिसळलेले दिसतात. 'आफत' कथेतील बाल-नायकाचे मन्याचे हरवणे आणि तो सापडल्यावर गावकऱ्यांमध्ये होणारे संभाषण ह्यातून कारुण्य व हास्याचे मिश्रण झाले आहे. नाटक बसवणाऱ्या ग्रामस्थांच्या अनुभवातील विनोदी घटनांमागेही कारुण्यच आहे. लेखकाने ग्रामीण भाषेचा अवलंब कौशल्याने केला आहे. ग्रामीण भाषेतील शब्द वाक्प्रचार, पात्रांचे संवाद, त्यांच्या भाषेच्या विशिष्ट लकबा यामुळे कथेची परिणामकारकता वाढते. कथांतील वास्तवाला भरीव परिमाण प्राप्त होते. सूक्ष्म निसर्गवर्णनातून निसर्गाची रौद्र-गंभीर तसेच आल्हादक रूपे प्रकट झाली आहेत. 'वळीव' कथासंग्रहातील शंकर पाटलांच्या ग्रामीण कथांनी मराठी ग्रामीण कथेच्या वेगळेपणाचा आणि लेखकाच्या सामर्थ्याचा प्रत्यय येतो.

**वि. शं. चौघुले**

**वाईकर भटजी : धनुर्धारी (रामचंद्र विनायक टिकेकर) प्रकाशक : दामोदर सांवळाराम आणि मंडळी, बडोदे, १८९८.** धनुर्धारी ऊर्फ श्री. रामचंद्र विनायक टिकेकर यांनी आणखी काही टोपन नावाने व स्वतःच्या नावावर विपूल लेखन केले आहे. त्यांची सुमारे ४९ पुस्तके प्रसिद्ध झाली आहे. कर्तबगार पुरुष आणि इतिहास तसेच निबंध, चरित्र आणि कादंबरी अशा विषयांवर विपूल लेखन सर्वसामान्य जनास समजेल अशा पद्धतीने त्यांनी केले. प्रथम रेल्वेत नोकरी, नंतर दुकानदारी तसेच सोलापूर भागात अनेक संस्थांची स्थापना असे अनेक उद्योग त्यांनी केले. वाईकर भटजी ही कादंबरी 'विविधज्ञानविस्तार' या मासिकात सुरुवातीस प्रसिद्ध झाली.

वाईकर भटजी ही कादंबरी आहे. मुखपृष्ठावरच 'इंग्रजीतील सुप्रसिद्ध (कादंबरी) 'व्हिकार ऑफ वेकफील्ड'च्या धरतीवर रचलेली नवीन कादंबरी' (मूळ ऑलिव्हर गोल्डस्मिथ) असे नमूद केले आहे. परंतु या इंग्रजी ग्रंथाच्या आधाराने लिहिलेली ही कादंबरी सर्वस्वी नवीन वाटते.

तत्कालीन समाजाचे वर्णन, भाषा आणि व्यक्तिचित्रण हे सर्व पाहता या ग्रंथास मूळ इंग्रजीचा आधार असावा असे वाटत नाही. प्रत्येक प्रकरणाला उत्तम शीर्षके दिली आहेत त्यातील एकच शीर्षक नमूद केल्यास हा विशेष ध्यानात येईल 'ग्रामत्यागासारखे दुःख नाही.' ही कादंबरी म्हणजे नायक त्रिंबक भटजीचे आत्मनिवेदन. पहिल्या प्रकरणाच्या (गृहिणी गृहमुच्यते) सुरुवातीच्या या वाक्याने कादंबरीची सुरुवात होते.

कादंबरीचे कथानक असे :

कादंबरीचा नायक त्रिंबक भटजी. याला ३ मुलगे व २ मुली. पत्नी अन्नपूर्णाबाई. स्नेही मोरोबा आणि इतर आप्तेष्ट. त्रिंबक हा एक अत्यंत प्रेमळ माणूस. प्राप्त गरीब परिस्थितीत ओढग्रस्तीचा दरिद्री संसार काटकसरीने करावा ही त्याची इच्छा आणि या संसारात त्रिंबक भटजीस त्याच्या पत्नी अन्नपूर्णाबाईंची पूर्ण साथ. मुलाला इंग्रजी शिक्षण मिळाल्यास त्याला सरकारी नोकरी मिळाल्यास दिवस बरे येतील या हेतूने सर्व कुटुंबासह पुण्यास स्थलांतर. मुलगा शिकतो पण आपण कर्जबाजारी झालो हे त्रिंबक भटजीस जाणवते. मुलीचे लग्न एका वृद्धाशी ठरते पण सुदैवाने हे लग्न न होता तिचे एका तरुणाशी लग्न होते. येथून त्रिंबक भटजींच्या संसारात दुःखद घटनांची मालिका सुरू होते. मुलगी विधवा होते. एका मुलाचे निधन होते, दुसरा मुलगा ख्रिस्ती धर्म स्वीकारतो. थोरल्या मुलाकडून आई-वडिलांना अपमानास्पद वागणूक मिळते. इतके साधे कथानक असलेली ही कादंबरी धनुर्धारी यांनी अत्यंत साध्या भाषेत लिहिली आहे.

**वाग्वैजयंती (किंवा) कै. गोविंदाग्रजकृत समग्र कविता : गोविंदाग्रज. प्रकाशक : के. रा. गोंधळेकर, पुणे, १९२१.** गोविंदाग्रज, बाळकराम या टोपण नावाने राम गणेश गडकरी यांनी काव्य व विनोदी लेखन केले. श्री. गडकरी नाटककारही होते. नाटककार श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचे शिष्यत्व त्यांनी मिळविले होते व याचा ते गौरवाने उल्लेख करत. काव्य या वाङ्मयप्रकारात त्यांनी केशवसुतांचे शिष्यत्व पत्करले होते, त्यांच्यावर त्यांची आत्यंतिक निष्ठा होती. ते स्वतःला केशवसुतांचा 'सच्चा चेला' म्हणवीत.

प्रस्तुत काव्यसंग्रहात एकूण १४५ कविता असून, प्रस्तुतचा काव्यसंग्रह त्यांच्या निधनानंतर प्रसिद्ध झाला. प्रेम, नैराश्य, विनोदी, गूढगुंजनात्मक इत्यादी प्रकारच्या कविता या संग्रहात आहेत. विनोदी कवितांत विहिणीचा कलकलाट, चिंतातुर जंतू, हुकमेहुकूम या कविता आहेत. गूढगीतामध्ये कलगीचे गाणे, मुरली गुलाबी कोडे, फुटकी तपेली, प्रेम आणि मरण, भयाण

एकांत, गोड निराशा इ. समावेश आहे. सांग कसे बसलो, घुबडास, स्मशानातले गाणे, अवेळी ओरडणाऱ्या कोकिळेस, अरुण, कृष्णाकांठी कुंडल या आणखी काही महत्त्वाच्या कविता. इंग्रजी आमदानीतील साहित्यिकात श्री. गडकरी लोकप्रिय होते. घुबडास ही मराठी कवितेतील एक लोकप्रिय आणि महत्त्वाची कविता आहे.' मुरली 'आणि'राजहंस माझा निजला' या दोन कवितामुळ श्री. गडकरी यांना कवी म्हणून अमाप प्रसिद्धी मिळाली. गोड निराशा, विरामचिन्हें, भुताचे गाणे, कधी या कवितांचाही उल्लेख केला पाहिजे. गोविंदग्रजांच्या कवितेत संस्कृत शब्दांचे वैपुल्य आढळते. बुद्धिमान आणि कल्पक कवी म्हणून गोविंदाग्रजांची अद्यापही प्रसिद्धी आहे. 'क्षण एक पुरे प्रेमाचा, वर्षाव पडो मरणाचा ' या ओळी लिहिणारे गोविंदाग्रज ' प्रेमाचे शाहीर ' म्हणून प्रसिद्ध आहेत. गोविंदाग्रजांचे ' श्री महाराष्ट्र गीत ' अपूर्ण आहे, याची खंत अनेकांनी व्यक्त केली आहे. त्यांनी आपल्या गूढगीतांच्या संदर्भात व्यक्त केलेल्या खालील ओळी प्रसिद्ध आहेत :

" गूढार्थचि तो अलिखित जागी मत्कवनी भरूनी राही नसता परि संकेत जिवाचा उमजेना तो कवणाही. "

**वाङ्मयीन टीका-शास्त्र आणि पद्धती : वाळिंबे, रामचंद्र शंकर. प्रकाशक : जनार्दन गणेश जोशी, पुणे, १९५०.** रामचंद्र शंकर वाळिंबे यांचा हा समीक्षा ग्रंथ निरनिराळे वाङ्मयीन वाद व प्रणालींचा इतिहास, त्यांचे सद्यस्वरूप याचे ज्ञान जिज्ञासू व प्रगल्भ वाचकांना करून द्यावे हा ग्रंथलेखनाचा उद्देश. वाङ्मयीन टीकेचे स्वरूप, कार्य, तिची व्याप्ती आणि टीकाकाराची सामग्री यांचा विचार केल्यानंतर तुलनात्मक, चरित्रात्मक, ऐतिहासिक, आस्वादक, निर्णायक इत्यादी समीक्षा पद्धतींची सविस्तर चर्चा केली आहे. ग्रंथाच्या अखेरीस अर्वाचीन प्रणालींचा आढावा घेऊन इंग्रजी टीकेचे ओझरते दर्शन घडविले आहे.

वसंत नरहर कुबेर

**वाङ्मयीन टिपा आणि टिप्पणी : कुळकर्णी, वा. ल. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. पहिली आवृत्ती, १९५३.** वा. ल. कुळकर्णी हे मराठीतील एक रसज्ञ समीक्षक म्हणून ओळखले जातात. ' वामन मल्हार वाङ्मयदर्शन ' ' वाङ्मयातील वादस्थळे' ,' वाङ्मयीन शोध आणि बोध ', ' न. चिं. केळकर वाङ्मय दर्शन, ' ' नाटककार खाडीलकर : एक अभ्यास ' इत्यादी समीक्षाग्रंथ मराठी समीक्षतच्या क्षेत्रात मान्यता पावले आहेत.

' वाङ्मयीन टिपा आणि टिप्पणी ' या ग्रंथातील समीक्षालेख वेळोवेळी नियतकालिकांत या ग्रंथाआधी प्रसिद्ध झालेले होते. " या समीक्षालेखांचे लेखन स्वतःच्या शंकांच्या समाधानार्थ झालेले आहे त्यामुळे या ग्रंथाचे शीर्षक ' वाङ्मयीन टिपा आणि टिप्पणी ' असे दिले आहे " असे वा. ल. कुळकर्णी प्रस्तावनेत नमूद करतात.

' टिका : काल, आज आणि उद्या' हा या ग्रंथातील पहिला लेख. या लेखनात मराठी टिकेच्या प्रारंभापासून थोडक्यात आढावा घेतला आहे.कालच्या टिकेपेक्षा आजची टीका आणि टिकाकार कलामूल्यांची जाणकारपणे कदर करतो आहे. आणि ते योग्य आहे. अशा आशयाचा अभिप्राय या लेखाच्या शेवटी वा.ल.नी व्यक्त केला आहे. ' कलावाङ्मयातील नवे आणि जुने ' या लेखात नव्या कलाप्रवृत्तींकडे जुन्यांचा कोणता दृष्टिकोण असतो याबद्दलची चर्चा आहे. वाङ्मयातील बदलांकडे जिज्ञासू वृत्तीने पाहणे, त्यामागील हेतूंचा शोध घेणे हे समीक्षकांचे काम आहे असे वा. ल. या लेखाच्या शेवटी म्हणतात. ' सर्वंकष सत्ता आणि गद्य-पद्य साहित्य ' हा या संग्रहातील आणखी एक महत्त्वाचा लेख टॉमस हार्डीचे 'पद्यापेक्षा गद्य साहित्य खळबळ माजवू शकते ' अशा आशयाचे विधान घेऊन गद्य आणि पद्याची परिणामकारकता वा. ल. नी चर्चिली आहे. याशिवाय ' रस म्हणजे काय ? ', ' सामान्य वाचक ', ' थोडेसे ऐतिहासिक कादंबरीच्या निमित्ताने ',' कला आणि चारित्र्य ', 'कला आणि स्वातंत्र्य : एक विचार ',' कलावाङ्मयातील दोन प्रवृत्ती ',' थोडेसे व्यक्तिचित्रणासंबंधी ', ' टीकाकार केळकर ', ' तुकारामाची कविता : काही विचार ', ' मराठी एकांकिका ' हे आणखी काही महत्त्वाचे समीक्षालेख अभ्यासकांना मार्गदर्शक ठरणारे लेख आहेत.

वि. दा. वासमकर

**वाङ्मयीन दृष्टी आणि दृष्टिकोण : कुळकर्णी, वा. ल. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई १९५९.** समीक्षक वा. ल. कुलकर्णी यांचा काही साहित्यप्रकार व वाङ्मयीन प्रश्नासंबंधीच्या चौदा लेखांचा संग्रह.

लघुकथेसंबंधी लेखकाने वेळोवेळी लिहिलेले सर्व लेख त्या पुस्तकात समाविष्ट. ' मराठी लघुकथेचा उत्क्रांतीमार्ग ', ' मराठी नवकथेच्या मर्यादा ',' स्फुट गोष्ट ' व ' दोन घटका मनोरंजन ' ' पुढील काळातील मराठी लघुकथेची ही नांदीच " इ. लेखांचा समावेश आहे तसेच ' सुखात्मिका आणि शोकात्मिका. ' ' मराठी कादंबरी ' ' काशिनाथ रघुनाथ मित्रांचे मासिक मनोरंजन ' मध्ये वाङ्.मयाचे विविध प्रकार व सामाजिक कार्य या बाबतीत मासिक ' मनोरंजन ' ने केलेल्या भरीव कार्याचा आढावा. असे महत्त्वपूर्ण लेखही या ग्रंथामध्ये आहेत.

पुस्तकाच्या अखेरीस जोडलेली लेखकाच्या समग्र टीकालेखनाची विषयावार सूची अभ्यासकांच्या दृष्टीने महत्त्वाची.

एस. एस. नाडकर्णी

**वाङ्‌मयीन महात्मता : मर्ढेकर, बाळकृष्ण सीताराम. प्रकाशक : रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबई ,१९४१.** बा. सी. मर्ढेकर लिखित सात समिक्षालेखांचा हा संग्रह प्रस्तुत ग्रंथामध्ये वाङ्‌मयचर्चा म्हणून मर्ढेकरांनी जी चर्चा केली आहे. त्यातील काहींबाबत मतभेद संभवत असले तरी मराठी समीक्षेमध्ये शुद्ध कालावादी भूमिकेचा पुरस्कार करण्याच्या दृष्टिकोनातून या चर्चेचा निश्चितच उपयोग झाला आणि त्यामुळेच त्या चर्चेचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. तसेच मराठी वाङ्‌मयाच्या परपुष्टतेचे पितळ उघडे पाडण्याचा प्रयत्न या लेखांमधून प्रथमच केला गेल्याने या लेखाचे महत्त्व विशेष आहे.

वसंत नरहर कुबेर

**वादळी वारे : केळकर, द. के. प्रकाशक : मनोहर ग्रंथमाला प्रकाशन, पुणे १९४०.** ' वादळी वारे 'या पुस्तकात द.के. केळकर यांचे पूर्वी निरनिराळ्या नियतकालीकांत प्रसिद्ध झालेले १३ लेख आहेत.

शास्त्राने शृंगारलेल्या समाजसंसार समाजशास्त्रातील जुना नवा दृष्टीकोण, स्त्रीपुरुष-समता, प्राचीन भारतीयांचे समाज घटनेतील प्रयोग, समाजशास्त्रातील विवेकवाद, धर्मविचारांच्या नव्या लाटा, मिशनऱ्यांचे आक्रमण, स्वामित्त्वभावना विरुद्ध औदार्यभावना, चंचल नीतिमत्तेतील अचल घटक अशा विविध विषयांवरील लेख या पुस्तकात एकत्र केले आहेत.

त्यामध्ये लेखकाचे मार्मिक निरीक्षण व सखोल चिंतन प्रत्ययास येत.

सुधा कापरे

**वामकुक्षी : अत्रे, प्र. के. प्रकाशक : देशमुख आणि कं. पुणे ,१९४९.** जीवनातील काही गंभीर व काही विनोदी अनुभवांचे चित्रण करणाऱ्या आठ कथांचा संग्रह.

' पाठीवरचे वळ ', ' महापुरात बुडालेला विष्णू ', ' समुद्राची देणगी ' या तीन शोकात्म कथा वगळता अन्य पाच कथा उपहास, विडंबन आदीच्या साह्याने विनोदांतून व्यक्तिगत व सामाजिक दोष दर्शन करतात.

ज्ञाती, कुळ आदींच्या नावे उठसूठ संमेलने भरवणारांचे विडंबन ' पहिले कावळे संमेलन ' या कथेत येते. स्वस्त माल जाहिरातीवर भुलून घेणाऱ्यांची फसवणूक व फजिती ' बारा आण्यात घोड' मध्ये दाखविली आहे. स्त्रीविषयक कल्पनांत रमणाऱ्या पौगंडावस्थेतील मुलांची फजिती ' आम्ही सातजण आणि ती 'मध्ये वाचक लेखकाची मिस्किल थट्टा ' काळ आणि कादंबरी ' मध्ये आहे.' मास्तर आणि पारेलीस'या कथेत अचानक संकटातून होणाऱ्या सुटकेच्या आनंदाचे चित्रण आहे.

अर्थगर्भ भाषा, वैशिष्ट्यपूर्ण व चटकन भिडणारे अनुभव आणि अत्रे यांची नेहमीच्या शैलीहून वेगळी शैली ही या कथासंग्रहाची वैशिष्ट्ये आहेत.

उर्मिला दळवी

**वामन मल्हार : वाङ्‌मयदर्शन : कुळकर्णी, वा. ल. प्रकाशक : मुंबई मराठी साहित्य संघ, प्रकाशन, मुंबई, १९४४.** वा. ल. कुळकर्णी हे मराठीतील महत्त्वाचे समीक्षक आहेत. ' वाङ्‌मयातील वादस्थळे ', ' वाङ्‌मयीन मते आणि मतभेद ', ' वाङ्‌मयीन टिपा आणि टिप्पणी ' इ. समीक्षाग्रंथ अभ्यासकांना प्रेरक ठरले आहेत.

' वामन मल्हार : वाङ्‌मयदर्शन ' हा वा. ल. कुळकर्णी यांचा अगदी सुरुवातीचा ग्रंथ मुंबई मराठी साहित्य संघाने वामन मल्हार जोशी यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ जी व्याख्यानमाला आयोजित केली होती त्या व्याख्यानमालेसाठी वा. ल. कुळकर्णी यांची व्याख्याने आयोजित केली होती. या व्याख्यानमालेसाठी तयार केलेल्या निबंधांवरून प्रस्तुत ग्रंथ सिद्ध झाला.

प्रस्तुत ग्रंथात वामन मल्हार जोशी यांच्या वाङ्‌मयीन व्यक्तीमत्त्वाची प्रथम चर्चा करून वामन मल्हार यांच्या ललित आणि समीक्षात्मक लेखनाची पुढील प्रकरणातून वा. ल. कुळकर्णी यांनी विवेचन केले आहे. ती अशी — (१) एक श्रेष्ठ वाङ्‌मयीन व्यक्तीमत्त्व (२) वामनरावांचे ललित लेखन, (३) वामनरावांचे वाङ्‌मय विवेचन, (४) वामनरावांचे तत्त्वचर्चात्मक लेखन. शिवाय प्रस्तुत ग्रंथाच्या शेवटी कथा वाङ्‌मयातील तत्त्वशोधन या शीर्षकाची पुरवणी 'इंदू काळे आणि सरला भोळे' या कादंबरीविषयी डायरीतील पाने या सदराखाली केलेली टिपणे ; आणि ' वामन मल्हार जोशी व त्यांचा काळ ' या विषयावरील सनावळी आणि घटना यांची माहिती वा. ल. कुळकर्णी यांनी दिली आहे.

वामन मल्हार जोशी हे तत्त्वचर्चा प्रधान कादंबरीचे जनक म्हणून ओळखले जातात. वैशिष्ट्यपूर्ण अशा ' रागिणी, ' ' नलिनी', ' आश्रमहरिणी', ' सुशीलेचा देव', ' इंदू काळे आणि सरला भोळे ' या कादंबऱ्या ' विचार-सौंदर्य', ' विचारविहार ' या समीक्षाग्रंथाचे तपशीलवार विवेचन करणारा वा. ल. कुळकर्णी यांचा मराठीतील एक महत्त्वाचा समीक्षाग्रंथ म्हणून या ग्रंथाचा उल्लेख करता येतो.

वि. दा. वासमकर

**वारकरी पंथाचा इतिहास : दांडेकर, शंकर वामन. प्रकाशक : प्रा. शंकर वामन दांडेकर , पुणे १९२७.** प्राचार्य शंकर दांडेकर वारकरी संप्रदायाचे अध्वर्यु. गुरू जोग महाराजांच्या प्रेरणेने संप्रदायाचा स्वीकार. संपूर्ण आयुष्य सांप्रदायासाठी वेचले. प्रतिवर्षी वारी, सांप्रदायिक कीर्तन-निरूपण परंपरा चालविली. त्यांचे हे केवळ साठ पानांचे पुस्तक. मूलतः हा निबंध त्यांनी डॉ. केतकर यांच्या सुचनेनुसार ज्ञानकोशासाठी लिहिला होता. हा निबंधच त्यानी पुस्तकरूपाने प्रसिद्ध केला.

वारकरी पंथाचा इतिहास म्हणजे महाराष्ट्राचा सातशे वर्षाचा धार्मिक इतिहास आहे. महाराष्ट्राचा हा अत्यंत लोकप्रिय भक्तिप्रधान पंथ. या पुस्तिकेत या पंथाच्या सर्व अंगोपागाची चर्चा आढळते. संप्रदायिकांच्या दृष्टीनेही हा अत्यंत महत्त्वाचा

ग्रंथ आहे. या संप्रदायास वारकरी म्हणजे वारी करणारा. भागवत म्हणजे भगवंताला सर्वस्व अर्पण करणारा. माळकरी म्हणजे तुळशीची माळ परिधान करणारा या तीनही नावाने ओळखले जाते. वारकरी संप्रदाय हा सनातन वैदिक धर्माचा भक्तिस प्राधान्य देणारा एक भाग आहे. उत्कट भक्ती, सदाचार, नीति, सरळमार्गी आचरण असलेला हा संप्रदाय असून चातुर्वर्ण्य जातिव्यवस्थेच्या चौकटीविरुद्ध न जाता आध्यात्मिक समता सर्वार्थाने आणण्याचा प्रयत्न या संप्रदायाने केला. हा संप्रदाय म्हणजे सर्व महत्त्वाच्या संतांनी चालविलेली भक्ती-संप्रदायी चळवळ होय. या संप्रदायाविषयीचे सर्वप्रथम लेखन न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांनी त्यांच्या 'मराठी सत्तेचा उत्कर्ष' या ग्रंथात केले.

भक्तिसंप्रदाय या पंथाचे कार्य व्यापक आणि मूलगामी समाजजीवनाला भक्तीची शक्ती आणि प्रेरणा देणारा हा जिवंत प्रवाह आजही त्याच जोमाने कार्यरत आहे. व्यापक सहानुभूती आणि मानवता जपणारा सर्वविषयी समानता व सख्यभाव असणारा हा संप्रदाय. या संप्रदायाचे कालखंड पुढीलप्रमाणे मानले जातात. पुंडलिक ते ज्ञानदेव, ज्ञानदेव. नामदेव, भानुदास-एकनाथ, तुकाराम-निळोबा आणि आजच्या धार्मिक ग्रंथामध्ये ज्ञानेश्वरी, नाथ भागवत, श्रीतुकारामांची गाथा हे ग्रंथ ही सांप्रदायाची प्रस्थानत्रयी. वारी करताना भेट द्यावयाची ठिकाणे म्हणजे चंद्रभागा तीर्थ, पुंडलिक मुनींचे मंदिर, पंढरीनाथाचे दर्शन ही त्रिपुटी. संत बहिणाबाईंच्या प्रसिद्ध अभंगात संप्रदायाचा इतिहास आलेला आहे.'संतकृपा जाली । इमारत फळा आली । ज्ञानदेवे रचिला पाया ' भक्तराज पुंडलिकापासून या संप्रदायाची सुरुवात झाली. या पंथात चार सांप्रदाय आहेत. चैतन्य, स्वरूप, आनंद आणि प्रकाश. प्रमुख दैवत पंढरपूरचा पंढरीनाथ, विठोबा आणि रुक्मिणीमाता. प्रस्थानत्रयीबरोबरच ज्ञानदेव ,एकनाथ यांच्या हरिपाठाचे नित्य वाचन आवश्यक. श्री निवृत्तीनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव, मुक्ताबाई, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि निळोबा हे प्रमुख संत. वारी, तुळशी माळ, बुक्का, गोपीचंदनाचा टिळा, मुखी रामकृष्णहरी हा मंत्र; खरे बोलणे, एकादशी व्रत हा आचारधर्म. प्रतिवर्षी वारीला वर नमूद केलेल्या संतांच्या गावाहून पंढरपुरास पालख्या येतात. मराठी जनमानसावर प्रचंड प्रभाव असलेल्या या पंथाचा उगम आणि इतिहास सांगणारे हे महत्त्वाचे पुस्तक आहे.

**विनायकाची कविता : विनायक (विनायक जनार्दन करंदीकर). , प्रकाशक : श्री. शंकर नरहर जोशी, चित्रशाळा प्रेस, पुणे, १९२०** आवृत्ती क्रमांक ०१ ते ०५ यामध्ये फर्ग्युसन कॉलेज, पुणे येथील इंग्रजीचे प्राध्यापक वासुदेव बळवंत पटवर्धन यांची प्रस्तावना,संग्राहक अनंततनय यांचे निवेदन यांचा समावेश आहे. आवृत्ती क्रमांक ०४ आणि ०५ मध्ये' मराठीतील राष्ट्रीय कवितेचे पहिले व श्रेष्ठ उद्‌गाते कविनायक विनायक 'या शीर्षकाची दीर्घ प्रस्तावना समाविष्ट आहे. तसेच वरील सर्व आवृत्यामध्ये ' विनायकांचे चरित्र' या मथळ्याखाली कविचे अल्प चरित्र समाविष्ट आहे.

कवी विनायक यांना केवळ ३७ वर्षांचे आयुष्य लाभले. रेव्हरंड नारायण वामन टिळक आणि केशवसुत या कविंच्या कालखंडातील समकालीन कवी इतिर कवीच्या मानाने त्यांचा व्यासंग कमी असला तरी इंग्रजी काव्यवाङ्मयाचा त्यांना परिचय होता हे जाणवते. 'राष्ट्रीय कवितेचे प्रणेते' म्हणून काही टीकाकारांनी त्यांना गौरविले असले तरी काहींनी या विधानावर आक्षेपही नोंदविले आहेत. त्यांच्या एकूण ७४ कविता असून, पहिल्या आवृत्तीत असलेल्या ६१ कवितांचा संग्रह संग्राहक अनंततनय यांनी अतिशय परिश्रमाने केला आहे. यामध्ये गणिकोद्धार, मोहानंतर, ध्यास तो भास, वीरमती या रचना दीर्घ असून खंडकाव्यसदृश आहेत. काही ऐतिहासिक स्त्रियावर काव्यरचना आहे त्यामध्ये अहिल्या, पन्ना, पद्मिनी, दुर्गावती, संयोगिता, तारा, कृष्णाकुमारी, हिरकणी या कवितांचा समावेश आहे. जुन्या पिढीतली बहुसंख्य सुशिक्षितांनी 'हतभागिनी' ही हिंदमातेवरील कविता गौरविली होती. महाराष्ट्र लक्ष्मी, कवी आणि पोपट, नागपंचमी, गाण्याचे गाणे, नदी आणि कवी, चिमणी, अवंतिके, सुवास, विरही (' विरही' हे प्रेमकाव्य आहे) दसऱ्याचे सोने, शिवसंदेश या उल्लेखनीय कविता आहेत. 'प्रीती निमाली तर' या कवितेचा विशेष उल्लेख केला पाहिजे. 'महाराष्ट्र लक्ष्मी' या काव्यातील काही ओळींचा निर्देश या ग्रंथपरिचयात आवश्यक वाटतो :

'महाराष्ट्र लक्ष्मी मातें जगीं धन्य वाटे, यशोगीत तिचें गातांमनी हर्ष दाटे. आणि पूर्व दिव्य ज्यांचें, त्यांना रम्य भाविकाळ, बोध हाच इतिहासाचा सदा सर्वकाळ.'

' देशभक्ताचा अपूर्व सोहाळा ' या शीर्षकाची कविता केवळ चार ओळींची आहे आणि या कवितेचा वारंवार उल्लेख केला गेला आहे :

देशभक्ता प्रसाद बंदिशाळा
शृंखलांच्या गुंफला पुष्पमाळा
चिता सिंहासन शूल राजदंड
मृत्यु दैवत दे अमरता उदंड.

**विरहतरंग : माधव जूलियन (माधव त्रिंबक पटवर्धन), प्रकाशक : श्रीगणेश छापखाना, पुणे, १९२६ (रविकिरण मंडळ प्रकाशन, क्रमांक ०६).** विरहतरंग हे माधव जूलियन यांचे सामाजिक खंडकाव्य. हे खंडकाव्य खऱ्या अर्थाने प्रेमकाव्य आहे त्यामुळे यामध्ये कोणत्याही प्रकारची टीका नाही. नायक प्रभाकर या काव्याचा निवेदक. हे काव्य एकूण ३३ खंडात असून खंडांना तरंग असे नाव कवीने दिले आहे. काव्याची भाषा संस्कृत शब्दप्रचूर आहे. या खंडांना शीर्षके नाहीत.

नायिका इंदू ही एका प्रार्थनासमाजी सुधारक गृहस्थाची कन्या. इंदू ही बालविधवा आहे. वडिलांची वृत्ती समाजसुधारणेला अनुकूल असल्याने ते तिला महाविद्यालयात प्रवेश घ्यायला

लावतात. इंदू ही बुद्धिमान व रसिक आहे. प्रभाकर हा इंदूचा सहाध्यायी. हा इंदूच्या प्रेमात पडतो व इंदूच्या वडिलांकडे तिला मागणीही घालतो. परंतू इंदू या प्रस्तावाला मान्यता देत नाही. दोन वर्षे इंदू आणि प्रभाकर एकमेकांपासून दूर राहतात. परंतु दोघांना परस्परावरील प्रीतिची जाणीव झाल्याने हे दोघे पुन्हा एकत्र येतात. त्याग हीच प्रेमाची खरी कसोटी आहे याचा त्यांना प्रत्यय येतो. या दोघांचे सहजीवन, सहली, वनभोजने इत्यादींच्या वर्णनाने हे काव्य रंजकही झाले आहे. या उभयतांच्या महाविद्यालयीन जीवनांत घडलेली एक रसाळ कथा प्रभाकराचे हे स्वागत आहे. अद्यापही 'विरहतरंगातील' वातावरण वाचकांना मोहात पाडते.

**विवेकमण्डन : माटे, श्रीपाद महादेव. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९५६.** श्री. म. माटे हे श्रेष्ठ दर्जाची लघुकथा लिहिणारे म्हणून जसे परिचित आहेत तसेच वैचारिक म्हणूनही ते ओळखले जातात.

'विवेकमण्डन'या ग्रंथात एकूण पंधरा वैचारिक स्वरूपाचे निबंध आहेत. या निबंधाचे पाच निबंधांचा एक असे तीन भाग मानले आहेत.

प्रत्येक भागात पहिला निबंध व्यक्तिविषयक, दुसरा सामाजिक समस्यासंबंधीचा, तिसरा वाङ्मयविषयक, चौथा तात्त्विक विवेचनाचा आणि पाचवा परकीय समाजसंबंधीचा अशी वर्गवारी तीनही विभागांत लेखकाने केली आहे.

या ग्रंथातील पहिला 'मागे पडलेला बैरागी' हा निबंध विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्या संबंधीचा आहे. तर 'सुसंस्कृतांचे प्रतिनिधी'या निबंधात तात्यासाहेब केळकर यांचे व्यक्तिचित्रण येते. तर 'भारत स्वातंत्र्याचा पहिला उद्गाता'या निबंधात याच शब्दांत शि. म. परांजपे यांचा गौरव लेखकाने केला आहे. 'गिरीजन आणि परिजन'या निबंधात गिरीजन म्हणजे गिरीगव्हरांत राहणाऱ्या आदिवासी जमाती व परिजन म्हणजे सुप्रतिष्ठित समाजाच्या भोवती घिरट्या घालणाऱ्या फटिंग जाती ; यांना आधुनिक आणि सुसंस्कृत करणे आवश्यक आहे, असा विचार श्री. म. माटे मांडतात.

याशिवाय 'भांबावलेला समाज', 'बायकांचा दु:स्वास', 'आजच्या संतांचे खरे कार्य', 'नातीची बदलती प्रकृती'हे महत्त्वाचे निबंध या ग्रंथात आहेत. समाजरचनेच्या नियमपालनाला नीती हे नाव असते. सामान्य माणसे नीती कधी बदलत नसते असे समजतात. पण हे खरे नाही ; हे अनेक उदाहरणांनी माटे यांनी दाखवून दिले आहे.

स्वातंत्र्य प्राप्तीनंतरच्या सुरूवातीच्या काळातील एक महत्त्वाचा वैचारिक ग्रंथ म्हणून 'विवेकमण्डन'या ग्रंथाचा उल्लेख करता येईल.

वि. दा. वासमकर

**विवेकसिंधू : मुकुंदराज. संपादक : प्रा. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, प्रकाशक : लेखन वाचन भांडार, पुणे, १९५७.** मुकुंदराजांचा 'विवेकसिंधू'हा ग्रंथ मराठीचा आद्य ग्रंथ मानला जातो. मुकुंदराजांचा काळ, स्थळ आणि आद्य ग्रंथकाराचा मान या तीनही घटना वादग्रस्त ठरल्या आहेत. अभ्यासकांनी या संदर्भात आग्रही प्रतीपादन केले असून दोन्ही पक्ष आपल्या मतांशी ठाम आहेत.

प्रस्तुत ग्रंथ दोन भागात लिहिला आहे. पहिल्या भागाला पूर्वार्ध असे नाव असून त्याला 'सृष्टिक्रम' असे संबोधिले आहे. या भागात सात प्रकरणे आहेत व प्रत्येक प्रकरणास स्वतंत्र शीर्षक आहे. स्वरूप समावेश, स्वानुभव-दृढीकरण, तत्वसृष्टी-कथन इत्यादी. या प्रकरणांत एकूण ७७३ ओव्या आहेत. उत्तरार्धाला 'संहारक्रम' हे शीर्षक आहे. स्थूलदेहनिरसन, लिंगदेहनिरसन, अद्वैत प्रतिपादन इत्यादी. या भागांत ९२७ ओव्या आहेत. संपूर्ण ग्रंथ संवाद स्वरूपात आहे. जिज्ञासु शिष्याने विचारलेले प्रश्न आणि आदरणीय सद्गुरुने त्याला दिलेले उत्तर याप्रमाणे ग्रंथाची रचना आहे. शिष्याचे शंका समाधान करताना योग्य संदर्भ, दृष्टांत, मार्मिक स्पष्टीकरण करून गुरूंनी दिलेली उत्तरे यामुळे ग्रंथास एकप्रकारचा जिवंतपणा आला आहे. अद्वैत सिद्धन्तासारखा गहन विषय आणि त्याचे प्रतिपादन मराठी भाषेत करावयाचे याची जाण ग्रंथकारास आहे. द्वैत म्हणजे काय ? द्वैताचा आभास का निर्माण होतो याचे विवेचन पूर्वाधात असून उत्तरार्धात अद्वैत मताचे प्रतिपादन आहे. 'शांकरोक्तिवरी। मिया बोलिली हे वैखरी' असे सांगून अद्वैताचे प्रतिपादन स्पष्ट केले आहे. मुकुंदराज हे नाथपंथी शिवोपासक होते. पूर्वपक्ष, उत्तरपक्ष आणि फलश्रुती, गुरु-शिष्य संवादरूपाने अशी ग्रंथ रचना असून वेदशास्त्राचा, उपनिषदांचा मथितार्थ, ब्रह्म-निरूपणकार या नात्याने ग्रंथकार सांगत असून यासाठी ब्रह्मसूत्रे आणि उपनिषदे यावरील शांकरभाष्ये हे मूळ ग्रंथ आहेत हे ग्रंथकाराने नमूद केले आहे. संस्कृत भाषेतील ज्ञानगंगा मराठी भाषेत आणण्याचा हा प्रयत्न आहे. वेदशास्त्राचा मथितार्थु। मऱ्हाटिया जोडे फलितार्थु। तरि चतुरी परमार्थु। कां नेघावा ।। हे मत मांडून "भाषा हो का मऱ्हाटी। परि उपनिषदांचीच राहाटी"।। असेही प्रतिपादन आहे. या ग्रंथाचा उत्तरकालीन तत्वज्ञानपर आणि आध्यात्मिक ग्रंथावर प्रभाव पडलेला आहे. ग्रंथकाराने ग्रंथरचना का केली याचे उत्तर पुढील ओवीत दिले आहे, "जेया नाही शास्त्रीं प्रतीति। नेणती तर्कमुद्रेची स्थिती।। तेयालागी मऱ्हाटीया युक्ति। केली ग्रंथरचना"हा मराठी भाषेतील एक महत्त्वाचा ग्रंथ आहे.

**विशाखा : कुसुमाग्रज (विष्णू वामन शिरवाडकर). १९४२ संपादक वि. स. खांडेकर, कोल्हापूर.** आधुनिक मराठी कवीमध्ये सर्वश्रेष्ठ व्यक्तिमत्त्व असलेले कवी. यांनी कवितेबरोबरच इतरही वाङ्मयप्रकारात विपुल लेखन केले आहे.

काव्यसंग्रह १३, संपादने ५, कथासंग्रह ८, कादंबरी ३, नाटके १७ इत्यादी त्यांच्या 'नटसम्राट'या नाटकाला साहित्य अकादमीचे १९७४ सालचे पारितोषिक मिळाले होते. १९८८ सालचे ज्ञानपीठ पारितोषिकही त्यांना मिळाले.

'विशाखा'हा कुसुमाग्रजांचा परंपरा निर्माण करणारा काव्यसंग्रह. ज्या काळात हा काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला तो काळ म्हणजे 'चले जाव' चळवळीचा कालखंड. यातील देशभक्तिपर कविता प्रसिद्ध आहेत. 'क्रांतीचा जयजयकार' 'जालियनवाला बाग' इत्यादी कविता प्रसिद्ध आहेत. त्यांच्या अनेक कविता प्रतिकात्मक आहेत. 'कोलंबसाचे गर्वगीत', 'अहिनकुल', 'आगगाडी आणि जमीन', 'हिमलाट' इत्यादी कवितेचे प्रयोजन व्यक्त करणारी 'समिधाच सख्या या'ही एक महत्त्वाची कविता. कुसुमाग्रजांनी समाजवादाचे व्यापक तत्त्वज्ञान स्वीकारले होते आणि साहजिकच त्यांचे लेखनही या अनुरोधाने झाले. सामाजिक विषमता, देश, धर्म इत्यादी विषय कवितांतून व्यक्त झाले आहेत. प्रणयभावना व्यक्त करणाऱ्या कविताही प्रस्तुत संग्रहात आहेत. 'स्वप्नांची समाप्ती'या कवितेचा या संदर्भात उल्लेख केला पाहिजे. या संग्रहास समाजमान्यता मिळाली होती. विषमता आणि अन्याय या संदर्भातील बळी, लिलाव, सहानुभूती, माळाचे मनोगत, पाचोळा या कविता महत्त्वाच्या. जा जरा पूर्वेकडे, गुलाम, बंदी इत्यादी कवितांतून क्रांतीचा जो ध्यास मानवजातीला लागलेला आहे त्याचे वर्णन येते. मातीची दर्पोक्ती, पृथ्वीचे प्रेमगीत यातील कल्पनाविलास मनोज्ञ आहे. अग्निसंप्रदायी कविता असे कुसुमाग्रजांच्या कवितेचे वर्णन केले जाते.

**विष्णू कृष्ण चिपळूणकर : काल आणि कर्तृत्व : लेखक : माडखोलकर, ग. त्र्यं. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, आवृत्ती ३ री, १९५७, पुणे.** १९२१-१९२२ सालात 'विविधज्ञानविस्तारा'मध्ये प्रकाशित झालेल्या गजानन त्र्यंबक माडखोलकर यांच्या लेखांची परिष्कृत केलेली ही आवृत्ती स्वातंत्र्योन्मुख युयुत्सू जीवनाच्या नव्या प्रणाली निर्माण करून पारतंत्र्यामुळे हतबुद्ध झालेल्या महाराष्ट्रात स्वावलंबनाचा उद्धार आत्मप्रत्यय आणि प्रतिकाराची अदम्य ईर्ष्या उत्पन्न करणाऱ्या विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या जीवनकार्याचा परिचय व परामर्श. इ. स. १८१९मध्ये सुरू झालेल्या एलफिन्स्टनच्या कारकिर्दी पासून सामान्यतः इ. स. १८८५ पर्यंत जे समाजधुरीण, वाङ्मयाग्रणी होऊन गेले, त्यांचा परामर्श घेऊन चिपळूणकरांवरील आक्षेपांना योग्य उत्तरे देऊन, राष्ट्रीय अभिमानाचा पुनरुत्थानाच्या चिपळूणकरांच्या थोर कार्याची प्रस्थापना करण्याचा प्रयत्न ग्रंथात आहे. एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्रातील राजकीय, सामाजिक, वाङ्मयीन चळवळींचा परिचय होण्यासाठी महत्त्वाचा विमर्शात्मक साधनग्रंथ श्री. ना. बनहट्टी यांच्या चिपळूणकर व त्यांचे आधुनिक आक्षेपक या प्रबंधासह १९३४ मध्ये पुनःप्रकाशित.

सु. रा. चुनेकर

**विसर्जन : कुलकर्णी, वि. म. प्रकाशक : मनोहर महादेव केळकर, पुणे, १९४३.** वि. म. कुलकर्णी यांच्या विसर्जन या काव्यसंग्रहात एका प्रेमिकाच्या प्रेमभावनेतील आरंभीची आशा आणि प्रेयसीने केलेल्या अपेक्षाभंगातून पूजन निर्माण झालेली त्याची निराशा या दोन भावना प्रकट झाल्या आहेत. 'आवाहन', 'विसर्जन' आणि 'समाप्ती'या शीर्षकांनी भावना विष्कारांच्या अवस्था कवीने सूचित केल्या आहेत. 'विसर्जन' ह्या दीर्घकवितेत प्रियकर प्रेयसीच्या असफल प्रेमाची कहाणी वि. म. कुलकर्णी यांनी उत्कटतेने कथन केली आहे. सुरूवातीचे बौद्धिक साहचार्य, तिचे लाघवी सौंदर्य, संभाषण चातुर्य, संगीताची आवड, तिचे लाडिक विभ्रम यांच्या वर्णनाने कथनाला गती येते. प्रेयसीला मनःपूर्वक दाद देणारा प्रेमिक वादपटू आहे, एक वाङ्मयप्रेमी भावुक युवक आहे. कालिदास, उमरखय्याम, माधव जूलियन हे त्याचे आवडते कवी आहेत. हळूहळू बहरत असलेले दोघांचे प्रेम असफल होते. 'जगताची काय चूक ? माझी तरी काय चूक ?' असा प्रश्न प्रियकराला पडतो. कविता शोकांत असली तरी दोघांच्या प्रणयाराधनाला विनोदाची डूब मिळाली आहे. कवितेतील प्रेमिक स्थिर संयमी आणि संथ वृत्तीचा आहे. त्यामुळे प्रणय-निराशा तीव्रपणे व्यक्त करीत असताना खोटी नाट्यपूर्णता आणण्याचा प्रयत्न तो करीत नाही. वि. म. कुलकर्णी यांना या प्रेमकवितेची सुचलेली कल्पना, कवितेची सफाईदार भाषा, वेचक शब्दांची निवड ही कवितेची वैशिष्ट्ये लक्ष वेधून घेतात. वरून थंड भासणारा ज्वालामुखी, एक वचणी हाक मारणारी खुळी प्रियशिष्या, परमेश्वराला दुःखानांच नाटक आवडणे, मोहरलेले आंबेवन, बाहूंचे पुष्पहार, मनींचा ढग या कल्पनांमुळे कवितेच्या बाळात्मक गुणवत्तेत भर पडली आहे. रा. श्री. जोगांनी 'विसर्जन'ला लिहिलेल्या प्रस्तावनेत म्हटले आहे, "क्रांतिगीतांना विशेष भाव असणाऱ्या या युगात श्री. कुलकर्णी यांनी विरहगीत प्रसिद्ध करावे, ही गोष्ट जरा धाष्ट्याचीच आहे, यात शंका नाही. वरवर चाळून 'प्रेमगीत आहे' असे म्हणून हे काव्य बाजूला ठेवणाऱ्यांची वंचनाच होईल. थोडा धीर धरून त्यांनी ते वाचावयास प्रारंभ करावा. - बाकीचे काम काव्यच करील." तत्कालीन काव्याच्या पार्श्वभूमीवर जोगांनी वि. म. कुलकर्णी यांच्या 'विसर्जन'या काव्यसंग्रहावर व्यक्त केलेली प्रतिक्रिया नक्कीच उचित आहे.

वि. शं. चौघुले

**विज्ञान-प्रणीत समाजरचना : सहस्त्रबुद्धे, पुरुषोत्तम, गणेश. प्रकाशन : मॉडर्न बुक डेपो, पुणे, १९३६.** डॉ. पुरुषोत्तम गणेश सहस्त्रबुद्धे, विचारवंत, निबंधकार आणि मराठी भाषा-साहित्याचे व्यासंगी प्राध्यापक या नात्याने प्रसिद्ध होते. मराठी साहित्यातील मुंबई विद्यापीठाची पहिली पीएच.डी. पदवी त्यांनी प्राप्त केली होती. मराठी भाषा-साहित्य यांच्या व्यासंगाबरोबर त्यांनी समाजशास्त्र, इतिहास, राजकारण, तत्वज्ञान, मानसशास्त्र, धर्मशास्त्र आणि विज्ञान या विषयांचाही

व्यासंग केला होता. प्रस्तुत ग्रंथ प्रबंध स्वरूपाचा असून त्याच्या व्यासंगी वृत्तीचे संपूर्ण फलित या ग्रंथात जागोजागी दृष्टोत्पत्तीस येते.

"अर्वाचीन शास्त्रीय ज्ञानावर आधारीत गृहसंस्था, विवाहसंस्था इत्यादि सामाजिक संस्थांची पुनर्घटना झाली पाहिजे तसेच तत्त्वज्ञान, नीती आणि आचार यांना भौतिकशास्त्राचे अधिष्ठान पाहिजे" हा या ग्रंथात मांडलेला विचार आहे. या विचाराच्या पुष्ठ्यर्थ अनेक पाश्चात्त ग्रंथकाराची मते नमूद केली आहेत. एकूण दहा प्रकरणे या ग्रंथात असून रक्तसंकर व वृत्तिसंकर विवाह संस्थेचे भवितव्य, गृहसंस्थेचे नवे स्वरूप ही महत्त्वाची प्रकरणे आहेत.

स्मृतिकार आणि धर्मशास्त्रकार यांनी निर्माण केलेल्या नियमावर हिंदू समाजरचना आजवर वाटचाल करीत आली आहे. गाय ही उपयुक्त पशू, आकाशस्थ ग्रहांचा मानवी कर्तृत्वाशी संबंध, ग्रहण, संध्योपासना; भूकंप या विषयांची पारंपरिक हिंदूशास्त्रकारांची मते आधुनिक काळात निरुपयोगी आहेत. पूर्वेची दैवी संस्कृती आणि पश्चिमेची आसुरी संस्कृती हे वर्गीकरण अजाणतेपणाचे आहे. स्वत: लेखकाने अत्यंत प्रामाणिकपणे विज्ञाननिष्ठा स्वीकारल्याने ग्रंथांत वर नमूद केलेल्या हिंदू मतांचा प्रतिवाद ग्रंथामध्ये आहे. अनुभव, अवलोकन, प्रयोग यांवर आधारित विज्ञाननिष्ठ विवेकवादाला अनुसरलेली समाजरचना निर्माण झाली पाहिजे.

हिंदू स्मृतिकाराचे कालबाह्य ठरलेले समाजशास्त्र आधुनिक काळात उपयोगी नाही. तसेच स्मृतिकारांच्या नियमांना धरून समाजाचा विकास होणार नाही असे आग्रही प्रतिपादन या ग्रंथात असून स्मृतिकारांचेच नियम योग्य आहेत हे मत मांडणाऱ्या लेखकांच्या मतांचा प्रतिवादही केला आहे. आनुवंशशास्त्र, सुप्रजाशास्त्र,मानवशास्त्र,जीवशास्त्र,मानसशास्त्र,मनोविश्लेषणशास्त्र इत्यादि शास्त्रांच्या अभ्यासाने प्राप्त झालेल्या नव्या माहितीच्या आधारे जुनी चुकीची माहिती बदलून नवीन शास्त्राधारीत माहिती समाजात दिली पाहिजे. रक्त शुद्धी, वर्णसंकर इत्यादि कल्पना विराम पावल्या पाहिजेत. मिश्र विवाहाला मान्यता मिळाली पाहिजे. संकराने प्रजा नाकर्ती, दुर्गुणी निपजते हे मत अयोग्य असून संकर हा हितावह आहे आणि संकरातूनही प्रजा कर्तृत्ववान जन्मते हे मत लेखकाने आग्रहाने मांडले आहे. नवविचारप्रवर्तक असा हा ग्रंथ असून, भाबडे वैराग्य, अध्यात्म, दैववाद यांची जागा विज्ञाननिष्ठा, मानवी प्रयत्न, शास्त्रीय दृष्टिकोन आणि भौतिक विद्येची उपासना यांनी घेतली पाहिजे. हिंदू संस्कृतीने जोपासलेली वर्णव्यवस्था, जातिभेद, बालविवाह, विधवाविवाह स्त्रीच्या आचाराची मते इत्यादी मतावर टीका प्रस्तुत ग्रंथात आहे. समाजाच्या सर्व-प्रकारच्या उन्नतीसाठी मानवाच्या जीवनावर क्रांतिकारक परिणाम करणारे विज्ञान अनुसरून नवी 'विज्ञान-प्रणीत समाजरचना' उभी राहिली पाहिजे. विवाहसंस्थेचे भवितव्य या प्रकरणात स्त्री पुरुषांचे व्यक्तित्व, स्त्री पुरूषांतील अनन्य साधारण प्रेमाची भावना, प्रेमविवाह, सुप्रजेची निर्मिती या मतांची चर्चा केली आहे. १९३६ साली प्रसिद्ध झालेल्या या अत्यंत महत्त्वाच्या ग्रंथावर फारशी चर्चा झाल्याचे आढळून येत नाही.

**विज्ञानबोध : माटे, श्रीपाद महादेव. आनंद छापखाना, पुणे, १९३४. विज्ञानबोधाची प्रस्तावना, माटे, श्रीपाद महादेव मॉडर्न बुक डेपो, पुणे, १९४७.** श्रीपाद महादेव माटे, मराठी भाषेचे प्राध्यापक व श्रेष्ठ कथाकार यांनी 'विज्ञानबोध' या ग्रंथाला लिहिलेली दोनशे पानांची प्रस्तावना. या ग्रंथात एकूण तेरा लेख शास्त्रखंड या भागात प्रसिद्ध केले असून हे सर्व विज्ञान व शरीरविज्ञान या विषयांवर आहेत. नामवंत विद्वान आणि शास्त्र विषयाचे प्राध्यापक यांनी हे लेख लिहिलेले आहेत. 'चमत्कार' खंड या भागात विज्ञानाशी संबंधित मनोरंजक मजकुर संकलित केला आहे आणि 'चरित्र' खंड या भागात पौर्वात्य आणि पश्चिमात्य शास्त्रज्ञावर व्यक्तिचित्रात्मक लेखन संकलित केले आहे.

बुद्धिप्रामाण्य आणि वैचारिक स्वातंत्र्य स्वीकारून यंत्रयुग व शास्त्रयुग यांच्या स्वरूपाचे सूक्ष्म विश्लेषण करून समाजाचे या घटनाकडे कोणत्या दृष्टीने पाहिले पाहिजे याचे सखोल विवेचन प्रा. माटे यांनी या 'विज्ञानबोध' ग्रंथाच्या प्रस्तावनेत केले आहे. नवशिक्षितांनी आधिभौतिक शास्त्रांचा सखोल अभ्यास सुरू केला पाहिजे असे आग्रही प्रतिपादन प्रस्तावना-कारांनी केले आहे. उद्योगीपणा आणि शास्त्रीय बुद्धी या गुणांवर पाश्चात्त्यांनी आपली प्रगती केली असून भारतीय व्यक्तिंमध्ये नेमक्या या गुणांचा अभाव आहे, असे मत नमूद केले आहे. सर्वसामान्य तरुणांच्या मनात नवीन ज्ञान, नवीन दृष्टीकोन, वैज्ञानिक दृष्टीकोन या बद्दल जिज्ञासा जागृत व्हावी हाही प्रस्तावना लिहिण्यामागचा हेतू आहे. विज्ञानवादाचा उत्कृष्ट परिचय देणारी आणि अतिशय लालित्यपूर्ण भाषेत लिहिलेली ही प्रस्तावना हा एक आदर्श नमूना आहे. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांच्या 'विज्ञान-प्रणीत समाजरचना' या ग्रंथाप्रमाणेच प्रस्तावनेचे हे अत्यंत महत्त्वाचे पुस्तक दुर्लक्षित राहिले.

**वीरधवल : नाथमाधव. प्रकाशक : न. मा. पटवर्धन, वाई, १९१३.** द्वारकानाथ माधवराव पितळे ऊर्फ नाथमाधव हे विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील एक लोकप्रिय कादंबरीकार म्हणून ओळखले जातात. 'सायंकालची करमणूक', 'प्रेमवेडा', 'स्वराज्याचा श्रीगणेशा', 'स्वराज्याची स्थापना', 'स्वराज्यावरील संकट', इ. कादंबऱ्या प्रसिद्ध 'सावळ्या तांडेल', आणि 'वीरधवल'या कादंबऱ्या अधिक लोकप्रिय झाल्या. नाथमाधवांनी विशिष्ट हेतूने ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या पण त्यांची रचना 'रोमान्ससेस' च्या धर्तीवर झालेली दिसते. 'इतिहासा'शी इमान राखण्यापेक्षा कल्पिताचा वापर करून कादंबरी रंजक करावी असे त्यांना वाटत असावे.

'वीरधवल' ही कादंबरी रेनॉल्डसच्या 'केनेथ' या कादंबरीवर आधारलेली आहे. या कादंबरीत एक कल्पित ऐतिहासिक कथानक आले आहे. 'वीरधवल' हा या कादंबरीचा नायक आणि ललितप्रभा ही नायिका ही प्रमुख पात्रे आहेत. या शिवाय सत्याश्रय, चंडवर्मा, चंद्रसेन, रणराग, दुर्जातमणी, उन्मत्तमणी, हंसिका, विज्जल इ. अनेक दुय्यम पात्रे आहेत. या शिवाय कीर्तिवर्मा महाराजांचे पिशाच हे अद्‌भूत पात्र कादंबरीत सर्वकाळ संचार करते. या कादंबरीत अद्‌भुताचा आणि योगायोगाचा भरपूर वापर केला आहे. सर्वत्र अंधारी गुहा, भुयारे, वधस्तंभ, नायकाला कीर्तिवर्म्याचे पिशाच दिसणे ; तुरुंगात नायकाला कोठे काय चालले आहे याचे दृश्यरूपात दर्शन घडणे असे अद्‌भूत चमत्कार कादंबरीत आढळतात. अशी सामान्य वाचकाला आकर्षित करण्यासाठी रंजकतेची सर्व वैशिष्ट्ये या कादंबरीत आहेत. 'अद्‌भुताचा आणि योगायोगाचा विपुल प्रमाणात वापर केल्यामुळे नाथमाधवांच्या कादंबरीला अरबी भाषेतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टींचे स्वरूप येते.' हे भालचंद्र फडके यांचे मार्मिक विधान प्रस्तुत कादंबरीला लावता येते.

वि. दा. वासमकर

**वेगळं व्हायचंय मला : कोल्हटकर, बाळ. प्रकाशक : जोशी ब्रदर्स, पुणे १९६०.** एकत्र कुटुंबाला तडा जाण्याच्या अलीकडील काळात 'विभक्त की अविभक्त' ह्या सामाजिक जिव्हाळ्याच्या समस्येवरील नाटक.

एकत्र/विभक्त कुटुंब यांच्या पार्श्वभूमीवर जुन्या निष्ठा, जुनी मूल्ये यांचा गौरव घटकेबाज व कोलेबाज संवाद ही या कौटुंबिक नाटकाची वैशिष्ट्ये.

गो. वि. वैद्य

**वेड्याचं घर उन्हात : कानेटकर, वसंत. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई , पहिली आवृत्ती १९५७.** 'वेड्याच घर उन्हात' हे वसंत कानेटकरांचे कालक्रमाने पहिले नाटक होय. हे नाटक म्हणजे एक कलासक्त, संस्कारी, संपन्न अशा मनाची शोकांतिका आहे. दादांचे पात्र हे या नाटकातील मर्मस्थान आहे. त्यांचे प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष अस्तित्व हाच या नाटकाचा गाभा आहे.

या नाटकातील सर्व घटना चांदणी या तालुक्याच्या गावी इनामदारांच्या जुन्या मोडकळीस आलेल्या खानदानी वाड्याच्या दर्शनी दालनात घडलेल्या आहेत. हळव्या, संवेदनशील कलासक्त मानाचे दादासाहेब आपल्या वडिलांच्या गाण्याच्या आणि बाहेरख्यालीपणाच्या नादापायी उद्‌ध्वस्त झाले आहेत. आपल्या वडिलांच्या म्हणजे बडे भय्यांचे अनौरस मूल. दामोदर याला घरी घेऊन येतात. परंतु याच दामोदरला बासरी वाजवली म्हणून दादासाहेब गुरासारखे मारतात. त्यामुळे हा दामोदर घरातून पळून जातो. दामोदरच्या घरातून निघून जाण्याने दादासाहेब अपराधीपणाच्या प्रचंड ओझ्याखाली सतत वावरतात. आपल्या मारामुळे आपला लाडका दामू देशोधडीला लागला आहे, वेडाबागडा होऊन रस्त्यातून भीक मागत हिंडतो आहे. त्याला घरदार नाही, अंगावर घालायला धड कपडासुद्धा नाही. आणि असा हा लीन दीन झालेला दामू एक दिवस आपल्या आश्रयाला परत येणार आहे आणि मग आपण त्याच्यावर अपरंपार प्रेमाचा वर्षाव करून त्याला पुन्हा पोटाशी घेणार आहोत, असे त्यांचे दिवास्वप्न असते. परंतु, पंचवीस वर्षांपूर्वी घरातून पळून गेलेला दामू अचानक परत येतो. तो दादांच्या दिवास्वप्नातल्या दामूच्या उलट स्थितीत. ब्रह्मदेशात जाऊन खूप धनवान होऊन आलेला कुटुंबाच्या कल्याणासाठी पाण्यासारखा पैसा ओतायला तयार असलेला आणि रुबाबदार व्यक्तिमत्त्व प्राप्त केलेला. घरी येताच घराची त्याने कायापालट केली आहे. या घटनेचा परिणाम दादांच्या मनावर फारच विलक्षण झाला आहे. आणि अगदी अनपेक्षित अशा स्वरूपात दामू घरी आलेला पाहून त्यांच्या जीवनाच्या दिवास्वप्नाला तडा गेला आहे. हे कस शक्य आहे असा त्यांना प्रश्न पडतो. ज्या दामूला आपल्या पंखाखाली घेऊन त्याचे सांत्वन करावे असे दादांना वाटते त्या दामूच्या आश्रयाखालीच दादांना त्यावाड्यावर जिणे कंठावे लागत आहे आणि या साऱ्यांचा परिणाम तिसऱ्या अंकात दिसतो. घरात दामूचेच वर्चस्व असल्यामुळे दादांचा संताप होतो. त्यांच्या मनाचा तोल सुटू लागतो. जागृती आणि स्वप्न यांची सीमारेषा आता अगदी पुसट झालेली दिसते. आणि स्वप्नात एक करुणास्पद प्रकार आपल्याला पाहायला मिळतो. दादांच्या अंतर्मनात असलेला हळवेपणा, प्रेमळपणा, सौंदर्याची आसक्ती यांच्या जागी लाचारी दिसू लागते. आणि आपल्या दिवास्वप्नातील खुळ्या दामूशी ते एकरूप होऊन जातात.

नाटकातील कथानक जीजी, शकू, बापू, चंदू, पंत, रावजी ही अन्य पात्रे आहेत. डॉ. श्रीराम लागू यांनी दादासाहेब व दामोदर पंत व खुळ्या दामूची भूमिका प्रा. भालबा केळकर यांनी संस्मरणीय केल्या.

वि. दा. वासमकर

**वेणुसुधा : वामन पंडित.** इसवी सनाच्या १७व्या शतकातील नामवंत कवी वामन पंडित याने लिहिलेले 'वेणुसुधा' हे आख्यान भागवताच्या दशमस्कंध अध्याय २१ यावर आधारलेले आहे. श्रीकृष्णाच्या बासरीचा मधूर नाद ऐकून सर्व विश्व मोहित झाले. श्रीकृष्णाची भक्ती करणाऱ्या गोपी तर हा अमृतासारखा गोड नाद ऐकून हातातील कामे सोडून धावत आल्या. मुरलीच्या नादाने विकल झालेल्या गोपींची आणि त्यासह देवाधिकांची मनेही मोहित झाली. या काव्यातील श्रीकृष्ण आणि गोपी यांचे प्रेम केवळ शुद्ध भक्तिस्वरूप आहे. असे कवीचे प्रतिपादन आहे. भक्ती आणि शृंगार यांचे मिश्रण आणि अध्यात्मप्रवणता, शब्दचित्रे रंगविण्याचे कवीचे कौशल्य या गुणांमुळे 'वेणुसुधा' तील अनेक श्लोक लोकप्रिय झालेले आहेत.

**वेदोक्त धर्मप्रकाश : विष्णुबुवा ब्रह्मचारी. प्रकाशक : गणपत कृष्णाजी, मुंबई ,१८५९.** एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात महाराष्ट्रात वैदिक धर्माचा हिरिरीने प्रचार करणाऱ्या विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचा वेदोक्त धर्मप्रकाश हा त्या काळात गाजलेला ग्रंथ आहे. आयुष्याच्या पूर्वार्धात किरकोळ उद्योग आणि नोकरी करणाऱ्या विष्णु बुवांनी दत्ताचा साक्षात्कार झाल्यावर आपल्या संकीर्ण लेखनातून धर्म विषयक विचार समाजापुढे ठेवण्याचा प्रयत्न केला. सातशे पृष्ठांच्या प्रस्तुत ग्रंथातील लेखांचे तीन प्रमुख प्रकरणांत लेखकाने विभाजन केले आहे. त्याने सुरूवातीला स्वतःच्या चरित्राची रूपरेखा सांगितली आहे. ग्रंथाच्या शेवटी 'सुखदायक राज्यप्रकरणी निबंध' हे छोटे स्वतंत्र प्रकरण, श्रीमद्‌भागवताचे मराठीत संक्षिप्त भाषांतर आणि भावार्थसिंधू या उपकरणांत योग, पंचकोशात विवरण व भक्तिमार्गाचे स्वरूप यांचा समावेश केला आहे. आपल्या ग्रंथनिर्मितीमागे लेखकाची भूमिका आहे. इंग्रजी राजवटीत लोकांना धर्माबद्दल आस्था राहिलेली नाही; जुने ते सर्व कुचकामी ही विचारसरणी स्वीकारल्यामुळे धर्मामुळे मिळणारे मानसिक, शारीरिक स्वास्थ्य यापासून लोक वंचित झाले आहेत. अशा धार्मिक अवनतीच्या काळात समाजाला वैदिक धर्माचे महत्त्व पटवावे, हा विष्णुबुवांच्या लेखनामागील हेतू आहे. त्यासाठी लेखकाने मांडलेले विषय असे-श्रीगणेश माहात्म्य,मंत्रशास्त्र, न्यायनीतिपर पुराणोक्त गोष्टी, निराकार ईश्वर,सत्याचे स्वरूप, म्लेंछ मतांचे स्वरूप, सृष्टीचे नियम, मुलामुलींना उपदेश, आत्मज्ञानाचे रहस्य, हठयोग व राजयोग, अधार्मिकांना जिंकण्याचे वाद इत्यादी. दुराग्रही पंडितांच्या संकुचित वृत्तीमुळे वैदिक धर्माची हानी झाली. सुधारणावादी विचार मागे पडले. धर्माला पूर्ववैभव प्राप्त करून द्यायचे असेल तर औद्योगिक प्रगती, साक्षरता प्रसार, सामाजिक समता, सती व केशवपनाच्या चालीवर बंदी आणणे, पुनर्विवाहास अनुमती देणे या गोष्टींना महत्त्व द्यायला हवे, असे लेखकाने आग्रहपूर्वक सांगितले आहे. देवाचे वारे, भुतेखेते, करणी-जादूटोणा, मंत्र-तंत्रावर समाजाने विश्वास ठेवू नये, स्त्रियांना सन्मानाने वागवावे असा मोलाचा उपदेश लेखकाने केला आहे. 'वेदोक्त धर्मप्रकाश' ह्या मोठ्या ग्रंथात समाविष्ट केलेल्या सुखदायक राज्य प्रकरणी 'निबंध' ह्या छोटेखानी वैचारिक लेखात साम्यवादी शासन व्यवस्थेशी जुळणारे विचार विष्णूबुवांनी मांडले आहेत. " सर्व प्रजा एक कुटुंब व सर्व जमीन हाच एक बाग व त्यातून जें जें निघेल तें तें ' सर्वांचे एक. सर्वांचे उत्पन्न एकच व एकाचेच ताब्यात राहून त्यातून खावायास विपुल न्यावे. सर्व प्रकारचे कपडे, सोन्यारूप्याचे, मोती हिऱ्याचे अलंकार गावोगावच्या खजिन्यात ठेवावेत व ज्याला जो हवा असेल त्याने तो नेऊन वापरावा. सर्वांची लग्ने करणाच्या खात्याच्या मार्फतीने राजाने करावी. पुरुषाला व स्त्रीला जोडीदार नको असेल, दुसरे लग्न करावयाचे असल्यास, त्यांना तशी मुभा असावी. " सर्वांची मुलगे-मुली पाच वर्षांची झाली की त्यांना सर्व विद्या शिकवून ज्याला ज्या कामात जास्ती उद्योग करण्याची इच्छा असेल त्याला त्या कामाकडे लावून द्यावा. व स्त्री-पुरुष वृद्ध झाली म्हणजे त्यांच्याकडून कामधंदा न करविता त्यांनी स्वस्थ बसून खावे." विष्णुबुवा ब्रह्मचारींचे हे विचार आधुनिक साम्यवादी विचारांशी नाते जोडणारे आहेत. त्यांच्या मते या सुधारणा प्राचीन काळात आपल्या देशात होत्याच. मध्यंतरीच्या काळात त्या खंडित झाल्या. काहीही असो, विष्णुबुवांना भविष्यकाळातील सुधारणावादी विचारांची चाहूल आधीच लागली होती, असे म्हणता येते. 'वेदोक्त धर्मप्रकाश'मधील लेखकाची भाषा सहज साधी आणि वाचकांच्या अंतःकरणाला भिडणारी आहे. परकीय राजवटीच्या काळात आपल्या बौद्धिक परंपरेचे पुनरुज्जीवन व्हावे व समाजाने जुनाट परंपरांचा त्याग करून सुधारणावादी विचारांचा अंगीकार करावा, हा संदेश विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्या प्रांजलनि मर्मस्पर्शी लेखनातून मिळतो.

वि. शं. चौघुले

**वेल विस्तार : जोशी, महादेवशास्त्री. प्रकाशक : सागर साहित्य १९४१.** पंडित महादेवशास्त्री जोशी यांचा गोमंतकीय पार्श्वभूमीवरील कथांचा संग्रह. आशा आणि सिद्धी यातील तफावत आणि अपेक्षाभंगाचे दुःख हे या कथांचे प्रमुख सूत्र आहे. लक्ष्मणाची उपेक्षित पत्नी 'ऊर्मिला' सामाजिक बंधनांची बळी-विधवा-निर्मला (भावनांचा उन्माद),'चंडिका देवी ' बद्दलच्या अंधश्रद्धा आणि वस्तुस्थिती,'चपलाहार' मधील प्रेमाचा त्रिकोण, परागंदा पतीच्या आगमनानेही दुःखी राहणारी विमला (बिलवर) यातून सहनशील पण परंपराप्रिय माणसांचे सहानभूतीपूर्ण चित्रण येते.

लालित्यपूर्ण, संस्कृतप्रचुर भाषाशैलीत लिहिलेल्या या कथा आहेत. त्यांचे विषय कौटुंबिक जिव्हाळ्याचे आहेत.

दीपक घारे

**वैदिक संस्कृतीचा इतिहास : जोशी, लक्ष्मणशास्त्री. प्रकाशक : प्राज्ञ पाठशाळा, प्रकाशन, वाई, १९५१.** वैदिक संस्कृतीचा इतिहास ५००० वर्षांचा आहे. ह्या संस्कृतीच्या विकासात ज्या विशिष्ट प्रकारच्या प्रवृत्ती दृग्गोचर झाल्या त्या सर्वांचा संकलनात्मक व सारभूत परामर्श शास्त्रीबुवांनी सहा (प्रकरणांतून) घेतला आहे. यात वेदकालीन संस्कृती, वैदिकांची कुटुंब व्यवस्था, पुराणकालीन व रामायणकालीन संस्कृती, बौद्ध व जैन यांची विचारसरणी, त्यांचा उदय वा ऱ्हास यांचा विचार प्रामुख्याने येतो. आधुनिक काळात इतर संस्कृतींशी आलेला संबंध, ब्रिटिशांमुळे केलेला नव्या मूल्यांचा स्वीकार, ब्राह्मआर्य-सत्यशोधक समाजाचे कार्य, गांधीयुग इत्यादींचा विचार, अखेरच्या प्रकरणात केला आहे. भारतीय वैदिक संस्कृती विश्वव्याती संस्कृतीच्या समन्वयात भागीदार होऊन त्या विशाल शक्तीचे पोषण निश्चित करू शकेल असे शास्त्रीबुवांनी सिद्ध केले आहे.

गं. वि. नेर्लेकर

**वैष्णव : शिरवाडकर, वि. वा. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, १९४२.** वि. वा. शिरवाडकर यांनी या कादंबरीत, १९४२च्या स्वातंत्र्यलढ्याच्या सुमारास, एका आडबाजूच्या खेड्यात शाळामास्तर असलेल्या विनायकराव या अत्यंत मवाळ, सज्जन आणि मनात कुठेतरी सदविचारांची, तेजस्वितेची कदर असणाऱ्या व्यक्तीची कहाणी लिहिली आहे. भोवतालच्या सद्गुणी व्यक्तींचे वर्तन आणि गांधीजींवरील अपार श्रद्धा, ह्यांमुळे ढोंग, लबाडी, वाईट प्रवृत्ती, ह्यांच्याशी सामना देण्याची हळूहळू नायकाच्या मनाची तयारी कशी होत गेली, आणि त्याचे परिवर्तन, स्वातंत्र्यलढ्यात भाग घेऊन हुतात्मा होण्यात कसे झाले याचे वर्णन यात आले आहे.

वसुंधरा बनहट्टी

**व्यक्ती आणि वल्ली : देशपांडे, पु. ल. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, १९५७.** समाजात सहजपणे भेटतील अशी सामान्य असूनही वेगळेपण असणारी अठरा वैशिष्टपूर्ण व्यक्तिचित्रे.

लग्नकार्यातील उपयुक्त पण उपेक्षित नारायण, भुतकाळात रमणारे हरितात्या, नैसर्गिक आयुष्याशी फारकत घेऊन पुस्तकातल्या कसरीसारखा जगणारा सखाराम गठणे, नाटक कंपनीतील हरकाम्या जनू, परोपकारी गंपू, ध्येयवादी चितळेमास्तर, फिल्मगुण उतरलेला नामू परीट आदी हरघडी भेटणारी, कधी वैताग तर कधी डोळ्यात अश्रु आणणारी ही जुन्या पिढीतील हळूहळू दिसेनाशी होणारी माणसे नेमकेपणे उभी राहिली आहेत. कारूण्याची एक छटा कायम ठेवणारी ही व्यक्तिचित्रे अविस्मरणीय झाली आहेत. मराठी साहित्यातील विनोद व व्यक्तिचित्रात महत्त्वपूर्ण भर घालणारे प्रभावी लेखन ह्या दृष्टीने लक्षणीय.

ऊर्मिला दळवी

**व्याधाची चांदणी : पाध्ये, प्रभाकर आत्माराम. प्रकाशक : कृ. ना. सापळे, मुंबई, १९४४.** मराठीतील एक सौंदर्य-मीमांसक आणि साहित्याचा कलावादी अंगाने विचार करणारे समीक्षक म्हणून प्रभाकर पाध्ये परिचित आहेत.' सौंदर्यानुभव', मर्ढेकरांची सौंदर्यमीमांसा या ग्रंथाचे लेखक पाध्ये यांनी ललित लेखनही केले आहे.

'व्याधाची चांदणी' हा प्रभाकर पाध्ये यांचा लघुकथांचा संग्रह ते कुशल ललित आहेत याची साक्ष पटवितो. प्रस्तुत कथासंग्रहात'उस्कटलेले घरटे','अल्पोपाहार', 'यात्रेची रात्र', 'अनुभूती ', 'दिलरूबा', 'व्याधाची चांदणी'; 'जगापलीकडचा जीव', ' स्मृतिपूजा', ' शेवटचा रुपाया' इ. बारा लघुकथा समाविष्ट आहेत.

संवेदनशील मनाच्या लेखकाला जीवनातील विविध घटनांमुळे जे पेचप्रसंग उभे राहतात त्यातून या कथांचा उगम झाला आहे असे मर्ढेकरांना वाटते.

प्रस्तुत कथासंग्रहाचे परीक्षण करताना बा. सी. मर्ढेकरांनी पुढील अभिप्राय व्यक्त केला आहे. " श्री पाध्ये यांचा हा कथासंग्रह म्हणजे कोवळ्या कल्पना आणि टपोर भावना यांचा एक आल्हाददायक बगिचा आहे ".

नवकथेच्या प्रारंभीच्या काळातील हा कथासंग्रह आहे. बा.सी.मर्ढेकरांच्या सारख्या सौंदर्यवादी समीक्षकाने परीक्षणासाठी प्रस्तुत कथासंग्रहाची निवड केली यात या कथासंग्रहाचे महत्त्व प्रकट होते.

वि. दा. वासमकर

**व्यायामकोश : संपादक : मुजुमदार, दत्तात्रेय चिंतामण. प्रकाशक : द. चिं. मुजुमदार, बडोदा १९३६ ते १९४९.** बडोद्याचे दत्तात्रेय चिंतामण मजुमदार यांनी १९३६ पासून १९४९ पर्यंतच्या काळात, दहा खंडात प्रसिद्ध केलेला (सचित्र) 'व्यायामकोश' हा एक वेगळ्या क्षेत्रातला कोश आहे. या कोशामध्ये व्यायामाचा इतिहास, अर्भकाचे व्यायाम, मुलांचे व मुलींचे देशी व विदेशी खेळ, देशी मर्दानी खेळ, विदेशी कसरती, विदेशी मेहनती, विदेशी शर्यती यांच्यावर अनेक लेखकांकडून लिहवून घेतलेले माहितीपर लेख आहेत.

सु. रा. चुनेकर

**व्यावहारिक ज्ञानकोश (सचित्र) : संपादक : भिडे, ग. रं. प्रकाशक : ग. रं. भिडे, कोल्हापूर, १९३५ ते १९४१.** श्री. ग. रं. भिडे यांनी " व्यावहारिक ज्ञानकोश " (सचित्र) १९३५ ते १९४१ या काळात पाच भागांत तयार करून प्रसिद्ध केला. " महाराष्ट्रीय ज्ञानकोश " हाच त्याचा बराचसा आधार होता. अर्वाचीन शास्त्रीय शोधांमुळे व्यापक झालेल्या सध्याच्या जीवनात उपयोगी पडणाऱ्या हर एक गोष्टीसंबंधीच्या व्यवहारोपयोगी ज्ञानाचा संग्रह यात आहे. भिडे यांची " बालकोश " रचण्याचीही योजना होती पण १९४२ मध्ये त्याचा एकच भाग प्रसिद्ध झाला. पुढे ही योजना खंडीत झाली.

स. रा. चुनेकर

**शककर्ते श्रीशिवछत्रपती महाराज ह्यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र : चिटणीस, मल्हार रामराव. संपादक : श्री. काशीनाथ नारायण. प्रकाशक : काशीनाथ नारायण साने, कल्याण, १९२४.** केवळ सात प्रकरणांत विभागून लिहिलेली पण व्यापक व विस्तृत अशी श्रीशिवछत्रपतींची चरित्रात्मक अशी शिवकालावरील अत्यंत महत्त्वाची अशी बखर. पूर्वज वर्णन-जन्मकथन, राज्य आक्रमण आणि सज्जनसेवन, अफजलवध-यवनयुद्धप्रसंग, राज्य-मर्यादा-स्थापना आणि पितृदर्शन, दिल्लीपतिपराभव, दक्षिणदिग्विजय राज्याभिषेक या सात प्रकरणांत ही बखर विभागलेली आहे. श्रीमहाराजांच्या जीवनाचे समग्र वर्णन करणारी ही बखर आहे. महाराजांचे बालपण, विद्याभ्यास, शास्त्रभ्यास, त्यांचा आज्ञाधारकपणा, मर्यादा, पितृप्रेम, श्रद्धा, कल्पनाचातुर्य इत्यादी गुणांचे वर्णन, यामध्ये

आढळते. त्यांच्या वैयक्तिक जीवनाचे समग्र वर्णन त्यांचा लोकसंग्रह, त्यानी सामान्य जनांत निर्माण केलेले क्षात्रतेज, त्यांची राजनीती, त्यांचा मुसद्दीपणा, पराक्रम, चातुर्य, औदार्य, त्यांची धर्मप्रवणता, भाविकता, भक्तिभाव आणि आत्मविश्वास या सर्वांचे तपशीलवार वर्णन भावी इतिहासकारांना प्रेरणा देणारे ठरले. त्यांच्या विविध मोहिमा, त्यांच्यावरील संकटे, आक्रमणे, त्यांची दिनचर्या या विषयांवरील माहितीही दिली आहे. रयतेची वर्तणूक, गड, तालुके, नामांकित सरदारांची नामावली, फौज, कोश, खजिना या विषयांवरील माहितीही बखरीत आहे. वर्षासने तोफखाना याचेही वर्णन आहे. जयसिंगाच्या स्वारीच्या निमित्ताने व दिल्ली-आग्रा भेटीप्रसंगी महाराजांच्या मनात आलेले विचार, भाव-भावना यांचे वर्णन अत्यंत उत्कटतेने केले आहे. राज्यव्यवस्थेचे आणि राज्याभिषेकाचे वर्णन अत्यंत तपशीलाने केले आहे. कर्मकांड, गोवध, धर्म, तीर्थक्षेत्रे यांना थोडेसे प्राधान्य देऊन लेखन केले आहे. वर्णनातील बारकावे, कल्पकशक्ति, काव्‍ात्मवर्णन ही या बखरीची लेखन वैशिष्ट्ये आहेत. भाषेवर संस्कृत, फारसी या भाषांचा प्रभाव असला तरी ही भाषा क्लिष्ट नाही. या बखरीत साधी पण, कारकुनी वळणाची भाषा आहे.

**शंख आणि शिंपले : गोरे, नारायण गणेश. प्रकाशक : कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे १९५७.** श्री. नारायण तथा नानासाहेब गणेश गोरे, हे महाराष्ट्रात समाजवादी पुढारी या नात्याने परिचित आहेत. उत्तम वक्ते, स्वातंत्र्यसैनिक आणि विचारवंत असाही त्यांचा लौकिक आहे. कथा, लघुनिबंध, वैचारिक निबंध लेखन याबरोबर पंडित जवाहरलाल नेहरुंच्या मूळ इंग्रजी आत्मचरित्राचा मराठीमध्ये त्यांनी केलेला अनुवाद प्रसिद्ध आहे.

प्रस्तुत पुस्तक हे त्यांच्या बालपणीच्या आठवणीवर आधारलेले असून यामध्ये एकूण सतरा लेख संग्रहित आहेत. श्री. गोरे राजकीय विचारवंत म्हणून प्रसिद्ध असले तरी त्यांचे मन हे साहित्यिकाचे मन आहे. भाषेचे लालित्य, स्वभाव रेखनाचे कौशल्य, सूक्ष्म अवलोकन आणि निसर्गाचे प्रत्ययकारी वर्णन यामुळे हे सर्व लेख अत्यंत वाचनीय आहेत. तीव्र स्मरणशक्ती आणि प्रत्येक घटनेचे, वस्तूचे बारकाईने केलेले सर्वांगीण वर्णन हा या पुस्तकाचा आणखी एक विशेष. लेखकाचे बालपण पुण्यास गेल्याने बहुतेक सर्व लेख पुणे वर्णनपर आहेत. पुण्यातील पेठा, वाडे याबरोबरच तत्कालीन समाजजीवनाचे वर्णनही प्रस्तुत ग्रंथात येते. त्या काळच्या समाजाच्या धार्मिक चालीरीती याही तपशीलाने लिहिल्या आहेत. हिंदु-मुसलमान दंगे आणि त्यावरील भाष्ये यांचेही वर्णन आहे. कोकण प्रवास आणि प्रवासातील निसर्गाचे वर्णन तपशिलवार आहे. अत्यंत लालित्यपूर्ण भाषेत केलेले हे लेखन आत्मपर असले तरी त्या त्या प्रसंगाच्या अनुरोधाने केलेले भाष्य हे या पुस्तकाचे वैशिष्ट्य होय.

**शततारका : कांत, वा. रा. प्रकाशक : ध्रुव प्रकाशन, हैदराबाद, १९५०.** कवी श्री. वा. रा. कांत यांचे नऊ कवितासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. त्यांनी काही महत्त्वाच्या ग्रंथाचे अनुवाद केले असून, काही समीक्षा लेखही प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचे सुरुवातीचे वास्तव्य निझामशाहीत झाल्याने उर्दू व फारसी या भाषा त्यांना अवगत होत्या. या भाषांचा त्यांच्या काव्यावरही परिणाम झाला आहे. श्री. कांतांना क्रांतीदर्शी कवी म्हणूनही मान्यता आहे. प्रस्तुत 'शततारका'हा संग्रह रुबायांचा आहे. रुबाया हा फारशी काव्यप्रकार. मराठी कवीतेमध्ये या प्रकाराचे लेखन श्री. कांत यांचेच आहे. उमरखय्यामच्या रुबायांचा माधव जूलियन अनुवादीत ' द्राक्षकन्या ' हा संग्रह प्रसिद्ध आहे. पण हा अनुवादित संग्रह आहे. स्वतंत्र निर्मिती नव्हे. रुबायांना, तराना, कणिका, मुक्तक असेही संबोधिले जाते. एकशे एक रुबायांचा हा संग्रह असून केवळ प्रेमभावना व्यक्त करणारा हा काव्यप्रकार असूनही श्री कांतांनी या काव्यप्रकारात निसर्ग, क्रांतिप्रवण काव्य, ईश्वरविषयक कल्पना, प्रादेशिक कविता इत्यादींचा अंतर्भाव केला आहे. केवळ चार ओळीत समग्र भाव व्यक्त करण्याचे कवीचे सामर्थ्य अजोड आहे. अत्यंत वेगळा असा 'रुबाई'हा काव्यप्रकार बापरून अत्यंत समर्थपणे, स्वतंत्रपणे केलेली काव्यनिर्मिती म्हणून या काव्यसंग्रहास महत्त्व प्राप्त झाले आहे.

**शापित महाराष्ट्र : एकबोटे, कृ. अ. (सहकार कृष्ण), प्रकाशक : तात्या नेमिनाथ पांगळ, १९१६.** सहकारी कृष्ण यांना आधीच्या ऐतिहासिक कादंबऱ्या अपुऱ्या वाटल्यामुळे तसेच नवीन साधने उपलब्ध झाल्यामुळे ते या ऐतिहासिक कादंबरीच्या लेखनास प्रवृत्त झाले. संभाजी महाराजांचा वध, राजाराम महाराजांचा जिंजीवास, त्यांचे परत महाराष्ट्रात येणे या घटनांवर प्रस्तुत कादंबरीचे कथानक आधारीत आहे. ऐतिहासिक व काल्पनिक पात्रे तसेच प्रसंगांची निर्मिती या कादंबरीत आढळतात. तत्कालीन रंजनपर ऐतिहासिक कादंबरीसारखेच या कादंबरीचे रूप आहे.

वि. शं. चौघुले

**शालिवाहन चरित्र : दात्ये, रघुनाथशास्त्री. प्रकाशक : अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, १८४०.** या चरित्रपट बखरीचे हस्तलिखित पैठण येथे मिळाले, असे लेखकाने म्हटले आहे. शालिवाहनांचा काळ इ. स. पूर्व पहिल्या शतकापासून इ. स. च्या तिसऱ्या शतकापर्यंत होता. या बखरीत शालिवाहनाचा जन्म, त्याच्या बालपणाची परिस्थिती आणि त्यानंतर त्याचा झालेला उत्कर्ष यांचा उल्लेख केलेला आहे. शालिवाहनाचे विक्रमाशी झालेले युद्ध व नंतर त्यांचा तह होऊन नर्मदेच्या उत्तरेकडे विक्रमाचे आणि नर्मदेच्या दक्षिणेकडे शालिवाहनाचे राज्य असे उभयपक्षी मान्य झाल्याचे यात वर्णिले आहे. शालिवाहनाचा शक नर्मदेच्याखाली चालतो आणि विक्रमाचा शक नर्मदेच्या पलीकडे चालतो, असेही या बखरीत म्हटले आहे. शेषापासून गर्भ राहिल्यावेळी शालिवाहनाच्या आईचे वय साडेचार वर्षांचे होते, तसेच शालिवाहनाने मातीच्या बाहुल्यांतून पराक्रमी सैन्य उभे केले आणि विक्रमाशी युद्ध करून जय मिळविला, यांसारख्या काही प्रसंगाचा उल्लेख बखरीत आहे.

अशा अद्‌भूत घटना आणि चमत्कारांची वर्णने वगळली तर उरलेला भाग इतिहासाशी मेळ घालता येण्यासारखा आहे, असे म्हणता येईल. १८४० मध्ये लिहिलेल्या या बखरीचा विषय अत्यंत जुना आहे.

स. मा. गर्गे

**शास्त्रीय मराठी व्याकरण : दामले, मोरो केशव. संपादक : कृ. श्री. अर्जुनवाडकर. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, १९७०.** मोरो केशव दामले यांच्या इ. स. १९११ साली प्रसिद्ध झालेल्या 'शास्त्रीय मराठी व्याकरणा'ची डॉ. कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर यांनी साक्षेपाने संपादित केलेली ही मुद्रावृत्ती होय.

दादोबा पांडुरंग तर्खडकर यांच्या 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' ज्या परंपरेतील आहे त्याच संप्रदायात मोडणारे हे दामल्यांचे 'शास्त्रीय मराठी व्याकरण' असून आशय व आकार या दोन्ही दृष्टीने ते एकमेवाद्वितीय आहे. संपूर्ण मराठी व्याकरणाची शास्त्रीय पद्धतीने मांडणी करून लेखकाने या शास्त्रातील बहुतेक सर्व मुद्द्यांची चिकित्सा केली आहे.

दामल्यांचे व्याकरण पहिल्या आवृत्तीप्रमाणेच छापताना अर्जुनवाडकरांनी त्याला ' मोरो केशव दामले : व्यक्ती वाङ्मय ' हा माहितीपूर्ण उपन्यास, संपादकीय टिपणे, सविस्तर विषयानुक्रम आणि विषयकृती, विषयसूची यांची जोड दिली आहे. इंग्रजी व्याकरणाच्या किंवा संस्कृत व्याकरणाच्या अशा कोणत्याही बेड्यांत न अडकता मराठी व्याकरणाची स्वतंत्रपणे नव्याने मांडणी व्हायला हवी असा निव्वळ शास्त्रीय दृष्टिकोन असणाऱ्या डॉ. अर्जुनवाडकरांचे हे महत्त्वाचे संपादन होय.

वि. बा. प्रभुदेसाई

**शितू : दांडेकर, गोपाळ निळकंठ. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९५३.** श्री. गोपाळ नीळकंठ दांडेकर, एक नामवंत साहित्यिक. २२ कादंबऱ्या, पाच प्रवासवर्णनपर एक चरित्र, एक आत्मचरित्र, पाच संगीतिका, चार धार्मिक/पौराणिक ग्रंथ, दोन कादंबऱ्यांची नाट्यरूपांतरणे, दोन चित्रपट पटकथा इतके विपुल साहित्य त्यांनी लिहिले आहे.

श्री. दांडेकर हे प्रादेशिक कादंबरीकार म्हणून ओळखले जातात. कोकण, मावळ आणि विदर्भ या महाराष्ट्रातील प्रमुख प्रदेशांवर त्यांचे कादंबरी लेखन आहे. 'शितू' कोकण प्रदेशावरील एक महत्त्वाची प्रादेशिक कादंबरी. 'शितू' ही त्यांची तिसरी कादंबरी. प्रथमतः ही कादंबरी क्रमशः सत्यकथा मासिकात छापून आली आणि या कादंबरीने श्री. दांडेकरांना प्रसिद्धी मिळवून दिली. त्या त्या परिसराची भाषा, परिसर बोली भाषेतील संवाद ही त्यांच्या लेखनातील वैशिष्ट्ये. ही कादंबरी म्हणजे एक प्रेमकाव्य आहे. अप्पा खोत वेळंशी गावचे सत्प्रवृत्त खोत. सर्वांच्या उपयोगी पडणारे म्हणून गावात त्यांना मान असतो. यांना दोन मुलगे एक सदू थोरला, धाकटा विसू. खोतांच्या पत्नी भागिरथीबाईंचे दुसऱ्या पुत्राच्या जन्मानंतर निधन होते. खोत विसूला आईच्या मायेने सांभाळतात. विसू हा हूड मुलगा त्याच्या हूडपणाचा गावकऱ्यांना व खोतांना सतत त्रास होत असतो. शितू भिमा कुळवाड्याची लेक वयाच्या सातव्या वर्षी विधवा होते. दुसरा पतीही खाडीत बुडून मरतो. बाप या घटनेनंतर मुलीला विहिरीत ढकलून देणार असतो. परंतु अप्पा खोत तिचा सांभाळ करतात. विसूच्या वर्तणुकीमुळे अप्पा त्याला महाडला मामाकडे शिक्षणासाठी पाठवतात. विसू उत्तमतऱ्हेने शिक्षण पूर्ण करून मॅट्रीक पास होतो. खेळातही तो बक्षिसे मिळवतो. विसूला महाडला पाठविण्याचा निर्णय अप्पानी घेतला असला तरी ते त्याच्या अनुपस्थितीने मनाने खचतात. या काळात त्यांचा सर्वतोपरी सांभाळ शितू करते. गंगा आल्याचे वर्तमान कळते, गंगेची खोत या नात्याने अप्पांच्याकडून पूजा होते. या काळात नाटके, कीर्तन, भजनी मंडळांची भजने इत्यादी कार्यक्रम सुरू होतात. या उत्सवासाठी अप्पा विसूला बोलावून घेतात. विसू येतो परंतु, या उत्सवातच अप्पांचे सर्पदंशाने निधन होते. विसू वेडापिसा होतो. अप्पांच्या निधनाचा धक्का त्याच्या जिव्हारी बसतो. थोरला व्यवहारी भाऊ सदू अप्पांच्या चौदाव्या दिवशीच वाटण्या करतो. नव्या घरात सदू आणि अप्पांच्या आठवणी मनात असल्याने जुन्या घरात विसू राहू लागतात. कुळवाडी भाग्या व शितू विसूबरोबर राहतात. कुळवाड्याची विधवा मुलगी ब्राह्मण विसू यांचे एकत्र रहाणे गावकऱ्यांना पसंद नसते. विसू गावाच्या विरुद्ध शितूला आपल्या जवळ ठेवतो व लग्नाची शितूला मागणी घालतो. शितूला हा प्रस्ताव मान्य नसतो. दोन पतींचे निधन, बाप परागंदा, सांभाळ करणाऱ्या अप्पाचे निधन या घटनापायी ती स्वतःला कमनशिबी समजत असते. विसूला सोडून ती आपल्या आत्याकडे जाते. विसू तिच्यापायी वेडा होतो. विसूचे मित्रमंडळ एका रात्री विसूसाठी बदचालीच्या बाईला आणतात. भागू कुळवाड्याला अप्पासारखा थोर माणसाचे घर नासवण्याचे उद्योग पसंद पडत नाहीत. तो शितूला बोलावण्यासाठी निघतो. शितू/भागू नाव न मिळाल्यामुळे खाडीतून पोहत येण्यासाठी निघतात. परंतु दोन-तीन दिवस उपाशी असलेली शितू खाडी पोहून किनाऱ्याला येऊ शकत नाही आणि तिचा मृत्यू होतो. भागू विसूला शितूच्या मृत्यूची बातमी देतो. मनाने सैरभैर झालेला विसू समुद्रात आत्महत्या करणाचा प्रयत्न करतो. नागांची वारुळे खोदून नाग उसवून घेऊन आत्महत्या करण्याचा प्रयत्न करतो. पण हे साधत नाही.

श्री. दांडेकरांच्या ' पडघवली ' या कादंबरीप्रमाणेच ' शितू ' ही कोकण प्रदेशावरील महत्त्वाची कादंबरी.

**शिरवा : शांताराम. प्रकाशक : मौज प्रकाशन, मुंबई १९५७.** 'शिरवा' हा 'शांतारामा'चा तिसरा कथासंग्रह. ऐन पंचविशीत प्रसिद्ध झालेल्या 'संत्र्यांचा बाग' आणि ' मनमोर 'या संग्रहात कथा लेखनामागील नवखेपणाच्या खुणा जाणवत होत्या. 'शिरवा' संग्रहातील कथा 'शांतारामा'च्या कथा लेखन विकासाच्या विशिष्ट टप्प्यावरील लक्षणीय कथा आहेत. 'शांतारामा'ना कथानुभवातील घटनाप्रधानता, ढोबळ वस्तुनिष्ठा आणि सांकेतिक पात्र चित्रणापेक्षा पात्रांच्या मनाचा

तळ गाठण्यात अधिक रस आहे. म्हणून 'शिरवा', 'खार', 'जुळवणी' या कथांमध्ये त्यांनी पात्रांच्या मनोवस्था चित्रणाला प्राधान्य दिले आहे. 'शिरवा' ही नायकाची तरल भाववृत्ती प्रकट करणारी कथा आहे. तिला रूढ, साचेबंद असे कथानक नाही. कामात गढून गेलेल्या कामाचा उबग आलेल्या रामचंद्ररावांची उद्विग्न मनःस्थिती थंडगार वाऱ्याच्या झुळकीने पावसाच्या शिडकाव्याने बदलते. ते हर्षनिर्भर होतात. 'खार' या कथेत चपळ खार आणि निवेदक यांच्यातील गंमतीदार संवाद आहे. 'खार'हा केवळ एक प्राणी म्हणून कथेत उरत नाही. खारीच्या प्रतीकातून लेखकाच्या सर्जनशील प्रतिभेतील तरलता, गतिमानता, स्फूर्ती, भासमयता ही अंगे लेखकाला सूचित करायची आहेत. एका कोवळ्या काळविटाच्या भावविश्वाची उकल 'शांतारामा'नी 'शिंग' या कथेत केली आहे. भावोत्कटता व काव्यमयता यांचा सुरेख मिलाफ या कथेत झाला आहे. तारुण्यात शिंगे फुटलेला काळविट उत्साहाच्या भरात स्वसामर्थ्यांच्या जोरावर आपल्याच मस्तीत हिंडत असतो. ज्या शिंगांनी त्याला स्वतःच्या सामर्थ्याची जाणीव करून दिली. स्वतंत्र जीवन जगण्याची प्रेरणा दिली ती शिंगेच त्याला मृत्यूचे आमंत्रण देण्यास कारणीभूत ठरली, हा दैवदुर्विलास सांबराच्या रूपाने दाखवून लेखकाने जीवनातील विदारक सत्यावर प्रकाश टाकला आहे. नुकत्याच उमलू लागलेल्या सौंदर्याचा व सामर्थ्याचा मुळातच उच्छेद होण्यात सूचित झालेली ही कथेतील दैवगती अर्थपूर्ण ठरते. 'धूळ'या कथेत छत्तीसगडी स्त्रीच्या जीवनाची परवड 'शांतारामा'नी शब्दांकित केली आहे. विपरीत परिस्थितीत वेश्याव्यवसाय करण्यासाठी प्रवृत्त झालेल्या एका स्त्रीच्या प्रामाणिकपणाचे व मूल्यनिष्ठेचे दर्शन लेखकाने या कथेत घडविले आहे. आधी उल्लेख केलेल्या कथांप्रमाणेच 'श्वान लागे पाठी','अनर्थ','वळण','प्रत्यय' ह्या कथांही पात्रांची विशिष्ट भावस्थिती व्यक्त करणाऱ्या कथा आहेत. सारांश 'शिरवा' या संग्रहातील शांतारामांच्या कथानी आशय-आविष्कारदृष्ट्या वरची श्रेणी गाठली आहे.

वि. शं. चौघुले

**शिवछत्रपतींचे चरित्र ऊर्फ कृष्णाजी अनंत सभासद यांची बखर, कृष्णाजी अनंत सभासद, प्रथम प्रसिद्धी 'काव्येतिहास संग्रह', संपादक : काशीनाथ नारायण साने, इ. स. १८८१. कृष्णाजी अनंत सभासदाची बखर कथित छत्रपती श्रीशिवाजी व प्रभूंचे चरित्र, संपादक : विनायक सदाशिव वाकसकर, व्हीनस प्रकाशन पुणे, १९५७.** बखरकार कृष्णाजी अनंत सभासद मूळ आडनाव हिरेपारखी हे साताऱ्याजवळील वसंतगडचे. त्यांनी ही बखर १६९७ साली लिहिली. या बखरीचे संपादक श्री. का. ना. साने यांनी 'काव्येतिहास संग्रह' या मासिकाचे संपादन केले व या मासिकातूनच त्यांनी प्रसिद्ध बखरी प्रथम प्रसिद्ध केल्या. श्री. साने इतिहास संशोधक म्हणून प्रसिद्ध होते. ही बखर महाराजांच्या समकालीनाने लिहिलेले आद्यचरित्र म्हणून प्रसिद्ध आहे. बखरलेखनाचा ही बखर म्हणजे आदर्श नमूना समजला जातो. शिवकालातील पहिली बखर आणि छत्रपती शिवाजी महाराजांचे चरित्र हा बखरीचा विषय. महाराजांच्या पूर्वजां-विषयीची माहितीही प्रस्तुत चरित्रात आहे. महाराजांचे व्यक्ती-दर्शन पहिल्यांदा या बखरीने घडविले. महाराजांच्या जीवनातील ७१ प्रसंगांचे वर्णन बखरीत आहे. त्यातील काही प्रसंगांचे विस्तृत वर्णन आहे. यामध्ये अफजलखान वध, आग्रा भेट, राज्याभिषेक, शिवाजी-व्यंकोजी भेट इत्यादी. दिल्ली भेटीत महाराजांच्या समागमे गेलेल्या व्यक्तिंची नावेसुद्धा नमूद आहेत. कारकून, हुजरे यांचेही बर्णन आढळते. आदर्श राजा, प्रशासन, सेनानी तसेच पुत्र, बंधू, पिता या नात्यानेही महाराजांचे वर्तन कसे होते याचे तपशीलवार वर्णन प्रस्तुत बखरीत येते. गडावरील नेमणुका, रयतेची सुधारणा, जहागीर व पगार, खजिना सुभेदार, सरदार आणि गड या संबंधीच्या घटनांचे सविस्तर वर्णन या बखरीत येते. अनुकूल वातावरण निर्मिती, संस्कृत फारसी मिश्रित ओघवती भाषा यामुळे पुढील बखर वाङ्मयाला मार्गदर्शक म्हणून या बखरीचा उल्लेख केला जातो. या बखरीचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे काही घटनांच्या जमाखर्चाचा तपशीलही आहे. अठरा कारखाने, खजिना, जवाहिरखाना इत्यादी तसेच बारा महाल-पागा, कोषागार, गोशाला इत्यादींची माहिती प्रस्तुत बखरीत आहे. प्रसंगाचे वर्णन, व्यक्तिदर्शन, वस्तुवर्णन, घटनांची मांडणी, चरित्राची साधी लेखनशैली यामुळे ही बखर बखरवाङ्मयांत प्रसिद्ध आहे.

**शिवपावित्र्य नाटक : कोल्हटकर, श्रीपाद कृष्ण. प्रकाशक : अनंत आत्माराम मोरमकर, मुंबई, १९२४.** रंगभूमीवर प्रयोग झालेले श्रीपाद कृष्णांचे हे अखेरचे नाटक. स्त्रियांबद्दल शिवाजीमहाराजांची वागणूक अत्यंत आदर्श होती हे दाखविण्यासाठी नाटक लिहिले आहे. कल्याणच्या सुभेदाराच्या सुनेला शिवाजीराजांनी दिलेली आदराची वागणूक आणि शिवाजीराजांना नीतिभ्रष्ट करण्यात सुप्याच्या शंभू मोहित्याला आलेले अपयश या प्रस्तुत नाटकातील प्रमुख घटना होत. संथ कथानक, पाल्हाळीक रचना, परिणामशुन्य पात्ररेखाटणे, सामान्य भाषा, असंबद्ध संवाद या दोषांमुळे या नाटकाला फारसे यश लाभले नाही. कोल्हटकरी प्रतिभेचा पूर्ण लोप दर्शविणारे नाटक म्हणून वेगळ्या अर्थाने महत्त्वाचे वाटते.

वसंत नरहर कुबेर

**शिवलीलामृत : श्रीधर.** शके १६४० मध्ये बारामती येथील शिवालयात लिहिलेला हा ग्रंथ. तात्त्विक दृष्टीने अद्वैत मानणारा, विविध देवदेवतांत भेद मानणाऱ्यांचा निषेध करणारा असा श्रीधरदेखील उत्तर आयुष्यात शिवलीलामृताची कथा लिहितो. फलश्रुतीत या ग्रंथाच्या श्रवण-पठणाने पापक्षालन, दीर्घायुष्य, आरोग्य, संपत्ती व संतती लाभेल अशी ग्वाही देतो.

यात कवीच्या पारंपरिक श्रद्धामूल्यावर पोसलेल्या व्यक्तीमत्त्वाचेच प्रतिबिंब उमटल्याचे अधिक जाणवते.

संतपरंपरेने निर्माण केलेले, जोपासलेले, भक्तीचे विशाल नि व्यापक तत्त्वज्ञान अंगीकारूनही पारंपरिक श्रद्धेचेही जतन करायचे, या द्वंद्वातून श्रीधरही मुक्त नाही, हे स्पष्ट होते. श्रीधरने या ग्रंथाला दैवतकथांचे, व्रतकथांचे रूप दिल्याने पारायण होणाऱ्या श्रीधराच्या ग्रंथात शिवलीलामृताचे मानाचे स्थान आहे.

कुमुद गोसावी

**शिवसंभव : खरे, वासुदेव वामनशास्त्री. प्रकाशक : आर्यभूषण, पुणे, १९२२.** वासुदेव वामनशास्त्री खरे लिखित या नाटकाचा प्रथम प्रयोग महाराष्ट्र नाटक मंडळीने शनिवार दिनांक २७ सप्टेंबर १९१९ रोजी पुण्यास किर्लोस्कर नाट्यगृहात केला.

शिवाजी महाराजांच्या जन्माआधीच्या, महाराष्ट्रातील राजकारणाचे यात वर्णन आले आहे. शहाजीराजे भोसले-वेरुळकर आणि लखुजी जाधवराव-सिंदखेडकर ह्यांच्यातील वैमनस्याचे, त्यांच्यातील सासरा-जावई या कौटुंबिक नात्याचे वर्णन आढळते. ऐतिहासिक संदर्भाचे आधारे उभ्या केलेल्या जिजाऊच्या व्यक्तिरेखेला विशेष महत्त्व दिले आहे. तिचे आदर्श राजमातेचे गुण प्रकर्षाने व्यक्त केले आहेत. नाटकाच्या शेवटी शिवाजीचा जन्म, जाधव-भोसल्यांचा सलोखा इत्यादी घटना घडून छत्रपतींचे नवीन मन्वंतर सुरू होऊन सौख्याचे साम्राज्य नांदेल अशी इच्छा व्यक्त केली आहे.

वसुंधरा बनहट्टी

**शिवाजी महाराजांची बखर : चित्रगुप्त (रघुनाथ यादव चित्रे), प्रकाशक : काशिनाथ नारायण साते, ज्ञानप्रकाश छापखाना, पुणे.** या बखरीचे लेखक रघुनाथ यादव चित्रे हे थोरल्या राजाराम महाराजांचे पुत्र, धाकटे संभाजी यांच्या कोल्हापूर दरबारी दीर्घकाल चिटणीस होते. 'चित्रगुप्त' हे आपल्या 'चित्रे'या आडनावाचे पौराणिक थाटात रूपांतर करून, टोपणनाव म्हणून त्यांनी स्वीकारलेले दिसते.

शिवाजी महाराजांच्या पराक्रमी जीवनातील घटनांचा हा इतिहास आहे. सभासदाच्या बखरीतील बरीच माहिती या बखरीत आलेली असली तरी तिचा लेखनकाल इ. स. १७६०-७० च्या सुमाराचा असल्यामुळे सभासदापेक्षा काही प्रकरणी अधिक माहिती या बखरीत आढळते.

धाकट्या संभाजीराजांच्या मृत्यूनंतर (इ.स. १७६०) रघुनाथ यादव चित्रे यांना चिटणीशी गेल्यामुळे बणवण भटकावे लागले व कालांतराने यशवंतराव शिंदे यांचा त्यांना आश्रय लाभला. त्यांच्या पदरी असतानाच चिकोडी येथे चित्रगुप्ताने ही बखर लिहिली.

स. मा. गर्गे

**शिशुपालवध : भास्करभट्ट.** महानुभाव सांप्रदायिकांना पूजनीय ठरणाऱ्या 'साती ग्रंथांपैकी', 'शिशुपालवध' (शके १२३४) व 'उद्धवगीता' (शके १२३५) ह्या ग्रंथांचे कर्तृत्व भास्करभट्टांचे आहे. यावरून पंथीय साहित्यातील त्यांचे महत्त्वाचे स्थान लक्षात येते. भास्करभट्टांच्या प्रतिभेचे सामर्थ्य दुहेरी स्वरूपाचे आहे. 'शिशुपालवध'या ग्रंथात त्यांची विदग्ध रसवृत्ती प्रकटते, तर 'उद्धवगीते'त तत्त्वदर्शी प्रज्ञा प्रकट होतांना दिसते. भास्करभट्टांच्या ग्रंथनिर्मितीचा झपाटा व त्यांच्या शीघ्रकवित्वासंबंधीची कथा लक्षात घेता, त्याच्या नावावर अनेक ग्रंथ असावेत, अशी अपेक्षा निर्माण होते.

सुहासिनी इर्लेकर

**शीळ : देशपांडे, ना. घ. (नागोराव घनश्याम) : मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९५४.** श्री. ना. घ. देशपांडे हे आधुनिक मराठी कवींमधील एक महत्त्वाचे कवी. पाच काव्यसंग्रह आणि एक आत्मपर लेखांचा संग्रह इतके त्यांचे साहित्य प्रसिद्ध झाले आहे. प्रस्तुत 'शीळ' या काव्यसंग्रहाच्या प्रकाशनापूर्वी त्यांच्या शीळ या कवितेची ध्वनिमुद्रिका प्रसिद्ध झाली. त्यांच्या कवितांच्या एकूण सोळा ध्वनिमुद्रिका प्रसिद्ध झाल्या. ते गीतकार म्हणून प्रसिद्ध आहेत.

'शीळ' या काव्यसंग्रहात एकूण ८२ कविता संग्रहित केल्या आहेत. श्री. देशपांडे यांच्या बहुसंख्य कविता या प्रेमकविता आहेत. त्यांच्या काव्यात प्रणयभावनेबरोबरच निसर्गही आहे. या कवितांमध्ये शीळ, कंचनी, तुम्ही, ये शेवटी तरी तू, ओसाडीत बसून, येशील का रे ?, मी आले लडिवाळ, राजसा आता, वाटते लाज रे !, हसेल रे जग, त्याला नाही कदर, कधी रे आता ?, पिसाट मन इत्यादी कवितांचा उल्लेख केला पाहिजे. संवादप्रधान प्रेमकाव्य हे श्री. देशपांडे यांच्या कवितेचे प्रधान वैशिष्ट्य. प्रस्तुत संग्रहात काही अध्यात्मविषक कवितांचाही समावेश आहे. अर्पण, माझी गाणी, इत्यादी. प्रेम-स्त्री-निसर्ग या त्रयींभोवती श्री. देशपांडे यांनी आपली कविता गुंफिली आहे. आत्मचिंतनपर कवितांमध्ये तळमळ, हे जीवन, ओढ इत्यादी कवितांचा उल्लेख केला पाहिजे. गीतकार या नात्याने श्री. देशपांडे यांना मराठी साहित्यात प्रमुख स्थान आहे.

**शुकचरित्र : अमृतराय : माधवराव चंद्रोबा यांचा छापखाना, मुंबई, १८६०.** मूळ श्रीमद्‌भागवतातील कथेवर आधारित अमृतरायकृत शुकचरित्र प्रदीर्घ असून ते एकूण १६ प्रसंगातून वर्णिले आहे. त्याला 'शुक-रंभा-संवाद ' असेही म्हटले जाते. शुकाच्या जन्माच्या आधीपासून प्रारंभ करून पुढे रंभेने केलेल्या त्याच्या तपोभंगापर्यंतचा कथाभाग कवीने अतिशय समरसून वर्णिला आहे. या काव्याचे स्वरूप प्रामुख्याने संवादात्मक असेच आहे. गर्भातून शुक बाहेर येत नाही म्हणून श्रीकृष्ण त्याच्याशी वाद करून मातेची सुटका करण्याची विनंती करतो, हा भाग कवीने चांगला वर्णिला आहे. शुकमुनींचा सात्त्विक संतापही अत्यंत स्वाभाविक वाटावा, असा वर्णिला आहे. गर्भातील यातना, इंद्राचा भित्रेपणा, रंभेचा गर्व, कृष्णाचे तत्त्वज्ञान, शुकाचे वैराग्यपर विचार यातून अमृतरायाच्या कल्पकतेची साक्ष पटते. शुकमुनीच्या व्यक्तिमत्त्वाचे, त्याच्या वैराग्यभावाचे आणि तत्त्वज्ञानाचे वर्णन कवीने अत्यादराने केले आहे. शृंगार व वैराग्य यांचा सुंदर समन्वय कवीने या रचनेत साधला आहे.

कुमुद गोसावी

**शुकाष्टकावर टीका** : एकनाथ. 'शुकाष्टक'नावाने प्रसिद्ध असलेल्या मूळ संस्कृत स्तोत्रावरील ही नाथांची टीका आहे. "निस्त्रैगुण्ये पथि केवचारता की विधिः की निषेधः" हे या स्तोत्रातील प्रधान सूत्र होय. शुकाचार्याविषयी आदरभाव व्यक्त करून ४४७ ओव्यांत नाथांनी यातील अध्यात्मज्ञान सर्वसामान्यांना सहजपणे समजेल अशा रसाळ भाषेत सांगितले आहे. विविध दृष्टांन्त देऊन नाथांनी आत्मा आणि पंचमहाभूतात्मक विश्व यांची एकरूपता प्रकट केली आहे. आत्मज्ञानाचे ज्ञाने झालेल्यांस पापपुण्य विधिनिषेध उर नाही हे या काव्याचे तात्पर्य आहे.

चन्द्रकांत धांडे

**शेजवलकरांचे लेख : पुस्तक पहिले : शेजवलकर, त्र्यंबक शंकर. प्रकाशक : ह. वि. मोटे, मुंबई, १९४०. शेजवलकरांचे लेख : पुस्तक २ रे : शेजवलकर, त्र्यंबक शंकर, प्रकाशक : ह. वि. मोटे, मुंबई, १९५९.** (त्र्यंबक शंकर शेजवलकर, निवडक लेखसंग्रह, संग्राहक, ह. वि. मोटे, प्रकाशक ह. वि. मोटे, मुंबई, १९७७.)

श्री. त्र्यंबक शंकर शेजवलकर, 'प्रगती' साप्ताहिकाचे संपादक, थोर इतिहासकार, इतिहास विषयाचे प्राध्यापक, मराठा इतिहासाचे साक्षेपी अभ्यासक, अनेक विषयांचा सखोल व्यासंग असे अनेक गुण धारण करणारे थोर विद्यासेवक. यांनी प्रगती साप्ताहिकात लिहिलेल्या लेखांचा हा संग्रह असून, दुसऱ्या पुस्तकांत त्यांनी वेळोवेळी लिहिलेले लेख, निरनिराळ्या पुस्तकांना लिहिलेल्या प्रस्तावना आणि मृत्यूलेख यांचा समावेश आहे. त्यांनी केलेले विविध प्रकारचे लेखन त्यांच्या व्यसंगाची साक्ष देते. पहिल्या पुस्तकाला लिहिलेली 'शय्येवरून'ही प्रस्तावना त्या काळी गाजली व या प्रस्तावनेवर त्या काळी बरेच उलट-सुलट लेख प्रसिद्ध झाले. त्यांनी लिहिलेली पुस्तक परीक्षणे ही पुस्तकांचे परीक्षण कसे करावे ? यांचे उत्तम नमुने आहेत. ग्रंथांच्या गुण दिग्दर्शनाबरोबर ग्रंथांचे दोष दिग्दर्शनही त्यांनी साक्षेपाने केले आहे. एकूण सतरा लेख आणि पाच परीक्षणे आणि इतर सहा लेख यांचा समावेश आहे. व्यक्तिचित्रणात्मक लेखामध्ये महत्त्वाचे लेख वि. का. राजवाडे, भांडारकर, न्यायमूर्ती तेलंग, महात्मा गांधी इत्यादी तत्कालीन थोर पुढाऱ्यांच्यावर आहेत. तसेच 'ओलेती' या मासिकातील चित्रावर, ताजमहाल या वास्तूवर आणि देवदास या चित्रपटावर लेखन आहे. पुस्तक परीक्षणांमध्ये 'माझे रामायण', 'सुशीलेचा देव', 'ब्राह्मणकन्या' इत्यादी ग्रंथांवर परीक्षणे आहेत. प्रस्तावनेमध्ये तत्कालीन समाजाच्या विचारसरणीवर, आचरणावर टीका असून समाजधुरीणांचे आचरण, विचार यासंबंधी चर्चा आहे. "समाजधुरीणांच्याकडे मूलग्राही ज्ञान नाही, देशभक्तांनी व समाजसेवकांनी समाज खाऊन टाकला आहे. समाजस्वास्थ्यास ओहोटी लागली आहे" असे विचार व्यक्त केले आहेत. १९५९ साली प्रसिद्ध झालेल्या शेजवलकरांच्या लेखांच्या दुसऱ्या पुस्तकात एकूण पंधरा लेखांचा समावेश असून यामध्ये सात लेख, तीन प्रस्तावना आणि पाच व्यक्तिचित्रणात्मक अशी विभागणी आहे. यांपैकी 'नानासाहेब पेशवे' या शीर्षकाखालील प्रस्तावना रियासतकार श्री. गो. स. सरदेसाई यांच्या 'नानासाहेब पेशवे' या ग्रंथासाठी लिहिली आहे. ग्रंथकर्त्याचे या ग्रंथातील सर्व दोष या प्रस्तावनेत नमूद केले असून आजही या प्रस्तावनेचे महत्त्व कमी झालेले नाही. सात लेखांपैकी एक लेख लोकहितवादींच्या 'शतपत्रे' ग्रंथाचे परीक्षण असून 'लोकहितवादींचे लोकोत्तर कार्य' या लेखात विशद केले आहे. उरलेल्या लेखांपैकी दोन लेख ऐतिहासिक विषयावर असून उरलेले राजकीय आणि सामाजिक विषयांवर आहेत. यांपैकी 'ब्राह्मण्याचा ऱ्हास' व 'महाराष्ट्राच्या मानगुटीचा समंध' हे दोन लेख अत्यंत महत्त्वाचे.

**शेतकऱ्याचा असूड : फुले, जोतीराव गोविंदराव. सदर ग्रंथ 'महात्मा फुले समग्र वाङ्मय' या ग्रंथात समाविष्ट ५ वी आवृत्ती १९९१, प्रकाशक : महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई. सदर ग्रंथ 'शेतकऱ्याचा असूड', 'महात्मा फुले समग्र वाङ्मय' या ग्रंथात पान क्रमांक २४५ ते ३३१ या पृष्ठ क्रमांकावर आहे.** 'महात्मा' ही पदवी सार्थ करणारे थोर विचारवंत, 'सत्यशोधक समाज' या संघटनेचे संस्थापक आणि 'सार्वजनिक सत्यधर्म', 'गुलामगिरी', 'शेतकऱ्याचा असूड' या ग्रंथाचे लेखक. प्रस्तुत 'शेतकऱ्याचा असूड' या ग्रंथात एकूण पाच प्रकरणे आहेत. पहिल्या प्रकरणांत भट ब्राह्मणांकडून शेतकऱ्यांचे शोषण कसे केले जाते याचे विवेचन आहे. दुसऱ्या प्रकरणांत सरकारी अधिकारी, इंग्रज अधिकारी यांचे शेतकऱ्यांच्या बरोबरच्या वर्तनाची माहिती येते. तिसऱ्या प्रकरणात शेतकऱ्यांकडून गोळा केला जात असलेल्या करांचे वर्णन असून सरकारी अधिकारी, कामगार पेन्शन उपभोगत सुखाची कालक्रमणा कशी करीत असतात याची माहिती आहे. चौथ्या प्रकरणाचे शीर्षक 'शेतकऱ्यासहित शेतकीची हल्लीची स्थिती' असे आहे. पाचवे प्रकरण शेतकऱ्यांसाठी, त्यांच्या उन्नतीसाठी सरकारने कोणते उपाय योजावेत यासंबंधी आहे. उपोद्घातात विद्या न शिकल्याने काय परिणाम होतात याचे दोन ओळीत विवेचन केले असून या ओळी खालीलप्रमाणे आहेत :—

"विद्येविना मति गेली, मतिविना नीति गेली,
नीतिविना गति गेली ! गतिविना वित्त गेले,
वित्ताविना शुद्र खचले, इतके अनर्थ एका अविद्येने केले"

(पुढील कालखंडात अनेकांनी या ओळी एखाद्या सुभाषिताप्रमाणे अनेक लेखांत वापरल्या).

जातिभेद, चातुर्वर्ण्य, ब्राह्मणवर्गाचे वर्चस्व या विरोधात सामाजिक सुधारणेच्या निमित्ताने आपले सर्व लेखन महात्मा फुले यांनी केले. अज्ञानी शेतकऱ्याला नाडणारे भट व ब्राह्मण जन्मापासून मृत्यूपर्यंत धर्माच्या नावाखाली त्याचे कसे शोषण करतात याचे विवेचन या ग्रंथात आहे. शूद्रातिशूद्रांवर,

शेतकऱ्यांवर विद्या शिकण्यास घातलेली बंदी आणि हिंदूंची संकुचित दृष्टी ही या अवनती व दुरावस्थेची कारणे आहेत. खोतांच्याकडून कुळांचे होत असलेले आर्थिक शोषण, सरकारी अधिकाऱ्यांकडून अन्यायाने केला जात असलेला साऱ्याचा वसूल याचेही विवेचन या ग्रंथात आहे. शेतकऱ्यांचे प्रश्न आणि त्यांचा आक्रोश समाजापुढे सर्वप्रथम महात्मा फुले यांनीच ठेवला आहे. गरीब शोषितांविषयीचा कळवळा त्यांच्या सर्वच लिखाणातून दिसून येतो. शेतकऱ्याची दारिद्र्यता, असहाय्यता आणि त्याचा ओढग्रस्त केविलवाण जीवनक्रम यांचे विवेचन करत असताना अज्ञान, आळस, सुखासीनता, धर्मभोळेपणा, व्यसने या दोषांचेही वर्णन त्यांनी केले. जातीय अन्याय, जात-रचना यांमुळे शेतकऱ्यांसारख्या समाजाची आर्थिक दुर्दशा कशी झाली यांचे समग्र वर्णन या ग्रंथात येते. कष्टकरी शेतकरी उपेक्षित कसा राहिला हा विषय प्राधान्याने या ग्रंथात विवेचिला आहे. या उपेक्षित समाजाचे सामान्यांचे हीन-दीन दर्शन घडवताना या समाजासाठी वेगळया योजना असल्या पाहिजेत, कालव्याचे पुरेसे पाणी उपलब्ध करून दिले पाहिजे आणि ‘ शेती विज्ञाननिष्ठ असावी’ असे महत्त्वाचे विचार मांडले आहेत. बुद्धिनिष्ठा, निरीक्षण, वक्तृत्व, चिंतनशीलता, संवादात्मकता, काव्यात्मकता या गुणांनी युक्त असा महात्मा फुले यांचा अत्यंत महत्त्वाचा असा हा ग्रंथ आहे. या ग्रंथाचा सर्वांत महत्त्वाचा विशेष म्हणजे हा ग्रंथ महात्मा फुले यांनी अनेक शेतकऱ्यांसमोर प्रसिद्धीपूर्वी वाचून दाखविला होता. तसेच बडोदा नरेश महाराजा सयाजीराव यांनाही हा ग्रंथ वाचून दाखविला होता.

**शेपटीचा शाप : परांजपे, सई. प्रकाशक : मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९६०.** राजकारण, गणित, संगीत, साहित्य, वैद्यक, ज्योतिष इ. क्षेत्रात आढळणाऱ्या उथळ प्रवृत्तींचे विडंबन करणारी नाटिका, राजकारणातील लुच्चेगिरी, भोंदुगिरी, संधिसाधू, स्वतःजवळ नसलेल्या विद्वतेचे प्रदर्शन, उच्च पदाधिकाऱ्यांचा मठ्ठपणा, प्रशासकांचा लहरी स्वभाव या पूर्वापार चालत आलेल्या गोष्टी नाटिकेत दिसून येतात. चक्रमादित्याची दरबारातील नवरत्ने ही अशा स्वभावांच्या लोकांचे प्रतिनिधी आहेत. अवगुणांबद्दल दुसऱ्याचे वाभाडे काढल्यास स्वतःच्या चारित्र्याचा पंचनामा होतो. यासाठी दुसऱ्याचे दोष काढण्याऐवजी आत्मावलोकन करून आत्मविकास साधावा हे अवघड तत्त्व लेखिकेने या नाटिकेत व्यंगचित्रांच्या माध्यमाने खेळकरपणे सफाईदारपणे कल्पना शक्तीद्वारे आपल्या खुमासदार शैलीत सूचित केले आहे. मुलांचे मनोरंजन व उद्‌बोधन करणारी प्रयोगक्षम नाटिका.

नीलिमा आंगले

**शेला : इंदिरा (इंदिरा नारायण संत), प्रकाशिका : सौ. सुधा रायकर,श्रीसरस्वती निवास, बोरिवली,१९५१.** प्रस्तुत काव्यसंग्रह हा इंदिराबाईंचा दुसरा काव्यसंग्रह. पहिला काव्यसंग्रह ‘ सहवास ’ उभयतांनी म्हणजे इंदिराबाई आणि ना. मा. संत यांनी लिहिलेल्या कवितांचा संग्रह. सदर संग्रह १९४० साली प्रसिद्ध झाला. त्यानंतर सुमारे दहा वर्षांनी ‘ शेला ’ हा संग्रह प्रसिद्ध झाला. या संग्रहात एकूण ६२ कविता संगृहित आहेत. या संग्रहातील ‘या हो सूर्यनारायणा’,‘चाहूल’, ‘बाळ होता रंगला’,‘ झंझावत ’,‘कोठे खोल तळांत’, ‘माझी प्रीति ’, ‘ शेला ’, ‘ कुठें ’,‘वाटे मला ’,‘ कधिं जीवनी वाटे ’,‘ सागरा ’,‘ धूसर विरल ’,‘ समर्पण ’,‘ चंद्रकोर ’ या विशेष उल्लेखनीय कविता. पहिल्या ‘ शेला ’ कवितेतील पहिल्या ओळी रचना सौंदर्याचा नमुना म्हणून उद्‌धृत केल्या पाहिजेत, ‘ निर्मल निर्भर वातावरणी धुकें तरंगे धूसर धूसर. झगमगते मग नक्षी त्यावर, सोनेरी किरणांची सुंदर ! ’. ‘ आईच्या मायेहूनी कोमल करांनी, गोंजारा बालकांना खेळती अंगणी ’ हे स्पर्शसंवेदनेचे अप्रतिम उदाहरण. पहिल्या संग्रहातील कविता सहवास अपेक्षा आणि स्फूर्ती यातून निर्माण झाली. तरी पुढील कविता, ‘ कोठे खोल तळांत पूर्वस्मृतीचे ज्वालामुखी जागृत ’ या विरह भावनेतून स्फुरली. मानवी मनातील सूक्ष्म भाव, औदासीन्य, वात्सल्य, वास्तवता आणि आत्मनिष्ठा व्यक्त करणारी भावकविता इंदिराबाईंनी लिहिली. त्यांच्या कित्येक कवितांमधून निसर्गाची सर्व प्रकारची रूपे वर्णिली आहेत. ‘ अंतरीच्या अंतरात, हृदयाच्या गाभाऱ्यात, जीवसख्याची नजर, तेवते शांत शांत ’,‘ निर्जीव या जीवनांत, असा येतो एक क्षण, बधीर हे माझे मन, पुन्हा घेई संजीवन ’ या ओळी इंदिराबाईंच्या रचनाकौशल्याची साक्ष देण्यास पुरेशा आहेत.

**शेवग्याच्या शेंगा : जोशी, यशवंत गोपाळ. प्रकाशक : यशवंत प्रकाशन, पुणे, १९५५.** श्री. यशवंत गोपाळ जोशी यांचे ‘पुनर्भेट’ या नावाचे कथांचे दहा भाग, अकरा निवडक कथासंग्रह, पाच कादंबऱ्या, पाच चित्रपट पटकथा, तीन नाटके, एक आत्मचरित्रपर ग्रंथ, एक ग्रंथ मुलाखतींचा आणि ‘सुबोध ज्ञानेश्वरी’ हा ग्रंथ इतके साहित्य आहे. श्री. जोशी हे मूलतः कथाकार या नात्याने मराठी वाचकास परिचित आहेत, विशेषतः मध्यमवर्गीय समाजाचे चित्रण त्यांच्या कथांत येते. ‘ शेवग्याच्या शेंगा ’ या छोट्या कथेचे पुढे पूर्ण लघुकादंबरीत आणि चित्रपट पटकथेत त्यांनी रूपांतरण केले. मध्यमवर्गीय समाज जीवनाचे, त्यातील व्यक्ती, नातेसंबंध त्यांच्या भाव-भावना यांच्या चित्रणाने तत्कालीन समाजाने ही कादंबरी व चित्रपट गौरविला होता.

कथेचा नायक अनंतराव तथा काका एका वाड्याचे मालक. वाड्यात विहिर आणि विहिरीजवळ शेवग्याचे झाड. मालकीण त्राग्याने आत्महत्या करते. या जोडप्याला तीन मुलगे आणि एक मुलगी, पत्नी निधनानंतर काका लग्न करीत नाहीत उलट एका गरीब वधुपित्यास त्यांच्या मुलीचे लग्न दुसऱ्याबरोबर करण्यासाठी आर्थिक मदत करतात. (सुशीला आणि विष्णुपंत हे जोडपे) मुलांची नावे श्रीनिवास, नारायण, अमृत आणि तारका. ही भावंडे सुशीलाबाईंना मावशी मानतात. यथावकाश

नायकाच्या मुलांची लग्ने होतात. घरात नव्याने आलेल्या लक्ष्मी /मनोरमा/कमल यांच्यात दुस्वास सुरू होतो. वाटण्यांची भाषा सुरू होते. काका तीर्थयात्रेहून परत येतात त्यांना घरातील वातावरणाची चाहूल लागते. ते मृत्यूपत्र तयार करून सुशीलाबाईंच्याकडे देतात. आणि त्यांचा मृत्यू होतो. कन्या तारका हिच्या विवाहासाठी त्यांनी आर्थिक योजना केलेली असतेच. यथावकाश बंधूवर्गात वाटप होते, दोन लहान बंधू घेर सोडून जातात आणि थोरले चिरंजीव मुख्य घरात राहू लागतात. बहीण त्यांच्याकडेच राहते, मात्र ' इतर दोन बंधूंच्या बरोबर कोणतेही संबंध ठेवावयाचे नाहीत ' अशी ताकीद थोरले बंधू धाकट्या बहिणीस देतात. ही अत्यंत अपमानास्पद अट तारकेला मान्य करावी लागते. एके दिवशी थोरल्या भावजईने नकार देऊनही तारका शेवग्याच्या शेंगा तोडते व मावशींना (सुशीलाबाई) नेऊन देण्यासाठी जाते. योगायोगाने तिथे तिचे भाऊ नारायण/अमृत येतात व त्याचवेळी थोरले बंधू श्रीनिवासराव ' शेंगा का तोडल्या ' याचा जाब बहिणीस विचारण्यासाठी येतात. तिथे सर्वांना ते एकत्र पाहतात. बहीण तारका थोरल्या बंधूना विनंती करते की, ' योगायोगाने येथे बंधूंची गाठ पडली आहे, पुन्हा यांची गाठ घेणार नाही, सबब तिला घराबाहेर काढू नये ' या भगिनीच्या विनवणीने श्रीनिवासरावाना आपण केलेल्या गंभीर चुकीची कल्पना येते या प्रसंगातून सर्व भावंडे एकत्रित येतात. सुशीलाबाईंना पुत्ररत्नाची प्राप्ती होते. त्यांच्या पोटी काकाच जन्माला आले आहेत अशी सर्व मंडळींची श्रद्धा बनते. कथानायक आपल्या मनातील खळबळ, विशेषतः पत्नी निधनानंतर, आपल्याशीच स्वगत करीत विहिरीजवळ शेवग्याच्या झाडाखाली व्यक्त करीत असतात त्यामुळे नायकाच्या भावविश्वांत या झाडाला महत्त्वाचे स्थान असते आणि इतर पात्रेही या झाडाबद्दल ममत्व बाळगून असतात. या कथेत हे झाडही एका पात्ररूपानेच वर्णिले गेले आहे.

**शोककारण आणि मराठी शोकांतिका : अळतेकर, म. मा. प्रकाशक : हिंदमाता प्रकाशन, मुंबई, १९५२.** ग्रंथाचा पूर्वार्ध तात्त्विक चर्चेचा असून उत्तरार्धात या तात्त्विक चर्चेच्या अनुरोधाने मराठीमधील शोकांतिकेचे आणि त्या लिहिणाऱ्यांचे गुणदोष-विशेषांचे परीक्षण केले आहे. प्रामुख्याने उपलब्ध उपपत्तींचा व माहितीचा सम्यक संग्रह करून क्वचित प्रसंगी मतभेद दर्शवून स्वतंत्र विचार मांडले आहेत. शोकांतिक नाटकाप्रमाणेच कथा आणि काव्याची गणना होत असली तरी येथे शोक रसप्रधान नाटकांचाच अभ्यास अभिप्रेत आहे.

चंद्रशेखर कपाळे

**शोनान/अस्मान/तुफान : फडके, ना. सी. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९५६.** नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी भारताच्या स्वातंत्र्यासाठी जपानच्या सहाय्याने भारताबाहेर दूर पूर्वेकडे जो सशस्त्र उठाव केला त्या चळवळीवर आधारित कादंबरीत्रय.

या सशस्त्र उठावात जपान्यांनी ब्रिटिशांचा पराभव केला. आणि सिंगापूर काबीज केले. त्याला 'शोनान' म्हणजे दख्खनचा दिवा-एशियाटिक लोकांच्या स्वातंत्र्याची ज्योत असे नाव दिले. भारतीय सैनिकांच्या मदतीने सशस्त्र सेनेची उभारणी केली आणि सुभाषचंद्र बोसांनी त्याला आझाद हिंद सेना हे नाव दिले. याच सर्व घटनांचे वर्णन 'शोनान' या कादंबरीत आढळते.

नेताजी सिंगापूरला येऊन दाखल झाल्यावर या चळवळीच्या दुसऱ्या पर्वाची सुरुवात होते. आझाद हिंद सैन्याची उभारणी व स्त्रियांचे झाशी राणी पथक सुसज्ज करून हाती घेतलेल्या प्रत्येक ठिकाणी विजय मिळवला आणि इंफाळ पर्यंत धडक मारली हा कथाभाग 'अस्मान' या दुसऱ्या कादंबरीत येतो.

तिसऱ्या कादंबरीत इंफाळच्या वेळेस उत्कर्ष बिंदूवर पोचलेल्या आझाद हिंद फौजेच्या विजयाला उतरती कळा लागते. महायुद्धाचे पारडे फिरते. स्वतःचा बचाव करण्याकरिता जपान्यांना माघार घ्यावी लागते. १९४४ मध्ये नेताजींनी चळवळ तात्पुरती स्थगित केली. पुढे त्यांचा विमान अपघातात मृत्यू होऊन एक 'तुफान' संपते.

या तीनही कादंबऱ्यांमध्ये स्वातंत्र्य चळवळीचा चार वर्षांचा इतिहास आहे.

सुभाषबाबूंच्या अपूर्व कार्याचे दर्शन घडविणाऱ्या कादंबरीत्रय या दृष्टीने या कादंबऱ्या महत्त्वाच्या आहेत. फडक्यांच्या सर्व नव्या जुन्या वैशिष्ट्यांचेही त्यातून दर्शन घडते.

सौ. दया वि. मित्रगोत्री

**श्यामची आई : साने, पांडुरंग सदाशिव (सानेगुरुजी), प्रकाशक : श्री. जगन्नाथ गोपाळ गोखले, अंमळनेर, १९३५.** श्री. पांडुरंग सदाशिव साने तथा सानेगुरुजी एक सव्यसाची लेखक आठ अनुवादित ग्रंथ, कथांचे दहा भाग, एक कविता संग्रह, बारा कादंबऱ्या, दोन निबंधसंग्रह, आणि ' भारतीय संस्कृती ' हा महत्त्वाचा प्रबंध, तीन पत्रांचे संग्रह इतकी त्यांची साहित्यसंपदा आहे. ' श्यामची आई ' ही त्यांची सार्वत्रिक लोकप्रियता मिळालेली कादंबरी. कथानकाची रचना अत्यंत साधी असून संपूर्ण कादंबरी साध्या, अत्यंत घरगुती भाषेत लिहिली आहे.

कथेच्या नायकाचे ' श्यामचे ' हे निवेदन असून आश्रमातील सहाध्यायांनी श्यामला त्यांची माहिती सांगण्याचा वारंवार जो आग्रह केला त्याला अनुसरून प्रत्येक रात्री एक कथा याप्रमाणे बेचाळीस रात्री आपल्या आईसंबंधीच्या बेचाळीस कथा श्याम सांगतो अशी कादंबरीची रचना आहे. या सर्वच कथा मातृप्रेमाची महती सांगणाऱ्या आहेत. प्रत्येक मराठी घरांत वावरणाऱ्या मातेचेच हे चित्रण आहे. भारतीय संस्कृतीने जगण्याचे जे गुण उदाहरणार्थ ज्ञानाची तळमळ, भूतदया, सर्वांविषयी प्रेमभावना, सदाचार, सद्‌गुण, धैर्य, सामर्थ्य, जिद्द, खरे बोलणे, चोरी न करणे त्यांची प्रसंगानुरूप रचना करून ते सांगितले आहेत.

गुरुजी कट्टर गांधीवादी. वरील सर्व गुणही गांधीवादाने स्वीकारलेले त्यामुळे या गुणांविषयी अतिशय उत्कट असे लेखन गुरुजींनी या कादंबरीसाठी केले आहे. शिवाय केवळ पाच रात्रीत २२५ पृष्ठांचे लेखनही त्यांनी या कादंबरीसाठी आणि तेही तुरुंगातच कैदी असताना केले. स्वातंत्र्यलढ्यातील गुरुजींचा सहभाग लक्षणीय आहे. आचार्य प्र. के. अत्रे यांनी निर्मिलेल्या या कादंबरीवरील ' श्यामची आई ' या चित्रपटास सर्वोत्कृष्ट चित्रपट म्हणून राष्ट्रपती पदक मिळाले आहे.

**श्रियाळचरित्र : रंकविप्र.** अनेक मराठी कवींनी श्रियाळ-चरित्र काव्यबद्ध केले आहे.

रंकविप्र नामक कवीने रचिलेले 'श्रियाळचरित्र'ही उपलब्ध झाले आहे.

ब्रह्मपुत्र नारदाने शंकराला श्रियाळाचे चरित्र सांगितले. त्यावरून शंकराने श्रियाळाचे सत्त्व पाहण्याचे ठरविले. अतिथीरूपाने शंकर श्रियाळाच्या दारापुढे उभा राहिला.आपण नरमांसाहारी असल्याचे सांगितले. त्यावेळी चांगुणाने स्वतःचे मांस देण्याची तयारी दर्शविली. पण अतिथीने ते घेण्यास नकार दर्शविला. त्यानंतर चांगुणाने पुत्र चिलयास आणले. तलवारीने वार करण्यास श्रियाळ सिद्ध झाला. श्रियाळाने चिलयाचे मस्तक हातात झेलून शंकरास ओवाळिले. चांगुणेने त्या शिराचा पाक तयार केला. जेवायला वाढावयाची तयारी झाली. पण अतिथीरूपाने आलेल्या शंकराने, " निपुत्रिकाच्या येथील मांस भक्षण करीत नसतो " असे सांगून मुलाला बोलाविण्यास सांगितले. चांगुणेने हाक मारताच चिलया प्रकटला. शंकरपार्वती श्रियाळ पतिपत्नीवर व मुलावर प्रसन्न झाले. त्यांनी सर्वांना कैलासाला नेले.

असा कथाभाग या श्रियाळचरित्र काव्यात आला आहे.

**वि. पां. देऊळगावकर**

**' श्री ' : कमतनूरकर, नरहर गणेश. प्रकाशक : व्यंकटेश बळवंत पेंढारकर, मुंबई, १९२६.** श्रीकांत नावाच्या बुद्धिमान, मनस्वी पण दारिद्र्यामुळे श्रीमंतांचा घरजावई व्हावा लागल्याने आणि त्यात कुसंगतीची भर पडल्याने घोड्यांच्या शर्यतीचा (रेसचा) नाद लागून सोज्ज्वळ व साध्वी पत्नी 'श्री' हिचा खून करून सर्वनाश ओढवून घेणाऱ्या तरुणाची शोकान्त कथा असलेले हे नाटक आहे.

नाट्यमन्वंतरपूर्वकाळातील नाट्यलेखनाचा हा एक महत्त्वाचा प्रयत्न असून लेखकाच्या 'सज्जन' स्त्री-पुरुष या अन्य नाटकाच्या तुलनेने प्रस्तुत 'श्री' हा अधिक स्पृहनीय प्रयत्न. गडकऱ्यांच्या वळणाचा विशेषत: 'एकच प्याला' आणि 'प्रेम संन्यास' या नाटकांचा विलक्षण प्रभाव दिसून येतो.

**तारा भवाळकर**

**श्रीएकनाथ : वाङ्मय आणि कार्य : फाटक, नरहर रघुनाथ. प्रकाशक : मौज प्रकाशन, मुंबई, प्रथम आवृत्ती, १९५०.** न. र. फाटक हे चिकित्सक संशोधक म्हणून मराठी रसिकांना परिचित आहेत. ' श्रीएकनाथ : वाङ्मय आणि कार्य ' हा त्यांचा महत्त्वाचा शोधग्रंथ आहे. संत एकनाथांच्या व्यक्तिमत्त्वाचे आणि त्यांच्या वाङ्मयाचे चिकित्सकपणे संशोधन करून फाटक यांनी हा ग्रंथ सिद्ध केला आहे.

या ग्रंथात नऊ प्रकरणे आहेत. पहिल्या प्रकरणात संत एकनाथांच्या काळाचे वर्णन आले आहे. दुसऱ्या प्रकरणात एकनाथांच्या चरित्राचा शोध घेण्यात आला आहे. तिसऱ्या प्रकरणात एकनाथकालीन समाजाची अवस्था कोणती आहे याचे ' लोकस्थितीचा आढावा ' या शीर्षकाखाली वर्णन फाटकांनी केले आहे. चौथ्या प्रकरणापासून एकनाथांच्या वाङ्मयाचे संशोधन आले आहे. त्यात ' रुक्मिणी स्वयंवर ', भागवतावरील एकनाथांची टीका, ' भावार्थ रामायण ' आणि इतर स्फुट ग्रंथातील अध्यात्म यांचे संशोधन करून न. र. फाटक यांनी विवेचन केले आहे. तसेच भारूडे यांच्यासंबंधीची सविस्तर चर्चा केली आहे.

श्रीएकनाथांच्या चरित्राचा आणि वाङ्मयाचा ज्यांना सखोल अभ्यास करावयाचा असेल त्याला 'श्री एकनाथ : वाङ्मय आणि कार्य' हा ग्रंथ मार्गदर्शक ठरेल.

**वि. दा. वासमकर**

**श्रीगोविंदप्रभु चरित्र (म्हाइंभटकृत) : म्हाइंभट. संपादक : कोलते, वि. भि. प्रकाशक : अरुण प्रकाशन, मलकापूर (वऱ्हाड) १९४४.** महानुभाव पंथाच्या पंचकृष्णापैकी चौथा अवतार जो गुंडम राऊळ त्यांचे चरित्र आठवणींच्या रूपाने गोविंदप्रभुचरित्रात सांगितले आहे. या ग्रंथाचे नाव वास्तविक ऋद्धिपूरचरित्र किंवा ऋद्धिपूर-लीळा असे आहे. चरित्रविषयाच्या गावाचे नाव त्याच्या चरित्राला देण्याच्या महानुभावीय प्रथेनुसार गुंडम राऊळांनी जेथे राहून या लीळा केल्या त्या ऋद्धिपुराचे नाव त्यांच्या चरित्राला देण्यात येते. पण आता त्याचे ' गोविंदप्रभुचरित्र ' हे नाव रूढ झाले आहे. या चरित्राची रचना म्हाइंभटांनी गुंडम राऊळांच्या निधनानंतर केली असावी. त्यात त्यांच्या सुमारे सव्वातीनशे लीळा संग्रहीत केल्या आहेत. या चरित्र ग्रंथाचा नायक गोविंदप्रभू ईश्वरी अवतार असला तरी तो एक वेडापिसा अवतार होता व त्यामुळे त्यांच्या ठिकाणी एका बाजुला ईश्वरावतारित्वाला शोभून दिसणारे सर्वज्ञत्वादी गुण होते, तर दुसऱ्या बाजूने एखाद्या अवलियाची किंवा बालोन्मत्त-पिशाच्चत्वाचीही लक्षणे होती. त्यांचे हे दुहेरी व्यक्तिमत्त्व म्हाइंभटांनी त्यांच्या लीळेतून उभे केले आहे. या चरित्रग्रंथाचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे गुंडम राऊळांचे सर्व आयुष्य वऱ्हाडात गेल्यामुळे त्यांच्या तोंडी खास वऱ्हाडी बोली ऐकण्यास मिळते. मध्ययुगीन मराठी चरित्रपर ग्रंथातील हा एक महत्त्वाचा ग्रंथ आहे.

**शं. गो. तुळपुळे**

**श्रीतुकारामबावांच्या अभंगांची गाथा भाग पहिला व भाग दुसरा : प्रकाशक : मुंबई सरकार, मुंबई, १९५०.** वारकरी संप्रदायाची स्थापना तेराव्या शतकात झाली. हा संप्रदाय दृढ करण्याचे कार्य तुकारामांनी केले. तुकाराम हे मराठीतील भक्तिसंप्रदायाचे कळस ठरतात.

प्रस्तुत गाथेचे दोन भाग १९५० साली प्रसिद्ध झाले. पु. म. लाड यांनी या गाथेला प्रस्तावना लिहिली आहे. प्रस्तावनेत गाथेच्या प्रकाशनाची ऐतिहासिक पार्श्वभूमी दिली असून या प्रस्तावनेत ही गाथा प्रथम विष्णू परशरामशास्त्री पंडित यांनी शंकर पांडुरंग पंडित यांच्या साह्याने शुद्ध केली असा उल्लेख येतो. या संपादकांनी (१) देहू प्रत, (२) तळेगाव प्रत, (३) पंढरपूर प्रत व (४) कडूस प्रत यांचा आधार घेऊन ही गाथा सिद्ध केली. कैक वर्ष दुर्मीळ झालेली या पंडितांनी सिद्ध केलेली गाथा तुकारामांच्या निर्याणाला तीनशे वर्षे पूर्ण झाली त्या प्रसंगी पुनः छापून प्रसिद्ध करावी असे स्वराज्यातील मुंबई सरकारने ठरविले आणि प्रस्तुत गाथा १९५० साली दोन भागात पुनः प्रसिद्ध झाली.

सदर गाथेच्या पहिल्या भागात २२४७ अभंग असून दुसऱ्या भागात २२४८ ते ४६०७ इतके अभंग आले आहेत.

राजकीय अस्थिरतेच्या काळात, स्वधर्मावर होणाऱ्या सततच्या आक्रमणात मराठी समाज सर्व प्रकारच्या अधिकारशाहीसमोर संपूर्ण शरणागती पत्करताना दिसून येत होता. युद्धग्रस्त महाराष्ट्रात तेराव्या शतकानंतर तीनशे वर्षे संत एकनाथांचा अपवाद वगळता एकही महत्त्वाचा लेखक निर्माण झाला नाही. या परिस्थितीत तुकारामांनी मराठी समाजाला भगवद्‌भक्तीच्या मार्गाने एकत्र ठेवले हे मोठेच ऐतिहासिक कार्य होय. ख्रिस्ती मिशनऱ्यांनी तुकारामांचा अभ्यास करून मराठी अभंगांचा उपयोग करून घेण्याचे ठरविले. परंतु ते त्यांना जमले नाही. याचे कारण तुकारामांच्या अभंगात मराठी मन रमले होते. या संदर्भात ग्रँटसाहेबांचे पुढील विधान उद्‌धृत करणे योग्य ठरेल, " . . . ज्यांच्या मुखी तुकारामांची वाणी वसत आहे त्यांना नैतिकदृष्ट्या ख्रिस्तीधर्म श्रेष्ठ आहे हे पटवून देणे दुरापास्त आहे." ग्रँटसाहेबांच्या वरील विधानात तुकारामांची महती साठविली आहे.

तुकारामांची अभंगवाणी ही ज्ञानेश्वरांच्या ओवीइतकीच लोकप्रिय आहे. शं. दा. पेंडसे, यांनी या संदर्भात केलेले विधान महत्त्वाचे आहे. " तुकोबांना जशी ज्ञानदेवांच्या बरोबरीने बसण्याची योग्यता प्राप्त झाली तशी 'ओवी ज्ञानेशाची, अभंगवाणी प्रसिद्ध तुक्याची' यांत सांगितल्याप्रमाणे ज्ञानेशांच्या ओवीबरोबर तुकोबांची अभंगवाणीही बसली. महाराष्ट्रातील लक्षावधी भाविक भक्तांच्या जीवनाला गेली कित्येक शतके या वाणीने शांती मिळवून दिली आहे. "

**वि. दा. वासमकर**

**श्रीनामदेव गाथा : नामदेव. प्रकाशक : ग. श्री. गोंधळेकर, गोडबोले, जगद्धितेच्छु, पुणे, २ री आवृत्ती, १८९६.** भावकोमल व मधुर अशा आत्मनिष्ठ काव्यरचनेसाठी प्रसिद्ध असणाऱ्या संत नामदेवांचे उपलब्ध वाङ्मय, मराठी अभंग आणि हिंदी पदरचना असे द्विविध प्रकारचे आहे. आजपर्यंत नामदेव गाथेच्या पुढील महत्त्वाच्या प्रती प्रकाशित झाल्या आहेत.

'नामदेवाची गाथा' (ग. श्री. गोंधळेकर, गोडबोले), जगद्धितेच्छु, पुणे, २ री आवृत्ती, १८९६ ही गाथा गोंधळेकर प्रत म्हणून प्रसिद्ध आहे.

नामदेवांच्या आणि त्यांच्या कुटुंबातील व समकालीन साधूंच्या अभंगाची गाथा (तुकाराम तात्या घरत), तत्त्वविवेक, मुंबई, १८९४ ही गाथा 'घरत प्रत' म्हणून प्रसिद्ध आहे.

'नामदेव महाराज यांच्या अभंगाची गाथा' (त्र्यं. ह. आपटे) इंदरा, पुणे, १९०८ 'गाथापंचक' अर्थात 'सकल संत गाथा' हा पंचखंडात्मक संतवचन संग्रह ज्ञानेश्वरीचे भाषांतरकार श्री. नाना-महाराज साखरे यांनी त्यांच्या संग्रहातील हस्तलिखिते आणि वारकरी सांप्रदायिकांच्या वह्या यावरून तयार केला. या पंचकातील दुसरा खंड नामदेव व त्यांच्या परिवारातील व्यक्तींच्या अभंगाचा आहे. या गाथेची दुसरी आवृत्ती ,१९२४ मध्ये आपटे यांनीच प्रकाशित केली.

श्रीनामदेवाची गाथा (सटीप)-(विष्णू नरहरी जोग), चित्रशाळा, पुणे, १९३१.

नामदेवरायांची समर्थ गाथा (............) खंड १ ते ६, पुणे, १९४९, १९५१, १९५४, १९५८, १९६०, १९६२.

' सकल संत गाथा ' (का. अ. जोशी) पुणे, १९६४ ही दोन खंडात असून पहिल्या खंडात ' नामदेव गाथा ' समाविष्ट आहे.

' श्रीनामदेव गाथा ', महाराष्ट्र शासन प्रकाशन, मुंबई, १९७०. संत नामदेव जन्म सप्तशतीच्या प्रसिद्ध केलेले नामदेवांच्या समस्त मराठी-हिंदी अभंगपदांचे हे संकलन म्हणता येईल.

मुद्रित स्वरूपात उपलब्ध असलेल्या या सर्व गाथा सांप्रदायिक असून त्यातल्या त्यात आपटे प्रत (४थी आवृत्ती) बरीच विश्वसनीय आहे. १९८३ मध्ये तिचे अक्षर प्रतिरूप पद्धतीने पुनर्मुद्रण वरदा बुक्स, पुणे या संस्थेने केले आहे.

आत्मचरित्रपर ६११, ज्ञानदेवादी भावंडाविषयी ३५५, पंढरी क्षेत्र, श्रीविठ्ठल-नाम महिमा व संत महिमा ४८३, बाळक्रीडा व माहात्म्यपर ३५६, उपदेशपर २९२, रूपकात्मक ११३, पौराणिक व संतचरित्रविषयक ११४, हिंदुस्थानी पदे १०२ असे एकूण २,४२६ अभंग आपटे प्रतीत आहेत.

त्यांच्या काव्यात अलंकाराची रेलचेल नाही. पण भक्तिभावाच्या अनेक छटा त्यांच्या अभंगात समर्थपणे प्रकट झाल्या त्या भाविकांप्रमाणे वाङ्मय रसिकालाही आल्हाद देणाऱ्या आहेत. अकृत्रिम रूपकात्मकता आणि आकर्षक रचना

चमत्कृती त्यांच्या कवितेत दिसते. सुभाषितवजा आकर्षक वचनेही विपुलतेने येतात.

विशाल सामाजिकता हा नामदेव काव्याचा एक लक्षणीय विशेष आहे. त्यांची शिकवण आंतरिक उमाळ्याने केलेल्या हितगुजासारखी वाटते.

अशोक कामत

**श्रीविष्णुबावा ब्रह्मचारी यांचे चरित्र : आजरेकर, रामचंद्र पांडुरंगशास्त्री. प्रकाशक : रामचंद्र पांडुरंगशास्त्री आजरेकर, गणपत कृष्णाजी प्रेस, मुंबई, १८७२.** विष्णुबोवांच्या ग्रंथामुळे आणि व्याख्यानांमुळे जगदोद्धारक, परोपकारी व दयाळू साधू म्हणून त्यांची ख्याती झाली व त्यामुळे वेदोक्त धर्ममंडळीने आजरेकरांना त्यांचे चरित्र लिहिण्याची आज्ञा केली. चरित्रकारांने बोवांच्या मुलाखती घेऊन त्यांच्या स्वमुखाने सांगितलेल्या व स्वतः अनुभविलेल्या गोष्टी या चरित्रामध्ये थोडक्यात कथन केल्या आहेत. लोकांबद्दलच्या कल्पना, त्यांनी केलेले व्यवसाय, सप्तशृंगीच्या डोंगरावर त्यांनी केलेली तपश्चर्या, त्यांना झालेला दत्तात्रेयाचा साक्षात्कार, त्यांनी केलेले वादविवाद व ग्रंथलेखन यांचे वर्णन यात आहे. मात्र बोवांचे कार्य व ग्रंथलेखन पाहता हे चरित्र अगदीच तुटपुंजे व सामान्य वाटते.

भीमराव कुलकर्णी

**श्रीशाहू महाराज यांची बखर (भारतवर्षातील प्रकरण) : चिटणीस गोविंद खंडेराव.** शाहू महाराजांच्या या बखरीत प्रथम छत्रपती राजाराम व छत्रपती संभाजी यांची थोडी हकिकत दिलेली आहे आणि नंतर शाहू महाराजांच्या कारकिर्दीतील घटना विस्ताराने दिल्या आहेत. बखरीचा मूळ कर्ता गोविंद खंडेराव चिटणीस (इ. स. १७१६ ते १७८४) हा खंडो बल्लाळ चिटणीसाचा मुलगा होय. चिटणीस घराणे छत्रपतींच्या घराण्याशी अत्यंत एकनिष्ठ व शाहूचा तर खंडे बल्लाळावर अत्यंत विश्वास होता. शाहूंच्या मृत्यूच्या वेळी शाहूंजवळ कोणाचाही प्रवेश होऊ नये अशी व्यवस्था केलेली होती, शाहूंच्या मृत्यूनंतर ताराबाई त्याला पाहण्यासाठी आली असता तिलाही चिटणीसाने परत पाठविले.

शाहू महाराजांनंतर रामराजाचे दत्तक प्रकरण खूपच गाजले. त्याबाबतही चिटणीस घराण्याने महत्त्वाची कामगिरी बजावली. गोविंदराव खंडेराव याने बखरीच्या आरंभी, " छत्रपती शाहू महाराज यांस बालत्वापासून राज्यप्राप्ती होऊन प्रजापालनादी स्थिती कशी झाली ते विस्तारे करून श्रुत व्हावे म्हणून " ही बखर लिहिली आहे, असे म्हटले आहे. भारतवर्षकारांनी या बखरीला श्रीशाहू महाराजांची बखर असे नाव दिले आहे. प्रस्तुत बखरीचा लेखक गोविंद खंडेराव चिटणीस हा लहान वयापासून शाहू महाराजांच्या सेवेत होता. साहजिकच त्याने शाहूंची हकिकत सविस्तर वर्णिली आहे. शाहूंचे दिल्लीतील वास्तव्य, बादशहा व बेगमचा त्याच्यावरील लोभ व त्याची बादशहावरील निष्ठा नंतर त्याची दक्षिणेत झालेली पाठवणी व त्याला तोतया ठरवून ताराबाईने त्याच्याशी केलेला संघर्ष इ. प्रसंगांच्या वर्णनातून बखरकाराने शाहूंचे व्यक्तिमत्त्व ठसठशीतपणे प्रगट केले आहे. ताराबाईशी प्रत्यक्ष युद्धाचा प्रसंग आला तेव्हा, " ती आई, मी लेक, दोघांशी भांडण तुम्ही प्राणानिशी मुकाल " असे तो सरदारांना निरोप पाठवितो. तसेच, " खोटा, तोतया आहे असे ज्यांच्या नजरेस आले त्यांनी मला पाहावे, मी खोटा आहे तर मला काढून द्यावे. मी लढत नाही मला राज्याची दरकार नाही " असे उद्‌गारही ते काढतात. या संघर्षातील ताराबाईची चीड व्यक्त करणारे प्रसंग किंवा युद्धात जय मिळाल्यावर शाहूने परशरामपंताना निष्ठुर शासन केले त्यावेळी खंडो बल्लाळांनी त्याची परखड शब्दात कानउघाडणी करण्याचा प्रसंग, हे अत्यंत उठावदार व नाट्यमय उतरले आहेत. या बखरीचा लेखनकाल १७४९ असा आहे.

स. मा. गर्गे

**श्रीसमर्थांची दोन जुनी चरित्रे : भीमस्वामी. प्रकाशक : सत्कार्योत्तेजक सभा, धुळे, १९१०.** समर्थ रामदासांचे शिष्य व तंजावर येथील मठाचे अधिपती भीमस्वामी यांनी लिहिलेले समर्थांचे लघुचरित्र पदे, ओव्या, श्लोक कडका छंद, उफगाणे अशा एकूण १६८ विविध रचनांनी युक्त आहे. भीमस्वामींची रामदासांवर फार भक्ती होती. रामदासांनी समाधी घेतल्यानंतर तीनच दिवसांनी भीमस्वामी सज्जनगडावर गेले. तेथून परतल्यावर लागलीच (सुमारे इ.स. १६८२) भीमस्वामींनी या चरित्राची रचना केली. रामदासांनी स्वतःच्या लग्नसमारंभातून पलायन केले या घटनेपासूनची हकिकत या चरित्रात झालेली आहे. रामदासांना लहान मुलात खेळण्याची आवड होती. चाफळ येथील रामनवमी उत्सवात रामदास भजन आणि निरूपण करीत शिवाजी महाराजांनी रामदासांच्या प्रेमामुळे सज्जनगडावर त्यांची वस्ती करविली. शिवाजी महाराजांनी बांधलेल्या वाड्यात शक १६०३ च्या वैशाख महिन्यात रामदासांनी प्रवेश केला तसेच समर्थांच्या अंतकाळाचा वृत्तांत व त्यांनी अंत्यकाळी शिष्यांना केलेला उपदेश इत्यादी माहिती या चरित्रात आलेली आहे.

रामदासांच्या सहवासात असलेल्या व त्यांच्या निधनानंतर तपशील मिळवून लागलीच लिहिलेल्या भीमस्वामींच्या या चरित्रातील माहिती विश्वसनीय आहे. हे लघुचरित्र धुळे येथील सत्कार्योत्तेजक सभेने प्रसिद्ध केले आहे. छापील आवृत्तीतील प्रस्तावनेत मूळ प्रतीची प्रारंभीची व अखेरची काही पृष्ठे गहाळ झाल्याचे म्हटले आहे.

**श्रीज्ञानेश्वर (वाङ्मय आणि कार्य) : फाटक, न. र. प्रकाशक : मौज प्रकाशन, मुंबई, प्रथम आवृत्ती. १९५२.** न.र.फाटक हे चिकित्सक संशोधक आहेत.' श्री एकनाथ : वाङ्मय आणि कार्य ', ' श्रीज्ञानेश्वर : वाङ्मय आणि कार्य ' इ. ग्रंथ त्यांच्या चिकित्सक संशोधकवृत्तीचे उत्तम नमुने आहेत.

' श्रीज्ञानेश्वर : वाङ्मय आणि कार्य ' हा न. र. फाटक यांचा एक महत्त्वाचा शोधग्रंथ आहे. तो १९४७ साली ' ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी ' या नावाने प्रकाशित झाला होता. त्याची व्याप्ती वाढवून ' श्रीज्ञानेश्वर : वाङ्मय आणि कार्य ' या प्रस्तुत ग्रंथाच्या स्वरूपात तो १९५२ साली मौज प्रकाशनतर्फे प्रसिद्ध करण्यात आला, असे प्रस्तुत ग्रंथाच्या प्रस्तावनेवरून दिसते.

प्रस्तुत ग्रंथात एकूण दहा प्रकरणे आहेत. पहिल्या प्रकरणात 'संत व त्यांचे कार्य' याविषयी फाटक यांनी विवेचन केले आहे. संतांनी देश बुडविला असा आरोप करणाऱ्या आधुनिक विन्दवानांच्या मतांचा परामर्श घेऊन संतांच्या ऐतिहासिक कार्याचे महत्त्व फाटक यांनी सांगितले आहे. दुसऱ्या प्रकरणात 'ज्ञानेश्वरांच्या कार्याची भूमिका' समजावून दिली आहे. तिसऱ्या प्रकरणात ज्ञानेश्वरांच्या कथनकौशल्याचे वर्णन आले आहे. 'कर्मयोग' हे या ग्रंथातील महत्त्वाचे प्रकरण आहे, त्यामध्ये स्मृतिपुराणे व भागवत धर्म, मनुस्मृती व गीता यांची तुलना केली आहे. ज्ञानेश्वरांच्या काळातील लोकस्थिती कशी होती, महाराष्ट्रातील गीताध्ययन-परंपरा-ज्ञानेश्वरांच्या गीतानिवडीचे कारण इ. मुद्दयांची तपशीलवार चर्चा न. र. फाटक यांनी केली आहे. याशिवाय ज्ञानेश्वरीच्या संदर्भातील 'आदर्श पुरूष', 'वाङ्मय चातुर्य', 'गीतार्थ', 'व्यासंग व स्वाभिमान' ही प्रकरणे येतात. 'अनुभवामृत' या प्रकरणात सुरुवातीला अनुभवामृताचे शीर्षक आणि स्वरूप यांची चर्चा आली आहे. त्यानंतर शिवशक्तीचे विवेचन, जीवनमुक्तावस्था, शब्दखंडन, अज्ञानखंडन इ. 'अनुभवामृता'तील प्रकरणांची चर्चा आली असून शेवटी 'गीता', 'ज्ञानेश्वरी', व 'अनुभवामृत', या तीनही ग्रंथांतील तत्त्वज्ञानाची चर्चा फाटक यांनी केली आहे. शेवटी उपसंहारात ज्ञानेश्वरांच्या व्यक्तिमत्त्वाची आणि त्यांच्या आयुष्यात आलेल्या घटनांची चर्चा केली आहे.

प्रस्तुत ग्रंथात 'ज्ञानेश्वरी', 'अनुभवामृता'तील शिकवण समजून देताना अध्यात्मविवेचनाबरोबरच सामाजिक हिताच्या विचाराची चर्चा महत्त्वाची मानली आहे, हे या ग्रंथाचे महत्त्वाचे वैशिष्ट मानता येईल.

**वि. दा. वासमकर**

**श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान : पेंडसे, शंकर दामोदर. प्रकाशक : केशव भिकाजी ढवळे, मुंबई, १९४१.** 'भागवतोत्तम संत श्रीएकनाथ', 'महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास', ' साक्षात्कारी संत तुकाराम ' यांसारख्या अभिजात ग्रंथांचे लेखक शंकर दामोदर पेंडसे यांचा 'श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान' हा ग्रंथ १९४१ साली प्रसिद्ध झाला. श्रेष्ठ तत्त्वज्ञ गुरुदेव रा. द. रानडे आणि ल. रा. पांगारकर यांनी प्रस्तुत ग्रंथाला प्रस्तावना लिहिल्या आहेत.

हा प्रबंध पेंडसे यांनी पीएच.डी. पदवीसाठी नागपूर विद्यापीठास सादर केला होता. त्याचे ग्रंथरूप म्हणजे 'श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान'.

ह्या ग्रंथाची (१) ज्ञानेश्वरी खंड, व (२) अमृतानुभव खंड या दोन खंडांत विभागणी केली आहे. ग्रंथाच्या सुरुवातीला ' विषय प्रवेश ' या प्रकरणात भारदेबुवा, भिंगारकर बुवा, हुपरीकर, पं. पांडुरंग शर्मा, रा. ब. आगाशे, दिवेकर शास्त्री, डॉ. लोंढे आणि प्रा. बनहट्टी यांच्या ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाविषयीचा परामर्श पेंडसे यांनी घेतला आहे. दुसऱ्या प्रकरणात 'ज्ञानेश्वरीची राजवाडे प्रत' याविषयी पेंडसे यांनी परिश्रमपूर्वक संशोधन सादर केले आहे. राजवाडे यांची प्रतीबद्दल मोडक, नेने यांच्या मताबद्दलची चर्चा आली असून राजवाडे ज्ञानेश्वरीत 'की' हे फारसी अव्यय नाही ; राजवाडे प्रतीतील अपपाठ, चांगले पाठ याविषयीचे पेंडसे यांचे संशोधन महत्त्वाचे आहे. ' भाष्यकाराने वाट पुसतु ' हे या प्रबंधातील सर्वांत मोठे प्रकरण आहे. त्यात शंकराचार्य व ज्ञानेश्वर यांच्या विचारातील साम्यभेदाची चर्चा आली आहे. त्यानंतर ' ज्ञानेश्वरीतील अधात्म ' आणि ' मोक्षाची साधने ' ही प्रकरणे प्रथम खंडात येतात.

दुसऱ्या अमृतानुभव खंडात नऊ प्रकरणे आली आहेत. 'अमृतानुभव' या प्रकरणात 'अमृतानुभवा'तील तत्त्वज्ञानाची चर्चा आली आहे. परमात्मा, शिव, शक्ती, आणि जीव यांचे ऐक्य, माया, अविद्या, भ्रम यांविषयीचे तत्त्वज्ञान आले आहे. 'जग हे जग नसून वस्तुप्रभा आहे', 'द्वैत हा भ्रम नाही' हा सिद्धान्त ज्ञानेश्वरांना मान्य नाही याची चर्चा लेखकाने केली आहे. प्रकरण सातमध्ये ज्ञानेश्वरांनी केलेले अविद्या खंडन आणि रामानुजनांनी केलेले अविद्या खंडन यातील भेदाची चर्चा झाली आहे. तर 'अमृतानुभव' आणि 'योगवासिष्ठ' या ग्रंथातील तत्त्व ज्ञानाची चर्चा आली आहे. याशिवाय प्रकरण नऊ-ज्ञानेश्वर, शैवाद्वैत, पांचरात्र ; प्रकरण १०-चांगदेवपासष्टी, आणि चांगदेवांचे तत्त्वसार ; प्रकरण ११-ज्ञानेश्वरांचे अभंग आणि हरिपाठ ; प्रकरण १२-ज्ञानेश्वरांच्या नावावर असलेले इतर ग्रंथ ; प्रकरण १३-ज्ञानेश्वर आणि नाथपंथाचे तत्त्वज्ञान प्रकरण १४-ज्ञानेश्वर आणि चार इतर आचार्य अशी प्रकरणे असून या सर्व प्रकरणांचा सारांश उपसंहारात आला आहे. शिवाय ग्रंथाला पाच परिशिष्टे जोडली आहेत.

या सर्व प्रकरणांतून आलेले 'ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान' या विषयीचे पेंडसे यांचे संशोधन श्रेष्ठ दर्जाचे आहे. याविषयी गुरुदेव रानडे आणि ल. रा. पांगारकरांच्या प्रस्तावनांत मार्मिक निरीक्षणे आली आहेत. ल. रा. पांगारकरांच्या मते "ज्ञानेश्वरभक्तांनी अनेकवार अभ्यासला पाहिजे इतक्या थोर योग्यतेचा हा ग्रंथ आहे." 'बिनचूकपणा' आणि 'विवेचनाची सर्वांगपूर्णता'ही ग्रंथाची वैशिष्टये नमूद करून "नवीन चिकित्सक पद्धतीने लिहिलेले जे फारच थोडे शास्त्रीय ग्रंथ मराठी वाङ्मयात आहेत त्यांत या प्रबंधाने चांगली भर पडली आहे." असा मार्मिक अभिप्राय गुरुदेव रानडे यांनी व्यक्त केला आहे.

**वि. दा. वासमकर**

**श्रीकृष्णविजय : मोरोपंत, प्रकाशक/संपादक : रामकृष्ण दत्तात्रय पराडकर, यशवंत प्रेस, पुणे, १९१४.** मोरोपंतांनी रचलेल्या प्रदीर्घ काव्यग्रंथापैकी पहिला ग्रंथ म्हणजे 'श्रीकृष्णविजय' होय. हा ग्रंथ पंतांनी आपले गुरू संस्कृत विद्याव्यासंगी पंडित बाबा पाध्ये यांच्या विनंतीवरून इ. स. १७५८ ते १७७० या कालावधीत लिहिला. श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधाच्या आधारे पंतांनी 'श्रीकृष्णविजया'ची रचना केली. मूळ भागवताप्रमाणेच 'श्रीकृष्णविजय' ग्रंथाचे ९० अध्याय आहेत. पूर्वाध ४९ अध्यायांचा असून उत्तरार्ध ४१ अध्यायांचा आहे. ह्या ९० अध्यायांपैकी पहिले ५४ अध्याय अवजड आर्यावृत्तात आहेत. नंतरच्या २५ अध्यायात मोरोपंतांनी अनेक वृत्तात्मक श्लोकांची योजना केली असून अखेरच्या ११ अध्यायातील कथाभाग मराठी समाजाला सुपरिचित असलेल्या सुलभ आर्यागीतात रचला आहे. रेखीव व गतिमान कथा-निवेदनशैली, नाट्यात्म प्रसंग, मर्मग्राही स्वभाव रेखाटन, नर्म विनोदबुद्धी, भाव विष्कारातील संयम, शब्दचमत्कृती व अलंकारिकतेसंबंधी ओढ व संस्कृतीकरणाच्या छंदामुळे कृत्रिमतेकडे झुकलेली भाषाशैली इ. गुणदोष पंतांच्या अन्य काव्यग्रंथांप्रमाणेच 'श्रीकृष्णविजया'तही जाणवत राहतात.

विद्यासागर पाटंगणकर

**श्रीगुरुगोविंद सिंह यांचे संक्षिप्त चरित्र : कानोले, विश्वेश्वर अंबादास. प्रकाशक : विश्वेश्वर, अंबादास कानोले, नांदेड, १९२७.** धर्मासाठी तळहातावर शिर घेऊन लढणाऱ्या आणि आपल्या दोन पुत्रांची आहुती देणाऱ्या खालसा धर्मस्थापक श्रीगुरुगोविंद सिंहाची मराठी वाचकांना ओळख करून द्यावी आणि त्यांच्या चरित्राची मराठीतील उणीव दूर व्हावी या हेतूने १९२७ साली 'चित्रमयजगत'मध्ये श्री. कानोले यांनी जो दीर्घ परिचय लेख लिहिला त्याचेच हे पुस्तकरूप. श्रीगुरूंचा जन्म, बालपण, खालसा धर्माची स्थापना, विस्तार, त्याची तत्त्वे, मोगलांविरुद्धच्या लढाया, श्रीगुरूंचे देहावसान याची माहिती प्रस्तुत पुस्तकात दिली आहे. लेखनोद्देश सफल झाला आहे. साधार पद्धतीने लिहिलेले एक बालबोध चरित्र असे या लेखनाचे साहित्यिक स्वरूप आहे.

वसंत नरहर कुबेर

**श्रीधर : चरित्र आणि काव्यविवेचन, श्री. जोशी, चिं. नी. प्रकाशक : श्री. मेघश्याम जोशी. हैद्राबाद १९५१.** पुस्तकाचे श्रीधरांचे चरित्र व काव्यविवेचन असे दोन भाग आहेत. दुसऱ्या भागात वडिलांच्या पश्चात त्यांच्या मुलाने महत्त्वाची भर घातली आहे. श्रीधराच्या चरित्रात जन्म, कुलवृत्तांत, बालपण, शिक्षण, गृहस्थाश्रम, तीर्थयात्रा, भक्तमंडळ, समकालीन कवी, तत्कालीन महाराष्ट्र, मृत्यू, श्रीधरानंतर त्यांचा वंश, आनंद संप्रदाय यांची माहिती आली आहे.

संस्कृत ग्रंथातील वेदान्त व धर्मरहस्याचे भांडार खुले करून स्त्री-शूद्रादी सामान्य जनास परमेश्वरप्राप्तीचा मार्ग मोकळा करून देणे हे इतर संतांप्रमाणे श्रीधराचेही ग्रंथरचनेचे ध्येय होते. त्यांच्या कवितेची तीन भागांत विभागणी करता येते. (१) मोठे ग्रंथ, (२) छोटे ग्रंथ, (३) स्फुट रचना. हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप, जैमिनी, अश्वमेध, शिवलीलामृत या ग्रंथांचा साक्षेपी परामर्श घेतला आहे. साधारणपणे ग्रंथलेखनकाल, ग्रंथनाम, ग्रंथकार, काव्यस्फूर्ती, विनय व आत्मविश्वास, रसपरिपोष, दृष्टान्त व अलंकार, विद्वत्ता, तत्त्वज्ञान, सुभाषिते, म्हणी, संवाद व चतुरालाप स्वभावपरिपोष, वर्णने आढळतात. समाजस्थिती, भाषाशैली व व्याकरण विशेष, दोषदर्शन, नमुनेदार उतारे व काही प्रश्न उपस्थित झाल्यास त्याचा छडा या पद्धतीने घेतलेला आहे.

'आत्मप्रकाश' हा ग्रंथ श्रीधरांचे गुरू ब्रह्मानंद यांनी श्रीधराने विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे देण्यासाठी लिहिलेला आहे. व संवादरूप ग्रंथसमाप्तीनंतर श्रीधराने मंगलाचरण करून ३२ ओव्यांत सारांश व महत्त्व वर्णिले.. आलंकारिक भाषा, संस्कृत वाक्यांश देऊन त्याचे प्राकृत स्पष्टीकरण देण्याची लकब श्रीधराने येथून उचलली आहे. त्याने पुढे यांच ग्रंथाचे सुबोध व रसाळ विवरण 'वेदान्त सूर्य' या ग्रंथात केले आहे.

पांडुरंग माहात्म्य, व्यंकटेश माहात्म्य, मल्लारिमाहात्म्य, ज्ञानेश्वर चरित्र, अंबिका उदय हे श्रीधराचे छोटे ग्रंथ, तर ९४ स्फुट प्रकरणे व १३ माला ही त्यांची स्फुट रचना आहेत.

श्रीधरी वाङ्मयाचे स्वरूप, वैशिष्ट्ये, आक्षेप व मूल्यमापन करणारा मराठीतील महत्त्वाचा समीक्षा ग्रंथ असे या ग्रंथाचे स्थान आहे.

विमल भालेराव

**श्रीपाद कृष्ण : वाङ्मयदर्शन : कुळकर्णी, वा. ल. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पहिली आवृत्ती, १९५९.** वा. ल. कुळकर्णी हे एक मर्मज्ञ समीक्षक म्हणून ओळखले जातात. 'वामन मल्हार वाङ्मयदर्शन', 'वाङ्मयीन टीपा आणि टिप्पणी', 'वाङ्मयीन दृष्टी आणि दृष्टीकोन', 'नाटककार खाडिलकर : एक अभ्यास', 'न. चिं. केळकर वाङ्मयदर्शन' इ. समीक्षाग्रंथांचे लेखन त्यांनी केले आहे.

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे कलावादी भूमिकेतून समीक्षा करणारे मराठीतील महत्त्वाचे समीक्षक, श्रेष्ठ विनोदी लेखक, कवी, नाटककार म्हणून मराठी रसिकांना परिचित आहेत. अशा लेखकाच्या वाङ्मयाचे समग्र दर्शन घडविण्याच्या हेतूने 'श्रीपाद कृष्ण : वाङ्मयदर्शन' या ग्रंथाची निर्मिती वा. लं.नी केली आहे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाने कै. प्रा. अ. बा. गजेन्द्रगडकर स्मारक व्याख्यानमालेसाठी वा. लं. कुळकर्णी यांना व्याख्याने देण्यासाठी निमंत्रित केले होते. या व्याख्यानमालेत वा. ल. कुळकर्णी यांनी श्रीपाद कृष्णांच्या साहित्यासंबंधी जी व्याख्याने दिली, त्यात काही लेखांची भर घालून हा समीक्षाग्रंथ तयार केला.

या ग्रंथात सुरुवातीला श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचा जीवनपट आला असून नंतर -(१) श्रीपाद कृष्णांची टीका, (२) श्रीपाद कृष्णांची नाटके, (३) श्रीपाद कृष्णांची नाटके : टिंप्पणी, (४) श्रीपाद कृष्णांचा विनोद : 'सुदाम्याचे पोहे', (५) श्रीपाद कृष्णांचे कथावाङ्‌मय, (६) श्रीपाद कृष्णांची कविता अशी प्रकरणे आली आहेत. शेवटी ग्रंथाला तीन परिशिष्टे जोडली आहेत.

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे मराठीतील महत्त्वाचे साहित्यिक व समीक्षक आहेत. त्यांच्या साहित्याचा व समीक्षेचा प्रभाव नंतरच्या पिढीतील साहित्यिकांवर झालेला असल्यामुळे वा. ल. कुळकर्णी यांनी प्रस्तुत ग्रंथात श्रीपाद कृष्णांच्या सर्व साहित्यकृतींवर तपशीलाने चर्चा केली आहे. मराठी वाचकांना, श्रीपाद कृष्णांच्या साहित्याचा विशेष अभ्यास करणाऱ्या संशोधकांना मार्गदर्शक ठरेल असा महत्त्वाचा समीक्षाग्रंथ म्हणून 'श्रीपाद कृष्ण : वाङ्‌मयदर्शन' या ग्रंथाचा उल्लेख करता येईल.

बि. दा. बासमकर

**श्रीपार्वती कल्याण : प्रतापसिंह भोसले. प्रकाशक : मराठी संशोधन पत्रिका, जानेवारी, १९६९.** 'श्रीपार्वतीकल्याण' हे मराठी नाटक तंजावरच्या राजघराण्यातील राजे प्रतापसिंह भोसले यांनी रचलेले आहे. हे फार विद्याप्रेमी होते. इसवी सनाचे १८वे शतक हा यांचा काल होय. यांनी एकूण १७ नाटके रचल्याची नोंद आढळते. यापैकी पार्वती कल्याण रुक्मांगद नाटक, रुक्मिणी कल्याण व स्यमंत कोपाख्यान ही नाटके फक्त तेलगु लिपीतच आढळतात. त्यांपैकी प्रस्तुत पार्वती कल्याण नाटकाची देवनागरी प्रत तयार करून घेऊन प्रा. माया सरदेसाई यांनी ती मुंबईच्या मराठी संशोधन पत्रिकेत (जाने-एप्रिल, १९६९) प्रसिद्ध केली आहे. त्यातील पात्रे पौराणिक असली तरी मानवी भाव-भावनांना ती पराङ्‌मुख झालेली नाहीत. " नाट्य भावानु कीर्तनम्" या न्यायाने ती मानवी मनाशी एकरूप झालेली दिसतात. त्यांचे देवत्वाचे वलय गळून पडलेले दिसते. नाटकाचा शेवट अर्थातच भरत वाक्याने झालेला आहे. नाटकाचे कथानक कालिदासकृत कुमारसंभवाच्या तिसऱ्या व चौथ्या सर्गावर प्रामुख्याने आधारलेले आहे. मदनदहन, पार्वतीची तपश्चर्या, ब्राह्मण वेषधारी शिवाने तिची परीक्षा पाहणे व शेवटी उभयतांचा विवाह असे हे कथानक आहे.

यशवंत कानिटकर

**श्रीमंत : तेंडुलकर, विजय धोंडोपंत. प्रकाशक : जोशी ब्रदर्स ॲण्ड पब्लिशर्स, पुणे, १९५६.** स्वातंत्र्योत्तर काळात मराठी नाटकाला नवता प्रदान करणारे, जीवनातील हिंसा, क्रौर्य प्रथमच रंगभूमीवर आणणारे एक अग्रगण्य नाटककार म्हणून तेंडुलकरांना ओळखले जाते. कथा, एकांकिका, वृत्तपत्रीय स्तंभलेखन, ललित गद्य, व्यक्तिचित्रण आणि चित्रपटांच्या पटकथा व संवाद असे विविध लेखनप्रकार त्यांनी हाताळले असले तरी नाटक हा साहित्यप्रकार त्यांच्या एकूण लेखनात महत्त्वाचा ठरला आहे. नाटकानेच त्यांना जागतिक रंगभूमीवरही मानाचे स्थान मिळवून दिले आहे.

लँडलॉर्ड दादासाहेब बागळे आणि भणंग श्रीधर यांच्यातील संघर्ष हा 'श्रीमंत' नाटकाचा विषय. दादासाहेबांची मुलगी मथुरा तारुण्याच्या मोहाला बळी पडते. नाजूक प्रकृतीमुळे गर्भपात करणे तिला अशक्य असते. तिचे लग्न लावण्याचा डॉक्टरांनी दिलेला सल्ला दादासाहेब नाइलाजाने मान्य करतात. डॉक्टर श्रीधर नावाच्या एका प्रौढ, दरिद्री तरुणाला लग्नासाठी तयार करतात. मथुरेशी लग्न करण्याच्या मोबदल्यात दादासाहेबांनी देऊ केलेले पैसे श्रीधर नाकारतो. येथून त्यांच्यातील संघर्षाला सुरुवात होते. पण सर्व संघर्षांअंती मथुरा वडिलांच्या श्रीमंतीपेक्षा आपल्या मुलाला भविष्य देऊ शकणाऱ्या श्रीधरला जवळ करते.

कुमारी-मातेचा विषय रंगभूमीवर आणणारे, वेगळ्या विषयावरील नाटक म्हणून हे नाटक गाजले.

**श्रीभगवद्‌गीतारहस्य अथवा कर्मयोगशास्त्र : टिळक, लोकमान्य बाळगंगाधर. प्रकाशक : चित्रशाळा प्रेस, पुणे, १९१५.** लोकमान्य टिळक हे भारतीय स्वातंत्र्याचे उद्‌गाते, थोर जहाल पक्षाचे नेते, भगवद्‌गीतेचे आधुनिक भाष्यकार व प्राच्य विद्यापंडित. 'केसरी' व 'मराठा'ही वृत्तपत्रे आणि 'ओरायन' हा संशोधनात्मक, महत्त्वाच्या ग्रंथांचे कर्ते. भगवद्‌गीतेवरील प्रस्तुत ग्रंथ टीका सादर करणाऱ्या ग्रंथांपैकी एक महत्त्वाचा ग्रंथ आहे, भगवद्‌गीता कर्मयोगपर असून जगातील आपले व्यवहार कसे करावेत हे सांगणारी आहे. या मताच्या प्रतिपादनासाठी प्रस्तुत ग्रंथाची रचना झाली. यात एकूण पंधरा प्रकरणे आहेत. पहिल्या दोन प्रकरणांमध्ये कर्माकर्म ठरविण्या-विषयीच्या निरनिराळ्या दृष्टीकोनांचा विचारप्रवाहांचा परामर्श घेतला आहे. संन्यासाप्रमाणे कर्मयोगही तितकीच श्रेष्ठ जीवननिष्ठा आहे. हे स्पष्ट करण्यासाठी संन्यास व कर्मयोग, सिद्धावस्था व व्यवहार ही प्रकरणे लिहिली आहेत. आरंभापासून पसंहारापर्यंत आत्मज्ञानी पुरुषांनी आचरावयाच्या निष्काम कर्मयोगाच्या एका सूत्राला धरून टिळकांनी विवेचन केले आहे. गीतेचे मूळ श्लोक भाषांतरासह व टिपांसह स्पष्ट केले आहेत. गीतारहस्याला कर्मयोगशास्त्र म्हणण्याचे कारण सांगताना ते म्हणतात, "एकच कर्म करण्याचे जे अनेक योग, साधने किंवा मार्ग असतात, त्यांपैकी पराकाष्ठेचा चांगला व शुद्ध मार्ग कोणता, तो नेहमी आचरिता येईल की नाही, नसल्यास त्याला अपवाद कोणते व का उत्पन्न होतात. जो मार्ग आपण चांगला समजतो तो चांगला का ? किंवा ज्यास वाईट म्हणतो तो वाईट का ? आणि हा चांगलेवाईटपणा कोणी व कोणत्या धोरणाने ठरवावा किंवा त्यातील बीज काय इ. गोष्टी ज्या शास्त्राच्या आधारे निश्चित करता येतात त्यास कर्मयोगशास्त्र म्हणतात. टिळकांनी भक्ती हे ज्ञानाचे साधन मानले आहे. ज्या ज्या विषयाचा कर्माशी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध आहे त्या विषयांच्या विवेचनाकडे अधिक लक्ष दिले आहे. संस्कृत ग्रंथातील अनेक संदर्भ देऊन पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाशीही तुलना केली आहे.

ग्रंथाच्या भाषेत सुबोधत, लय आणि तर्कशुद्ध प्रतिपादन आहे. वैदिक तत्त्वज्ञानातील प्रवृत्तीपरता गीतेच्या निमित्ताने मांडून दाखविणे, दीर्घकाळ उपेक्षित राहिलेल्या कर्मयोगाचा साक्षेपाने पुरस्कार करणे आणि पारमार्थिक तत्त्वज्ञानाला व्यावहारिक नीतिविचारांची जोड देणे हे या ग्रंथाचे विशेष सांगता येतील. ग्रंथ अत्यंत मौलिक आणि संग्राह्य मानला जातो.

**श्रीमन्महाभारताचे मराठी सुरस भाषांतर या ग्रंथाचा उपसंहार खंड १०वा : वैद्य, चिंतामण विनायक. प्रकाशक : बाळकृष्ण पांडुरंग ठकार, पुणे, १९१८.** वैद्य हे महाभारताचे प्रकांड अभ्यासी. त्यांचा 'महाभारत-ए-क्रिटिसिझम' हा इंग्रजी मधील ग्रंथ प्रसिद्ध आहे. तसेच महाभारत-रामायणच्या गाढ व्यासंगाला धरून त्यांनी 'एपिक इंडिया' हा आणखी एक ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. श्रीमन्महाभारताचे मराठी सुरस भाषांतर या ग्रंथाचा उपसंहार खंड १० वा हा लोकमान्य टिळक यांच्या आग्रहावरून केला. टिळक त्यांना 'भारताचार्य' म्हणून संबोधित असत.

महाभारताचे अंतरंग म्हणजे महाभारताच्या अनुषंगाने जे कळावे असे वाटते ते सारे विषय या ग्रंथात आले आहेत. या ग्रंथाची अनुक्रमणिका विषयावर व विस्तृत असून हा ग्रंथ १८ प्रकरणात विभागला आहे. यामध्ये महाभारताचे कर्ते, महाभारताचा काळ, भारतीय युद्ध काल्पनिक आहे काय ? इतिहास, कोणत्या लोकांचा वर्णव्यवस्था, आश्रमव्यवस्था आणि शिक्षणपद्धती, विवाहसंस्था, सामाजिक परिस्थिती, सैन्य व युद्ध, व्यवहार व उद्योगधंदे, भौगोलिक माहिती, ज्योतिर्विषयक ज्ञान, वाङ्मय व शास्त्रे, धर्म, तत्त्वज्ञान, भिन्न मतांचा इतिहास, भगवद्गीता विचार अशी प्रकरणे आहेत. परिशिष्टात महाभारताची लोकसंख्या, गण अथवा प्रजासत्ताक लोक इ. समाविष्ट असून ग्रंथाअखेरीस विषयसूची दिली आहे.

महाभारताचा अभ्यास प्राच्य आणि पाश्चात्त्य दोन्ही पंडितांनी केला असून त्याविषयी आपली निरनिराळी मते मांडली आहेत. या दोहोंच्या परीक्षणाचा विचार करून महाभारताचा ऐतिहासिक सांगोपाग विचार उपसंहारात केला आहे. अनुक्रमणिकेतील विषय विवेचनासाठी जैन, बौद्ध व ग्रीक लोकांचे प्राचीन इतिहास ग्रंथ यांचाही आधार घेतलेला दिसतो. ग्रंथारंभी महाभारताच्या मुंबईकडील दोन व कुंभकोणमची एक या प्रतीची श्लोकसंख्या दिली असून त्यांपैकी मुंबईकडील दोन प्रतींचा आधार या ग्रंथासाठी ग्राह्य धरला आहे.

महाभारताचे सार व विषय समजावून घेण्याच्या दृष्टीने उपयुक्त ग्रंथ.

यशवंत चव्हाण

**श्रीसमर्थचरित्र : आळतेकर, सदाशिव खंडो. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९३३.** श्री. सदाशिव खंडो आळतेकर यांच्या या चरित्रग्रंथामध्ये पूर्वपरंपरा आणि वरदान, जन्म व बालपण, तपश्चर्या आणि तीर्थयात्रा, उत्तरार्धातील संचार व धर्मचालना, समर्थांची वाङ्मयसंपदा, समर्थ संप्रदाय, शिव-समर्थ संबंध आणि समर्थांचे राजकारण इ. प्रकरणांमधून श्रीसमर्थ चरित्राचा विचार केला आहे. समर्थांच्या ग्रंथातील व चरित्रातील रहस्य समजावून घेऊन त्याप्रमाणे सावधपणे व साक्षेपाने कृती करून राष्ट्राची सर्वांगीण उन्नती करावी हा या चरित्रामागील हेतू स्पष्ट केला आहे.

समर्थांनी सांगितलेला तत्त्वविचार, प्रयत्नवाद यांवर भर देऊन लेखकाने अत्यंत चिकित्सकपणे व अभ्यासपूर्ण असे हे चरित्र लिहिलेले आहे.

सुधा कापरे

**सगनभाऊकृत लावण्या व पवाडे : प्रकाशक : गो. गो. अधिकारी, पुणे, १९२४.** गो. गो. अधिकारी यांनी 'सारस्वत प्रसारक मंडळीकरिता प्रकाशित केलेल्या 'सगनभाऊ कृत लावण्या व पवाडे' या पुस्तकात मराठी, हिन्दी लावण्या आणि 'पानपताचा पवाडा', 'खडकीची लढाई व 'प्रतापसिंह महाराजांवर पोवाडा' हे तीन पोवाडे आहेत. सगनभाऊ ह्या शाहिराबद्दल फारशी विश्वसनीय माहिती उपलब्ध नाही. शिकलगार असलेल्या जेजुरी गावच्या सगनभाऊचे वास्तव्य पुण्यात असे. 'होना गवळ्याचा झाला चुना', असे घमेंडखोरपणे म्हणणाऱ्या सगनभाऊने शेवटच्या बाजीरावाची कारकीर्द पाहिली होती. अश्लीलतेकडे झुकलेल्या लावण्या आणि थरारून सोडणारे वीरश्रीयुक्त पोवाडे अशी दोन्ही प्रकारांतली रचना सगनभाऊने केली. सगनभाऊच्या लावण्यांतील नायिका स्वारीवर केलेल्या पतीच्या सहवासासाठी आतुर झालेल्या आहेत. त्या शृंगारनिपुण, धीड आणि लडिवाळ आहेत. वीरही नायिकांचे वर्णन करणारा सगनभाऊ आपल्या काव्यात विविध रंगांची उधळण करतो. त्याला कल्पकतेची देणगीही मिळाली आहे. 'येऊद्या माझी करुणा पाव गिरिजापति भगवान' या शब्दांत सगनभाऊची एखादी नायिका परमेश्वराची आळवणीही करते. 'चंद्राचें चांदणें सितळ कां ऊष्ण प्राणपती ते सांगा मजप्रती कल्पना डोळ्यांमधिं खुपती', हा मुखडा असलेली सगनभाऊची लावणी महाराष्ट्रात खूप लोकप्रिय झालेली लावणी आहे. 'पानपताचा पवाडा' ह्या पवाड्यात सगनभाऊने पानपतावर झालेल्या भाऊसाहेब पेशव्यांच्या पराभवाचे प्रत्ययकारी वर्णन केले आहे. 'महाराष्ट्रातल्या अनेक सरदारांची नावनिशीवार यादी, शस्त्रसंभाराची माहिती, भाऊसाहेब पेशव्यांचे जिद्दी स्वभावाचे रेखाटन ही पानपतावरील पोवाड्याची ठळक वैशिष्ट्ये आहेत. 'द:खनची सौभाग्य गळसरी तुटली', 'गगनि झाकले चंद्रसूर्य पडला अंधकार', 'नवलाख बं.डी फुटली', 'सोन्याची जळली भट्टी उरले खापर' अशा परिणामकारक शब्द योजनेमधून सगनभाऊने पोवाड्याची परिणामकारकता वाढविली आहे. शृंगारिक भावना नि अश्लीलतेचे दर्शन घडविणाऱ्या लावण्या आणि वीररसप्रधान पोवाडे लिहिणारा सगनभाऊ हा मराठी शाहिरी परंपरेत स्वत:चे विशिष्ट स्थान असलेला एक महत्त्वाचा शाहिर आहे.

वि. शं. चौघुले

**संगीत आत्मतेज (द्रौपदीवस्त्रहरण) : बाभणगावकर, ना. रा. प्रकाशक : रा. द. पराडकर, पुणे १९२०.** नारायण रामलिंग बाभणगावकरांचे 'आत्मतेज' हे नाटक म्हणजे त्यांनी 'सतीप्रभाव' या शीर्षकाखाली लिहायला घेतलेल्या नाटकाचे सिद्धरुप आहे. कथानकाची दुहेरी वीण, परकीयांच्या द्वेषाचा अविष्कार, गंभीर व विनोदी प्रसंगांची एकाआड एक अशी केलेली मांडणी ही प्रस्तुत नाटकाची वैशिष्ट्ये आहेत. काकासाहेब खाडिलकरांनी लिहिलेल्या नाटकाच्या प्रभावाखालील 'आत्मतेज' नाटकात द्रौपदीच्या विटंबनेतून उफाळून आलेले आत्मतेज प्रकट झाले आहे.

तारा भवाळकर

**संगीत गुप्तमंजूष : कोल्हटकर, श्रीपाद कृष्ण. प्रकाशक : गजानन चिंतामण देव, १९०३.** श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे हे नाटक. ' गुप्तमंजूष ' नाटकाचे कथानक रहस्यमय असून वेषांतर, नामांतर, प्रतिज्ञा इत्यादींचा यात अंतर्भाव असून स्त्रीशिक्षणाचा प्रचार हा एक दुय्यम हेतू आहे. 'गुप्तमंजूष ' नाटकात नवऱ्याला व मुलीला टाकून जाणारी प्रौढ राणी, रुग्णमार्जार औषधाने राजाचा प्राण घेऊ इच्छिणारा विद्वान खलपुरुष. भविष्यामुळे बापापासून दूर ठेवलेला राजपुत्र, पुरुष वेषात आपल्या मुलीशी प्रणय करणारी आई या सर्वच गोष्टी सुरस आणि चमत्कारिक आहेत.अद्‌भुतरम्यतेचे रूपांतर कृत्रिमतेत किती लवकर होते याचा पुरावा म्हणजे 'गुप्तमंजूष' नाटक. 'स्वकपोलकल्पित' आणि काव्यात्म नाटक म्हणून श्रीपाद कृष्णांच्या नाटकातले प्रातिनिधिक नाटक असा याचा निर्देश करता येईल.

केतकी कुलकर्णी

**संगीत चंद्रग्रहण : टिपणीस, यशवंत नारायण. प्रकाशक : एम. व्ही. आगाशे, पुणे, दुसरी आवृत्ती, १९२०.** विजापूरच्या बादशहाशी एकनिष्ठ असलेल्या जगदेवराव सरदाराला शिवाजीने आपलासा करून, स्वराज्य निर्मितीच्या कार्याला अनुकूल कसा करून घेतला यावर कथानक रचून यशवंत नारायण टिपणीस यांनी हे नाटक लिहिले आहे. शिवाजीची व्यक्तिरेखा उदात्त. तत्कालीन वातावरण निर्मितीसाठी हेर, चोर दरवाजे, वेषांतर यांचा उपयोग. ऐतिहासिक व काल्पनिक व्यक्तिरेखांची निर्मिती. नाटकाच्या पहिल्या आवृत्तीत संगीत नव्हते. रंजक मांडणीचे सुखपर्यवसायी ऐतिहासिक नाटक.

वीणा देव

**संगीत दामिनी : पेडणेकर, हिराबाई. प्रकाशक : हिराबाई पेडणेकर, कर्नाटक प्रेस, मुंबई, १९१२.** हिराबाई पेडणेकर या श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या शिष्या. त्यांच्या या नाटकालाही कोल्हटकरप्रणीत कल्पनारम्य सुखांतिकेचे रूप प्राप्त झालेले दिसते. गुंतागुंतीचे, रहस्यपूर्ण, उत्कंठावर्धक कथानक असलेल्या या नाटकाचा उद्देश दंभस्फोट करणे हा आहे. समाज आंधळ्या भक्तीने साधुवेषधाऱ्यांच्या भजनी लागतो आणि त्याचा फायदा संधीसाधू उठवितात असा धोक्याचा इशारा या नाटकाने कल्पकतेने दिला आहे. नाटकात एकूण ७२ पदे असून ती सुश्लिष्ट, सुबोध व प्रासादिक आहेत. लेखिका संगीताची विशेष जाणकार असल्याने तिची पदरचना लक्षणीय स्वरूपाची आहे. १९०८ मध्ये किर्लोस्कर नाटकमंडळीने हे नाटक रंगभूमीवर आणले.

भीमराव कुलकर्णी

**संगीत नंदकुमार : गुर्जर, वि. सी. प्रकाशक : तुकाराम गणपत धामणकर, १९३०.** विठ्ठल सीताराम गुर्जर यांचे एके काळी प्रयोगदृष्ट्या गाजलेले लोकप्रिय नाटक.

नंदकुमार नामक सच्छील राजपुत्राला सावत्र माता सुमती हिच्याकडून सहन कराव्या लागणाऱ्या छळाची आणि तिची कारस्थाने उघडकीस येऊन सद्‌गुणी व्यक्तींना मिळालेल्या न्यायाची ही नाट्यरूप कहाणी, राजपुत्राबरोबर त्याच्या आईचा, इंदुमतीचाही काळ होतो. काळ्या-पांढऱ्या रंगात रंगविलेली सुष्ट-दुष्ट पात्रे, राजघराण्यातील सापत्नभाव, वृद्ध राजा व तरुण सुंदर बायका त्यामुळे होणारा व्यभिचार इ. अनेक गुंतागुंती व घोटाळे नाटकात असून शेवट सुखपर्यवासी आहे.

हे घटनाप्रधान गद्य नाटक असून राज्य बहिष्कृत प्रधान व राजपुत्र यांनी राज्यावरील परचक्र थोपवून महत्त्वकांक्षी राणीचा दुष्टपणा उघड करणे इ. गोष्टी 'मॅक्बेथ' च्या प्रभावातून आलेल्या दिसतात.

तारा भवाळकर

**संगीत पट—वर्धन : टेंबे, गोविंद सदाशिव. प्रकाशक : गो. स. टेंबे, रामकृष्ण प्रेस, मुंबई,१९२४.** महाभारतातील द्रौपदीवस्त्रहरणाच्या प्रसंगावर आधारित असे हे नाटक आहे. द्रौपदीवस्त्रहरण प्रसंगामागील कारणाचा शोध घेण्याच्या निमित्ताने स्वदेशी वस्त्रांचा वापर करण्याची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. स्वकालीन विषयांचा संबंध पौराणिक कथेशी जोडण्याच हव्यासातून नाटकात कृत्रिमता आल्याचे जाणवते. ' तारिणी नववसन धारिणी ', 'मधुसूदना हे माधवा ', ' शांतवा हो मानसा ' अशी लोकप्रिय पदे हेच नाटकाचे खरे बलस्थान. संगीतकार टेंब्यांचे त्याकाळी गाजलेले हे नाटक होय.

वसंत नरहर कुबेर

**संगीत ब्रह्मकुमारी : बेडेकर, विश्वनाथ (विश्राम) चिंतामण. प्रकाशक : हरी विष्णू मोटे, पुणे, १९३३.** विश्वनाथ चिंतामण ऊर्फ विश्राम बेडेकर यांनी पारंपरिक पौराणिक कथेच्या आवरणाखाली समकालीन ज्वलंत सामाजिक समस्यांचे प्रभावी व कलात्मक दर्शन घडविणारे हे नाटक लिहिले आहे. अहल्या-गौतम आणि इंद्र यांच्या प्रमुख कहाणीला तारा-बृहस्पती आणि चंद्र यांच्या विरोधी जोडकथानकामुळे उठाव व नाट्यपूर्णता लाभली आहे.विवाह संबंधात स्त्री-पुरुष विषयक भिन्न कसोट्यांमुळे स्त्रियांवर सतत अन्यायच होत राहिला आहे.

पतिव्रत्य, सतीत्व, शील या भ्रामक कल्पनांमुळे स्त्रीचे सत्त्व आणि पुरुषाची न्यायी वृत्ती यांचा लोप झाल्याने मुळातच गल्लत झाली असल्याची विवेचक मांडणी लेखकाने केली आहे. तारेच्या परखड उत्तरातून स्त्रीविषयक समस्येसंबंधी एक दुर्लक्षित विचार नव्याने दृष्टिपथात येतो.

तारा भवाळकर

**संगीत मतिविकार : कोल्हटकर, श्रीपाद कृष्ण. प्रकाशक : मॉडर्न बुक डेपो, पुणे.** श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे हे नाटक किर्लोस्कर नाटक मंडळीच्या रंगभूमीवर आले. बक्षीस लावून मागविलेल्या नाट्यकृतींतून हे नाटक निवडले.

कोल्हटकरांनी खऱ्याखुऱ्या सामाजिक कथानकाला व प्रश्नाला या नाटकात हात घातला आहे. चकोरासारख्या जपानहून परत आलेल्या तरुणाने चंद्रिकेची भेट घेण्याकरिता बैराग्याच्या वेषाने तिच्या घरी जाणे वा तरंगिणीने कल्याणी नावाने बुरख्यात मनोहरच्या आश्रमात राहणे या गोष्टी वास्तव वाटत नाहीत. पण चटकदार कथानक, सुंदर संवाद व कल्पनायुक्त पद्ये इ. गुणांमुळे हे नाटक गाजले. या नाटकात चकोर, चंद्रिका, सरस्वती, आनंदराव इत्यादी समकालीन मध्यमवर्गीय पात्रांद्वारा पुनर्विवाहाचा प्रश्न मांडला असून, विषम-विवाह, केशवपन, भ्रूणहत्या इ. सामाजिक प्रश्नांचाही ओघाने समावेश केला आहे.

केतकी कुलकर्णी

**संगीत मानापमान : खाडिलकर, कृष्णाजी प्रभाकर. प्रकाशक : यशवंत कृष्ण खाडिलकर, मुंबई १९११.** कृष्णाजी प्रभाकर खाडिलकरांचे पहिले संगीत नाटक. पाच अंकी कल्पनारम्य सुखात्मिका. कर्तृत्वाने सेनापतीपद मिळविणाऱ्या स्वाभिमानी, तडफदार अशा धैर्यधराची आणि श्रीमंतीच्या कैफामुळे गरिबांना कस्पटासमान लेखणारी भामिनी हिच्या मानसिक परिवर्तनाची शृंगारप्रधान कथा. धैर्यधर-भामिनी याखेरीज लक्ष्मीधर-विलासधर इ. अन्य व्यक्तिरेखा. शृंगार, वीर व हास्यरसांचा परिपोष. शूरा मी वंदिले, मला मदन भासे इत्यादी अनेक पदे श्रुतिसुभग रंगभूमीवर नव्या प्रकारच्या संगीतामुळे गाजले.

ग. ना. जोगळेकर

**संगीत मूकनायक : कोल्हटकर, श्रीपाद कृष्ण. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, १९०३.** श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे 'मूकनायक' हे नाटक मद्यपान निषेध या विषयावरील आहे. ते प्रथम विविधज्ञानविस्तारातून प्रसिद्ध झाले. 'मूकनायक' नाटकाची सुरुवात एकाच वेळी सारी स्त्री पात्रं एकत्र आणून केली व त्या पात्रांच्या भाषणातून मोठ्या कौशल्याने या नाटकाच्या विषयाचा म्हणजे मद्यपान निषेधाचा प्रस्ताव केला.

या नाटकात रोहिणी ही गृहिणी तशीच प्रेमळ भावजय आहे. सरोजिनी ही बुद्धिप्रधान, प्रेमळ तितकीच कठोर नणंद आहे. रोहिणीच्या स्वभावधर्माला अनुसरून भजनी ढंगाच्या जुन्या थाटाच्या पदांची योजना करून लेखकाने तिच्या स्वभाव रेखाटनाला उठाव आणला आहे. रंगभूमीच्या द्वारे राजकीय प्रश्नाला लोकांपुढे मांडण्याचा प्रयत्न नाटकातून केलेला दिसतो.

केतकी कुलकर्णी

**संगीत मृच्छकटिक : भाषांतरकार गोडबोले, परशुरामपंत. प्रकाशक : सेंट्रल बुक डेपो, मुंबई, १८६२.** शुद्रक राजाने लिहिलेल्या मूळ संस्कृत नाटकाचे हे परशुरामपंत गोडबोले यांनी केलेले मराठी भाषांतर गुणवान. परंतु परिस्थितीने दारिद्र्य प्राप्त झालेला चारूदत्त आणि रूपगुणसंपन्न गणिका वसंतसेना यांची प्रणयरम्य प्रेमकथा हा नाटकाचा मुख्य विषय. याखेरीज व्यावहारिक दुष्टता, राजकारण व खलस्वभावी व्यक्तींची चित्रणे या नाटकात रेखाटली आहेत. नाटकाचे मूळ दशांकी स्वरूप भाषांतरकर्त्याने कायम ठेवले असून गद्य संवाद व पद्य श्लोक, आर्या, कटाव यांचा प्रासादिक रसाळ अनुवाद केला आहे. मात्र प्रायोगिक दृष्टीचा येथे अभाव जाणवतो.

वसंत नरहर कुबेर

**संगीत रणदुंदुभी : जोशी, वीर वामनराव. प्रकाशक : बलवंत पुस्तक भांडार, मुंबई, १९२७.** वीर वामनराव जोशी यांचे मराठी रंगभूमीवर गाजलेल्या नाटकांपैकी एक महत्त्वाचे नाटक मा. दीनानाथ यांच्या 'बलवंत संगीत मंडळीं' ने रंगभूमीवर प्रयोगित केले. महाराष्ट्रात आणि गोवा आदी भागात त्या काळात अतिशय गाजलेले नाटक. त्यातल्या संगीतामुळे आणि प्रभावी व्यक्तिरेखन, नाट्यभाषा यामुळे हे यशस्वी ठरले.

कदंबाधिपती कंदर्प एक विलासी राजा. त्याचा मातंग देशातील राजांशी राज्याबद्दल झालेला तह. सौदामिनीचा कदंबाच्या योजनेस स्वार्थासाठी पाठिंबा. तितकाच तेजस्वी तिचा प्रखर विरोध, तिला झालेली शिक्षा, कदंब आणि मातंग यांच्यात युद्ध. ह्या सगळ्यातून नाट्य उभे राहते. एक काल्पनिक ऐतिहासिक नाटक, उत्तम संवाद, श्रवणीय संगीत यामुळे नाटक लोकप्रिय. मराठी नाटकाच्या श्रेयनामावलीत या नाटकाचे प्रयोगमूल्य विशेष मानले जाते.

वि. भा. देशपांडे

**संगीत रणरागिणी : गुप्ते, शां. गो. प्रकाशक : न. रा. जोशी, मुंबई, १९२३.** गडकऱ्यांनंतरच्या पिढीतील नाटककार शां. गो. गुप्ते यांचे झाशीच्या राणीवरील ऐतिहासिक नाटक. राणीबद्दल आवेशपूर्ण रितीने लिहिण्यापेक्षा एका कोमल विचाराच्या स्त्रीच्या ठिकाणी कर्तव्याच्या आचेमुळे निर्माण झालेली न्यायनिष्ठुरता रंगविण्याकडे नाटककाराचे लक्ष आहे. अशा विषयावर लिहिल्या जाणाऱ्या नाटकापेक्षा काहीतरी नावीन्यपूर्ण सूचक लिहिण्याची ऊर्मी गुप्ते यांच्यात दिसते. माफक कल्पनाविलास, आटोपशीर मांडणी, सुटसुटीत पदे यांच्यामुळे नाटक लोकप्रिय झालेले दिसते. झाशीच्या राणीच्या भाषेवर टिळकप्रणीत देशस्वातंत्र्याची भावना चेतविण्याची धाटणी उमटलेली दिसते. ती सहन न होऊन परकीय सरकारने या नाटकावर बंदी घालून त्याची मुस्कटदाबी केली. स्वातंत्र्योत्तर काळात हे नाटक या आपत्तीतून मुक्त झाले.

भीमराव कुलकर्णी

**संगीत राक्षसी महत्त्वाकांक्षा : जोशी, वीर वामनराव. वामन गोपाळ जोशी ऊर्फ वीर वामनराव जोशी, आवृत्ती पहिली, १९१४.** वीर वामनराव जोशी यांचे हे पहिले नाटक. या पहिल्याच नाटकाने त्यांना नाटककार म्हणून मान्यता. या नाटकाची कल्पना त्यांना 'खूबसूरत बला' या उर्दू नाटकावरून सुचली. उर्दू नाटकातील 'वफादा' च्या तत्त्वाला मध्यवर्ती ठेवून राक्षसी महत्त्वाकांक्षा श्रेष्ठ की दैवी महत्त्वाकांक्षा श्रेष्ठ हे सूत्र या नाटकात स्वतंत्रपणाने मांडले. ललितकलादर्श नाटक मंडळी या संस्थेने हे नाटक रंगभूमीवर आणून लोकप्रिय केले. हे एक काल्पनिक इतिहासकालीन नाटक. भाषा, वातावरण त्या पद्धतीचे राणी मदालसा ही महत्त्वाची व्यक्तिरेखा. ही उन्मत्त, महत्त्वाकांक्षी राणी. आपल्या राज्याबरोबरच इतरांची राज्ये काबीज करावीत आणि सत्तेचा उपभोग घ्यावा ही तिची आसुरी महत्त्वाकांक्षा. तिच्या विरोधात राजा चंद्रशेखर आणि राजा विक्रांत. त्यांच्या संघर्षातून नाट्य उभे राहते. अतिभडक जातीचे हे नाटक. व्यक्तीरेखनही त्याच अंगाने झालेले तरीही नाट्यसंघर्षाला अनुकूल प्रसंग, पल्लेदार नाट्यसंवाद यामुळे प्रभावी प्रयोगदर्शन.

वि. भा. देशपांडे

**संगीत वधूपरीक्षा : कोल्हटकर, श्रीपाद कृष्ण. प्रकाशक : व्यंकटेश बळवंत पेंढारकर, लीलावती छापखाना, मुंबई, १९२८.** गद्यस्वरूपात रंगभूमीवर आलेले आणि सन १९२३ मध्ये संगीत स्वरूपात सादर झालेले कोल्हटकरांचे हे पहिले नाटक. अनुलोमविवाहावर आधारित असलेल्या या नाटकात बालविवाह, विषम विवाह आणि जातीभेदासंबंधी विचार आले आहेत. अतिशय गुंतागुंतीचे कथानक असून देखील घटना व पात्रांची योग्य सांगड घालून कथानकाची उकळ मोठ्या कौशल्याने केली आहे. पुरुष पात्रांपेक्षा स्त्रीपात्रे अधिक उठावदार आहेत. चटकदार व कोटीबाज संवादांनी रंगत वाढते. यातील भाषा सुंदर, सुसंस्कृत बनली आहे. नाटकातील पदे अर्थवाही. प्रासादिक आहेत. एकदा बंद पडून दीड-पावणेदोन तपांनी पुनर्जन्माचे भाग्य लाभलेले आणि कोल्हटकरी प्रतिभेतील गुण-दोषांचा एकत्र प्रत्यय देणारे चांगले नाटक म्हणून महत्त्वाचे.

**संगीत विद्याहरण : खाडिलकर, कृष्णाजी प्रभाकर. प्रकाशक : शं. न. जोशी, चित्रशाळा प्रेस, पुणे १९१३.** कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांचे महाभारतातील कच देवयानी आख्यानावर आधारलेले तीन अंकी पौराणिक संगीत नाटक. दैत्यगुरू शुक्राचार्य यांच्याकडील संजीवनी विद्या बृहस्पतीपुत्र कचास कशी प्राप्त होते हा मुख्य कथाभाग.

दारूच्या व्यसनाने सर्वनाश कसा होतो हे प्रेक्षकांच्या मनावर ठसविण्याचा खाडिलकरांचा हेतू. कच हा आदर्श ध्येयनिष्ठ विद्यार्थी, देवयानी ही निग्रही प्रेयसी आणि शुक्राचार्य हा व्यसनाधीनतेमुळे पराभूत झालेला तपस्वी या मुख्य व्यक्ती रेखा, शिष्यवर हे विनोदी पात्र पौराणिक कथानकाला वर्तमानकालीन संदर्भ देणारे हेतुपूर्ण नाटक. मधुकर बनवन, मधुमधुरा तव गिरा, सुरसुखखानि तू, विमला इ. काही पदे लालित्यपूर्ण.

गं. ना. जोगळेकर

**संगीत वीरतनय : कोल्हटकर, श्रीपाद कृष्ण. प्रकाशक : निर्णयसागर प्रकाशन, मुंबई १८९६.** शृंगाररसाबरोबर वीररसाचा परिपोष करावा आणि नवीन चालींची पदे प्रचारात आणावी या हेतूने श्री. कृ. कोल्हटकरांनी हे नाटक लिहिले. 'बकुल' या वीरपुत्राच्या शौर्यामुळे त्याचा पिता शूरसेन व प्रिया शालिनी यांचे होणारे मीलन हा प्रस्तुत नाटकाचा विषय. नाट्यतंत्रदृष्ट्या अनेक दोषांनी मुक्त असून देखील सामाजिक भावनाप्रधान नाटकांना कंटाळलेल्या प्रेक्षकांनी काल्पनिक कथानकांच्या या नाटकाचे चांगले स्वागत केले. या नाटकातून शब्दनिष्ठा विनोदाला सुरुवात झाली असली तरीही त्यात चमक नाही. मुख्यतः गुजराथी, पारशी नाटकातील चालींचा पदांसाठी केलेला वापर आणि त्यात मिळालेले यश हे या नाटकाचे वैशिष्ट्य.

वसंत नरहर कुबेर

**संगीत वीरवचन : अत्रे, प्रल्हाद केशव. प्रकाशक : रामकृष्ण प्रिंटीस, मुंबई १९३२.** आचार्य अत्र्यांनी आपल्या उमेदवारीच्या काळात, शालेय विद्यार्थ्यांसाठी लिहिलेले ऐतिहासिक नाटक. मराठ्यांच्या इतिहासातील कुंभेरीच्या वेढ्याच्या रोमहर्षक प्रसंगावरचे हे नाटक असून प्रयोग व परिणाम लक्षात घेऊन मूळ ऐतिहासिक कथेत लेखकाने अनेक बदल करून ऐतिहासिक घटनांना मनोरंजनाची जोड दिली आहे. भाषाशैलीवर गडकऱ्यांची छाप स्पष्ट दिसते. नाटकातील पदे तत्कालीन लोकप्रिय पदांच्या चालीवर आधारित आहेत. नाटककार अत्र्यांची जडणघडण चालू असता त्यांचा आत्मविश्वास वाढविण्यास उपयुक्त ठरलेले नाटक म्हणून महत्त्वपूर्ण.

वसंत नरहर कुबेर

**संगीत शहाशिवाजी : टिपणीस, यशवंत नारायण. प्रकाशक : इंदुप्रकाश छापखाना, मुंबई, शिवशक २४७.** यशवंत नारायण टिपणीस यांचे ऐतिहासिक गद्यपद्यात्मक नाटक. आपले स्वराज्य निर्मितीचे अपुरे स्वप्न आपला पुत्र पूर्ण करताना पाहून शहाजी सुखावलेला. विजापूरच्या बादशाहाशी एकनिष्ठ असूनही, शिवाजीशी झालेल्या पहिल्या भेटीत, स्वराज्य निर्मितीच्या कार्यावरील निष्ठेबाबत शिवाजीची परीक्षा घेतो आणि संतुष्ट होतो. विजापूरचे बोलावणे येताच शिवाजीचा विरोध न जुमानता तो जातो. शहाजीशी बाजी घोरपडे कपट करतो व त्यास कैद होते. ह्या प्रसंगातून शहाजीची सुटका शिवाजी आणि सईबाई यांच्या मुत्सद्देगिरीने व शिपाईगिरीने होते.

दोन वेगळ्या निष्ठा जपणाऱ्या पिता-पुत्रांची ही कथा आहे. यामध्ये काही शूर, स्वाभिमानी, राष्ट्रभक्त आणि काही

स्वाभिमानशून्य राष्ट्रद्रोही पात्रांची योजना करून नाटककाराने प्रेक्षकांच्या मनाची पकड घेईल असे नाट्य उभे केले आहे.

वीणा देव

**संगीत शारदा नाटक : देवल, गोविंद बल्लाळ. प्रकाशक : रामचंद्र गोविंद देवल, सांगली,१८९९.** श्री. गोविंद बल्लाळ देवल हे नामवंत नाटककार. त्यांची एकूण आठ नाटके प्रसिद्ध आहेत. यांपैकी सात नाटके इंग्रजी अथवा संस्कृत नाटकांवर आधारित असून संगीत शारदा हेच एक त्यांचे स्वतंत्र नाटक आहे. श्री. देवल हे श्री. अण्णासाहेब किर्लोस्करांचे शिष्य तसेच नाट्य दिग्दर्शकही होते. त्यांच्या नाट्यरचना स्वतंत्र नसल्या तरी त्यामध्ये रचना कौशल्य दिसते. 'बालजरठ विवाह' या दुर्दैवी सामाजिक रूढी विरुद्ध, चिरंतन मूल्य लाभलेले संगीत शारदा हे स्वतंत्र सामाजिक नाटक. हे पहिले सामाजिक स्वतंत्र नाटक, असल्याने त्यांना या एकाच नाटकाने सामाजिक नाट्याचे जनकत्त्व बहाल केले.

या नाटकातील प्रमुख पात्रे : भुजंगनाथ (जराग्रस्त परंतु विवाहासाठी उत्सुक श्रीमंत),भद्रेश्वरशास्त्री (विवाह जुळविणारा मध्यस्थ कांचनभट (शारदाचे वडील, धनलोभी भिक्षुक), कादंड (शंकराचार्यांचा शिष्य. हिरण्यगर्भ (कोदंडाचा स्नेही), शारदा (नायिका), इंदिराबाई (शारदेची आई), जयंत (शारदेचा लहान भाऊ), वल्लरी, जान्हवी (शारदेच्या मैत्रिणी)

श्रीमंत भुजंगनाथ हा पंचाहत्तर वर्षाचा वृद्ध गृहस्थ. या वयातही त्याची लग्न करण्याची इच्छा असते. कांचनभट या लोभी भिक्षुकाच्या तरुण कन्येबरोबर भद्रेश्वरशास्त्री हा विवाह जुळविणारा धूर्त गृहस्थ, शारदेचे लग्न भुजंगनाथाशी ठरवितो. धनाच्या लोभाने या भिक्षुकाने या लग्नाला संमती दिली आहे. कोदंड या श्रीमंत शंकराचार्यांच्या शिष्याला ही बातमी लागते. भद्रेश्वराला या विवाहात कोदंड हा अडसर ठरणार याची कल्पना येते. तो कोदंडाला कोंडून ठेवतो. हिरण्यगर्भ हा कोदंडाचा स्नेही त्याची सुटका करतो व कोदंड हा विवाह मोडण्यात यशस्वी होतो. हा विवाह मोडल्याने शारदा आनंदी होते पण यानंतर आपल्याशी कोण विवाह करणार या भीतीने आत्महत्या करण्याचा प्रयत्न करते. पण श्रीमंत शंकरचार्यांच्या आशीर्वादाने कोदंड शारदा यांचा विवाह होतो आणि भुजंगनाथ संन्यास स्वीकारतात.

गद्य आणि पद्य या दोन्हींवरही प्रभुत्व असलेली श्री. देवलांची साधी आकर्षक भाषा, भावपूर्ण आणि कलापूर्ण स्वभाव रेखाटन,शुद्ध कथानक ही नाटकाची वैशिष्ट्ये.लग्नाचे वय झालेल्या परंतु परस्वाधीन,अगतिक वधू त्यांचेवर असलेले संस्कार आणि समाजाचे दडपण ही परिस्थिती आजही तशीच आहे. आपल्या वडिलांना उद्देशून शारदेने म्हटलेले पद, ' यमपाश गळ्याशी ज्यास लागला, त्यांस मला कां देता ? आणि 'मूर्तिमंत भीती उभी मजसमोर राहिली ' ही गाजलेली पदे.

**संगीत शिक्काकट्यार : टिपणीस यशवंत नारायण. प्रकाशक : बलवंत पुस्तक भांडार, मुंबई १९५०.** यशवंत नारायण टिपणीस यांचे हे नाटक प्रथम १९१८ मध्ये ' राज्यारोहण ' नावाने आर्यावर्त नाटक मंडळीने रंगभूमीवर आणले. नंतर १९२७ साली ललितकलादर्श मंडळीने ' शिक्काकट्यार' या नावाने रंगभूमीवर सादर केले.

मोगलांच्या कैदेतून सुटलेला संभाजी पुत्र शाहू आपले राज्य परत मिळवू पाहत असताना राजारामाची पत्नी ताराबाईकडून विरोध होतो. ताराबाईही आपला वेडसर पुत्र शिवाजी ह्यालाच राज्यावर बसविण्याची स्वप्ने पाहते. शाहूला तोतया ठरवू पाहते. परंतु खंडोबल्लाळ, धनाजी जाधव हे शाहूपाशी एकनिष्ठ असतात. शिर्के यांची राजकुंवर शाहूवर प्रेम करते व शाहूला मदत करते. अखेर शाहूला राज्य मिळते आणि पत्नीही मिळते.

असे नाट्यमय घटनांनी नाटक रंगतदार झाले आहे.

वीणा देव

**संगीत संतसखूबाई : आपटे, हरी नारायण. प्रकाशक : अ. वि. पटवर्धन, आर्यभूषण, पुणे १९११.** हरी नारायण आपटे यांचे हे नाटक १९११ सालच्या ' करमणूक ' नियत-कालिकाच्या वासंतिक अंकात प्रसिद्ध झाले. नाट्यकला प्रवर्तक मंडळींच्या विनंतीवरून, त्याच्यात योग्य ते फेरफार करून, ते प्रयोगक्षम करण्यात आले. मूळ श्राव्य नाटकातील अभंगाबरोबर काही पदेही रचून नंतर त्याला संगीत नाटकाचे स्वरूप देण्यात आले. यातील पदे कृष्णाजीपंत महेश्वरकर यांची. नाटकाचा पहिला प्रयोग २६ ऑगस्ट १९११ रोजी पुण्याच्या विजयानंद थिएटरमध्ये झाला. दैवी चमत्कारयुक्त आणि भक्तिरसप्रधान असल्याने हे नाटक लोकप्रिय झाले.

वसुंधरा बनहट्टी

**संगीत सत्यविजय : पाटणकर, माधव नारायण. प्रकाशक : रा. ब. साठे, १८९५.** हिंदी भाषेमध्ये " आस का बाप। निरास की मा। होते की बहेन.... " असा एक दोहा आहे. त्या दोह्यामध्ये व्यक्त झालेला आशय, एका सावकारपुत्राला एक लाख रुपयांच्या बदल्यात अनुभवावा लागला हा नाट्यकथेचा विषय. एकापुढे एक अशा प्रसंगाची बाळबोध पण वेधक अशी मांडणी. किर्लोस्कर पद्धतीच्या सुबोध, भरपूर पदांमुळे एका काळी हे नाटक विलक्षण लोकप्रिय झाले होते. केवळ रंजनापेक्षा नीतिबोध, हसविण्याचा प्रयत्न. संवाद घरगुती स्वरुपाचे. व्यक्तिदर्शन ठसठशीत संगीत योजना किर्लोस्कर नाटाकांना अनुसरणारी असे या नाटकाचे स्वरूप आहे.

मु. श्री. कानडे

**संगीत सोन्याचा कळस : वरेरकर, भार्गवराव विठ्ठल. प्रकाशक : माई वरेरकर, मुंबई १९३२.** भार्गवराव विठ्ठल वरेरकरांच्या ' धावता धोटा ' या कादंबरीवर आधारित हे गद्यपद्यमय नाटक. भांडवलदार आणि मजूर यांच्यातील संघर्ष दाखविणाऱ्या नाटकांपैकी एक. कापड गिरणीतील कामगारांचे प्रश्न या नाटकातून मांडले असून "मराठ्यांच डोकं आणि गुजरात्याचा खिसा" एक झाला तर मुंबईच्या धुरकटलेल्या

वातावरणावर सोन्याचा कळस चढेल, असा निष्कर्ष काढला आहे. आधुनिक समाजव्यवस्थेतील उणिवा दाखविण्याचा प्रयत्न करणाऱ्या वरेरकरांना वास्तवाशी सुसंगत मांडणी करण्यात अपयश आले असले तरी विषयाच्या नावीन्यामुळे या नाटकाचे महत्त्व आहे.

वसंत नरहर कुबेर

**संगीत सौभद्र : किर्लोस्कर, बळवंत तथा अण्णासाहेब पांडुरंग. प्रकाशक : आर्यभूषण छापखाना, पुणे, १९२७.** अण्णासाहेब किर्लोस्करांचे 'संगीत सौभद्र' हे अत्यंत यशस्वी आणि लोकप्रिय नाटक होय. संगीत नाटकांची गोडी महाराष्ट्राला लावण्याचे श्रेय अण्णासाहेबांना आणि 'संगीत सौभद्र' या त्यांच्या नाटकाला द्यावे लागते.

१८४३ साली विष्णुदास भावे यांच्या 'सीता स्वयंवर' या नाटकाने मराठी रंगभूमीवर नाटकांची सुरुवात झाली असली तरी अण्णासाहेबांच्या ' संगीत शांकुंतल ' आणि ' संगीत सौभद्र ' ने खऱ्या अर्थाने मराठी नाटकांची सुरुवात झाली असे म्हणावे लागते. सुरुवातीला (१८ नोव्हेंबर १८८२) तीन अंकात नाटकाचे सादरीकरण केले जात असे, मात्र मार्च, १८८३ मध्ये पाच अंकात ' सौभद्र ' सादर केले जाऊ लागले.

महाभारतातील आणि भागवतातील 'सुभद्राहरणा च्या कथेवर आधारित असलेली या नाटकाची कथा अण्णासाहेबांनी आपल्या प्रतिभेच्या जोरावर अनेक बदल करून विरही प्रेमीजनांच्या कथेच्या स्वरूपात मांडली. त्यात अनेक अवीट गोडीची पदे असल्यामुळे या नाटकाचे प्रयोग पाहण्यासाठी लोकांच्या झुंडीच्या झुंडी नाट्यगृहावर लोटू लागल्या आणि त्यातली पदे अबालवृद्धांच्या तोंडी झाली. अशी ही मोहिनी प्रस्तुत नाटकाने अद्याप टिकविली आहे.

एका ब्राह्मणाच्या गायी चोरांनी चोरल्या. त्या गायी सोडविण्यासाठी धर्म व द्रौपदी ज्या शस्त्रागारात एकांतात होते तेथे जाणे अर्जुनाला भाग पडले. नंतर अर्जुनाने त्या गायी सोडवल्या. पण धर्म-द्रौपदीचा एकांत पाहिल्यामुळे नारदासमक्ष घालून दिलेल्या आचारसंहितेला अनुसरून अर्जुन प्रायश्चित घेण्यासाठी बारा वर्षे वनवासाला जातो. त्यावेळी तीर्थाटन करीत प्रभासक्षेत्री श्रीकृष्णाच्या दर्शनाला येतो. तेथे सुभद्रेला पाहिल्यावर कामविव्हल होतो. त्यावर ' सुभद्रेचे हरण कर ' असा सल्ला श्रीकृष्णाने अर्जुनाला दिला. तसे त्याने तिचे हरण केले. ही मूळ कथा त्रीदंडी संन्यास, कृष्णाचे कपटनाट्य यांची भरती अण्णासाहेबांनी स्वतःची घातली आहे. आणि नाटकातील कथानकातील घटनांचे कर्तृत्व श्रीकृष्णाला दिले आहे.

अण्णासाहेबांनी या नाटकासाठी पौराणिक कथा निवडली असली तरी ती एक कुटुंब-कथा आहे याची जाणीव प्रेक्षकांना होत राहते. पुराणकालातील पात्रांना मानवी पातळीवर आणण्याचे कौशल्य, अण्णासाहेबांनी अप्रतिमपणे प्रकट केले आहे. यावरून ' सौभद्र ' हे स्वतंत्र नाटक आहे याची जाणीव होते. कारण याची प्रेरणा पुराण कथेत असली तरी त्याचा आविष्कार प्रणयाच्या चित्रणात आहे ; कौटुंबिक वातावरणात आहे, असे म्हणावे लागते. प्रा. ना. सी. फडके यांनी या नाटकाच्या यशस्वीतेसंबंधी पुढील उद्‌गार काढले आहेत— ' सौभद्र ' हे नाटक अनेक दृष्टींनी मोलाचं आहे... मराठी रंगभूमीची कितीही स्थित्यंतरे होवोत, लेखनाची आणि अभिनयाची तंत्र कितीही बदलोत, कोणत्याही जमान्यात कोणत्याही स्थळी जे नाटक रसिकांना वसंतोत्सवासारखं वाटेल असं अण्णासाहेबांचं 'सौभद्र' हे नाटक आहे, हे प्रा. फडके यांचे उद्‌गार सार्थ आहेत.

वि. दा. वासमकर

**संगीत स्वर्गावर स्वारी : शुक्ल, सदाशिव अनंत. प्रकाशक : अनंत सखाराम गोखले, १९२८.** भक्त प्रल्हाद आणि दैत्यसम्राट हिरण्यकश्यपू यांच्या कथेवर आधारित गद्य-पद्यात्मक नाटक. सत्त्व, शील, धर्म ही त्रयी पराक्रमाचा पाया असून पराक्रमाला सद्धर्माचा पाया हवा, तसेच परमेश्वराच्या शाश्वत स्वरूपाचा शोध लागणे शक्य नाही, दुर्जनांचा नाश करून सज्जनांचे रक्षण करण्यासाठी परमेश्वर अवतार घेतो ही तेजस्वी तत्त्वे विशद करण्यासाठी हे नाटक लिहिले. प्रल्हादाची दैवी शक्ती, हिरण्यकश्यपूची पाशवी शक्ती यातून महात्मा गांधी व इंग्रजी सरकार यांच्यातील संघर्ष सूचित केला असून दैवी शक्तीचा विजय होतो, या घटनेतून इंग्रजी राजवटीचा अंत अपरिहार्य असल्याचे सूचित केले आहे. सामान्य प्रेक्षकांना भावणारे चमत्कार, पात्रानुरूप भाषाशैली, चटकदार घटना प्रसंगांची गुंफण आणि बालमोहन नाटक मंडळीतील बालनटीचे परिश्रम यामुळे हे नाटक लोकप्रिय झाले.

वसंत नरहर कुबेर

**संगीत स्वयंवर : खाडिलकर, कृष्णाजी प्रभाकर. प्रकाशक : यशवंत कृष्ण खाडिलकर, मुंबई १९१६.** कृष्णाजी प्रभाकर खाडिलकरांचे पाच अंकी संगीत पौराणिक नाटक भागवतातील कृष्ण-रुक्मिणी विवाह प्रसंगावर आधारलेले सुखान्त नाटक खाडिलकरांच्या यशस्वी नाट्यपरंपरेतील उत्कर्ष गाठणारे हे नाटक असून याही नाटकात पौराणिकतेला वर्तमानाचा संदर्भ देण्याचा त्यांचा प्रयत्न दिसतो. वीर, शृंगार व करुण रसांचा प्रामुख्याने परिपोष. दृश्य परिणामाला प्राधान्य देणारे अनेक नाट्यपूर्ण प्रसंग नाटकात आहेत. नाथ हा माझा, करिन यदुमनी सदना, मम आत्मा गमला, नरवर कृष्णासमान यांसारखी अवीट गोडीची अनेक पदे या नाटकात आली आहेत. अभिजात संगीताचा उपयोग हे 'स्वयंवराचे' बलस्थान आहे.

गं. ना. जोगळेकर

**संगीत हाच मुलाचा बाप : वरेरकर, भार्गवराम विठ्ठल. प्रकाशक : श्री. महादेव विष्णू आगासे, पुणे, १९१७.** श्री. वरेरकर यांचे हे सामाजिक नाटक हुंडा या विषयावर असून

गरीब वधूपित्याची समाज काय अवस्था करतो याचे चित्रण सदर नाटकात आहे. प्रमेय/प्रहसन या प्रकारचे नाटक लिहून विनोदी पद्धतीने हुंडा हा विषय श्री. वरेरकरानी समाजासमोर ठेवला आहे. श्री. वरेरकरांचे हे नाटक गाजलेले नाटक. मोलियरच्या नाट्य लेखन तंत्राचा प्रभाव सदर नाटकावर आहे, असे मत बऱ्याच जाणकारांनी व्यक्त केले आहे. रावबहादूर व दिगंबरपंत हे मित्र. रावबहादुरांना वसंत आणि मंजिरी ही दोन मुले. दिगंबरपंताची कन्या यमुना. रावबहादूर श्रीमंत पण दिगंबरपंत गरीब. रावबहादूर पैशाचे लोभी, मुलाच्या लग्नात हुंडा पाहिजे पण मुलीला मात्र विवाहात हुंडा देण्याची त्यांची तयारी नाही. वसंताचे यमुनेवर प्रेम आहे आणि त्याने तिला लग्नाचे वचनही दिले आहे. पण बापाचा लोभी स्वभाव हा लग्नाला अडथळा आहे. दिगंबरपंतांना ते लग्नाचा नकार देतात. डॉ. गुलाब, दिगंबरपंताचा भाचा रावबहादुराना सांगतो की, त्याला त्याच्या काकाची एक लाख रुपयाची इस्टेट मिळाली असून तो वसंतासाठी चार हजार रुपये हुंडा द्यावयास तयार आहे. दरम्यान बहिणीच्या मदतीने वसंता रावबहादुरांच्या तिजोरीतील चार हजार रुपये चोरतो. हुंड्यापोटी मिळालेली रक्कम पाहून त्यांना संशय येतो कारण त्यांच्याजवळील नोटांचे व या रकमेचे नंबर एकच असतात. मुलाने रक्कम चोरल्याचे निष्पन्न होताच रावबहादूर वसंत, यमुना यांना संतापून घराबाहेर काढतात. दरम्यान डॉ.गुलाबवर मंजिरीचे प्रथमदर्शनीच प्रेम जडते. रावबहादूर डॉ. गुलाब जवळ त्यांच्या कन्येशी-मंजिरीशी लग्न करावे असे सुचवितात पण तो हुंड्याशिवाय लग्न करण्यास तयार होत नाही. वसंतावरील रागामुळे रावबहादुरांनी आपली सर्व संपत्ती बँकेत ठेवलेली असते व ही बँक बुडाल्याचे वृत्त त्यांच्या कानी येते. आता रावबहादूर रावाचे रंक होतात व मनोहर नावाचा एक वरही हुंड्याशिवाय मंजिरीशी लग्न करण्यास नकार देतो व ' गरिबाकडून हुंडा मागणारा हाच मुलाचा बाप ' अशी निर्भर्त्सना करतो. डॉ. गुलाबही रावबहादुरांची कानउघडणी करतो. वस्तुस्थितीची जाणीव झालेले रावबहादूर सर्वांची क्षमा मागतात. डॉ. गुलाब खुलासा करतो की, ' बँक बुडल्याची खोटी तार त्याने त्याच्या मित्राकडून केलेली असते. ' अशा तऱ्हेने शेवट गोड होतो.

**संगीताने गाजलेली रंगभूमी : जोशी न. ग. तथा बाबूराव. प्रकाशक : स्कूल ॲण्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर, १९५९.** पुस्तकाच्या पहिल्या विभागात दिनांक ११ ऑक्टोबर १८८० रोजी संगीत नाटकाची नांदी झडली, इ. ऐतिहासिक माहिती असून सूत्रधारी संगीताची पार्श्वभूमी दिली आहे. इ. स. १८८० ते १८८९, १८९० ते १९१०, १९११-१९२०, १९२१-१९३४ व १९३४ ते १९५९ असे कालखंड पाडून नाट्य संगीतात घडलेले बदल व त्यांचा ऐतिहासिक मागोवा घेऊन धावता परामर्श घेतला आहे.ह्या मध्ये किर्लोस्करी संगीताचे महत्त्व सांगून १९१० पर्यंत संगीतात केलेले विविध प्रयोग, सांगून त्या काळातील श्रेष्ठ नाट्यसंगीतकार व गवई यांची माहिती दिलेली आहे. १९११ ते १९२० हा रंगभूमीचा सुवर्णकाल मानला आहे. संगीतकार व नाटककार इथे वेगळे झाल्याची नोंद केलेली आहे. १९२१ नंतर तिचा पडता काळ सुरू झाला. स्वतंत्र स्वररचना करण्याचे श्रेय मा. कृष्णरावांना दिले आहे. संगीत तसेच नाटक कंपनीचा इतिहास या भागात शेवटी मिळतो. दुसऱ्या भागात नाट्यसंगीत चर्चा (वादविवाद व मते मतभेद) सादर केली असून साथसंगत व साथीदार यांचे विषयी एक लेख आहे. लोकप्रिय पदांची यादी व काही महत्त्वाच्या पदांचे स्वरलेखनही दिले आहे.

मराठी रंगभूमीवरील संगीत परंपरेचा व विकासाचा आढावा घेणारी महत्त्वाची समीक्षा.

सुरेश गजेंद्र बाडकर

**संत कान्होपात्रा : कुलकर्णी, नारायण विनायक. प्रकाशक : विठ्ठल रामचंद्र खाडिलकर पुणे, १९३१.** गंधर्व नाटक मंडळाचे मालक अभिनय सम्राट बालगंधर्वांच्या सूचनेवरून ना. वि. कुलकर्णी यांनी ' संत कान्होपात्रा ' नाटक लिहिले हे नाटक ' गंधर्व नाटक मंडळाने ' रंगभूमीवर आणले. गणिका असलेल्या कान्होपात्रा या मंगळवेढे येथील संत कवयित्रीची अधिकृत माहिती उपलब्ध नाही. कुलकर्णी यांनी महिपतिबाबा यांचा ' भक्तिविजय ' (३९वा अध्याय), इंदिराप्रेस संपादित संत गाथेतील कान्होपात्रेचे अभंग, प्रो. रा. द. रानडे यांचे संतवचनामृत हे संपादन, पंडित कवी मोरोपंतांच्या सन्मणी मालेतील आर्या ह्या साधनसामग्रीचा आधार नाटक लिहिण्यासाठी घेतला. चोखामेळा हा कान्होपात्रेच्या दीडशे वर्षे आधी मंगळवेढे येथे होऊ गेलेला संत होता. चोख वागणारा तो चोखा. म्हणून नाटकात चोखोबा हे पात्र नाटककराने कल्पनेच्या सहाय्याने निर्माण केले आहे. या नाटकात कान्होपात्रा व तिची आई शामा ही दोन पात्रे ऐतिहासिक आहेत. पण संविधानक निर्मिती व रसपरिपोषासाठी गुलाबचंद शेठजी त्याचा बाप लक्ष्मीचंद, बेदरच्या बादशहाचा मंगळवेढे येथील पाळेगार विलासराव, त्याची पत्नी शीलवती, कान्होपात्रेची दासी शेवंती, फुलवंती व झेंडू पती-पत्नी अशी पात्रनिर्मिती केली आहे. कान्होपात्रेला विठ्ठल भक्तीकडे वळवणारा चोखोबा ही नाटककाराने निर्मिलेली, कान्होपात्रेला गुरुस्थानी असलेली महत्त्वाची व्यक्तिरेखा आहे. या पाच अंकी नाटकात कान्होपात्रा, गुलाबचंद, विलासराव-शीलवती, खलनायक आनंदराव-शीलवती यांच्या संदर्भातील प्रसंगांनी नाटकाच्या संविधानकाल उठाव मिळून हे पाचअंकी नाटक रंगतदार झाले आहे विशेष म्हणजे रसानुकूल पदांच्या जोडीला ज्ञानेश्वर, नामदेव, चोखामेळा आणि कान्होपात्रा या संतकवींचे मूळ अभंग नाटककाराने समाविष्ट केले आहेत. ' जोहार मायबाप ', ' धाव घाली विठू आता, ' देह जावो अथवा राहो', ' अवघाची संसार सुखाचा करीन ',' उस डोंगा परी रस नाही डोंगा ', ' माझ्या जीवाचे जीवन ', ' दीन पतीत अन्यायी , ' पतित तू पावना म्हणविसी नारायणा', ' पतित पावन म्हणविशी आधी ', ' अगा वैकुंठीच्या राया ' या सर्वपरिचित ' अभंगांमुळे कान्होपात्रा ' नाटकाच्या रसवत्तेत भर पडली आहे. विठ्ठलाच्या दारी मृत होऊन पडलेल्या कान्होपात्रेला पाहून सर्व मंडळी

दुःखात बुडून जातात. चोखोबाच्या भाषणाने नाटकाचा शेवट होतो. कान्होपात्रेची महती सांगताना तो म्हणतो, " कान्हेप्रमाणे पावित्र्यानं राहू इच्छिणाऱ्या कोणाही देवदासीवर प्राणाचं मोल देण्याची पाळी येऊ देऊ नका." संत. कान्होपात्रा या नाटकाद्वारे दिलेला हा संदेश नाटककार ना. वि. कुलकर्णी यांच्या द्रष्टेपणाची नि आशावादी भूमिकेची साक्ष पटवणारा आहे.

वि. शं. चौघुले

**संत, पंत व तंत : माटे, श्री. म. प्रकाशक : ठोकळ प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९५७.** श्री. म. माटे हे लघुकथालेखक आणि अपेक्षित समाजाचे चित्रण करून त्यांच्या समस्या वाचकांपुढे मांडणारे वैचारिक म्हणून परिचित आहेत. ललित आणि वैचारिक असे दोन्ही प्रकारचे विपुल लेखन त्यांनी केले आहे.

'संत, पंत आणि तंत' या ग्रंथात श्री. म. माटे यांनी एकूण पंचवीस शोधनिबंध समाविष्ट केले आहेत. या सर्व लेखांची शीर्षके पाहिली तर पंत आणि तंत म्हणजे शाहिरी काव्यापेक्षा संत काव्याची चर्चा अधिक प्रमाणात झाली आहे, असे दिसते. 'पांडुरंगाचे स्थलांतर आणि पुंडलिकाचे रूपांतर', 'आपेगावचा ज्ञानेश्वर व आळंदीचा ज्ञानेश्वर एकच', 'भागवतकार आणि ज्ञानदेवीकार', 'महार संतांच्या मनाचे सामाजिक दुखणे', 'आनंदवनभुवन म्हणजे वाराणसी की महाराष्ट्र', 'मराठी काव्याचे बंधविमोचन', 'पंतकाव्याचे दुर्बोधत्व व त्याची सामाजिक मीमांसा', इ. लेख पाहिले तर माटे यांनी परिश्रमपूर्वक संशोधनाच्या चौकटीत हे लेख लिहिले आहेत, याची जाणीव होते.

तेराव्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंतच्या संत, पंडित व शाहिरी काव्याच्या इतिहासाचा घेतलेला शोध असे या ग्रंथाचे स्वरूप आहे. माटे यांचे हे लेखन अभ्यासकांना तसेच जिज्ञासूंना मार्गदर्शक आहे.

वि. दा. वासमकर

**संतलीलामृत : महिपती, प्रकाशक : मोरोबा गोविंदा मनुचार्य, जगदीश्वर छापखाना, मुंबई, १८७०.** 'संतलीलामृत' या ग्रंथाची रचना शके १६८९ मध्ये झालेली आहे. पूर्वी अपूर्ण राहिलेली किंवा न लिहिलेली संतांची चरित्रे वेगवेगळे ग्रंथ पाहून, माहिती जमवून व आधार शोधून लिहिलेले आहेत, असे कवीनेच सांगितले आहे. 'संतलीलामृत' या ग्रंथाचे ३५ अध्याय असून त्यात ५२५९ ओव्या आहेत. या ग्रंथात ज्ञानदेव (समाधी-प्रसंग), नामदेव, चांगदेव, रोहिदास, गोपीचंद, एकनाथ, संत सखू, तुकाराम, कान्होपाठक इ. संतांची चरित्रे आलेली आहेत. संत हे परमेश्वरच आहेत अशा उत्कट भक्तिभावनेने हे लेखन झाले आहे. संतांची चरित्रे श्रवण-पठण केल्याने मोक्ष मिळतो या श्रद्धेने या चरित्रांना भाविकांच्या देवघरात स्थान मिळाले. परमेश्वरावरील नितांत निष्ठा, संतांबद्दलची आदरभावना, धर्मपरायण मनोवृत्ती आणि प्रासादिक भाषेतील हृदयस्पर्शी प्रतिपादन ही महिपतीच्या रचनेची वैशिष्ट्ये आहेत. भांडाराचे जतन केले ही मराठी भाषा आणि वाङ्मय यांच्या दृष्टीने त्यांची महनीय कामगिरी आहे.

चंद्रकांत धांडे

**संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती : सरदार गं. बा. प्रकाशक : श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९५०.** महाराष्ट्रीय संत आणि अन्यधर्मीय थोर पुरुषांच्या सांस्कृतिक व सामाजिक कामगिरीचा आढावा घेणारा ग्रंथ. जैन, महानुभाव, चोखामेळा, ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास इ. संतांच्या कार्याची वैशिष्ट्ये सांगून धार्मिक प्रबोधनाची फलश्रुती म्हणजे संतांनी लोकजागृती, समाजसुधारणा, भूतदया यावर भर देऊन धार्मिक समतेचा प्रचार मराठी मायबोलीतून केला. १९८२ च्या चौथ्या आवृत्तीत 'चोखामेळा संत भला' हा लेख व धार्मिक प्रबोधनाचे आशय स्पष्ट करणारे परिच्छेद समाविष्ट करण्यात आले आहेत.

लेखकाच्या प्रतिपादनाला काहीसा समाजवादी अभिनिवेश सोडल्यास मराठी संतांच्या व अन्य धर्मीयांच्या कार्याचे महत्त्वमापन व विवेचन मूलगामी आहे.

रा. व्यं. जोशी

**संतविजय : महिपतीबुवा ताहराबादकर. प्रकाशक : दामोदर सावळाराम आणि मंडळी, मुंबई, १९२७.** 'भक्तविजय', 'संतलीलामृत', 'भक्त लीलामृत' हे चरित्रग्रंथ लिहूनही समाधान झाले नाही म्हणून आपल्या उतारवयात 'संतविजय' या नावाचा ग्रंथ महिपतीबुवांनी लिहिण्याचे ठरविले. रामदास स्वामी व बाबाजी गोसावी यांची चरित्रे त्यांनी लिहिली. पण हा ग्रंथ पूर्ण होऊ शकला नाही. नेहमीच्या पद्धतीप्रमाणे ग्रंथारंभी नमन नाही, संतस्तवन नाही की प्रास्ताविक नाही. महिपतीबुवा एकेका संताची माहिती मिळवून चरित्र पूर्ण करीत असावेत असे दिसते.

" संतांची चरित्रे संपूर्ण। एकदाचे न कळती जाण। तेव्हा जी झाली आठवण। ती चरित्रे लिहून ठेवावी " असे त्यांनी नमूद करून ठेवले आहे.

चंद्रकांत देऊळगावकर

**संत्र्यांची बाग :शांताराम. प्रकाशक :रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबई, १९४२.** 'संत्र्याची बाग' हा कथाकार 'शांताराम' (के. ज. पुरोहित) यांचा पहिला कथासंग्रह आहे. साठ वर्षांपूर्वी म्हणजे पारंपारिक कथा लेखनाच्या काळात कथालेखन करणाऱ्या 'शांतारामा' च्या कथांत पुढील काळातील नवकथेची बिजे सामावलेली दिसतात. एका विशिष्ट बिंदूपासून सुरुवात करून त्यांची कथा पुढे विकसित होत जाते. जवळच्या मित्राला आपल्या आयुष्यातील हकिकत सांगावी त्या पद्धतीने अगदी मोकळेपणाने कथेचा आशय सांगितला जातो. त्याच दरम्यान 'शांताराम' लघुनिबंध लिहित होते. त्या लेखनाचाही

हा परिणाम असावा.'संत्र्यांचा बाग' कथेतील जाईची हकिकत शांतारामांनी मनमोकळ्या पद्धतीने सांगितली आहे. निवेदनातील भाष्य, चिंतनशीलता, सुभाषितवजा वाक्यांचा अवलंब ही वैशिष्ट्ये त्यांच्या प्रारंभीच्या या कथांत दिसून येतात. मराठीतील आधीच्या कथेतील पाल्हाळ, खांडेकरांची जीवनवादी भूमिका यांचा आढळ शांतारामांच्या कथेत झालेला दिसून येतो. 'जीवनाचा साक्षात्कार', 'जीवनाचे तत्त्व' आढळ 'त्याग' या कथांत बोधवादी भूमिकेचे प्रतिबिंब पडले आहे. 'शांगचू', 'वंचना', 'जीवनाचे तत्त्व' या कथांत प्रणय भावनेचा आविष्कार झाला आहे. कपड्याचा व्यापार करणाऱ्या शांगचू या चिनी मित्राबरील कथेचे स्वरूप व्यक्तिचित्रासारखे आहे. आपल्या चिनी प्रेयसीला प्राप्त करून घेण्यासाठी तो लष्करात शौर्य गाजवतो ; पण शेवटी अफूच्या व्यसनाच्या आहारी जातो. पुरुषी स्वावलंबन शीलतेचे दर्शन या कथेत होते. 'सी. आय. डी. च्या घरातील चोरी', 'वंचना', 'सौंगडी' या कथांवर फडके पद्धतीचे तंत्र आणि प्रणयाविष्कराचा प्रभाव आहे. उमेदीच्या काळात कथालेखन करणाऱ्या 'शांतारामां'वर पूर्वसुरींचा असा परिणाम होणे स्वाभाविक होते. असे असले तरी या संग्रहातील 'भेदरेखा' या आदिवासी जमातीच्या अनुभवावरील कथेत कथाकार 'शांतारामां'चे सामर्थ्य प्रकट झाले आहे. आदिवासी आणि युरोपीयन समाज यांच्या नृत्याचे वेड, मदिरापन, नृत्याच्या वेळचा बेबंदपणा-मुक्तपणा याबाबतीत सभ्य असले तरी भारतीय आदिवासी आणि पुरोगामी सुशिक्षित इंग्रज यांच्या नैतिकतेत मोठा भेद असतो, हे 'भेदरेख' ह्या कथेतून लेखकाने सूचित केले आहे. इंग्रज अधिकाऱ्या विवाहापूर्वी बरोबर बेबंद-मुक्तपणे नाचणारी आदिवासी स्त्री विवाहानंतर नैतिकता सांभाळण्यासाठी आपल्या पतीला इंग्रज अधिकाऱ्याचा 'भेद' करण्यासाठी प्रवृत्त करते 'शांतारामांच्या' भविष्य काळातील प्रभावी सामाजिक कथेची बिजे 'भेदरेखा' या सारख्या कथेत आढळून येतात. 'संत्र्यांची बाग' ह्या त्यांच्या पहिल्या कथासंग्रहाचे हेच वैशिष्ट्य आहे.

**वि. शं. चौघुले**

**सतरावे वर्ष : भावे, पुरूषोत्तम भास्कर. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९४९.** पु. भा. भावे यांच्यातील कथाकारांचे प्रभावी दर्शन घडविणारा कथासंग्रह.

फुकट मिळालेल्या वस्तूंचा मोबदला किती भयंकर द्यावा लागतो याचे चित्रण 'फुकट' या कथेत आहे तर 'सतरावे वर्ष' मध्ये नव्या पौरुषाच्या जाणिवेने येणारी अस्वस्थता, थरार यांचे मार्मिक रेखाटन आहे. तर 'माणुसकीच्या मर्यादा'मध्ये माणसातील माणुसकीचे दर्शन क्वचित होते, एरवी तो जनावर असतो हे विदारक सत्य स्पष्ट केलेले आहे. या मानवी वृत्ती प्रवृत्तीचे दर्शन सखोलपणे घडवितात. त्यात लेखकाच्या भाषा व शैलीचाही महत्त्वाचा वाटा आहे.

मराठी नवकथेच्या एका समर्थ शिल्पकाराच्या सामर्थ्याचा प्रत्यय देणारा महत्त्वपूर्ण संग्रह म्हणून लक्षणीय.

**उर्मिला दळवी**

**सत्तावनचा सेनानी : वरखेडकर, वसंत. प्रकाशक : प्रथम प्रकाशन, १९५७, अमरावती.** १८५७ च्या स्वातंत्र्यलढ्यातील एक श्रेष्ठ लढवय्या सेनापती तात्या टोपे यांच्या जीवनावरील ऐतिहासिक कादंबरी.

बह्मावर्तातील तात्यांचे बालपण, इंग्रजांचे पेन्शन खाऊन लाचार जिणे जगणारा भित्रा आणि रंगेल बाजीराव व त्यांचे सहकारी, जनसामान्यांतील असंतोष आणि संस्थानिक सरदारांची गुलामी मनोवृत्ती या साऱ्या पार्श्वभूमीवर इंग्रजांच्या अन्यायाविरुद्ध तात्यांनी जनतेच्या उठावाला दिलेले नेतृत्व, त्यांचे युद्धकौशल्य, धैर्य व शौर्याबरोबर त्यांच्यातील उसळून निघालेली माणुसकी, त्यांची दुर्दैवी हार आणि इंग्रजांनी विश्वासघाताने घडविलेला मृत्यू या सर्वांचे चित्रण या कादंबरीत येते.

भारतीय इतिहासातील तेजस्वी पण इंग्रजी इतिहासकारांनी दडविलेल्या कालखंडावर आधारित तत्कालीन राजकीय सामाजिक स्थितीचे वस्तुनिष्ठ चित्रण करणारी कादंबरी म्हणून मराठी ऐतिहासिक कादंबरी वाङ्मयात महत्त्वाची आहे.

**शरद दळवी**

**सत्तेचे गुलाम : वरेरकर, भार्गवराम विठ्ठल. प्रकाशक : बॉम्बे बुक डेपो, मुंबई, ६वी आवृत्ती,१९४४.** श्री. भार्गवराम विठ्ठल वरेरकर, नाटककार, कादंबरीकार आणि अनुवादक. मराठी साहित्य विश्वात नाटककार या नात्याने त्यांना मान आहे. प्रस्तुत सत्तेचे गुलाम नाटकात, 'सत्तेचा गुलाम बनून व्यक्ती जर दुसऱ्याच्या कलाने सर्वथैव वागू लागली तर त्या व्यक्तीचा नाश ठरलेला' हे सूत्र आहे. त्या काळात हे नाटक फारच गाजले, यामध्ये आधुनिक वेषभूषा व नेपथ्य यांचाही सहभाग होता. शिवाय हे नाटक रचण्यासाठी नाटककाराने एक सत्य घटनेचा आधार घेतला आहे. या नाटकामध्ये बाबासाहेब, हेरंब (बाबासाहेबांचे द्वितीय पुत्र), वैकुंठ (नाटकाचा नायक व बाबासाहेबांचे तृतीय चिरंजीव व हेरंबचे सावत्र भाऊ), कान्होबा (बाबासाहेबांचा पुतण्या) केरोपंत ऊर्फ केरो महादेव नाटकातील खलनायक मार्तंडराव (वकील) नलिनी गोखले - नाटकाची नायिका व बाबासाहेबांच्या परम मित्राची कन्या, क्षमा - नलिनीची धाकटी बहीण, रेवा (बाबासाहेबांचा ज्येष्ठ पुत्र सदानंद यांची बायको), रमा (हेरंबरावाची बायको) ही प्रमुख पात्रे आहेत.

बाबासाहेब पस्तीस लाख रुपयांचे धनी असलेले, हरिद्वारला मरण पावतात. त्यांनी केलेल्या मृत्युपत्रात अनेक अटी घातलेल्या असतात. राहते घर हेरंबला आणि चेंबूर येथील शेत वैकुंठला अशी वाटणी केलेली असते. परागंदा सदानंद सापडल्यास त्याला, किंवा त्याच्या बायकोला किंवा त्यांच्या मुलास रोख रक्कम द्यावी. यापैकी कोणीही नसेल तर ही रक्कम नलिनी गोखलेला द्यावी, अशी व्यवस्था केलेली असते. सदानंद, त्याची पत्नी यांचा तपास न लागल्याने संपत्ती नलिनीला मिळते. केरोपंत संपत्तीच्या लालसेपायी नलिनीशी विवाह करू इच्छितो. केरोपंत हेरंबला नलिनीवर कोर्ट केस करण्याचे सांगतो. केस करू नये असे सांगणाऱ्या वैकुंठला हेरंब घरातून हाकलून देतो, केरोपंतांची

कारस्थाने उघड करणाऱ्या वैकुंठवर नलिनीचे प्रेम बसते. नलिनीकडे राहत असलेली रेवा हीच सदानंदची बायको हे सिद्ध होते. व ही संपत्ती कायदेशीर पण तिला मिळते पण ती या सर्व संपत्तीचा उपभोग घेण्यासाठी सर्वांनाच एकत्र बोलावते व कान्होबा या बाबासाहेबांच्या पुतण्याचे लग्न क्षमा या नलिनीच्या धाकट्या बहिणीशी लावून दिले जाते. श्री. वरेरकरांचे हे एक महत्त्वाचे सामाजिक नाटक आहे.

**सत्याग्रही : शुक्ल, सदाशिव अनंत. प्रकाशक : बलवंत पुस्तक भांडार, मुंबई आ.३री, १९५९, प्रथम प्रकाशन १९३३.** हे सदाशिव अनंत शुक्ल यांचे पौराणिक नाटक ध्रुवबाळाच्या कथाख्यानावर रचले आहे. डिसेंबर १९३३ मध्ये यशवंत संगीत मंडळीने ते 'सत्याग्रही' मुंबईमध्ये रंगभूमीवर आणून अत्यंत लोकप्रिय केले.

'सत्याग्रही' नाटक सत्य व न्यायासाठी खडतर तपश्चर्या करणाऱ्या ध्रुवाच्या कथाभागावर आधारित असले तरी प्रचलित राजकीय विचारांची सूचनाही त्यातून मिळते. यातील ध्रुवाचे 'देवा, कोठे गुंतला' हे पदही गाजले होते.

**केतकी कुलकर्णी**

**संध्याकाळच्या सावल्या : शशिकांत पुनर्वसू. प्रकाशक : य. गो. जोशी प्रकाशन, पुणे, १९४४.** शशिकांत पुनर्वसू यांचा हा कथा-संग्रह हे पुस्तक गतकाळातील रम्य आणि मधूर स्मृतींस अर्पण केले आहे.

यात लहान लहान एक दोन पानांच्या तर काही चार-पाच पानांच्या १७ कथा आहेत. सुरुवातीच्या काही कथा चुटकेवजा, विनोदी किंवा गंमतीशीर, काही गंभीर. वेळोवेळी लिहिलेल्या कथांचा लेखनकाल साधारणपणे १९३५ ते १९४४ पर्यंत. एक नवा प्रयोग या दृष्टीने कथा लक्षणीय.

**वसुंधरा बनहट्टी**

**समाजचित्रे - भाग १ व २ : केळकर गिरीजाबाई. प्रकाशक : मनोहर ग्रंथमाला, भाग १ - १९२९, २ - १९३४.** या दोन्ही कथासंग्रहात सौ. गिरिजाबाई केळकर यांच्या एकूण २४ गोष्टी आहेत. बहुतेक कथा मनोरंजन कालखंडातील कथा प्रामुख्याने बोधपर.स्त्रीजीवनावरील विविध प्रश्नांची चर्चा, जुनी संस्कृती, जुनी एकत्र कुटुंबपद्धती, जुन्या रूढी यांचा जिव्हाळा कथांतून प्रगट होतो. कथेचे निवेदन साधे, सरळ, बालबोध पद्धतीचे पुष्कळ कथा प्रदीर्घ व प्रकरणात विभागलेल्या स्वभावलेखनापेक्षा कथानकाला प्राधान्य. 'पुस्तकी शोक व्यवहारी भिक', 'पुरी हौस फिटली' या दीर्घकथा आणि 'माझा प्रवास', 'प्रेमाचे रूपांतर'यासारख्या छोट्या कथा निवेदन शैलीमुळे विशेष उल्लेखनीय. मराठीतील कथा लेखिकांच्या वाटचालीत या कथासंग्रहाचे महत्त्व आहे.

**म. ना. अदवंत**

**समाधी व इतर सहा गोष्टी : केळकर, दिवाकर कृष्ण (दिवाकर कृष्ण). प्रकाशक : श्री. हरी श्रीपाद घारे, पुणे, १९२७.** श्री. दिवाकर कृष्णांनी १९२१ ते १९५६ या काळात फक्त एकवीस कथा लिहिल्या. या कथा संख्येने कमी असल्या तरी गुणांनी श्रेष्ठ आहेत. त्यांचे तीनच कथासंग्रह प्रसिद्ध झाले. या सर्व कथा स्वतंत्र आणि मौलिक असून दिवाकर कृष्णांना 'आधुनिक वळणाच्या नव्या मराठी कथेचे जनक' असे संबोधिले जाते. व्यक्तीचे मन, मनाचे आंतरिक व्यापार याचे चित्रण करून त्यांनी मराठी बहिर्मुख कथेला अंतर्मुख केले. प्रस्तुत संग्रहात केवळ सात कथा असून यापैकी 'समाधी' ही कथा प्रथमतः या संग्रहात प्रसिद्ध झाली. इतर कथा यापूर्वी 'मनोरंजक' मासिकात प्रसिद्ध झाल्या. 'अंगणातला पोपट' ही पहिली कथा. पोपटलाल हा आईविना पोरका मुलगा. वडील भाईसाहेब सदैव व्यापारात दंग. त्यांचे पोपटलालकडे लक्ष नाही. या पोरक्या मुलाची तडफड दिवाकर कृष्णांनी विलक्षण तन्मयतेने रंगविली आहे. अखेर हा मुलगा झुरून मरतो. 'हातरहाट' ही दुसरी कथा. या कथेचा नायक भिवाजी. त्याची 'प्रेयसी मंजुळा' हा हातमागाचे काम सोडून मुंबईला जातो व आपल्या प्रेयसीला अंतरतो. 'संकष्टी चतुर्थी' ही तिसरी कथा. या कथेत शांता या नायिकेचे मानसिक ताण रंगविले आहेत. तिच्या मनात चाललेल्या खळबळीची जाणीव एका त्रयस्थाला असते. तिची स्वप्ने, सोशिकपणा, पतीने केलेली उपेक्षा, सासूचा जाच, यामुळे तिच्या मनाचा झालेला कोंडमारा कथेत व्यक्त झाला आहे. 'देवाच्या घरी' या चौथ्या कथेत लहान मुलीच्या मनोव्यापाराचे वर्णन आहे. मृणालिनीचे लावण्य ही दिवाकर कृष्णांची महत्त्वाची कथा. या कथेतील लावण्यवतीला याची जाण असते की आपल्या लावण्यांने आपला लहानपणीचा सवंगडी अशोक याचे मातेरे झाले. या कथेत या प्रसंगाला अनुसरून मृणालिनीच्या अंतर्मनात चाललेल्या आंदोलनाचे वर्णन येते. सहावी कथा 'वेड्याची कहाणी' ही गरीबी आणि विफल प्रेमाची कथा 'समाधी'कथेतील वातावरण राजघराण्याचे. हे कृत्रिम खानदानी वातावरण दिवाकर कृष्णांनी रंगविले आहे. गरीब-श्रीमंत भेदाने गुदमरलेली आणि व्यथित झालेली 'लीलागौरी' या कथेत वर्णिली आहे.

**सरलादेवी : भोळे, वा. वा. प्रकाशक : के. नारायण काळे, १९३१.** 'नाट्यमन्वंतर' काळातील प्रयोगशील नाटककार श्री. वासुदेव वामन भोळे या नाटककाराचे प्रस्तुत नाटक केवळ प्रचारात्मक नाटक नसून समाजातील नाजूक प्रश्नांची मांडणी करणारे असे हे विमर्शात्मक नाटक आहे. त्यातील सूक्ष्म स्वभावचित्रांमुळे परिणामकारक झाल्याचा समकालिनांचा अभिप्राय आहे.

'सरला' नावाच्या एका सुंदर व निष्पाप तरुणीला तिच्या नात्यातील सुंदरराव नावाच्या एका बेजबाबदार पुरुषाच्या वासनेची शिकार व्हावे लागल्याने तिच्यावर कुमारी माता होण्याचा प्रसंग आला. तर तिच्या प्रेमळ मामांमुळे परदेशात जाऊन पुन्हा आयुष्यात स्थिर होण्याची तिला संधी मिळते.

(सत्यपाल नावाच्या उदारमतवादी सज्जन वकील तरुणाशी विवाह झाल्याने प्रतिष्ठा मिळाली असतानाच तिच्या विवाहपूर्व काळातील अपत्याचा शोध सुंदररावाला लागतो. त्याचा सुंदररावाने खून केल्याने पेचप्रसंग - भर कोर्टात सत्य कबूल करूनही पारंपरिक पूर्वसंस्कारामुळे अपराधी भावनेने घर सोडण्याचा सरलेचा निश्चय तिच्या उदार, समंजस पतीमुळे स्थगित होतो.) कुंती ही माता म्हणून वंदनीयच, असे विचार मांडणारा आदर्श नायक कुमारी मातांच्या सामाजिक समस्येला उत्तर म्हणून आलेला आहे.

ता. रा. भवाळकर

**सर्कशीच्या रिंगणात : कार्लेकर, शिवाजी शंकरराव. प्रकाशक : मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई, १९५९.** सर्कशीचा जन्म, तिच्याविषयी माहिती, त्यातील काही व्यक्ती, काही थरारक प्रसंग वगैरेंचा समावेश असणाऱ्या १५ लेखांचा संग्रह.

भारतीय सर्कशीच्या जन्माची कथा, तिचे जनक विष्णुपंत छत्रे यांचे व्यक्तिमत्त्व, सर्कशीच्या पिछेहाटीची कारणमीमांसा असे तीन लेख आहेत.

सर्कसविषयी अत्यंत महत्त्वपूर्ण माहिती, त्या क्षेत्रातील प्रसिद्ध व्यक्तींची व्यक्तिचित्रे, कार्लेकर सर्कशीच्या कारकिर्दीतील काही वेचक असे चित्तथरारक प्रसंग अशी नवी माहिती देणारे हे पुस्तक मराठी साहित्यात वैशिष्ट्यपूर्ण व महत्त्वाचे आहे.

शरद दळवी

**संशयरत्नावली : मोरोपंत. संपादक : चांदेकर, वासुदेव विठ्ठल, प्रकाशक : रामचंद्र वासुदेव कुलकर्णी, अमरावती, १९०९.** प्राचीन मराठीतील पंडिती परंपरेचे मुकुटमणी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या कवी मोरोपंतांची ही रचना होय. 'संशय रत्नावली' हे त्यांचे ४९ आर्यांचे सुंदर लघुकाव्य आहे. भक्ताविषयी अत्यंत प्रेमळ, कनवाळू असलेल्या त्यांच्या हाकेसरशी त्याच्या उद्धारासाठी धाव घेणारा परमेश्वर आपला उद्धार करण्यास मात्र येत नाही याचे काय बरे कारण असावे ? असा प्रश्न त्यांना पडतो व त्याची न येण्याची कारणे विविध कल्पना करून ते सांगू लागतात. हेच संशयरत्नावली काव्य होय. मनात निर्माण झालेल्या या शंका म्हणजे आपणच शंका उपस्थित करावयाची व आपणच तिचे निराकरण करावयाचे असे या रचनेचे स्वरूप आहे. 'संशयरत्नावलीत' मोरोपंतांच्या आर्त भक्तिभावनेचा आविष्कार चमत्कृतिपूर्ण कल्पनाविलासाने नटलेला आहे. या काव्यरचनेची प्रेरणा महिपतीच्या पांडुरंग स्तोत्रापासून झाली असावी.

**ससाचे कान : करंदीकर, विन्दा. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९५७.** कल्पनारम्य व कथात्मक बालगीतांचा संग्रह. दुसऱ्याला चिडविण्याचे गाणे, गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या, लपंडाव, ससाचे कान, हत्तीची कहाणी, चार पायांचे झाड, दवाखाना वगैरे कवितात कथानकाला महत्त्व आहे. त्यात कल्पना रंजकतेबरोबरच जगाचा उलटा व्यवहार, ढोंगीपणा यांचेही मर्मग्राही दर्शन. जर-तरची गंमत, बक्षीस वगैरे कवितांतून ही गंमत, खोडकरपणा याबरोबरच भेदक आशयही आहे. प्राण्यांवरील कवितादेखील परिचित विषय असूनही हाताळणीचे नावीन्य व जिवंतपणामुळे वेगळीच गोडी देते.

नावीन्यपूर्ण व मौलिक कथा, आशयघनता, लोकगीता-सारख्या सफाईदार चाली, मानवी भावभावनांचा सार्वत्रिक आविष्कार, नादमाधुर्य, बालकल्पनाशक्तीला रुचेल अशा कल्पना, सोपेपणा आणि मुलांबरोबरच मोठ्यांच्याही मनाला भीडण्याचा सर्वस्पर्शीपणा व वसंत सरवटे यांची बोलकी चित्रे यामुळे हा संग्रह मराठी कवितेचा एक उत्तम आविष्कार ठरावा.

उर्मिला दळवी

**संस्कार : चोरघडे, वामन. प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, १९५०.** 'संस्कार' हा वामन चोरघडे यांचा सहावा कथासंग्रह. या कथासंग्रहातील १५ कथांपैकी पहिल्या सात कथा आत्मनिवेदनपर कथा आहेत. लोकसाहित्याचा अभ्यास आणि, लोकगीतांचा संग्रह करताना चोरघड्यांना जे अनुभव आले त्या अनुभवांचे कथन सुरुवातीच्या सहा कथांत आहे. विदर्भातील लोकजीवन आणि लोकसंस्कृतीच्या अनुभवांवर आधारलेल्या कथांत लेखकाची आई, वडील, आजोबा, भावंडे, शिक्षक यांची रेखाटने आहेत. चोरघडे यांनी आपल्या शालेय जीवनातील आठवणी प्रांजल शैलीत सांगितल्या आहेत. माझ्या असंस्कृत मनाला आकार आला त्यांचे स्मरण या निमित्ताने मला घडत आहे. ते स्मृतिकण आज मी वाचतो तेव्हा, सर्व जग पुन्हा नवे दिसायला लागते, या शब्दांत लोकजीवनाशी निगडित कथांबद्दलची प्रतिक्रिया लेखकाने व्यक्त केली आहे. 'सुनबाई' या शीर्षकाची कथा लोकसाहित्यावर आधरलेली असली तरी लेखकाने मूळ कथेत काही बदल केले आहेत. कहाणीला शोभणारी भाषेची गोड लय प्रभावी सामाजिक आशय, नाट्यपूर्ण घटनांची निर्मिती ही या कथेची वैशिष्ट्ये आहेत. संग्रहातील नंतरच्या आठ कथा लघुकथा आहेत. 'ज्योतिर्मयी', 'गोरी बायको', 'तें जुने पुस्तक त्याग', 'पंकज', 'क्रव्याद', 'मधुबोल', 'हा तरी जगायला हवा होता.' या कथांमध्ये वामन चोरघडे यांच्या कथाविशेष प्रत्ययास येतात. वि. स. खांडेकरांनी या संग्रहासाठी लिहिलेल्या प्रस्तावनेत चोरघडे यांच्या कथेतील गुणदोषांची सविस्तर चर्चा केली आहे. चोरघड्यांच्या कथांतून वास्तववादी जीवनदर्शन घडते. व्यापक सामाजिक दृष्टिकोनांमुळे, तावून सुलाखून मनासी निश्चित केलेल्या जीवनमूल्याबरच्या श्रद्धेमुळे चोरघड्यांची कथा काव्यात्मक असूनही वैविध्यपूर्ण झाली आहे. लेखक ध्येयवादी असूनही त्याची कथा बोधपर न होता वास्तवदर्शी ठरली आहे. दिवाकर कृष्णांनंतर चोरघड्यांच्या कथेनेच मराठी कथा साहित्यात काव्यात्मक वळण घेतले. 'चोरघडे यांच्या कथेत जोश नाही, ओज नाही, त्यांच्या कथेत भयानक व भव्य अनुभव

प्रकार होत नाहीत. त्यांच्या कथा बोधपर आहेत.' या प्रकारचे काही आक्षेप चोरघड्यांच्या कथेवर घेतले गेले आहेत. तथापि, चोरघड्यांच्या लघुकथांचे सामर्थ्य अन्य वैशिष्ट्यांत शोधावे लागते. उत्कटता, कोमलता व सौम्यता हे त्यांच्या कथांचे विशेष आहेत. त्यांच्या कथा वाचकाला जीवनाच्या क्षुद्र, स्वार्थी, संकुचित किंवा केवळ आत्मनिष्ठ पातळीवर ठेवीत नाहीत, कलेचा नाजूकपणा कसोशीने जपण्याचा प्रयत्न केल्यामुळे वामन चोरघडे यांच्या कथेचे स्वयंभू स्थान मराठी कथाविश्वात कायम राहिले आहे.

वि. शं. चौघुले

**संस्कृत कविपंचक : चिपळूणकर, विष्णू कृष्णशास्त्री. प्रकाशक : निर्णयसागर, मुंबई, १८९१.** 'संस्कृत कविपंचक'या पुस्तकामध्ये कालिदास, भवभूती, बाण, सुबंधी व दंडी या ५ कवींच्या काव्याचा विचार विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी केला आहे. प्रत्येक कवीच्या काळाचा निर्णय, पुढे त्यांच्या ग्रंथाच्या निर्देश व त्याविषयी विवेचन आणि शेवटी उत्कृष्ट उतारे अशा क्रमाने लेखन.

सुबंध या कवीची कीर्ती त्याने रचलेल्या 'वासवदत्ता' या एकाच ग्रंथाने सिद्ध होते, असे लेखक म्हणतात. गद्यरचनेचा प्रकार सुबंधूनेच पहिल्यांदा अवलंबिला असे मतही मांडले आहे.

दंडीविषयी लिहिताना त्यांच्या 'दशकुमारचरित' व 'काव्यादर्श' या ग्रंथाची चर्चा केली आहे.

सुधा कापरे

**संस्कृत काव्याचे पंचप्राण : वाटवे, के. ना. प्रकाशक : मनोहर ग्रंथमाला प्रकाशन, पुणे, १९४७.** 'रसविमर्श' ह्या रस-संकल्पनेचे विश्लेषण करणारा महत्त्वपूर्ण ग्रंथाचे लेखन के. ना. वाटवे यांनी केले आहे.

'संस्कृत काव्याचे पंचप्राण' ह्या ग्रंथात डॉ. वाटवे यांनी संस्कृत पंचमहाकाव्यांची कथानके सांगून त्यांचे रसग्रहणात्मक विवेचनही केले आहे. कालिदासाचे 'कुमारसंभव' व 'रघुवंश' भारवीचे 'किरातार्जुनीय', माघाचे 'शिशुपालवध' आणि श्रीहर्षाचे 'नैषधीयचरित'ही ती पंचमहाकाव्ये होत. या पंचमहाकाव्यांची (१) कविपरिचय (२) कथासार (३) रसग्रहण व (४) सुभाषिते या क्रमाने वाटवे यांनी ओळख करून दिली आहे.

या ग्रंथाला काव्याच्या तत्त्वांची आणि काव्याचा इतिहास सांगणारी सत्तर पानांची विस्तृत अशी प्रस्तावना वाटवे यांनी लिहिली आहे.

संस्कृत आर्ष महाकाव्यांचा अभ्यास करणाऱ्या अभ्यासकांना तसेच जिज्ञासूंना संस्कृत पंचमहाकाव्यांची विस्ताराने ओळख करून देणारा मराठीतील महत्त्वाचा ग्रंथ म्हणून प्रस्तुत ग्रंथाचा उल्लेख करता येईल.

वि. दा. वासमकर

**संस्कृति-संगम : केळकर, दत्तात्रय. प्रकाशक : मनोहर ग्रंथमाला, पुणे, १९४१.** भारताला स्वातंत्र्य मिळण्याच्या काही वर्षे आधी द. के. केळकर यांचा 'साहित्य-संगम' हा संस्कृतीविषयी साधकबाधक चर्चा करणारा ग्रंथ प्रसिद्ध झाला. जगातील सर्व भूप्रदेशात विविध संस्कृतींचा प्रवाह कित्येक वर्षे अप्रतिहतपणे सुरू आहे. इंग्रजी आमदनीत आध्यात्मिक भारतीय संस्कृती आणि आधिभौतिक पाश्चात्त्य संस्कृती यांतील विरोधाची जाणीव तत्कालीन विचारवंतांना तीव्रतेने झाली. अशा विवेकी विचारवंतांपैकी द. के. केळकर हे एक आहेत. 'काव्यलोचन' ह्या काव्यशास्त्रावरील ग्रंथानंतर प्रसिद्ध झालेला 'संस्कृति-संगम' हा वैचारिक ग्रंथ त्यातील समतोल विचारामुळे जिज्ञासू वाचकांमध्ये प्रिय ठरला. लेखकाने ग्रंथारंभी प्रस्तावनेत संस्कृती या शब्दाची व्याख्या करून संकल्पित ग्रंथाचे स्वरूप स्पष्ट केले आहे. केळकरांनी संस्कृतीची केलेली व्याख्या अशी "अन्तःसृष्टी आणि बाह्य सृष्टी यांतील ज्या ज्या गोष्टींवर त्याने (मानव समूहाने) आपल्या मानव्याची संस्कारमुद्रा ठोकली आहे, त्या त्या सर्व गोष्टींचा कलाप म्हणजे संस्कृती." द. के. केळकरांनी आपल्या संस्कृती संबंधीच्या विवेचनाची मांडणी चौदा प्रकरणांत केली आहे. भारतातील नेत्यांच्या- इंग्रजांच्या संस्कृतीला कसा प्रतिकार केला जातो, याचे विवेचन पहिल्या तीन प्रकरणांत आहे. पाश्चात्त्य विचारवंत स्वतःच्याच संस्कृतीची कशी निंदा करतात, याची माहिती चवथ्या प्रकरणात आहे. पाचवे व सहावेही प्रकरण पाश्चात्त्य आणि पौर्वात्य संस्कृतींचा तुलनात्मक परामर्श घेणारी आहेत. पाश्चात्त्य संस्कृती आधिभौतिक आणि पौर्वात्य संस्कृती आध्यात्मिक आहे, हे सिद्धांतवजा वर्गीकरण लेखकाला मान्य नाही. आपल्या संस्कृतीमधील दुर्लक्षित आणि उपेक्षित भागाकडे लक्ष वेधून घेण्याचा प्रयत्न लेखकाने सात ते नऊ या तीन प्रकरणांत केला आहे. संस्कृतीला प्राप्त झालेले संमिश्र स्वरूप हा दहाव्या प्रकरणातील प्रतिपादनाचा विषय आहे. आपली संस्कृती 'वैदिक संस्कृती' म्हणून गणली गेली तरी तिच्यात वेदबाह्य अशा बऱ्याच गोष्टी आहेत. शिवाय, सहिष्णुता व संग्राहकता भारतीय संस्कृतीत कशा पोसल्या गेल्या आहेत, याचे सोदाहरण विवरण अकराव्या प्रकरणात आहे. विचारस्वातंत्र्याचा आग्रह न धरल्यामुळे संस्कृतीला स्थिरावस्था प्राप्त झाली. या स्थिरावस्थेतील मनोवृत्तीने शास्त्र, विद्याकला, समाजशासन या क्षेत्रांत मूलगामी विचारांची धमक खचली. आपण जगाच्या शर्यतीत मागे पडलो. याचे तेराव्या प्रकरणात विश्लेषण केल्यावर लेखकाने आपल्या विवेचनाचा समारोप केला आहे. लेखकाच्या निष्कर्षवजा विचारांचा सारांश असा. पाश्चात्त्य संस्कृती ही आसुरी संस्कृती म्हणून तिच्यापासून दूर न पळता आपल्या भारतीय संस्कृतीतील प्रगतिपर, विधायक विचारांचे स्मरण ठेवून भौतिकशास्त्राची जोपासना भारतीयांनी केली पाहिजे.

सर्वांना समान संधी देणारा साम्यवाद अंगीकारला पाहिजे. पारलौकिकाची किंवा धर्माची उपासना ही वैयक्तिक बाब आहे. वैयक्तिक स्वातंत्र्याचा आदर राखूनही सामाजिक सुव्यवस्था, संपन्नता, भौतिक प्रगती यांचेकडे लक्ष दिले पाहिजे. 'संस्कृति-संगम' ग्रंथातील विवेचनासाठी लेखकाने ऐतिहासिक पुरावे साधार दिले आहेत. ग्रंथकार नामसूचीत २६ मराठी, २४ संस्कृत, ६४ इंग्रजी ग्रंथांचा नामनिर्देश केला आहे. त्यावरून लेखकाच्या व्यासंगाचा आणि परिश्रमशीलतेचा प्रत्यय येतो. पुस्तकाच्या शेवटी व्याकरणकार दादोबा पांडुरंग यांचे गुरू बापूशास्त्री शुक्ल यांनी दादोबांच्या ज्ञानलालसेचे कौतुक केले होते, त्याचे उदाहरण दिले आहे. पण दादोबा नास्तिक झाल्याबद्दल गुरुवर्यांनी खेद व्यक्त केल्यावर दादोबांनी आपणाला धर्म नीट समजाऊन न दिल्यामुळे तसे घडल्याचे सांगितले. पूर्वसंस्कारामुळे नव्या जमान्याकडे ज्यांना निर्विकार बुद्धीने पाहता येत नाही त्यांच्याशी वाद घालीत न बसता नव्या विद्येचे स्वागत करणे आपले कर्तव्य आहे, अशी मार्मिक प्रतिक्रिया दादोबांनी त्या वेळी व्यक्त केली. उपरोक्त यथोचित उदाहरण देऊन लेखकाने नव्या ज्ञानाचा सदुपयोग करणाऱ्याचा मौलिक सल्ला वाचकांना दिला आहे. भारतीय स्वातंत्र्याच्या सीमारेषेवरील काळात प्रसिद्ध झालेल्या द. के. केळकर लिखित 'संस्कृति-संगम' ह्या मौलिक ग्रंथामुळे पाश्चात्त्य-पौर्वात्य संस्कृतींचा परिचय जिज्ञासूंना होतो ; त्याचप्रमाणे दोन्ही संस्कृतींकडे समन्वयशील, आशावादी भूमिकेने पाहण्याचे सूचनही होते.

वि. शं. चौघुले

**सहवास : संत ना. मा. आणि संत, इंदिरा. प्रकाशक : लक्ष्मण नारायण चापेकर, १९४०.** या पतीपत्नींच्या कवितांचा हा पहिलाच व एकमेव जोडसंग्रह असून प्रीतीच्या स्पर्शाने पुलकित झालेल्या दोन प्रेमी जीवांचे भावमधुर नादनिनाद या कवितांतून उमटले आहेत. इंदिराबाईंच्या काव्यातील भावनाविष्कार अधिक उत्कट, सहजसुंदर व हृदयंगम आहे. रचनेची सहजता, उस्फूर्तता आणि भाषासौष्ठव या गुणांबरोबरच स्त्रीमनाची हळुवारता, मुग्ध प्रीतीची सलज्जता, नवतारुण्याची गोड हुरहुर, सहवासातील माधुर्य आणि वियोगातील आर्तता यांचे स्निग्ध दर्शन ओवीछंदातील त्यांच्या कवितांमधून घडते. निसर्ग सौंदर्याने पुलकित होणारे त्यांचे मनही या संग्रहातून प्रगटते. इंदिरा संतांना मराठी काव्यात पुढे जे श्रेष्ठ स्थान लाभले त्याची अंधूक चाहूल या कवितांमधून लागते. ना. मा. संत यांच्या काव्यातही प्रेमभावनेचीच अनुभूती भरून राहिली असून तिचा आविष्कार मात्र अधिक संयत व प्रयत्नपूर्वक वाटतो.

अनुराधा पोतदार

**सह्याद्रीवर्णन : रवळोव्यास.** महानुभाव कवी व लिपीकार म्हणूनच प्रसिद्ध असलेल्या रवळोव्यास यांनी लिहिलेले सह्याद्री वर्णन हे काव्य पंथातील महत्त्वाच्या साती ग्रंथात समाविष्ट झालेले आहे. या काव्याची ओवीसंख्या ५१७ असून रचनाकाराबद्दल विद्वानांच्यामध्ये मतभेद आहेत. डॉ. वि. भि. कोलते यांनी हा ग्रंथ शके १२७५ (इ. स. १३५३) मध्ये लिहिण्यात आला असावा असे म्हटले आहे. तर श्री. य. खु. देशपांडे यांच्या मते हा काल इ. स. १३३२ होय. रवळोव्यास हा हिराईसेचा शिष्य. या काव्यात अनेक ठिकाणी त्याने गुरुगौरव केला असून ग्रंथरचनेचे श्रेय तिला दिले आहे.

सह्याद्री पर्वताच्या परिसरात वास्तव्य करणाऱ्या श्रीदत्तात्रेयाचे चरित्र सांगण्याच्या हेतूने हा ग्रंथ लिहिण्यात आला आहे. प्रारंभी नमनाच्या वीस ओव्या असून काव्याचा विषय असलेल्या दत्तात्रेयाचे वर्णन फक्त १८३व्या ओवीपर्यंत आहे. पुढील भागात कवीने अळर्क, सहस्रार्जुन व परशुराम यांना श्रीदत्तात्रेयाकडून झालेल्या अनुग्रहाचे वर्णन आहे. काव्याच्या राहिलेल्या भागात गोविंदप्रभूंना झालेले शक्तिदान, चक्रधरांचे अवतारकार्य, कालयुगाचे वर्णन, गुरुद्रोहाचे परिणाम असा कथाभाग आलेला असल्याने सह्याद्री वर्णन हे ग्रंथशीर्षक पुरेसे ठरत नाही, यातील सह्याद्री म्हणजे माहूरचा पर्वत होय.

चक्रधरस्वामींवर कवीची नितांत निष्ठा आहे. या परमेश्वर अवताराची प्रतीती आल्यामुळे कवीच्या अंत:करणात निर्माण झालेल्या भक्तिभावनेमुळे काव्य रसोत्कट झाले आहे. काव्याच्या उत्तरार्धात चक्रधरस्वामींची वेधशक्ती, बोधशक्ती, त्यांच्या प्राप्तीची साधने या साधनांचे आचरण करणाऱ्या भक्तांना लाभणारे परमेश्वरी संरक्षण, चक्रधरस्वामींनी सांगितलेला जीवोद्धारणाचा 'परमार्ग' याचे विस्तृत वर्णन झाले आहे. कल्पनाविलास व भावनोत्कटता हे या काव्याचे विशेष आहेत. अलंकारांचे वैभव, अलंकारातील समर्पक प्रतिमांची योजना या विशेषावरून कवीच्या अभिजात प्रतिभाशक्तीचा, सौंदर्य-दृष्टीचा व रसिकत्वाचा प्रत्यय येतो. कवीने ग्रंथलेखनात महानुभाव पंथातील थोर कवी नरेन्द्र पंडित आणि भास्करभट्ट बोरीकर यांचे अनुकरण केले असले तरी स्वतंत्र रचना म्हणून या ग्रंथास वेगळे महत्त्व आहे. ज्ञानेश्वरीनंतर सुमारे साठ-सत्तर वर्षांनी निर्माण झालेल्या या ग्रंथात मराठी भाषेचे तत्कालीन स्वरूप दिसत असल्यामुळे भाषेच्या दृष्टीने ग्रंथ महत्त्वाचा ठरतो. प्रस्तुत ग्रंथकाराने 'सकळी' ही संकेतलिपी शोधून काढली व महानुभाव पंथातील ग्रंथ या लिपीत लिहिले गेल्यामुळे महानुभाव वाङ्मय इतरांना दीर्घकाल पारखे झाले.

**संक्षेप रामायण : संपादक : जनार्दन बाळाजी मोडक आणि वामन दाजी ओक. प्रकाशक : जावजी दादाजी, निर्णय-सागर प्रकाशन व प्रेस, मुंबई, १८९१.** मुक्तेश्वराचे 'संक्षेप रामायण' हे काव्य श्लोकबद्ध असून त्यात विविध वृत्तान्ताची योजना आहे. या काव्यातील श्लोकसंख्या १७२५ असून मूळ रामायणातील कथा संक्षेपाने मराठीत सांगावी या हेतूने हे लेखन झालेले दिसते. बालकांड, अयोध्याकांड, अरण्यकांड, किष्किंधाकांड,

युद्धकांड असा एक भाग आणि उत्तरकांड हा दुसरा उपसंहाराचा भाग अशी या काव्यात कथानकाची मांडणी झालेली आहे.

एकनाथांचा नातू असलेल्या मुक्तेश्वरांच्या रचनेत एकनाथी वाङ्मयाचे संस्कार जसे डोकावतात तसेच प्रस्तुत काव्यात 'हनुमन्नाटक' व जयदेवकृत 'प्रसन्नराघव' या नाट्यवृत्तींचा प्रभावही स्पष्ट दिसून येतो.

**साकी : बी. रघुनाथ. प्रकाशक : वीणा प्रकाशन, नागपूर, १९४०.** मराठवाड्यात कवी, कथाकार व कादंबरीकार म्हणून लोकमान्यता मिळालेल्या बी. रघुनाथ यांच्या एकोणीस कथांचा "साकी" हा संग्रह. "साकी" हा त्यांचा पहिलाच संग्रह आहे. निझामी राजवटीत भोगलेल्या दु:खाचे, सामान्य माणसाच्या पिळवणुकीचे शोषणाचे दर्शन त्यांच्या कथेत घडते. तंत्राचा बडेजाव न माजवता स्वत:ला आलेला अनुभव प्रांजळपणे मांडण्याकडे त्यांचा कल आहे. 'साकी' या संग्रहात प्रणयजीवनाशी निगडित शृंगारिक कथा आहेत; काही कथांत लेखकाची चिंतनशील व आदर्शवादी वृत्ती प्रकट झाली आहे. सरंजामी शासनव्यवस्था आणि कार्यालयात काम करणारी माणसे हाही लेखकाच्या आस्थेचा विषय आहे. 'नंदादीप आणि पणती', 'बाभळीचे झुडूप', 'कंदील' या कथांत लेखकाची तत्त्वदर्शी चिंतनशील वृत्ती दिसते. भोवताली घनदाट अंधार असला तरी इवलीशी पणती मात्र आपल्या सर्व शक्तीनिशी अंधाराला तोंड देण्यासाठी प्रयत्न करते. 'छोट्या माणसाचे मोठे काम' इथे लेखकाला सूचित करावयाचे आहे. 'फाउंटन् पेन', 'बेगम सकीना', 'एक हंगामी जागा', 'निळावंतीची लावणी' या कथांना कार्यालयीन वातावरणाची, सरंजामी राजवटीची पार्श्वभूमी आहे. बी. रघुनाथांच्या प्रेमकथांमध्ये कारुण्य, असहाय्यता, अपेक्षाभंगाचे दु:ख, नैराश्य, असफलता या भावना अभिव्यक्त होतात. 'बेगम सकीना' कथेमधील मुबारकचा होणारा अपेक्षाभंग, 'निरुद्ध जीवन' कथेतील मुमताजचे शोषण, 'फाकेमस्ताच्या आठवणी'मधील नायकाची कमळीच्या आठवणींनी झालेली विव्हल अवस्था, 'फूल आणि काटा' कथेतील नायकाचा दयाभाव, 'माणूस आणि' मधील विवाहितेची अतृप्ती आणि कुचंबणा इत्यादींचा या संदर्भात निर्देश करता येईल. 'दोन चित्रे' या कथेत लेखकाने दोन विरोधी घटनांचे निवेदन करून सामाजिक विषमता सूचित केली आहे. सुखवस्तू सधन कुटुंबातील लहान मूल खूप काळजी घेऊनही अशक्त राहते; तर रस्त्यावर वाढणारे एका गरीब वडारणीचे मूल अगदी सुदृढ, धडधाकट आणि तजेलदार असते. वडारणीच्या मुलाकडे पाहत किंचाळणाऱ्या नि रडणाऱ्या सुखवस्तू कुटुंबातल्या मुलाचे वर्णन करून लेखक म्हणतो, "पुढारलेली संस्कृती आपल्या पुरातन प्राथमिक वैभवाकडे पाहून जणू त्या किडक्या मुलाच्या रूपानंच रडत होती न काय ?....." बी. रघुनाथ यांना प्रतीत झालेले अनुभव 'साकी' या संग्रहात प्रांजलपणे आविष्कृत झाले आहेत. मराठवाड्याची भौगोलिक, सांस्कृतिक, सामाजिक पार्श्वभूमीचा वारसा मिळालेल्या बी. रघुनाथांच्या कथेचे बळ लेखकाच्या अनुभवसृष्टीच्या 'स्वतंत्र' अभिव्यक्तीत आहे.

**वि. शं. चौघुले**

**सातासमुद्रापलिकडे : गाडगीळ, गंगाधर. प्रकाशक : सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर, १९५९.** रॉकफेलर फौंडेशनतर्फे केलेल्या जगप्रवासातील विविध अनुभूतींचे चित्रण करणारे ललित लेखन.

रोम, व्हेनिस व पॅरीसमधल्या सामान्य माणसांचे, त्यांच्या वृत्ती प्रवृत्तींचे, धर्म व संस्कृती याविषयीचे अनुभव, युरोप, अमेरिका व पूर्व न्यूयॉर्क, कॅलिफोर्निया व जपानमधील अनुभव, युरोप, अमेरिका व पूर्व यांमधील फरक, या सर्वांशी भारतीय जीवनाची तुलना या लेखांत केली आहे. 'तरंगते दिवस'मध्ये अटलांटिक सागरावरील दिवसांचे काव्यात्म वर्णन असून 'कॅलिफोर्नियातील प्राणीप्रेम'मध्ये अमेरिकन प्राणिप्रेमाचे मासलेवाईक वर्णन आहे. काही ललित लेखांना कथांचा आकार आहे.

हे सारे लेख प्रवासातील असले तरी रूढ अर्थाने प्रवासवर्णने नाहीत. विनोद व उपहास यांच्या साह्याने जगातील विभिन्न जीवनपद्धती, समाज व संस्कृती यांचे दर्शन प्रवासवर्णन, ललितलेख व कथा या सर्वांचे मिश्रण असल्याने मराठीत एका वेगळ्या वैशिष्ट्यपूर्ण पुस्तकाची भर पडली आहे.

**शरद दळवी**

**सावलीच्या उन्हांत : अत्तरदे, श्रीराम हरी. प्रकाशक : नागपूर प्रकाशन, नागपूर, १९४६.** श्रीराम अत्तरदे यांची 'सावलीच्या उन्हांत' ही कादंबरी सातपुड्याच्या आणि आजूबाजूच्या भिल्ल, पावरी, कुणबी, कोळी या शोषितांच्या जीवनाचे चित्रण करणारी कादंबरी आहे. १९३०-४० च्या दरम्यान त्या भूप्रदेशात सुरू असलेल्या वर्गीय संघर्षाचे दर्शन प्रस्तुत कादंबरीत घडते. रामभाऊ मनसाराम भारंबे या काँग्रेस पक्षाच्या कार्यकर्त्याला केंद्रस्थानी ठेवून जगनशेठ, मिठाराम हे धनिक व सुंदऱ्या, झिपरू कोळी निर्धन या पात्रांच्या चित्रणाद्वारे कादंबरीचा आशय लेखकाने शब्दांकित केला आहे. रेंजर आणि सावकारांकडून होणारे भिल्ल, पावरींचे शोषण, त्यांचे जमिनीचे प्रश्न, ह्या पैलूंचे चित्रण करताना अत्तरदे यांनी लालबावटे-वाल्यांचा लढाऊ कार्यक्रम आणि काँग्रेस कार्यकर्त्यांचे मवाळ धोरण यांतील बाचकांसमोर ठेवला आहे. चित्रदर्शी रेखीव निसर्गवर्णने, स्थलवर्णने, प्रसंगरेखाटने आणि व्यक्तिदर्शने हा या कादंबरीचा ठळक विशेष आहे. कादंबरीकाराने कथावस्तूच्या उभारणीसाठी खानदेशी बोलीमधील गाणी, तिथले अस्सल ग्रामीण शब्द आणि पात्रांचे संवाद यांसाठी अहिराणी लोकभाषेचा अवलंब केला. विशेष म्हणजे, मूळ ग्रामीण बोलीतील संवाद कंसात ग्रांथिक मराठीत दिले आहेत. पुस्तकाच्या शेवटी दोनशे खानदेशी शब्दांची सूची दिली आहे. "देशभक्त म्हणवण्याऱ्या खादीधारी बगळ्यांच्या सावकारी छायेच्या दाहक उन्हात लाखो श्रमजीवी आत्मे कसे भाजून निघत आहेत, हे 'सावलीच्या उन्हांत' तुम्हाला सांगेल. विश्वस्तांच्या राजकारणाचे दिवस संपले आहेत. कामगार किसानाच्या वर्गीय संघटनाच लोकशाही निर्मू शकतील हे निर्विवाद." असे जे लेखकाने प्रस्तावनेत म्हटले आहे त्याचा प्रत्यय कादंबरी वाचताना येतो. कादंबरीचा हेतू

मतप्रचाराचा असला तरी लेखक ज्या शेतकरी वर्गातून आला आणि ज्यांच्यासाठी त्याने कार्य केले अशा दीनदुबळ्यांच्या व्यथा-वेदना साकार करण्याचा लेखकाचा प्रयत्न विचारात घ्यावा असा आहे. १९६० नंतर मराठीत ग्रामीण कादंबऱ्यांची विपुल निर्मिती होण्याच्या अगोदर श्रीराम अत्तरदे यांनी 'सावलीच्या उन्हांत' ही समूहजीवनाचे चित्रण करणारी व ग्रामसंस्कृतीचे दर्शन घडवणारी कादंबरी लिहावी, ही घटना निश्चितपणे उल्लेखनीय आहे.

**वि. शं. चौघुले**

**साहित्य : निर्मिती आणि समीक्षा : बेडेकर, दि. के. प्रकाशक : चित्रशाळा प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९५४.** 'साहित्यविचार', 'हेगेल : जीवन आणि तत्त्वज्ञान' इ. ग्रंथांचे लेखन करणारे दि. के. बेडेकर मार्क्सवादी विचारवंत म्हणून प्रसिद्ध आहेत.

'साहित्य : निर्मिती आणि समीक्षा' या ग्रंथात पहिल्या सहा प्रकरणांमधून साहित्य, साहित्यसमीक्षा, कवीचे व्यक्तिमत्त्व या विषयी तात्त्विक चर्चा आली आहे. नंतरच्या प्रकरणांमधून प्रत्यक्ष समीक्षणे आली आहेत.

'साहित्यसमीक्षेचे स्वरूप' ह्या प्रकरणात कलानिर्मिती व इतर निर्मिती यातील फरक, कला आत्मनिष्ठा की वस्तुनिष्ठ या संबंधीची तात्त्विक चर्चा करून 'कला जीवनाची सहचरी आहे', असे विधान बेडेकरांनी केले आहे. 'कवीच्या व्यक्तिमत्त्वाची मीमांसा' या लेखात "कविमन व बाह्य वास्तव यांच्या परस्पर प्रक्रियेतून कलाकृतीचा जन्म होतो" अशी कवितेची निर्मितीप्रक्रिया स्पष्ट केली आहे. 'कला आणि स्वातंत्र्य' 'काव्यातील अबोधवाद', 'काव्यामध्ये शैशवाची जपणूक', 'करुणरसाची मीमांसा' या काव्यासंबंधी तात्त्विक प्रकरणांनंतर 'नवकाव्य : परंपरा व अंत:प्रवाह' या समीक्षा-लेखात मर्ढेकरप्रणीत नवकाव्यातील दुर्बोधतेचा विचार केला आहे.' 'नवकाव्यातील विफलता', 'मानवजंतूसाठी वेदान्त', 'आजच्या भयाकुलतेचे रहस्य', 'मंजुळेला गबसलेला माणूस' हे या ग्रंथातील आणखी काही समीक्षालेख बेडेकरांच्या विदग्ध वृत्तीची साक्ष पटवितात.

साहित्याचा सौंदर्याच्या अंगाने आणि जीवनसंबद्ध भूमिकेतून विचार करणारा महत्त्वाचा समीक्षाग्रंथ म्हणून 'साहित्य : निर्मिती आणि समीक्षा' या ग्रंथाचा उल्लेख करता येईल.

**वि. दा. वासमकर**

**साहित्य आणि समाजजीवन : पेंडसे, लालजी. प्रकाशक : अ. ज. आवडे, मुंबई, १९३५.** मार्क्सवादी साहित्यिक व विचारवंत म्हणून लालजी पेंडसे परिचित आहेत.

साहित्यशास्त्रीय विवेचनाला विशिष्ट समाजशास्त्रीय बैठक मिळवून देण्याचा प्रयत्न लालजी पेंडसे यांनी ' साहित्य आणि समाजजीवन ' या ग्रंथात केला आहे.

विशिष्ट भौतिक परिस्थितीत विशिष्ट प्रकारच्याच विचारसरणी व कलाकृती निर्माण होत असतात असे लालजी पेंडसे यांचे म्हणणे आहे.

वाङ्मय कालनिष्ठ की व्यक्तिनिष्ठ ? वाङ्मयाच्या निर्मितीमध्ये लेखकाची प्रतिभा किती महत्त्वाची असते आणि तो ज्या परिस्थितीत वाढला त्या सामाजिक परिस्थितीची प्रेरणा किती महत्त्वाची असते यांसारख्या साहित्यशास्त्रीय प्रश्नांची चर्चा पेंडसे यांनी केली आहे.

मार्क्सवादी साहित्यदृष्टीचा प्रत्यय या ग्रंथाच्या वाचनाने येतो. मार्क्सवादी दृष्टिकोन असलेली साहित्यविषयक भूमिका घेणारे सुरुवातीच्या काळातील महत्त्वाचे लेखक म्हणून लालजी पेंडसे आणि अशा स्वरूपाचा ग्रंथलेखनाचा पहिला प्रयत्न म्हणून ' साहित्य आणि समाजजीवन ' या ग्रंथाचा उल्लेख करता येईल.

**वि. दा. वासमकर**

**साहित्य मंजरी : माटे, श्रीपाद महादेव. प्रकाशक : श्री. म. माटे, नातूबाग, पुणे-२, प्रथमावृत्ती, १९५४.** त्या काळी हंस, वसंत, लोकसत्ता, नवयुग, दीपावली, इत्यादी मासिकांतून वेळोवेळी प्रसिद्ध झालेल्या निवडक पंधरा लेखांचा, प्रा. माटे यांनी स्वत: निवडून स्वत:च प्रसिद्ध केलेला लेखसंग्रह वाङ्मयीन, सामाजिक, तात्त्विक, आत्मनिवेदनपर असे लेखांचे स्वरूप असून 'साहित्य' असे ग्रंथशीर्षकास पद असले तर निव्वळ वाङ्मयीन स्वरूपाचे लेखन संग्रहीत करण्याचा लेखकांनी विचार केलेला नाही.

नवे मतप्रतिपादन, सामाजिक प्रश्नांची जाण, उपेक्षित माणसांबद्दल आस्था, विविध विषयांची आवड, त्यांचा व्यासंग आणि विषयानुरोधाने आत्म प्रगटीकरन, स्वानुभव कथन, तसेच दुसऱ्यांस ज्ञान देण्याची लालसा या गोष्टी माटे मास्तरांच्या पिंडात ठासून भरल्या होत्या ; विषय समजून देताना त्याच्या सव्य-अपसव्य बाजूंचा विचार करून आपले मत मार्मिकतेने पटवून देताना त्यांनी दाखवलेला विवेक त्यांच्या या संग्रहातील लेखांमध्ये आवर्जून दिसतो.

मराठी लेखकांचे स्वर्गात संमेलन भरवून - साहित्यिकांची वैशिष्ट्ये त्यांच्या तोंडून वदवण्याची क्लृप्ती वापरून मौजेबरोबर केलेली त्या त्या साहित्यिकांची गुणदोष चर्चा ही वेगळीच साहित्यचर्चा ठरावी, श्रीज्ञानेश्वर, तात्यासाहेब केळकर हे एकमेकांशी बोलतात ही कल्पनाच मनोज्ञ करून माटेंनी लेखात मराठीचा स्वर्ग भरवला आहे. या लेखाबरोबरच 'श्रद्धा सरितेची गंगोत्री' हा बुद्धिप्रामाण्यवादाची चर्चा करणारा लेख, आणि 'संस्कृतीची वाटचाल' दाखवणारा लेख अभ्यासपूर्ण असून ते मूळातून वाचण्यासारखे आहे 'अडगळीची खोली'सारख्या लेखांस उत्कृष्ट 'लघुनिबंधाचा' दर्जा प्राप्त व्हावा इतका भावना-विचार आणि कल्पना-लालित्य यांचा सुमेळ जमला आहे.

श्री. म. माटे यांचा तात्त्विक आणि वैचारिक, अनुभवकथनपर निबंधांचा वाचनीय संग्रह.

**मोहन पाटील**

**साहित्यधारा : माटे, श्रीपाद महादेव. प्रकाशक : ठोकळ प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९४३.** 'उपेक्षितांचे अंतरंग', 'माणुसकीचा गहिवर' हे कथासंग्रह ; 'विवेकमण्डन', 'संत, पंत आणि तंत' इत्यादी वैचारिक ग्रंथाचे लेखक म्हणून श्री. म. माटे परिचित आहेत.

त्यांचा 'साहित्यधारा' हा तेरा स्फुट लेखांचा संग्रह आहे. 'भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी' हा या ग्रंथातील पहिला आणि महत्त्वाचा निबंध आहे. तो नंतर शालोपयोगी पुस्तकांमधून समाविष्ट करण्यात आला. या निबंधात शब्दप्रयोग, वाक्प्रयोग, म्हणी इत्यादींचा सविस्तर विचार केला आहे. व्यवसाय करणाऱ्या लोकांची भाषा कशी असते याचे संत काव्यातील नरहरी सोनार, सावता माळी, सेना न्हावी यांच्या अभंगांची उदाहरणे देऊन विश्लेषण केले आहे. 'शिक्षकाने केव्हा मरावे' हा शिक्षकांच्या दयनीय अशा आर्थिक स्थितीचे चित्रण करणारा निबंध वाचकाला अस्वस्थ करतो. 'शृंगाररसांचा राजा' या लेखात शृंगार हा रस आपल्या विविध रूपांनी मानवी जीवनाला कसा व्यापून राहिला आहे याचे विवेचन केले आहे. 'शेक्सपिअरची कुचाळी', 'माझी विद्वत्ता', 'ललित लेखक जीविताचे अनुकरण करतात काय ?' इ. आणखी काही महत्त्वाचे निबंध या ग्रंथात समाविष्ट आहेत.

विविध विषयांवर वैचारिक भाष्य करणारा ग्रंथ म्हणून प्रस्तुत निबंधाकडे पाहता येते.

**वि. दा. वासमकर**

**साहित्याचा ध्रुवतारा : वाळिंबे, रा. शं. प्रकाशक : मनोहर महादेव केळकर, मनोहर ग्रंथमाला, पुणे, १९४५.** रा. शं. वाळिंबे हे एक महत्त्वाचे साहित्यमीमांसक व समीक्षक आहेत. त्यांची साहित्यविषयक भूमिका प्राधान्याने संस्कृत साहित्य-शास्त्रावर पोसलेली आहे. 'साहित्याचा ध्रुवतारा', 'वाङ्मयीन टीका शास्त्र आणि पद्धती', 'साहित्यातील संप्रदाय', 'साहित्य-मीमांसा' इ. अनेक तात्त्विक व साहित्यसमीक्षात्मक ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

'साहित्याचा ध्रुवतारा' हा वाळिंबे यांचा पहिला ग्रंथ. 'साहित्य व रंजन', 'साहित्य व बोधवाद', 'साहित्य व जीवन' 'लोक-साहित्य व नवा वास्तववाद', 'संवेदनांचे तत्त्वज्ञान', व 'साहित्याची थोरवी' या सहा महत्त्वाच्या विषयांची चर्चा प्रस्तुत ग्रंथात वाळिंबे यांनी केली आहे. रंजनपरता, बोधवाद, जीवननिष्ठा, वास्तवदर्शन, सौंदर्यचिंतन इ. प्रयोजनांचा परामर्श घेऊन साहित्याने कोणत्या ध्येयाचा ध्रुवतारा आपल्यासमोर ठेवावा याचे दिग्दर्शन वाळिंबे यांनी या ग्रंथात केले आहे.

ग्रंथाच्या शेवटी लेखकसूची व विषयसूची जोडून या संशोधन-पर ग्रंथाची सांगता केली आहे.

साहित्यमीमांसा, विशेषतः साहित्याचे प्रयोजन यासंबंधी चर्चा करणारा एक उपयुक्त ग्रंथ म्हणून 'साहित्याचा ध्रुवतारा' या ग्रंथाची नोंद करता येईल.

**वि. दा. वासमकर**

**साहित्यातील संप्रदाय : वाळिंबे, रा. शं. प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती १९५०, तिसरी आवृत्ती १९७४.** निष्ठेने साहित्योपासना करणारे अभ्यासक म्हणून डॉ. रा. शं. वाळिंबे मराठी रसिकांना परिचित आहेत. साहित्यमीमांसा, समीक्षा, अशा अनेक विषयावर विपुल ग्रंथनिर्मिती डॉ. वाळिंबे यांनी केली आहे.

'साहित्यातील संप्रदाय' हा डॉ. वाळिंबे यांचा महत्त्वाचा ग्रंथ आहे. १९५०च्या पहिल्या आवृत्तीनंतर या ग्रंथाची १९६६ मध्ये सुधारून वाढविलेली आवृत्ती प्रसिद्ध झाली.

प्रस्तुत ग्रंथात अभिजातवाद, स्वच्छंदवाद, वास्तववाद, अतिवास्तववाद यांची सविस्तर चर्चा डॉ. वाळिंबे यांनी केली आहे. या वेगवेगळ्या वादांची चर्चा करताना पाश्चात्त्य साहित्यकृती, तसेच संस्कृत आणि मराठीतील साहित्यकृतींची उदाहरणे देऊन हा ग्रंथ सिद्ध केला आहे.

युरोपमध्ये साहित्यातील संप्रदायांचा उदय व विकास कसा झाला हे सांगणे हा या ग्रंथाचा प्रमुख उद्देश असून स्वच्छंदवादाची सांगोपांग चर्चा करणे हा हेतू आहे. मराठीत स्वच्छंदवादाच्या अनुषंगाने केशवसुतांपासून रविकिरण मंडळापर्यंत महाराष्ट्रात जी नवीन स्वरूपाची कविता निर्माण झाली तिची विस्ताराने चर्चा वाळिंबे यांनी केली आहे.

"डॉ. वाळिंबे यांचा पाचशे पानांचा हा ग्रंथ म्हणजे प्रमुख वाङ्मयीन वादांचा ज्ञानकोशच म्हटला पहिजे" असा अभिप्राय डॉ. हे. वि. इनामदार यांनी व्यक्त केला आहे.

"हा समग्र ग्रंथच अत्यंत वाचनीय आणि विचारात नवी भर टाकणारा झाला असून मराठीच्या प्राध्यापकांना, अभ्यासू विद्यार्थ्यांना आणि जिज्ञासू वाचकांना तो फार मार्गदर्शक ठरेल असाच मोलाचा आहे" असा अभिप्राय प्र. के. अत्रे यांनी व्यक्त केला आहे. अत्रे यांच्या अभिप्रायातच प्रस्तुत ग्रंथाचे महत्त्व व्यक्त झाले आहे.

**वि. दा. वासमकर**

**सुंदर मी होणार : देशपांडे, पु. ल. प्रकाशक : ग. पा. परचुरे प्रकाशन मंदिर, पुणे, १९५८.** 'सुंदर मी होणार' हे १९५८ साली रंगभूमीवर आलेले रुपांतरित नाटक आहे. रुडाल्फ बेसियर यांनी इंग्रजीतील ख्यातनाम कवयित्री एलिझाबेथ ब्राउनिंग व तिचा पती कवी रॉबर्ट ब्राउनिंग यांच्या प्रणय जीवनावर लिहिलेल्या 'द बॅरेट्स ऑफ विम्पोल स्ट्रीट' या नाटकाचा प्रस्तुत मराठी रूपांतराला आधार आहे. याशिवाय ब्राउनिंग दाम्पत्याचे चरित्र 'ईमॉर्टल लव्ह' आणि व्हर्जिनिया वुल्फ हिच्या 'फ्लश' पुस्तकाचेही साहाय्य रूपांतरासाठी नाटककाराने घेतले आहे. हे रूपांतर करीत असताना मूळ नाटकाचे सूत्र कायम ठेवून पु. ल. देशपांडे यांनी त्यात काही कल्पिताचे रंग भरले आहेत. इंग्रजी नाटकाचे रूपांतर करणे ही अवघड गोष्ट होती, पण नाटककाराने नाटकात भारतीय संस्थांनी वातावरणाचे अस्सल रंग भरले आहेत. नंदनवाडीचे अरसिक व माणूसघाणे संस्थानिक, त्यांची निसर्गप्रेमी, स्वप्नाळू, अपंग मुलगी दिदी, स्पष्टवक्ती

मुलगी बेबी, वडिलांचा अन्याय निमूटपणे सहन करणारे राजेंद्र व प्रताप हे मुलगे, दिदीवर प्रेम करणारा व दिदीच्या मनात आशावाद निर्माण करणारा तिचा प्रियकर संजय अशी परस्पर विरोधी पात्रांची निर्मिती नाटककाराने केली आहे. माणसाला जगण्यासाठी प्रेम व निसर्गसौंदर्याची आवड असावी लागते हे तत्त्व दिदीच्या व्यक्तीरेखेतून प्रकट झाले आहे. आपल्या शिस्तशीर आणि सत्ताकांक्षी स्वभावामुळे मुलांपासून दुरावलेले नंदनवाडचे महाराज हे नाटकातले प्रमुख पात्र आहे. महाराजांच्या हेकट व जुलमी स्वभावामुळे त्यांच्यापासून दुरावलेली मुले व महाराज यांच्यातील विरोध पु. ल. देशपांडे यांनी ताकदीने फुलवला आहे. त्यासाठी महाराजांच्या मुलांची लहानपणापासून जोपासना करणारे डॉ. पटवर्धन आणि महाराजांची पुतणी कल्पना व गायक नवरा सुरेश या पात्रांची निर्मिती नाटककाराने केली आहे. हुकमी, अत्याचारी व अन्यायी संस्थानी राज्यपद्धतीपेक्षा लोकशाही राज्यव्यवस्था समाजाच्या हिताची असते, हे तत्त्वही नाटकातून सूचित होते. संविधानकाची नेटकी रचना, पात्रांच्या स्वभावाला अनुरूप संवाद आणि मूळ इंग्रजी नाट्यकृतीला चढवलेला वास्तव भारतीय साज यांमुळे 'सुंदर मी होणार' हे मराठीतील रूपांतरित नाटकांतील एक महत्त्वाचे नाटक ठरते.

वि. शं. चौघुले

**सुदाम्याचे पोहे-अर्थात साहित्यबत्तिशी : कोल्हटकर, श्रीपाद कृष्ण. प्रकाशक : कोल्हटकर आणि कंपनी, मुंबई, तिसरी आवृत्ती १९२३.** श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे मराठीतील एक श्रेष्ठ विनोदी लेखक, नाटककार आणि समीक्षक म्हणून प्रसिद्ध आहेत.

विनोदनिर्मिती हे ध्येय डोळ्यासमोर ठेवून लिहिलेला हा विनोदी लेखांचा संग्रह. या संग्रहात बत्तीस लेख असल्यामुळे त्याचे 'साहित्यबत्तिशी' हे त्याचे दुसरे नाव अन्वर्थक आहे. प्रस्तुत ग्रंथाची दुसरी आवृत्ती १९०९ साली प्रसिद्ध झाली. तीत अठरा लेख समाविष्ट होते म्हणून त्या आवृत्तीचे नाव 'सुदाम्याचे पोहे अर्थात अठरा धान्याचे कडबोळे' असे योजले गेले होते. या आवृत्तीला न. चिं. केळकरांची प्रस्तावना होती. या आवृत्तीतील लेख एकदा नियतकालिकातून व दुसऱ्यांदा पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाल्यामुळे १९०९ च्या आवृत्तीला दुसरी आवृत्ती असे संबोधण्यात आले. त्यानंतर १९२३ सालपर्यंत कोल्हटकरांनी जे आणखी १४ लेख लिहिले त्यांची दुसऱ्या आवृत्तीत भर घालण्यात आली. आणि ती तिसरी आवृत्ती म्हणून 'सुदाम्याचे पोहे-अर्थात साहित्यबत्तिशी' या नावाने १९२३ साली प्रसिद्ध झाली.

मराठी विनोदी वाङ्मयाच्या इतिहासातील पहिला श्रेष्ठ आणि अभिजात ग्रंथ म्हणजे 'सुदाम्याचे पोहे' नॅशनल बुक ट्रस्ट या दिल्लीच्या साहित्य संस्थेने १४ भाषांतून अनुवाद करण्यासाठी या ग्रंथाची निवड केली यावरून या ग्रंथाचे माहात्म्य लक्षात यावे.

अतिशयोक्ती, शाब्दिक कोटी, उपरोध, उपहास, विडंबन या साधनांद्वारे कोल्हटकर आपला विनोदी लेख फुलवितात. कोल्हटकर हे वृत्तीने समाजसुधारक असल्याने त्यांनी आपल्या विनोदी लेखातून अंधश्रद्धा, रुढी यांच्यावर टीका केली आहे. सनातनी लोकांवर त्यांचा विशेष कटाक्ष दिसून येतो. आपल्या अनेक वेडगळ चालीरीती, समजुती, रूढी त्यांनी हास्यास्पद ठरविल्या आहेत. 'कुलूप', 'शिमगा', 'गणेशचतुर्थी', 'हजामतीची नीतिमीमांसा', 'श्रावणी', 'चोरांचे संमेलन', 'आमचे बैठे खेळ', 'साहित्य परिषदेची तयारी', 'साधुसंत', 'झोप', 'आमच्या गावातील पाण्याचे दुर्भिक्ष' इ. अनेक विनोदी लेखांनी तत्कालीन महाराष्ट्रात खळाळून हास्य निर्माण केले. या ग्रंथातील विनोदाचा दर्जा अभिजात असल्यामुळे आजही या विनोदी लेखांमुळे मराठी रसिक खळखळून हसून दाद देतो.

श्रीपाद कृष्णांचे पांडुतात्या व बंडूनाना हे मानसपुत्र मराठी साहित्यविश्वात गाजले. अनेक लेखांत हे पांडुतात्या व बंडूनाना आणि कधी कधी स्वतः लेखक यांच्याकडून विनोदी घटना घडतात. कोल्हटकर हे वृत्तीने समाजसुधारक असल्यामुळे मूषकवाहन, वक्रतुंड, लंबोदर म्हणून गणपतीची थट्टा त्यांनी केली. त्याचा परिणामही त्यांना भोगावा लागला अशी चर्चा त्याकाळी होत होती. असे असले तरी मराठीतील विदग्ध साहित्यज्ञापासून सामान्य वाचकांपर्यंत सर्वांना भावलेला हा ग्रंथ आहे. न. चिं. केळकरांनी "मराठी भाषेतील विनोदपीठाचे आचार्य" ही बहुमोल पदवी श्रीपादकृष्णांना दिली आहे; ती सार्थ आहे.

वि. दा. वासमकर

**सुधारक : माधव जूलियन (माधव त्रिंबक पटवर्धन). प्रकाशक : वा. गो. परांजपे, आर्यसंस्कृती प्रेस, पुणे, १९२८ (रविकिरण मंडळ प्रकाशन, क्रमांक ११).** श्री. माधव त्रिंबक पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन हे मराठीतले प्रथितयश कवी. यांनी यशवंत, गिरीश, श्री. बा. रानडे या मान्यवर कवींसह 'रविकिरण मंडळ' या मंडळाची १९२३ साली स्थापना केली. हे मंडळ सभासदांच्या पुस्तकांचे प्रकाशनही करीत असे. या मंडळाने एकूण ५० पुस्तके प्रकाशित केली. कवी गिरीश (शंकर केशव कानेटकर) यांनी लिहिलेले श्री. माधवराव पटवर्धन यांचे 'स्वप्नभूमी' हे चरित्र हे मंडळाचेच ५०वे प्रकाशन. प्रस्तुत पुस्तकही मंडळाचेच प्रकाशन आहे.

दोन खंडकाव्ये, चार कवितासंग्रह, एक अनुवादित कविता संग्रह, एक कोश, छंदोरचना हा ग्रंथ, या ग्रंथास मुंबई विद्यापीठाची डी. लिट. पदवी इतके त्यांचे साहित्य प्रसिद्ध झाले आहे.फर्ग्युसन कॉलेज, पुणे; राजाराम कॉलेज, कोल्हापूर या महाविद्यालयांत ते फार्शी भाषेचे प्राध्यापक होते.

'सुधारक' हे उपहासगर्भ, सामाजिक चालीरीतीवर टीका करणारे प्रदीर्घ खंडकाव्य. या संग्रहास कवीने प्रवाहपतितांचे तरङ्गारोहण या शीर्षकाची प्रस्तावना लिहिली आहे. काव्यापेक्षा

व्यक्तिचित्रणावर भर दिला असून एकूण अठरा अध्यायाच्या या काव्याची प्रकरणांची शीर्षके व्यक्तीनामेच असून यात या व्यक्तीचे वर्णन येते. रावबहादूर केरो विष्णू ठोसर हे सुधारक वकील प्रथम पत्नीच्या मृत्यूनंतर ते विमला या विधवेशी विवाह करतात. त्यांना तीन मुले. प्रथम पत्नीचे अपत्य सरला. द्वितीय पत्नीची अपत्ये अजित आणि तरला. सरला जी. ए. होते व तिचा विवाह रंगराव देशमुख या विधुराशी होतो. रंगराव देशमुखाशी, त्याच्या वर्तणुकीने वितुष्ट ती घरी परतते. मनाच्या या विकल अवस्थेत ती डॉ. ओंकारस्वामीकडे जाऊ लागते. या स्वामींच्या भोंदूपणाचे तिला दर्शन होते. वासू राजे यांच्याशी तिचा परिचय होऊन ती त्यांची शिकवणी तरलेसाठी लावते. वासूचे आणि तरलेचे प्रेम जमते पण रावबहादूर हे लग्न मोडतात व त्यांच्या वरवरच्या सुधारकी मताचे खरे स्वरूप उघडे होते. तरलेचा विवाह शंभू सबनीसाशी होतो. रावबहादूरांच्याकडे मधल्या काळात मेजर गोखले येतात. सरलाला त्यांचेबद्दल प्रेमभाव निर्माण होते पण ते प्रतिसाद देत नाहीत. वासू राजे (नायक), ज्याने सरलेला स्वामीच्या तावडीतून सुटण्यासाठी मदत केलेली असते, तो तरलेबरोबरच्या प्रेमभंगाने पुण्याहून निघून मुंबईला येतो. दरम्यान मेजर गोखले युद्धात मरण पावतात. या बातमीने सरलेला धक्का बसतो. या धक्क्यानेच ती मृत्यू पावते. वासू मुंबईस शिक्षण घेत असतो. त्याचे श्यामा वेंगुर्लेकर या गणिकेच्या कन्येशी प्रेम जमते. सगुणा कुलकर्णी या विधवेने भ्रूणहत्या केल्याची बातमी वासूच्या वाचनात येते. न्यायमूर्तींनी सगुणेला विवाहाची परवानगी दिलेली असते. वासू तिच्याशी विवाह करतो. परंतु तिचाही मृत्यू होतो. पण मरतेसमयी सगुणा वासू-श्याम यांना एकत्र आणते. यानंतर वासू दयाश्रम उघडतो. बहिष्कृत, पतित, अनाथ यांना शिक्षण देण्याचे कार्य सुरू करतो. इतके या काव्याचे कथानक श्री. गोपाळ गणेश आगरकर यांच्या साप्ताहिकाचे नाव 'सुधारक' नायक वासू हा श्री. आगरकरांचे विचार मानणारा. त्यामुळे या काव्याचे शीर्षक 'सुधारक' हे अन्वर्थकच. या खंडकाव्यात उत्कटता असली तरी 'तुतारी' या एकाच वृत्तात केलेल्या रचनेवर आक्षेप घेतला गेला आहे. संपूर्ण काव्य या एकाच वृत्तात आहे. समाजातील रूढी, निरनिराळे सामाजिक प्रश्न, मनुष्य स्वभाव, मध्यमवर्गीयांच्या उथळपणावर टीका, सामाजिक हेतू, प्रचलित समाजव्यवस्थेतील स्त्री आणि पुरुष यांना मिळणारा विषम न्याय या सर्व विषयांवर काव्य करताना कवीच्या प्रतिभेचा मुक्त संचार दृष्टोत्पत्तीस येतो. अनेक पात्रे, सामाजिक समस्या इत्यादिंचे चित्रण करण्याचा यशस्वी प्रयत्न या खंडकाव्यात आहे.

**सुभाषित रत्नावली : महाराष्ट्र सारस्वत ग्रंथमाला, पुष्प पहिले : वर्दे, तुकारामबाबा. संपादक : सदानंद लक्ष्मण कापडी, लक्ष्मीनारायण प्रेस, मुंबई, १९४०.** भर्तृहरीच्या शतकत्रयीचे तुकारामबाबा बर्दे यांनी केलेले हे समश्लोकी भाषांतर आहे. रचनाकाळ-सोळाव्या शतकाच्या शेवटी व सतराव्या शतकाच्या आरंभी.

भर्तृहरीच्या नीतिशतकाच्या व वैराग्यशतकाच्या श्लोकदशकालात निरनिराळी नावे देऊन त्यातील श्लोक त्या त्या सदराखाली येतील असा श्लोकानुक्रम रूपांतरकाराने साधलेला आहे. नीतिशतकात दहा पद्धती आलेल्या आहेत. अज्ञपद्धती, विद्वत्पद्धती, शैर्यपद्धती, अर्थपद्धती, दुर्जनपद्धती, सज्जनपद्धती, परोपकारपद्धती, शलपद्धती, दैवपद्धती व कर्मपद्धती.

वैराग्यशतकात आशादूषणपद्धती, संसार परित्यागपद्धती, कालमहिमापद्धती अवधूतचर्यापद्धती, अशा प्रकारची दशके आलेली आहेत.

शृंगारशतकात पाच 'विंशती' कल्पिलेल्या असून त्यांची नावे स्त्रीप्रसंग, कामिनी प्रशंसा, कामिनीगर्हण, कामिनीविहर्गण व षडऋतुवर्णन अशी आहेत.

तुकारामबाबा बर्दे यांनी भाषांतर करताना वामनपंडिताप्रमाणे मुळातील श्लोकांची संख्या कमी केलेली नाही वा वाढविलेली नाही, तर प्रत्येकी शंभर श्लोकच लिहिलेले आहेत. संस्कृत वृत्तातही बदल न करता मूळ वृत्ताचे मराठी रुप फक्त दिलेले आहे. म्हणून ते खऱ्या अर्थाने समश्लोकी भाषांतर आहे.

लता मोहरीर

**सुस्त्रीचातुर्यदर्शन अथवा गुलाबछकडीचा मनोरंजक फार्स : लेखक व प्रकाशक : जोगळेकर, दत्तात्रय वासुदेव. १८८५.** गुलाबछकडी नावाची एक रूपगुणसंपन्न पतिव्रता स्त्री आपल्या रूपसौंदर्यामुळे गावातल्या सोरट शोकिनांकडून गांजली जाते. आपल्या वृद्ध नवऱ्याला विश्वासात घेऊन ती गावातल्या प्रतिष्ठितांची कशी फजिती करते याचे वेधक चित्रण या फार्सात आले आहे. न्यायाधीश, फौजदार, राजा यांना ती रात्रीच्या समयी निरनिराळ्या वेळी बोलाविते. एक आल्यानंतर दुसरा थोड्या वेळाने येतो व अगोदरच्या व्यक्तीला बाईचे सोंग घेऊन रात्रभर दळावे लागते, पेटीत लपून बसावे लागते. शेवटी सर्वांची फजिती होते. अश्लीलतेकडे न झुकल्याने या फार्सची रंगत वाढत राहते व प्रेक्षकांना विश्वासात घेऊन फजितीचे चित्रण केल्याने क्षणोक्षणी उत्कंठा वाढवीत केले आहे.

भीमराव कुलकर्णी

**सुलभ विश्वकोश (सचित्र) : संपादक : दाते, य. रा.; कर्वे, चिं. ग. प्रकाशक : य. गो. जोशी, पुणे, १९४९-१९५०.** डॉ. केतकरांचे सहकारी व त्यांच्याच परंपरेतील कोशकार 'महाराष्ट्र शब्दकोशाचे' कर्ते य. रा. दाते व चिं. ग. कर्वे यांनी १९४९ ते १९५० या काळात सुलभ विश्वकोश (सचित्र) तयार करून प्रकाशित केला. हा एका प्रकाराने 'लघुज्ञानकोश'च आहे हा कोश निव्वळ महाराष्ट्रीय ज्ञानकोशाची छोटी आवृत्ती नसून यातील लेखांचे धोरण आणि आखणी व मांडणी अगदी वेगळ्या प्रकारची आहे. 'या कोशात जगातील सर्व विषयांची, व्यवहारांची मांडणी सुबोध आणि थोडक्यात

सापडेल' असे संपादकांनी सांगितले आहे. या कोशात सुमारे १३०० नोंदी असून १००० चित्रे व नकाशे आहेत. याच्या सर्व खंडांना प्रस्तावना आहेत. त्या अशा—भाग-१, सृष्ट्युत्पत्तीपासून मानवोत्पत्तीपर्यंत विश्वविकास, भाग-२, भौगोलिक परिस्थिती आणि मानववंश, भाग-३, प्राचीन संस्कृति-विकास, भाग-४, ग्रीक व रोमन संस्कृति-विकास, भाग-५, भारतीय व चिनी संस्कृति-विकास.

सु. रा. चुनेकर

**सुवर्णतुला : गोखले, विद्याधर. प्रकाशक : संजय प्रकाशन, मुंबई, १९६०.** 'सुवर्णतुला' हे विद्याधर गोखले यांनी लिहिलेले तिसरे नाटक. विसाव्या शतकात मराठी रंगभूमीवर संगीत नाटकांची मुद्रा उमटलेली होती. कालांतराने संगीत नाटकांची परंपरा उतरणीला लागली. १९६० नंतर ज्या संगीत नाटकांनी मराठी रंगभूमीचे पुनरुज्जीवन केले त्यांतील रसिकमान्य ठरलेले 'सुवर्णतुला' हे महत्त्वाचे नाटक आहे. हे नाटक 'हरि-विजय' ह्या पंडित कवी श्रीधरांच्या कथाकाव्यावर आधारलेले आहे. प्रस्तुत नाटकातील शेवटच्या अंकात राधेच्या व्यक्तिरेखेला महत्त्वाचे स्थान आहे. वस्तुतः मूळ महाभारतात किंवा भागवतात राधेची व्यक्तीरेखा नाही. 'अनया राधितो नूनं....' या भागवतातील श्लोकाच्या आधारे कल्पनेच्या साहाय्याने पौराणिक कवींनी निर्माण केलेली 'राधा' ही व्यक्तिरेखा आहे. उत्तरकालीन कवींनी राधा-कृष्ण प्रेमाला वैषयिक किंवा शृंगारिक वळण दिले आहे. मात्र नाटककाराला प्रस्तुत नाटकात राधेच्या निष्काम व निःस्वार्थ भक्तीचा महिमा नाटकाच्या माध्यमातून वर्णन करावयाचा आहे. त्यासाठी विद्याधर गोखले यांनी तीन अंकांच्या संविधानकातून अत्यंत बांधेसूदपणे कथावस्तू प्रेक्षकांसमोर ठेवली आहे. सत्यभामा आणि रुक्मिणी या दोघींच्या कृष्णप्रेमासंबंधी संशय निर्माण व्हावा, त्यांची मने कलुषित व्हावीत म्हणून प्रयत्न करतात. त्यातच कृष्णाची बालमैत्रीण रैवतक पर्वताजवळच्या राजमंदिरात मैत्रिण उतरणार असल्याचे समजताच सत्यभामेच्या रागाचा पारा अधिकच चढतो. कृष्णाचे प्रेम कायम आपल्यावर राहावे म्हणून शिवाचे व्रत करणारी सत्यभामा दुसऱ्या अंकात नारदांना भेटते. या व्रताबरोबरच आणखी एक साधे व्रत करण्याचा 'सोपा' मार्ग कळलावे नारद सत्यभामेला सुचवतात. कृष्णाचे दान विधीपूर्वक एखाद्या सत्पात्र ब्राह्मणाच्या हाती सोडणे हा तो उपाय. आयत्याच उपलब्ध झालेल्या नारदमुनींच्या हातावर सत्यभामा पतीचे श्रीकृष्णाचे दान सोडते. नाटकाचा तिसरा अंक नाट्यपूर्ण घटनांनी भरलेला आहे. ह्या कपटनाट्याच्या मुळाशी देवेंद्र आहे, हे समजल्यामुळे बलराम युद्धाची भाषा करतात. पण संघर्ष टाळण्यासाठी श्रीकृष्णाची सुवर्णाच्या मोहरांनी तुला करण्याची अट नारदमुनी घालतात. ती अट मान्य केली जाते. सुवर्ण, जडजवाहिरासोबत, स्यमंतक मणी, सत्यभामा व रुक्मिणीचे दागिने हे सर्व पारड्यात टाकूनही कृष्णाचे पारडे जडच राहते. शेवटी रुक्मिणी श्रीकृष्णाचें पूजन करून तुलशीदल पारड्यात टाकते. श्रीकृष्णाच्या भावभक्तीचे प्रतीक असलेले तुळशीचे पान राधेच्या सूचनेनुसार पारड्यात टाकले जाताच चमत्कार घडतो. रुक्मिणी व सत्यभामा यांना भक्तिभावाच्या तुलसीदलांचा जागता पाहारा कृष्णाभोवती ठेवण्याचा सल्ला राधा सत्यभामा व रुक्मिणी यांना देते. नाटककार गोखल्यांनी आकर्षकपणे केलेली प्रवेशांची मांडणी, सत्यभामा-रुक्मिणी यांच्या स्वभावातील विरोध, नारदाचा कळलावेपणा, कृष्णाने नारदाशी संगनमत करून निर्माण केलेले कपटनाट्य, बलरामाचा आपल्या घराण्याविषयीचाभिमान आणि वीरवृत्ती ही या नाटकाची ठळक वैशिष्ट्ये आहेत. नाटकातील संवाद अनौपचारिक आहेत. रसानुकूल पदांतील 'रतिहुन सुंदर मदन-मंजिरी', 'फुलला मनीं वसंत-बहार!' 'येतिल कधीं यदुवीर-सखये' ही महाराष्ट्रातील संगीतप्रेमींच्या मनावर कायम मोहिनी घालणारी पदे आहेत. विद्याधर गोखले लिखित 'सुवर्णतुला' नाटकाला सातत्याने मिळणाऱ्या प्रतिसादात नाटकाच्या यशाचे रहस्य सामावलेले आहे.

वि. शं. चौघुले

**सुशील यमुना अथवा वासुदेव बळवंत फडके यांच्या बंडाची धामधुम : पंडित, बळवंत मनोहर. प्रकाशक : जावजी दादजी, मुंबई, १८९१.** रामोशांच्या मदतीने बंड उभारून परकीय सत्तेचा नायनाट करू पाहणाऱ्या वासुदेव बळवंत फडक्यांच्या कार्याची पार्श्वभूमी लाभलेली ही कादंबरी—बळवंत मनोहर पंडित यांनी लिहिली आहे. कादंबरीत यमुना नावाच्या दुर्दैवी स्त्रीचे कथानक गुंफले आहे. समकालीनत्वामुळे चांगली माहिती दिली आहे. लेखकाला इंग्रजांचे सामर्थ्य लक्षात आल्यामुळे काही वेळा वासुदेव बळवंत फडके यांचे कार्य हे अव्यापारेषु व्यापार असल्याने, तर काही प्रसंगी फडके यांचे बंड राजकीयदृष्ट्या महत्त्वाचे असल्याचे दाखविते. रचना मात्र विस्कळीत, शुष्क, नीरस आणि संभ्रमित आहे. भाषा पंडिती वळणाची आहे.

भीमराव कुलकर्णी

**सुषमा : चोरघडे, वामन. प्रकाशक : ह. वि. मोटे, प्रतिभा कचेरी, मुंबई, पहिली आवृत्ती, १९३६.** १९३० ते १९४६ पर्यंतचा कालखंड हा लघुकथेचा कालखंड मानला जातो. या कालखंडातील वामन चोरघडे हे विशेष उल्लेखनीय लघुकथाकार. १९३२ मध्ये त्यांची पहिली 'अम्मा' ही कथा प्रसिद्ध झाली. 'हवन', 'यौवन', 'प्रस्थान', 'पाथेय', 'संस्कार', 'प्रदीप', 'नागवेल', 'मजल', 'बेला' इ. कथासंग्रह प्रसिद्ध असून 'सुषमा' हा त्यांचा पहिला कथासंग्रह. या संग्रहात 'कुसुमची पहिली लघुकथा', 'प्रत्येकाने सांगितलेली गोष्ट', 'विहीर', 'मातीची भांडी', 'झोपेत लिहिलेली गोष्ट', 'आणभाक', 'अंतरंग' इत्यादी सोळा कथा समाविष्ट आहेत.

विविध उत्कट अनुभवातून स्फुरलेल्या या कथा अंतर्मुख करायला लावणाऱ्या असून निवेदनातील अकृत्रिमता हा चोरघडे यांचा लेखन विशेष या कथांतून नजरेत भरतो. बाह्यघटना आणि भडक प्रसंग या कथात येत नाहीत. लहान-लहान लयदार वाक्ये, निसर्ग, माणूस यांच्यातील सहसंवेदनाची जाणीव त्यांच्या कथांतून आलेली आहे. चिंतनशीलता, उत्कटता, तंत्राबद्दलची उदासीनता, अनुभवाबद्दलची आस्था, ध्येयवादाचे आकर्षण आणि तत्त्वशोधनाची हौस हे या कथांचे लक्षणीय विशेष आहेत.

लघुकथेचा विकास समजावून घेण्यासाठी कथासंग्रह अभ्यासनीय.

यशवंत चव्हाण

**सेंट पीटरचे पुराण : फादर कृवा.** पाद्री एलियन-द-ला कृवा (फादर कृवा) या जेजुइत (ख्रिस्ती) पंथीय फ्रेंच पाद्रीने (इ.स. १५७९ ते १६४३) ग्रांथिक मराठी भाषेत रचलेले 'सेंट पीटरचे पुराण' गोव्यात १६२९ साली रोमन लिपीत प्रसिद्ध झाले. या २१८७ ओवीसंख्येच्या बृहत्काव्य ग्रंथाचे मूळ शीर्षक पोर्तुगीज भाषेत असून त्याचे मराठीपण ज्यात हिंदू धर्मातील चुकांचे खंडन केले आहे असे 'सेंट पीटरचे चरित्र' असे होईल. संपूर्ण ग्रंथाच्या तीन विभागांना 'पुराण' असे नाव देऊन त्यांची 'कांडात' आणि प्रत्येक 'कांडा'ची 'अवस्वरू'मध्ये विभागणी आढळते. फादर स्टिफन्सननंतर रायतूर (गोवा) येथील सेंट इग्नेशस कॉलेजचा प्राचार्य झालेल्या या पाद्री कृवाने नवख्रिस्त्यांच्या उद्‌बोधनासाठी म्हणून हे महापुराण लिहिले. त्यासाठी विष्णू, राम, कृष्ण, महेश, गणेश, तुलसी इ. हिंदू देवदेवतांची निंदा व कमालीचा उपहास आणि विपर्यास या प्रभावी शस्त्रांचाही तो फार वापर करताना आढळतो. योगवासिष्ठ, गीता, अश्वमेध, भागवत, द्रोणपुराण, आदिपुराण इ. हिंदूंच्या प्राचीन ग्रंथांचे त्याने दिलेले संदर्भ लक्षवेधक वाटतात.

वि. बा. प्रभुदेसाई

**सेतू : बापट, वसंत. प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पहिली आवृत्ती १९५७.** वसंत बापट हे स्वातंत्र्योत्तर काळातील एक महत्त्वाचे कवी. 'बिजली', 'सेतू', 'अकरावी दिशा', 'सकीना' इत्यादी तेरा कवितासंग्रह; 'चंगामंगा', 'अबडक तबडक', 'फुलराणीच्या कविता' इत्यादी सहा बालकवितांचे संग्रह प्रसिद्ध. याशिवाय बालनाट्य, बालनृत्यनाट्य, प्रवासचित्रे, समीक्षा इ. वाङ्मयप्रकारांच लेखन.

'सेतू' हा वसंत बापटांचा 'बिजली'नंतरचा महत्त्वाचा कवितासंग्रह. या संग्रहात त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण कविता समाविष्ट झाल्या आहेत. नव्या अनुभूती प्रत्ययाला आणून देणारा कवितासंग्रह म्हणून या संग्रहाचा उल्लेख करता येईल. या कवितांच्या अभिव्यक्तीत कलात्मक अपरिहार्यता जाणवते.

या संग्रहात एकंदर ५२ कविता समाविष्ट झाल्या आहेत.

"शरदामधली पहाट आली तरणीताठी।
हिरवे हिरवे चुडे चमकती दोन्ही हाती।
शिरि मोत्यांचे कणिस तरारून झुलते आहे।
खांद्यावरती शुभ्र कबूतर खुलते आहे।।"

अशा तऱ्हेने निसर्गावर मानवी भावनेचा आरोप करणारी ही कविता आहे. 'स्मरते तुजला ?' यासारख्या कवितेत स्त्री-पुरुषाचे हळवे, कोमल आणि ज्याला विशिष्ट नात्यात बांधून ठेवता येत नाही असे चित्रण बापट यांनी उत्कटतेने केले आहे. 'फुंकर' ही बापटांची आणखी एक महत्त्वाची कविता या संग्रहात येते. भूतपूर्व प्रेयसीच्या घरी नायक जातो त्यावेळी आपल्या प्रेमाचा थोडा का होईना परिणाम कुठे जाणवतो का हे पाहणारा नायक आणि त्याचे भावविश्व कवी प्रकट करतो. 'विस्मृती', 'विचार ते', 'कसे सांगू तुला' इत्यादी कविता प्रेमाची वेगवेगळी रूपे चित्रित करतात. 'ऋतुराजांनो' ही कविता निसर्गाची वेगवेगळी रूपे चित्रित करणारी आणि दीर्घकवितेकडे झुकणारी कविता आहे. 'प्रियंवदा' ही नाट्यकविता संग्रहाचे सौंदर्य वाढविते.

बापटांची कविता बहुरंगी प्रतिमासृष्टी निर्माण करते. अतींद्रिय अनुभवांना ती रूप-रस-गंधाचे लावण्य देणारी कविता म्हणून तिचे महत्त्व आजही आहे.

वि. दा. वासमकर

**सेनापती तात्या टोपे यांचे अल्पचरित्र : लेखक व प्रकाशक : ना. दा. सावरकर, १९३२.** १८५७च्या क्रांतियुद्धाचे नेतृत्व करणाऱ्या सेनापती तात्या टोपे यांचे छोटेखानी चरित्र डॉ. ना. दा. सावरकर यांनी प्रसिद्ध केले. याची दुसरी आवृत्ती १९४० मध्ये निघाली. तात्या टोपे हे स्वातंत्र्यवीर होते आणि त्यांच्या झुंझार जीवनाची आणि हौताम्याची कथा ओजस्वी भाषेत कथन केली आहे.

म. श्री. दीक्षित

**सोपानदेवी : सोपानदेव.** सोपानदेवांनी भगवत्‌गीतेवर समश्लोकी टीका केली असून ती 'सोपानदेवी' म्हणून ओळखली जाते. १२७७ ते १२९६ हा सोपानदेवांचा जीवनकाळ असल्याने साहजिकच हा ग्रंथ ह्या कालावधीतला आहे.

श्री. त्र्यं. ह. आपटे यांनी इ. स. १९९४ मध्ये 'सोपानदेवी' हा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. (या व्यतिरिक्त काही लहान-लहान प्रकरणे व अभंग आणि पदे अशी सोपानदेवांची अन्य रचना आहे.)

वि. पा. देऊळगावकर

**सोयराबाईचे अभंग :** चौदाव्या शतकाच्या पूर्वकाळातील मंगळवेढ्याचा अभंगकार चोखामेळा यांची पत्नी सोयराबाई हिने लिहिलेले ६२ अभंग सकलसंत गाथेच्या पहिल्या खंडात समाविष्ट करण्यात आलेले आहेत.

सोयराबाई 'चोखयाची महारी' असा स्वतःचा उल्लेख अभंगांमधून करते. 'हीन मी काय वानू देवा' अशी आपल्या हीन जातीविषयीची जाणीव चोखोबांप्रमाणेच तिच्याही अभंगांमधून व्यक्त झालेली आहे. भगवद्‌भक्तीची तिच्या मनाला

लागलेली ओढ "येई येई गरुडध्वजा, विटेसहित करीन पूजा" अशा आवेगासह साकार होते. त्याचप्रमाणे सामाजिक मानखंडना व आपले दारिद्र्य यांचे आघातही ती व्यक्त करते-- "पंढरीचे ब्राह्मणे चोखयासी छळिले। जयालागी केले नवल देवें", "आमची तो दशा विपरीत झाली। कोण आम्हा घाली पोटामध्ये" देहाचा विटाळ मानणाऱ्या कर्मठांची कानउघाडणी करून लोकांच्या संसारासक्तीचा कडक निषेध तिने केलेला आहे. सर्व मित्र-गोत्र केवळ सुखाचे सोबती असा कडवट अनुभवही व्यक्त केला आहे.

सोयराबाईच्या प्रासंगिक व सांप्रदायिक स्वरूपाच्या अभंगांमधून तिच्या मनाचे उत्कट, संवेदनशील व अकृत्रिम स्वरूप सहजपणे व्यक्त झालेले आहे.

चंद्रकांत धांडे

**सौंदर्य आणि साहित्य : मर्ढेकर, बाळ सीताराम. प्रकाशक : मौज प्रकाशनगृह, मुंबई, १९५५.** मर्ढेकरांनी वेळोवेळी व विविध प्रसंगांच्या निमित्ताने लिहिलेल्या सौंदर्यशास्त्राविषयक व अन्य लेखांचा संग्रह. सौंदर्यदृष्ट्या विचार करणे म्हणजे एखादया कलाकृतीने स्फुरविलेल्या संवेदनांच्या अंगभूत खुणांतील संवाद, विरोध, समतोल किंवा प्रमाणबद्धता यांना अनुसरून विचार करणे हा महत्त्वाचा सिद्धांत मर्ढेकरांनी मांडला आहे.

पुस्तकाच्या पहिल्या विभागात सौंदर्यवाचक विधानांचे स्वरूप, सौंदर्यभावना म्हणजे काय, कलेची फलश्रुती, सौंदर्यशास्त्रातील एकदोन ससे, सौंदर्यशास्त्रातील काही प्रश्न, धूमकेतू (प्रभाकर पाध्यांच्या 'कलेची क्षितिजे' या ग्रंथाची प्रस्तावना), सौंदर्यविचार असे सात लेख आहेत.

दुसऱ्या भागात साहित्यावरील दहा लेख असून त्यातील दोन लेख मराठी समीक्षेच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचे आहेत. 'ललितवाङ्मयकृतीचा घाट' या लेखात मर्ढेकरांनी घाट किंवा फॉर्म ही संकल्पना स्पष्ट केली आहे, तर ' वाङ्मयीन महात्मता ' या लेखांत त्यांनी 'लेखनपूर्व' व 'लेखनगर्भ' आत्मनिष्ठांमधील फरक दाखविला आहे. यानंतर त्यांनी 'तादात्म्य' या संकल्पनेसंबंधीचा विचार मांडला आहे. वाङ्मयीन महात्पनेसंबंधी लिहिताना ते म्हणतात की, महात्मता ही फक्त कैवल्यपूर्ण स्वयंसिद्ध मूल्यभावांच्या आश्रयानेच परिणत होऊ शकेल. हा कैवल्यपूर्ण मूल्यभाव म्हणजे भावनांच्या संगतीतून उत्पन्न होणाऱ्या लयबद्धतेतून व्यक्त होणारे सौंदर्य अशी अभिव्यक्तीवादी भूमिका मर्ढेकर घेतात.

पुस्तकाच्या साहित्य या विभागातील 'वाङ्मय आणि सौंदर्यशास्त्र', 'काव्यातील नवीनिता ', 'मी का लिहीतो' हे तीन लेख वाङ्मय समीक्षेसंबंधीच्या चिंतनातून लिहिले गेले आहेत. 'सांगितक' हा लेख ऑपेरा या सांगितिक-साहित्यिक प्रकाराचे स्पष्टीकरण करतो. या विभागातील अन्य चार लेख पुस्तकांचे परीक्षण करणारे आहेत. 'साहित्यमीमांसा व ॲरिस्टॉटलचा दृष्टिकोन', 'सौंदर्यभावना व रिचर्ड्स' यावर दोन परिशिष्टे असून तिसऱ्या परिशिष्टात श्री. चैतन्य यांनी मर्ढेकरांच्या 'सौंदर्यशास्त्रातील एकदोन ससे' या लेखावर घेतलेल्या आक्षेपांना उत्तरे दिली आहेत.

मर्ढेकरांच्या साहित्यविषयक मतांना जशी मान्यता मिळाली आहे. तसेच त्या विचारातील कच्चे दुवे व विसंगतीही डॉ. रा. भा. पाटणकर व श्री. प्रभाकर पाध्ये यांनी समर्थपणे दाखवून दिल्या आहेत. मर्ढेकरांचे सिद्धांत विवादास्पद व आक्षेपार्ह ठरले तरीही मराठी समीक्षेवरील त्यांच्या प्रभावासंबंधी दुमत नाही.

मराठी समीक्षेच्या दृष्टिने मर्ढेकरांचे साहित्यकलाविषयक विचार क्रांतिकारी व कलाटणी देणारे ठरले आहेत. मराठी समीक्षेला पारंपरिक समीक्षेकडून रूपवादाकडे, नवसमीक्षेकडे वळवण्याचे कार्य मर्ढेकरांच्या या ग्रंथाने केले आहे.

अशोक जोशी

**सौंदर्यशोध आणि आनंदबोध : जोग, रा. श्री. प्रकाशक : व्हीनस प्रकाशन, पुणे, पहिली आवृत्ती, १९४३.** रा. श्री. जोग हे मराठीतील एक चिकित्सक साहित्यमीमांसक आणि समीक्षक म्हणून ज्ञात आहेत. 'अभिनव काव्यप्रकाश' हा त्यांचा भारतीय साहित्यशास्त्रावरील महत्त्वाचा ग्रंथ अभ्यासकांना मार्गदर्शक ठरला आहे.

'सौंदर्यशोध आणि आनंदबोध' हा मराठीतील सौंदर्यशास्त्रावरील महत्त्वाचा ग्रंथ आहे. या ग्रंथाचे मुख्य दोन भाग आहेत. पहिल्या भागात 'सौंदर्याचा शोध' घेतला आहे तर दुसऱ्या भागात या 'सौंदर्या'पासून जो आनंद होतो त्याचे स्वरूप कोणते आहे हे 'आनंदबोध' या शीर्षकाखाली पाहिले आहे. शिवाय ग्रंथाला 'विषयप्रवेश' आणि 'उपसंहार' यांची जोड दिली आहे. एकंदरीत संशोधनाच्या शिस्तीच्या चौकटीत या ग्रंथाची सिद्धता झाली आहे.

पौर्वात्य तसेच पाश्चात्त्य साहित्यमीमांसकांच्या मनाची चिकित्सा जोग यांनी केली आहे. वाङ्मयसौंदर्याची चर्चा करण्याचा या ग्रंथाचा हेतू आहे. साहित्य ही ललित कला असल्याने इतर ललित कलांचा जो 'सौंदर्यशोधन, सौंदर्यदर्शन, सौंदर्यवर्णन' असा हेतू असतो तोच साहित्याचाही हेतू असतो; 'ललित वाङ्मयासह सर्व ललित कलांसह सामान्य असा विचार करणारे जे शास्त्र ते सौंदर्यशास्त्र होय' असे रा. श्री. जोग म्हणतात.

ग्रंथाच्या शेवटी संक्षिप्त रूपांचे स्पष्टीकरण आणि सूची जोडली आहे. भारतीय आणि पाश्चात्त्य साहित्यशास्त्राच्या अभ्यासकांना हा ग्रंथ मार्गदर्शक आहे.

बि. दा. वासमकर

**सौंदर्याचे व्याकरण : बारलिंगे, सुरेंद्र. प्रकाशक : मराठवाडा साहित्य परिषद, १९५७ (आवृत्ती पहिली).** वेगवेगळ्या निमित्ताने लिहिलेल्या कलास्वरूपाविषयक लेखांचा संग्रह. कलास्वरूपाचे कलासौंदर्याचे घटकांचे विवेचन हा मुख्य उद्देश

यात दिसतो. सुंदर ही कल्पना निश्चय व अस्तित्व विलक्षण आहे हा जी. ई. मूरचा सिद्धांत बारलिंगे मान्य करतात. सौंदर्यवाचक विधानातील उद्देश व विधेय यांचा जसा बारलिंगे यांनी विचार केला आहे तसाच भारतीय साहित्यशास्त्रातील रसकल्पनेचाही विचार त्यांना महत्त्वाचा वाटतो. याबरोबरच केलेचे स्वरूप, कलाहेतू, सौंदर्यशास्त्र व वाङ्‌मय यांचा संबंध, सामान्य भाषेचे स्वरूप, समीक्षा व मूल्यांकन या अन्य विषयाची चर्चादेखील लेखकाने केली आहे.

आधुनिक तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने सौंदर्यशास्त्रीय प्रश्नांकडे पाहणाऱ्या मराठीतील पहिल्या काही पुस्तकांत या पुस्तकाचा समावेश होतो.

अशोक जोशी

**स्त्री-पुरुष तुलना : शिंदे, ताराबाई. प्रकाशक : ताराबाई शिंदे, बुलढाणे, १८८२.** १९व्या शतकातील एक महत्त्वाचा वैचारिक निबंध म्हणून ताराबाई शिंदे लिखित 'स्त्री-पुरुष तुलना' या छोटेखानी पुस्तकाचा उल्लेख करता येईल. महात्मा फुले यांनी या ग्रंथाचा अतिशय गौरव केला आहे.

१९व्या शतकाच्या उत्तरार्धात स्त्री सुधारणेला मिळालेली चालना, ही या ग्रंथाची निर्मितीची प्रेरणा आहे असे म्हणता येईल.

ग्रंथाच्या सुरुवातीलाच हिंदू समाजात स्त्रियांची किती वाईट अवस्था आहे. पुनर्विवाह न करण्याची चाल महान रोगाप्रमाणे पसरली आहे; असे परखड मत ताराबाई शिंदे व्यक्त करतात. पुरुषांची ही जुलमी व्यवस्था प्राचीन काळापासून चालत आलेली आहे याची रामायण महाभारतातील उदाहरणे देऊन ताराबाई सांगतात. स्त्रीला नेहमी गुलाम म्हणून राबवून घेण्यासाठी ज्या रूढी किंवा समज हिंदू धर्मात रूढ झाल्या आहेत त्यांचा समाचार ताराबाईंनी घेतला आहे. (१) स्त्रीने पुरुषाने जरी लाथा मारल्या तरी त्याचे पाय रगडावे. (२) नवऱ्याआधी बायकोने मरावे. (३) परदेशगमन वर्ज्य. (४) स्त्री कुऱ्हाडीसारखी असून पुण्यवृक्ष तोडते. (५) स्त्रिया म्हणजे अविचारकर्माचे नगर. (६) स्त्रिया म्हणजे गोठ्यातील म्हशीप्रमाणे मूर्ख इ. अंध समजांचा समाचार ताराबाईंनी घेतला आहे. ताराबाईच्या समकालीन अद्‌भुतरम्य कादंबऱ्यांमध्ये जी स्त्रियांची वर्णने आली आहेत ती किती खोटी आणि अविश्वसनीय आहेत याची ताराबाईंनी चर्चा केली आहे.

आजच्या काळातसुद्धा स्त्रियांवर होणारे अन्याय पाहिले तर ताराबाई शिंदे यांच्या 'स्त्री-पुरुष तुलना' या ग्रंथाची १९व्या शतकाप्रमाणेच २१व्या शतकातही नितांत आवश्यकता आहे असे स्पष्टपणे म्हणता येते.

वि. दा. वासमकर

**स्थानपोथी : मुनिव्यास. संपादक : डॉ. वि. भि. कोलते, प्रकाशक : अरुण प्रकाशन, मलकापूर, १९५०.** महानुभाव संप्रदायात 'स्थानपोथी' हा एक महत्त्वाचा ग्रंथ मानला जातो. कुमरे आम्नायातील मुनिव्यास (पंडित कमळाकर अयाचित) यांनी शके १२७५ च्या सुमारास हा ग्रंथ तयार केला. या ग्रंथकाराचे पूर्वाश्रमीचे नाव पंडित कमलाकर अयाचित असे होते. हा ग्रंथ ऐतिहासिकदृष्ट्या तर महत्त्वाचा आहेच पण भौगोलिक दृष्ट्याही महत्त्वाचा आहे. महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधर यांनी ज्या-ज्या ठिकाणी भेटी दिल्या त्या सर्व स्थानांना त्या पंथात तीर्थस्थानीचे महात्म्य प्राप्त झाले. हा ग्रंथ महानुभाव वाङ्‌मयात पूज्य अशा श्रीचक्रधरस्पृष्ट तीर्थस्थानांची नोंद करतो. प्रस्तुत स्थानपोथीत जवळ-जवळ दोन-अडीचशे गावांची नोंद आलेली आहे. त्यावरून महाराष्ट्राचा भूगोल तसेच तत्कालीन सामाजिक परिस्थितीचे आकलन होण्यास मदत होते.

यशवंत कानिटकर

**स्फूर्तिलहरी : काव्यविहारी (गद्रे, धों. वा.). प्रकाशक : ना. वा. गद्रे, बुधगाव-सांगली, १९३६.** कृष्णा-काठच्या परिसरातील व केशवसुत-संप्रदायाचा वारसा 'किती तुतारी भक्त जाहले, त्यातील मी एक' या शब्दात सांगणारे धोंडो वासुदेव गद्रे (काव्यविहारी) यांच्या या कवितासंग्रहातून केशवसुतांचे अनुकरण दिसते. दुष्टरूढीविरुद्ध काही कवितांतून जोरदार प्रहार. बहुतांश कविता गेय स्वरूपाची व समाजाभिमुख वृत्तीची. रूपकात्मक रचना करून बोध देण्याची वृत्ती. 'उंबरातील किडे', 'पाळीव पोपटास', 'पाखरास' इत्यादी कवितांतून हे विशेष जाणवतात. 'जगाचा न्याय' ही कविता गाजलेली. बऱ्याच कविता गद्यप्राय शैलीत.

ग्रामीण जीवनातील काही परिणामकारक शब्दचित्रे ('मोटेवरचे गाणे', 'खेड्यातील देखावा', 'मंजूळा' इत्यादी) लक्षात राहतात. 'दोन चित्रे', 'खार आणि घार' अशा काही रचनांतील ध्वन्यर्थवेधक. प्रस्तावनाकार वि. स. खांडेकरांनी म्हटल्याप्रमाणे 'गोविंदाग्रजांचा कालखंड व रविकिरणमंडळाचा कालखंड' यांच्यामधला संधिकाल ज्यांनी सुना भासू दिला नाही अशा कवींमध्ये इतिहास काव्यविहारींची निश्चित गणना करील'.

वि. म. कुलकर्णी

**स्मरण-यात्रा : कालेलकर, काकासाहेब; (कालेलकर, दत्तात्रय बाळकृष्ण). प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, १९४९.** श्री. काकासाहेब कालेलकर, प्रसिद्ध गांधीवादी विचारवंत, शिक्षणतज्ज्ञ, प्रवासवर्णनकार, अनेक भाषाअभ्यासी. त्यांची अकरा पुस्तके प्रसिद्ध झाली असून यामध्ये निबंध, समीक्षा, प्रवासवर्णन, आत्मचरित्र या वाङ्‌मयप्रकारांचा समावेश आहे. 'स्मरण-यात्रा' या पुस्तकांत बालपण, विद्यार्थीदशा, वय वर्षे ७ ते १८, सन १८९२ ते १९०३ या कालखंडातील प्रसंगांचे वर्णन आहे. स्वतः लेखकानेच "माझी ही स्मरणयात्रा 'आत्मचरित्र' नाही" असे प्रस्तावनेतच नमूद केले आहे. या स्मरणयात्रेत अनेक प्रसंग, आठवणी, व्यक्तिचित्रे यांची गुंफण आहे. स्मरणयात्रेचे प्रयोजन आणि परिचय, संस्मरणांची पार्श्वभूमी इ.स. १८९२ ते १९०३ या दोन प्रास्ताविकांसह एकूण

७९ लेख संग्रहित केले आहेत. वडिल सरकारी सेवेत असल्याने आणि बदल्यांमुळे त्यांचे शिक्षणही निरनिराळ्या ठिकाणी झाले. प्रसंगोपात्त ही गावे, तेथील निसर्ग, शाळा, सवंगडी, शिक्षक यांचेवर हे लेखन आहे. आपले भाऊ, त्यांचे स्वभाव, छंद आपल्या धाकट्या भावाला सर्व गोष्टींचे ज्ञान करून देण्यासाठी त्यांनी केलेले प्रयत्न. बहीण अक्का आणि तिच्या निधनाचे त्यांनी केलेले लेखन कारुण्यपूर्ण आहे. आईबद्दलही प्रसंगा/प्रसंगात त्यांनी अत्यंत जिव्हाळ्याने लिहिले आहे. त्यांच्या घरातील नोकर महादू, विठू, भानू यांच्या व्यक्तिचित्रांचेही वर्णन या पुस्तकात आहे. सावनूर शहरातील बागेचे वर्णन तपशीलाने केले आहे. मोडक मास्तर, हकीम साहेब, चांदवडकर मास्तर याही व्यक्तिंचे चित्रण त्यांनी तन्मयतेने केले आहे. वामन मास्तर म्हणजे वामन मंगेश दुभाषी (प्रख्यात साहित्यिक पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे यांचे आजोबा, आईचे वडील) यांचे व्यक्तिचित्र 'वामन मास्तर' या शीर्षकानेच लिहिले आहे आणि माझे 'पूज्य शिक्षक' असा त्यांचा गौरव केला आहे. त्यांनी शिकविलेल्या 'A Mother's Love' या कवितेसंबंधीचे हे लेखन मूळातूनच वाचले पाहिजे. अनेक ठिकाणी जवळ-जवळ प्रत्येक लेखात त्यांनी आपल्या वडिलांविषयी लिहिले असले तरी 'जीवन पाथेय' या शेवटच्या लेखांत वडिलांनी जो संस्कार केला त्याचे वर्णन फारच सुंदर शब्दात व्यक्त केले आहे. लेखकाची तीव्र स्मरणशक्ती हे या पुस्तकाचे ठळक वैशिष्ट्य आहे.

**स्मरणसांखळी : देशपांडे, कमलाबाई. प्रकाशक : मनोहर ग्रंथमाला, पुणे, १९४३.** मराठी साहित्यातील आत्मचरित्र या साहित्य प्रकारात काही स्त्रियांनी लिहिलेली आत्मचरित्रे अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण आहेत. रमाबाई रानडे, लक्ष्मीबाई टिळक, आनंदीबाई (बाया) कर्वे, आनंदीबाई शिर्के इत्यादी. या आत्मचरित्र मालिकेत प्रस्तुत आत्मचरित्रही वैशिष्ट्यपूर्ण आहे. प्रस्तुत ग्रंथात एकूण अठरा प्रकरणे आहेत. लेखिका साहित्य सम्राट नरसिंह चिंतामण केळकर यांची कन्या. लेखिकेच्या प्रत्येक उपक्रमात या समर्थ पित्याच हातभार होता. अनेक प्रसंगी उद्‌भवलेले मतभेद ही त्यांना नोंदवले असून यामध्ये पिता आणि कन्या यांचे संवादही तपशीलाने नोंदविले आहेत. स्त्रीमध्ये जन्मतःच असलेला वत्सलभाव, प्रेमळ स्वभाव, सूक्ष्म निरीक्षणे प्रसंगानुरुप नोंदविले आहेत. लेखिकेचे पदवीचे शिक्षण महर्षी धोंडो केशव कर्वे यांच्या आश्रमशाळेत झाले. त्यांनी जी. ए. ही पदवी मिळविली होती. श्री. केळकर हे टिळकांचे अनुयायी त्यामुळे लोकमान्यांना झालेल्या शिक्षेसंदर्भात, त्याकाळच्या वातावरणाचे संदर्भ विस्तृत तपशीलाने नोंदविले आहेत. पुणे म्युनिसिपालटीत मोफत प्राथमिक शिक्षणाचा ठराव केवळ पुरुषांसाठी मांडला जातो या विरुद्धच्या सभेत लोकमान्यांच्या उपस्थितीत लेखिका स्त्री शिक्षणालाही प्राधान्य द्यावे असे मत व्यक्त करते. लग्नानंतर दोन वर्षातच लेखिकेला वैधव्य येते. 'स्वप्नदृश्य' या प्रकरणात या स्थितीचे वर्णन येते. महर्षी कर्वे यांच्या भारतवर्षीय महिला विद्यापीठाच्या त्या आजन्मसेविका होत्या. स्त्री शिक्षणाबद्दल सुरुवातीपासूनच आस्था आणि तळमळ असल्याने सातारच्या कन्या शाळेची त्या स्थापना करतात. आर्थिक नुकसान सोसून या शाळेसाठी त्यांनी जी कामगिरी केली त्याचे यथार्थ वर्णन प्रस्तुत आत्मचरित्रात असून या संदर्भात या आत्मचरित्रात पाच प्रकरणे आहेत. लेखिका श्री. न. चिं. केळकरांचे आर्थिक साहाय्य घेऊन परदेशी जाते. प्राग विद्यापीठातून डॉ. विंटरनिट्‌झ्‌ या प्रख्यात प्राच्यविद्या-पंडिताच्या मार्गदर्शनाखाली- "The Origin and Development of संस्कार" हा विषय घेऊन पीएच. डी. पदवी मिळविते. भारतात परत आल्यावर श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महाविद्यालयात प्राचार्यपदी रुजू होते. डॉ. कमलाबाईची सर्व कारकीर्द शिक्षणक्षेत्रातील त्यातूनही स्त्रियांच्या शिक्षणासाठी व्यतीत झाली. सातारची कन्याशाळा त्यांच्या ध्येयवादी जीवनाचे मूर्त रूप. सरकारी नोकरी करावयाची नाही ही प्रतिज्ञा. स्वराज्य चळवळीच्या काळात व्यक्तित्व घडले. स्त्री शिक्षणासंबंधीच्या तत्कालीन घडलेल्या घटनाही नोंदविल्या आहेत. स्त्रियासंबंधी समाजात उमटलेले पडसाद नोंदविले आहेत. 'एखाद्या धर्मनिष्ठ पुरुषाचे लहान मुलीशी लग्न, एखाद्या बालविधवेस केशवपन करावयास लावणे' या घटनांविरुद्ध स्पष्ट मत नोंदविले आहे. अतिशय प्रांजळपणे लिहिलेले हे एक महत्त्वाचे आत्मचरित्र.

**स्मृतिचित्रे : टिळक, लक्ष्मीबाई. प्रसिद्धी भाग एक ते चार १९३४ ते १९३६, संक्षेपक- देवदत्त नारायण टिळक, संक्षिप्त आवृत्ती १९५८, प्रकाशक : पॉप्युलर प्रकाशन, मुंबई.** लक्ष्मीबाई टिळक ह्या विवाहानंतर अक्षरज्ञान शिकलेल्या आणि अभिजात साहित्यकृती लिहिणाऱ्या लेखिका म्हणून सर्वज्ञात आहेत. 'स्मृतिचित्रे' या आत्मचरित्राबरोबर कविता-लेखनही त्यांनी केले आहे. निसर्गकवी रे. ना. वा. टिळक यांच्या पत्नी म्हणून त्यांची सुरूवातीची ओळख असली तरी नंतर स्वतंत्र आणि प्रतिभावंत व्यक्तिमत्त्व म्हणून त्यांची ओळख निर्माण झाली.

'स्मृतिचित्रे' हा आत्मचरित्रपर ग्रंथ म्हणजे लक्ष्मीबाई टिळकांचा संघर्षमय जीवनाचा चरित्रपट आहे. पती नारायण वामन टिळक यांच्या ख्रिस्ती धर्माच्या स्वीकाराचा लक्ष्मीबाईंच्या मनावर कोणता परिणाम झाला ; त्या त्या सर्व घटनांना कशा धैर्याने सामोरे गेल्या ; या सर्वांचे तपशीलवार चित्रण लक्ष्मीबाईंनी केले आहे.

या आत्मचरित्राचे चार भाग आहेत. पहिल्या भागात ३१ प्रकरणे असून लक्ष्मीबाईंच्या लग्नापासून ते टिळकांच्या धर्मांतरापर्यंतचे चित्रण आले आहे. दुसऱ्या भागात टिळक ख्रिस्ती झाल्यापासून रेव्हरंड (दीक्षित) होईपर्यंतच्या चरित्राचा काळ आला आहे. तिसऱ्या भागात टिळकांच्या मृत्यूपर्यंतचा भाग आला आहे. शेवटच्या चौथ्या भागात टिळकांच्या मृत्यूनंतरचा आणि कराचीस वास्तव्याला जाईपर्यंतच्या भागाचे चित्रण आले आहे.

लक्ष्मीबाईंचे वडील आणि सासरे दोघेही कर्मठ होते. वडिलांना 'सोवळे' झाले होते असे त्या सुरूवातीलाच सांगतात. मीठ, साखर इ. वस्तूसुद्धा ते धुऊन कसे घेत असत याचे वर्णन लक्ष्मीबाई प्रत्ययकारी रितीने करतात. सासरेही छळ करणारे. जेवावयास सून बसली की चुकलेले काम दाखवून अर्ध्या जेवणावरून तिला उठवत. नवरा कधी रागीट तर कधी प्रेमळ. अशा स्वभावाच्या माणसांच्या हाताखाली लक्ष्मीबाई वाढल्या. नवरा ख्रिस्ती झाल्यानंतर त्यांच्या मनाची अवस्था कशी झाली याचे चित्रण करुणरसाची प्रतीती देते.

या ग्रंथातील भाषाशैली वैशिष्ट्यपूर्ण आहे. लांबलचक वाक्यांपेक्षा वेचक शब्दांची त्रोटक वाक्ये लिहिण्यात त्यांचा हातखंड आहे. उदा. 'काळजी काय ती खाण्याची व नाण्याची', 'जन्मभर माझी बेरीज व टिळकांची वजाबाकी चालू असे'. एखादे लांबलचक सुसंगत कथानक सांगण्यापेक्षा प्रत्येक प्रकरणात एखादी घटना त्या चटकदारपणे सांगतात. त्यांचे लिखाण शैलीने सुबोध, सहज स्फुरलेल्या थोड्या अलंकारांनी व वर्णनांनी मनोहर विसंगती टिपण्याच्या त्यांच्या जन्मजात स्वभावामुळे विनोदी व हृद्य होते. शब्दकोशकार ह. अ. भावे यांनी "जोपर्यंत मराठी भाषा आहे तोपर्यंत हे पुस्तक टिकेल व वाचले जाईल" असा अभिप्राय व्यक्त केला आहे.

**वि. दा. वासमकर**

**स्मृतिस्थळ.** 'स्मृतिस्थळ' हा महानुभाव पंथाच्या चरित्रमालेतील तिसरा आणि अखेरचा ग्रंथ आहे. (मात्र त्याचा विषय 'लिळाचरित्र' किंवा 'ऋधिपुरचरित्र' याप्रमाणे परमेश्वरावतार नसून नागदेवाचार्य हा आहे. 'स्मृति' या शब्दाला महानुभाव वाङ्मयात एक विशेष अर्थ आहे. परमेश्वरांचे विहरण वर्तनदेखिले तैसें स्मरौनि लिळाचरित्र ते स्मृति बौलिजे अशी 'स्मृति'ची व्याख्या 'लक्ष्मणरत्नाकरा'वरील बत्तीस लक्षणाची टीप करते. थोडक्यात, चक्रधरांची वचने म्हणजे 'श्रुति' व नागदेवाचार्यांची वचने म्हणजे 'स्मृति', 'स्थळ' म्हणजे ज्यात विवेचन केले जाते तो ग्रंथ. म्हणून 'स्मृतिस्थळ' म्हणजे तो नागदेवाचार्यांच्या उक्तींचा आणि आठवणींचा संग्रह.

'स्मृतिस्थळ' हा गद्यात लिहिलेला चरित्रग्रंथ असून त्यात नागदेवांचे गोविंदप्रभूंच्या निधनानंतरचे चरित्र आले आहे. त्याचा सर्व बाजूंनी विचार करून त्याचे पहिले संपादक वा. ना. देशपांडे असे म्हणतात की, "सध्याचे 'स्मृतिस्थळ' कुणाही एका लेखकाचे नसून त्यात अनेकांच्या पाठातील कमीअधिक मजकूर मिसळला गेला असावा." हे मत स्थूलमानाने बरोबर असले तरी त्याचा मूळ लेखक 'रूक्मिणीस्वयंवराचा'चा कर्ता नरेंद्र कवी असण्याची शक्यता पुष्कळ आहे. त्यात महानुभाव पंथाचे पहिले आचार्य नागदेव यांचे इ.स. १२८७ ते १३१२ पर्यंतचे चरित्र आठवणींच्या रूपाने सांगितले आहे. या आठवणींची संख्या एकूण २६० असून त्यात पुढे भर पडत गेली असे दिसते. चक्रधर आणि गोविंदप्रभू यांच्या पश्चात महानुभाव पंथाची धुरा नागदेवाचार्यांनी उत्तम प्रकारे सांभाळली. 'स्मृतिस्थळ' त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू प्रकाशात आले असून पंथाचे आचार्यत्व सांभाळताना आपण श्री चक्रधरस्वामींचे पाइक आहो, स्वतंत्र आचार्य नाही, ही भूमिका त्यांनी अखेरपर्यंत राखलेली दिसून येते. 'स्मृतिस्थळा'चा आणखी एक विशेष म्हणजे त्यात आलेले आघाडीच्या महानुभाव ग्रंथकारांचे व त्यांच्या ग्रंथरचनेचे उल्लेख. ही सर्व ग्रंथरचना नागदेवचार्यांच्या मार्गदर्शनाने आलेली असल्याने पंथ ती प्रमाण मानतो. मराठी वाङ्मयेतिहासालाही 'स्मृतिस्थळ' हा एक साधनग्रंथ म्हणून महत्त्वाचा आहे. प्राचीन मराठी गद्याचाही तो एक आदर्श आहे.

**शं. गो. तुळपुळे**

**स्वात्मबोध : मौनीस्वामी. प्रकाशक : जगदीश्वर प्रेस, मुंबई, १८७८.** 'स्वात्मबोध' या ग्रंथाचे कर्ते श्रीमौनीस्वामी अथवा मौनी महाराज यांचे मूळ नाव नारायण भिकाजी रत्नपारखी. त्यांचे गुरू रघुनाथ, नारायणेंद्र सरस्वती हे त्यांचे संन्यासोत्तर नाव, हा ग्रंथ शके १७४०, इ. स. १८१८ मध्ये पूर्ण झाला. या ग्रंथाचे १६ अध्याय असून श्रोता-वक्ता अशा संवाद रूपाने हा ग्रंथ लिहिलेला आहे. वेदान्त शास्त्राधारे आत्मरूपाचे विवेचन व त्याची प्राप्ती कशी करावी, त्याची साधने कोणती, हा या ग्रंथाचा विषय आहे. (साधना चतुष्ट्याने व वैराग्य नित्यानित्य विवेक या गुणांनी जीवन्मुक्ती साधता येते असे दहा अध्यायांत वर्णन आले असून ११व्या अध्यायात विदेह मुक्तीचे वर्णन आहे. विवेचनात उपनिषद, गीता, पंचदशी आदि संस्कृत ग्रंथांची वचने असून त्यांनी ग्रंथ व्यापलेला असल्यामुळे तो क्लिष्ट वाटतो. विवेचनाचे सूत्रही काही वेळा हरवल्यासारखे होते. ग्रंथावर शांकरवेदांताची छाया दिसते.) आधुनिक काळातील उद्वैत परंपरेतील ग्रंथ असे याचे वर्णन करता येईल.

**म. प. पेठे**

**स्वेदगंगा : करंदीकर, विंदा. प्रकाशक : गो. वि. करंदीकर, रत्नागिरी, आवृत्ती १९४९.** कविवर्य विंदा करंदीकरांचा पहिला काव्यसंग्रह. करंदीकर पोंभुर्ल्याहून कोल्हापूरला आले. इंग्रजी-मराठी वाङ्मयाचा मोठा व्यासंग, उपजत चिंतनशील वृत्ती; तशात प्रारंभीच कवी माधव ज्युलिएन यांच्या व्यक्तिमत्वाचा आणि त्यांच्या वाङ्मयाचा प्रभाव. यामुळे त्यांच्या प्रज्ञेला आणि प्रतिभेला ठोस वळण मिळाले. करंदीकरांची विचारगंगा हिंदुत्ववाद, राष्ट्रवाद, गांधीवाद या टप्प्यावरून वळणे घेत घेत नव्या नव्या आशयाने पुष्ट होत मार्क्सवादाच्या जागतिक क्रांतिसागराला मिळाली. या जीवनानुभवाचा व विचार, चिंतनाचा प्रतिभामय विलास 'स्वेदगंगा' संग्रहातील कवितांतून पाहावयास मिळतो.

१२७ पृष्ठांच्या घट्ट पुठ्ठाबांधणीचा त्यांनी स्वतः प्रकाशित केलेल्या या पहिल्याच संग्रहात १९४०-१९४९ या साधारण दशकभरातील ७८ कविता संग्रहीत केल्या आहेत.

पहिल्याच संग्रहात विंदा करंदीकरांची प्रयोगशिलता आणि चिंतनशिलता ही त्यांच्या कवितांची मुख्य वैशिष्ट्ये दिसतातच; तशीच ती कविताही वाचताना नवी वाटते. 'स्वेदगंगा', 'मजूर', 'कीर्तन', 'दगडाकडून देवाकडे', 'लोकशक्ती' या कवितांतून शोषणांच्या रुक्ष विचारांना सुरेख काव्यरुप दिलेले आहे ते

खरोखरीच मुळातून वाचण्यासारखे आहे. इतर 'पुनर्मिलन', 'जीवितक्रीडा' अशा काही कवितांत मनातील अंतःस्थ भावनांचे नाजूक चित्रण आढळते तर 'नारद' (शेंडेपाखरू) 'बागुलबोवा' ही अद्भूतरम्य 'शिशुगीतेही' वाचावयास मिळतात.

करंदीकरांची कविता प्रारंभापासूनच रोकडी, चिंतनशील आणि रूढ भेदांना अनुभवाचे नवे विशाल पटल देणारी असून तिची एक धीट वाट आहे. या संग्रहात 'शब्दचित्रे', 'भावगीते', 'कोकणी भाषेतील गाणी', 'बालगीते', 'चुटके' इ. विविध काव्यप्रकारातील कविताही संग्रही आहेत. ते पाहता आज जे त्यांना प्रयोगशील कवी म्हणून श्रेष्ठतम स्थान प्राप्त झाले आहे त्याची बीजे या संग्रहात लपली आहेत असे दिसते.

मोहन पाटील

**हरी नारायण आपटे : चरित्र आणि वाङ्मयविवेचन, लेखिका : पानसे, वेणूताई. प्रकाशक : नारायण सखाराम पानसे, पुणे, १९३१.** हरी नारायण आपटे यांनी लिहिलेले अपूर्ण आत्मचरित्र गहाळ होणे, काशीताई कानिटकरांची चरित्रलेखनाची असमर्थता व बापूजी आंबेकर यांनी लिहिलेले चरित्र संक्षिप्त असणे या कारणांमुळे वेणूताई पानसे प्रस्तुत चरित्रलेखनास प्रवृत्त झाल्या. हरिभाऊंच्या वैयक्तिक व कौटुंबिक जीवनाशी लेखिकेचा निकटचा संबंध होता. हरी नारायण आपटे यांचे कौटुंबिक जीवन, त्यांच्या वैयक्तिक जीवनातील ताणतणाव, त्यांचा स्वभाव, सभोवतालची तत्कालीन सामाजिक परिस्थिती यांचा त्यांच्या ग्रंथनिर्मितीशी असलेला संबंध स्पष्ट केल्यामुळे हे चरित्र तत्कालीन चरित्र वाङ्मयात वेगळे ठरले आहे.

वि. शं. चौघुले

**हरिभाऊ : भिंगारे, ल. म. प्रकाशक : स्कूल व कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर,१९५६.** हरिभाऊ आपटे यांच्या साहित्याचा हा कालानुक्रमी अभ्यास मुळात पीएच. डी.च्या पदवीसाठी लिहिलेला प्रबंध. "मूर्तिभंजन, मूर्तिपूजन, आणि भोंगळ समन्वय यांपैकी कशाच्याही आहारी जावायाचे नाही अशी मनोमन इच्छा धरून हरिभाऊविषयी जे वाटले ते तसेच लिहिले" असे लेखकाने निवेदनात म्हटले आहे. प्रबंध लेखनासाठी हरिभाऊंच्या उपलब्ध साहित्याशिवाय ८८० पृष्ठांच्या दुर्मीळ साहित्याच्या प्रती लेखकाने मिळविल्या. त्या आधारे हरिभाऊ व त्यांच्या साहित्याविषयी रूढ असलेल्या बऱ्याच समजुतींना धक्का देणारी काही विधाने या ग्रंथात केली आहेत.

हरिभाऊंच्या अभ्यासकांना उत्तम संदर्भ ग्रंथ. लेखकाचे प्रतिपादन व मांडणी आग्रही असली तरी ती साधार आहे.

चंद्रशेखर कपाळे

**हरिवंश : मोरोपंत. प्रकाशक : यशवंत छापखाना, पुणे, १९१४.** मोरोपंतांनी आपल्या वयाची पन्नाशी उलटून गेल्यावर आणि आर्याभारत व मंत्रभागवत या ग्रंथांची रचना पूर्ण केल्यानंतर, इ. स. १७८२ ते ८७ या कालावधीत हरिवंश हा ग्रंथ लिहिला. आपले यजमान पुत्र पांडुरंग नाईक याच्या सततच्या आग्रहामुळे आपण हा ग्रंथ रचल्याचे पंतांनी स्वतः नमूद केले आहे. बहुधा यामुळेच प्रस्तुत ग्रंथ आर्याभारताप्रमाणे, सत्य उतरला नसावा. या ग्रंथांचे ५४ अध्याय असून त्यातील आर्याची संख्या ५४४५ आहे. श्रीकृष्णाचे उत्तरार्धात चरित्र प्रस्तुत ग्रंथात वर्णन करण्यात आले आहे.

**हरिश्चन्द्राख्यान : मोरोपंत. संपादक : परशुरामपंत गोडबोले, मुद्रक : बाळकृष्ण रामचंद्र ठकार, पुणे, १८५९.** इसवी सनाच्या १८व्या शतकातील प्रसिद्ध पंडित कवी मोरोपंत यांनी हे आख्यान रचले आहे. मोरोपंतांचे पहिलेच काव्य 'कुशल' व्याख्यान हे आहे. मोरोपंतांच्या रामायणावरील, महाभारतावरील रचना तर प्रसिद्धच आहेत.

'हरिश्चन्द्राख्यान' हे मोरोपंतांच्या अनेक आख्यानापैकी एक आख्यानकाव्य आहे. मोरोपंतांचा व्यवसाय पुराणिकाचा होता. साहजिकच इतर वर्णनापेक्षा कथानिवेदनाकडे त्यांचे लक्ष विशेष असते. पाल्हाळ न लावता, खुबीदारपणे, आटोपशीरपणे, नीटनेटके असे केलेले निवेदन व संक्षेपविस्तार कुशलता हे गुण त्यांच्या आख्यानकाव्यातही आढळतात. विश्वामित्राने घेतलेली सत्त्वपरीक्षा व स्वप्नात दिलेल्या वचनासाठी अनेक संकटांना तोंड देऊन या सत्त्वपरीक्षेच्या कसोटीस उतरणारा राजा हरिश्चंद्र; हा या आख्यानाचा विषय मोरोपंत यांनी प्रभावीपणे हाताळला आहे.

मोरोपंतांच्या शैलीमध्ये क्वचित दुर्बोधता व चमत्कारिक शब्दयोजना आढळते. हे किरकोळ स्वरूपाचे दोष त्यांच्या या आख्यानकाव्यात आढळतात.

तु. शं. कुलकर्णी

**हळवे भिंग : भावे, य. द. प्रकाशक : मधुकर प्रिंटिंग प्रेस, बेळगाव, १९५१.** १९४५ नंतरच्या वास्तववादी कवितेचे समर्थन करणाऱ्या कवीचा दुसरा संग्रह. ४७ कवितांच्या या लहानशा संग्रहात समकालीन सामाजिक दुःखाच्या तीव्र प्रतिक्रिया उमटलेल्या दिसतात. यंत्रयुगाने निर्मिलेली भांडवलशाही, मजुरांची पिळवणूक, बेकारी, रेशनशॉपच्या बंद स्वर्गापुढे रित्या बाटल्या, ठिगळ्या पिशव्या घेऊन रांग लावणारे पापात्मे, दारिद्र्य नैराश्य नको असलेले जीवन जगण्याचा शाप भोगणारी माणसे-हे या संग्रहातील कवितांमागचे अनुभूतीविश्व.

" तनूतली कुंडलिनी जागली आहे, थोडी कळ काढ "-असा आशावाद असला तरी बव्हंश कविता नैराश्याची, तीव्र उपहासाची व तुच्छतेची धार असलेली, प्रखर भावना वेगाने लिहिली गेलेली उत्कट जिवंत कविता अशी आहे. या कवितेतील तळमळ, संताप आणि रोखठोकपणा वाचकाला सरळ भिडणारा आहे.

प्रभा गणोरकर

**हातीमताई चरित्र : प्रभू, कृष्णराव माधवराव. प्रकाशक : कृष्णराव माधवराव प्रभू, मुंबई, १८५४-५५.** अरबी-फारशी

भाषातील कथासंग्रहापैकी मराठीत उघडपणे आलेला ग्रंथ म्हणजे कृष्णराव माधवराव प्रभू यांनी इ. स. १८५४-५५ मध्ये सात भागात रूपांतरित केलेला 'हातीमताई चरित्र' हा सुमारे ४५० पृष्ठांचा ग्रंथ होय. मूळ फारशी ग्रंथाच्या डंकन फोर्बसकृत इंग्रजी भाषांतरावरून हा मराठी केलेला अनुवाद होय. ह्या चरित्र कथांचे सूत्र असे की, हुस्नबानू या स्त्रीने विचारलेल्या सात कूट प्रश्नांची उत्तरे आपल्या मित्रासाठी शोधण्याकरिता परोपकारी हातिम मोहिमेवर निघतो. मुख्य कथेमध्ये एकातून एक अशा नवीन कथांची सूत्रे निघत असतात. या निमित्ताने अनेक अद्‌भूत घटनांची साखळी विणली जाते. या सर्व गोष्टींचे स्वरूप एकाच धाटणीचे आहे. कथांची रंजकता राक्षसांच्या वस्त्या, चिनी व्यापारी, इत्यादींच्या उपकथांनी मूळकथा वाढत राहते.

वसंत बोरगावकर

**हिंडलग्याचा प्रसाद : कालेलकर, काका (द. बा. कालेलकर). प्रकाशक : सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, १९३४.** दत्तात्रेय बाळकृष्ण ऊर्फ काका कालेलकर यांचे मराठीत लिहिलेले हे एकमेव पुस्तक. या निबंधामध्ये हिंडलगा (बेळगाव) येथील तुरुंगात असताना केलेल्या चिंतनातील विषय आले आहेत. खेडेगावांचे प्रश्न, आश्रमीय शिक्षण पद्धती, परलोकविषयक कल्पना, वर्णव्यवस्थेचा पुनरुद्धार, गीताचर्चा, उपासनापद्धती अशा विषयांवरचे हे चिंतन आहे. याचे दोन भाग असून पहिल्या भागात 'लोकजीवन' आणि दुसऱ्या भागत 'धर्मविचार' यावरचे लेखन आहे. ग्रामविकासाचा विचार मांडणाऱ्या थोड्या पुस्तकांपैकी हे एक आहे.

श्रीपाद जोशी

**हिंदू धर्माचे पहिले प्रसिद्धीकरण : (ॲन एक्सोजर ऑफ द हिंदू रिलिजन) संपादक : जॉन विल्सन, प्रकाशक : आर. प्रेरा यांचा छापखाना, मुंबई, १८३२.** या ग्रंथाचे संपादक जॉन विल्सन हा धर्मोपदेशक असून तो भारतात १८२८ ते १८७५ या ४७ वर्षांच्या कालावधीत वास्तव्य करून होता. मोरभट्ट दांडेकर यांनी छापलेल्या हिंदू धर्मविषयक पुस्तकाला यात उत्तर दिले आहे. हिंदू धर्मातील तत्त्वे, अवतार कल्पना, रामकृष्णादिकांची चरित्रे, मूर्तिपूजा, जातिभेद यांवर टीका करून व पुराणे वेद यांतील गोष्टींची ख्रिश्चन धर्मातील सिद्धांताशी तुलना करून या ग्रंथाचा लेखक विद्वानांना आव्हान देतो की, आपल्या या मतप्रतिपादनास कुणी उत्तरे देईल तर आपण आपल्या मताचे खंडण करावयास सिद्ध आहोत.

म. प. पेठे

**हिंदूधर्मतत्त्व : फडके, गंगाधरशास्त्री. प्रकाशक : गणपत कृष्णाजी, मुंबई, १८५२.** १९व्या शतकाच्या पूर्वार्धात रे विल्सन, रे. मरे मिचेल या ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या हिंदू धर्मावरील हल्ल्यांना तोंड देण्यासाठी भारतीयांनी प्रयत्न सुरू केले. 'हिंदुधर्मतत्त्व' हा ग्रंथ त्यांतील प्रमुख प्रयत्न म्हणता येईल. या ग्रंथाच्या प्रस्तावनेत गंगाधरशास्त्री फडके यांनी आपला ग्रंथरचनेचा हेतू स्पष्टपणे सांगितला आहे. हिंदूधर्मग्रंथ संस्कृत भाषेत आहेत, त्यामुळे लोकांना धर्मविचार समजत नाहीत. त्यांना हिंदूधर्म समजावा, स्वधर्माविषयीचे त्यांचे अज्ञान दूर व्हावे, जाणत्या पंडितांनी या उदाहरणाने मराठीत धर्मविचार मांडावेत व हिंदू धर्माचे रक्षण व्हावे, यासाठी गंगाधरशास्त्री फडके यांनी हा ग्रंथ लिहिला. १७६ पृष्ठांचा छोटासा ग्रंथ इ. स. १८५२ मध्ये गणपत कृष्णाजी यांनी मुंबईस प्रसिद्ध केला. तो धर्मशास्त्रावर आधारित असून तर्कशुद्ध पद्धतीने लिहिलेला असून याची रचना १२ अध्यायांत केली आहे.

म. प. पेठे

**हिंदू शास्त्रांत सांगितलेले ब्राह्मणांचे महत्त्व (द ब्रॅहमिन्स क्लेयस्) : निब्बिट रॉबर्ट, प्रकाशक : बॉम्बे ट्रॅक्ट ॲण्ड बुक सोसायटी, मुंबई १८४८.** हिंदू धर्मग्रंथातून ब्राह्मणांचे जे महत्त्व सांगितले आहे ते त्यांनी स्वतःच निर्माण केले आहे, आपले स्वतःचे महत्त्व वाढविण्यासाठी केले आहे. वास्तविक ब्राह्मण मोठा नाही. तो देवावतार नाही. तो सामान्य माणूस आहे, असे ख्रिश्चन शास्त्राशी तुलना करून या ग्रंथात प्रतिपादन केले आहे. अखेरी ख्रिस्ती धर्मात असे काही नसल्याचे सांगून ब्राह्मणांचा मोठेपणा अमान्य केला आहे. हिंदू धर्मातील जातीसंस्थेवर धर्मोपदेशकांनी केलेल्या हल्ल्याचे हा ग्रंथ म्हणजे एक उदाहरण होय.

म. प. पेठे

**हिंदूसमाज दर्शन : प्रकाशक : भोपटकर, ल. ब. १९३७.** हिंदूमहासभेच्या प्रचारकांना केवळ भावनात्मक आवाहनावर विसंबून राहू लागू नये, या हेतूने लिहिलेला तरुण पिढीत उत्साह उत्पन्न करील अशा साधार आणि विश्वसनीय माहितीतून समाज दर्शन घडविणारा ग्रंथ. आक्रमक इस्लामीक आणि ख्रिस्ती धर्मांचे प्रचारक हिंदू धर्मातील आणि समाजातील वैगुण्यावर भर देतात. त्यांना उत्तर देण्यासाठी हिंदूसमाजातील उज्ज्वल गोष्टींच्या संग्रहाबरोबरच अन्य धर्मीयांच्या दोषांचा, अत्याचारांचा, कत्तलींचा, लुटालुटींचा, दंग्यांचा त्रोटक इतिहास ग्रंथात दिलेला आहे.

श्री. पु. गोखले

**हिंदुस्थानचे दुसरे स्वातंत्र्ययुद्ध : ओक, पुरुषोत्तम नागेश. प्रकाशक :मंगला अमरेन्द्र गाडगीळ, पुणे, १९४७.** १८५७ चा उठाव स्वातंत्र लढा की बंड या बद्दल वाद असला तरी नेताजी सुभाषबाबूंच्या नेतृत्वाखाली लढलेले युद्ध निर्विवाद स्वातंत्र्य-युद्धाचे होते. नेतृत्व, एक निशान, अनेक धर्म, पंथ यांनी एकत्रितपणे घेतलेला भाग, आंतरराष्ट्रीय अस्तित्व, आधुनिक रणसाहित्य यामुळे हे स्वातंत्र्ययुद्ध या संज्ञेस पात्र होते.

८ डिसेंबर १९४१ रोजी जपानने दूरपूर्वेत युद्धाला सुरुवात केल्यापासून १४ ऑगस्ट १९४५ रोजी जपानवर अणुम्बाब पडून तो शरण येईपर्यंतचा इतिहास येथे आलेला आहे.

स्वातंत्र्याचे मोल पुरेपूर दिल्याखेरीज ते प्राप्त होत नाही. ही नेताजींची युक्ती हा इतिहास वाचल्यावर अतिशय सार्थ वाटते. आझाद हिंद फौजेचा स्वातंत्र्य लढ्याचा इतिहास सांगणारा मराठीतील प्रयत्न या दृष्टीने महत्त्व.

रा. व्यं. जोशी

**हिमशिखरे : बुधे, कांतदर्शी. प्रकाशक : वीणा प्रकाशन, नागपूर, १९५०.** गूढवादी व अध्यात्मपर गद्यगीतांचा संग्रह. परंतु मराठी अध्यात्मपर कवितेशी त्यांचे नाते नाही. रवींद्रनाथ व खलील जिब्रानच्या गद्यकाव्यांशी त्यांचे नाते जुळते. "गूढवाद म्हणजे प्रतीकांच्या साहाय्याने परमात्म्याप्रत पोचण्याची वृत्ती." या व्याख्येनुसार बुधे यांच्या गद्यगीतातही सर्वगत व सर्वातीत एकाच्या साक्षात्काराला उत्कट ध्यास व तळमळ आहे. सर्वसाधारणपणे गूढवादी कवितेत मधुराभक्ती आढळते तशीच ती या ही कवितेत आहे. प्रेयसीच्या भूमिकेतून ईश्वराविषयीची आर्त तळमळ, त्याच्या विरहाने होणारी तडफड कवीने व्यक्त केली आहे. भावनोत्कटता, आर्तता, ऋजुता या मधुराभक्तीपर काव्यांच्या वैशिष्ट्यांचा प्रत्यय 'हिमशिखरे'तील अनेक गीतांतून येतो.

प्रभा गणोरकर

**हिमालयांतील प्रवास : कालेलकर, काका (दत्तात्रय बाळकृष्ण कालेलकर), अनुवादक : भाऊ धर्माधिकारी, प्रकाशक : सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणे, १९३९.** श्री. काकासाहेब कालेलकर यांनी गुजराथी भाषेमध्ये साठ पुस्तके लिहिली आहेत. सदरचे पुस्तक हे मूळ गुजराती पुस्तकाचे मराठी भाषांतर आहे. श्री. काणेकर, श्री. कालेलकर आणि श्री. पु. ल. देशपांडे यांनी मराठी प्रवासवर्णन ग्रंथात मोलाची भर घातली आहे. हिमालयांतील प्रवास हा ग्रंथ त्यांनी लिहिलेले लेख एकत्रित करून तयार केला आहे. ग्रंथासंबंधीच्या माहितीचे प्रकरण पहिले असून संकल्प आणि शेवटचे या पहिल्या व शेवटच्या भागासह एकूण ४६ लेख एकत्रित केले आहेत. संदर्भ आणि शब्दार्थ या नावाचे परिशिष्टही ग्रंथात शेवटी समाविष्ट आहे. महाराष्ट्रीय मंडळी जिज्ञासू वृत्तीने यात्रा करतात व माहिती मिळवतात असे भारतातील इतर राज्यांचे मत आहे असा उल्लेख श्री. कालेलकरांनी ग्रंथात केला आहे. प्रसंगानुसार स्थलाचे, निसर्गाचे, मानवी प्रवृत्तीचे वर्णन श्री. कालेलकरांनी विशिष्ट शैलीने केले. स्वतःच्या सवयी त्यानुसार निर्माण झालेल्या अडचणी यांचे वर्णन रोचक आहे. लेखांची शीर्षके भक्तीच्या पुष्पक्षेत्रात, सच्चित्सुख तो तूं परब्रह्म केवळ, धर्मशाळा की ऋषिकुल ? याप्रमाणे असून ही अत्यंत अन्वर्थक अशी आहेत. कल्पनाशक्ति, योजनावृत्ती आणि स्मरणशक्ती यांच्या साहय्याने एक उत्तम ग्रंथाची निर्मिती झाली आहे. मूळ गुजराथी ग्रंथाचा आशय कायम ठेवून श्री. धर्माधिकारी यांनी ग्रंथाचा अनुवादही उत्तम केला आहे.

**हृदय : कुमार रघुवीर. (रघुवीर सामंत). प्रकाशक : नवभारत ग्रंथमाला, मुंबई, १९३२.** रघुवीर सामंत यांनी 'कुमार रघुवीर' या टोपणनावाखाली १९२९ ते ३२ या काळात 'प्रगति' मासिकात लिहिलेल्या चौतीस शब्दचित्रांचा संग्रह. रघुवीर सामंतांनी स्वतःच्या निरीक्षण-अवलोकनातून उच्चभ्रू स्त्री-पुरुषांपासून तळागाळातल्या दरिद्री, अशिक्षित, दलित-ग्रामीण माणसांपर्यंत अनेक व्यक्तींचा पट शब्दचित्रांतून उभा केला आहे. वकील, कारकून, शेतकरी, बेरड, कोळी, कोळीण, भंगीण, माळीण, चिनी कापडविक्या, ट्रमड्रायव्हर, व्हिक्टोरियावाला अशा भिन्न स्तरांतल्या स्त्री-पुरुषांचे चित्रण सामंतांनी केले आहे. त्यात शब्दांतून हुबेहूब चित्र रेखाटण्याचे सामंतांचे कौशल्य दिसून येते. पुढील काळात सामंतांनी स्वभावचित्रे, चित्रबंध, लघुनिबंध, लघुकथा व कादंबरी या स्वरूपाचे लेखन जे केले त्याची बिजे शब्दचित्र या स्फुटलेखनात आहेत. नंतर मराठीत झालेल्या व्यक्तिचित्रणपर लेखनाची मुळे 'कुमार रघुवीर' टोपणनावाने रघुवीर सामंतांनी लिहिलेल्या शब्दचित्रणपर लेखनात आहेत.

वि. शं. चौघुले

**हृदयशारदा : टिळक, कमलाबाई. प्रकाशक : हरी विष्णू मोटे, पुणे, १९३२.** कमलाबाई टिळक यांच्या दहा कथांचा संग्रह विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात ज्या मोजक्याच मराठी लेखिका कथालेखन करीत होत्या त्यांत कमलाबाई टिळक ह्या एक आहेत. तत्कालीन स्त्री-पुरुष संबंधांचे चित्रण पुरोगामी दृष्टीकोनाचा स्वीकार करून लेखिकेने केले आहे. प्रस्तुत संग्रहाच्या वा. म. जोशी यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेत लेखिकेची साधी, सरळ भाषा आणि लेखनातील अंतर्मुख व बहिर्मुख वृत्तींचा मिलाफ यांचा गौरव केला आहे. जुन्या वळणाच्या, वस्तुनिष्ठ स्वरूपाच्या विविध कथा ज्या काळात लिहिल्या जात होत्या त्या काळात स्त्री-पुरुषांच्या मनोवस्थांचा व मानसिक आंदोलनांचा वेध लेखिकेने घ्यावा, हे वैशिष्ट्य नमूद करण्याजोगे आहे, 'कोंकणी वहाणा', 'बाहुल्या', 'मृगजल', 'आत्मदान' या कथा त्या दृष्टीने विशेष उल्लेखनीय आहेत. 'कोंकणी वहाणा' कथेतील मंदाकिनीच्या मनात हणमंतरावांबद्दल निर्माण होणारी आंदोलने, 'बाहुल्या' कथेतील प्रभेला खेळण्यांतील बाहुल्यांविषयी वाटणारे गूढ आकर्षण, 'मृगजल'मधील सदानंदाच्या वाट्याला आलेल्या विपरीत अनुभवामुळे त्याला संपूर्ण आयुष्याबद्दल वाटणारी घृणा, 'आत्मदान' कथेमधील उषेच्या पुरुष प्रेमाबद्दलच्या व सहज[illegible]च्या स्वतंत्र कल्पना इत्यादींमधून लेखिकेने मानवी वृत्ती-प्रवृत्तींचा शोध घेतला आहे. 'हृदय शारदा' कथेची नायिका आपल्या काव्यप्रेमी कलासक्त पतीच्या अपेक्षा आपण पूर्ण करू शकू किंवा नाही, या आशंकेने भयभीत झाली आहे. 'नजर' कथेचा विषय तसा साधा आहे. नजर लागल्यामुळे खंगत गेलेल्या एक नवविवाहितेच्या शोकांतिकेला आपण

कारणीभूत ठरलो, या भावनेने विव्हळ झालेली मिनू ही कथा नायिका सनातन स्त्रीसभावाचे, स्त्रीच्या अंधश्रद्धा वृत्तीचे सूचित करते. दोन पुरुषांकडे आकर्षित होणारी निर्मला ही 'प्रेमाचा वाटा' कथेची नायिका पुढे काय करावे, ह्या विचाराने संभ्रमित झाली आहे. ती कोणताही ठाम निर्णय घेऊ शकत नाही. एक नवा आणि धाडसी विचार मांडण्याचा प्रयत्न लेखिकेने या कथेत केला आहे. कमलाबाई टिळकांच्या 'हृदयशारदा' ह्या संग्रहातील कथा लेखिकेच्या स्वतंत्र कथा प्रवासाची साक्ष पटवणाऱ्या आहेत ; आणि समकालीन लेखिकांच्या कथांपेक्षा आशय, अभिव्यक्तीच्या दृष्टीने वेगळ्याही.

वि. शं. चौघुले

**हेमाद्रिकृत लेखनकल्पतरू : संपादक : मुनशी, गणपतराव सातारकर. प्रकाशक : रखमाजी देवजी मुळे, मुंबई, १८५३.** यादवांचा सर्वश्रेष्ठ 'करणाधिप' ऊर्फ फडणवीस हेमाडपंत याने यादवांच्या मोठ्या, थोरल्या राज्यविस्तारातील अनेक बाबींसंबंधी लिखाण कसे असावे, जमा-खर्चाची काय पद्धत असावी, तसेच पत्र-व्यवहाराची पद्धत काय असावी हे सांगण्यासाठी त्या शिस्तीचा हा ग्रंथ केला असावा.

इ. स. १८५३ साली मुनशी गणपतराव यांनी मूळ ग्रंथावरून तपासून 'हेमतद्रेकृत लेखन कल्पतरू' या नावाचा एक ग्रंथ मुंबईत प्रसिद्ध केला आहे. प्रस्तावनेत ते लिहितात "महाराष्ट्र देशातील लोकांस आपले वडिलोपार्जित जे लेखन चालत आले आहे त्याची रीती पुरातन स्वदेशीच कवींनी काय योजली व सप्रमाण लेखन कोणते, हे कळले पाहिजे म्हणून, हा ग्रंथ प्रसिद्ध केला जात आहे. या ग्रंथाची रचना अनेक वृत्तात्मक श्लोकबद्ध असून त्या श्लोकांवर पुढे गद्य टीका दिली आहे. यात शुद्ध, सात्त्विक आणि रहस्य अशा लिहिण्याच्या तीन रीती कल्पिल्या आहेत. यात सुमारे शंभर-सवाशे मायने दिले आहेत. यात निरनिराळे सरकारी कामगार व साधू पुरुष वगैरेचे मायने दिले असून लहान-थोर, धनी-नोकर, गुरु-शिष्य, नवरा-बायको इ. नी एकमेकांस लिहिताना कोणते मायने योजावेत हेही सांगितले आहे.

आजच्या काळी होणाऱ्या पत्रव्यवहारातही या ग्रंथातील पद्धती काही ठिकाणी अवलंबिली जाते.

हा ग्रंथ हेमाद्रीने रचलेला नसावा, असेही मत आहे. परंतु हेमाद्रीच्या नावावर अनेक बाबी रूढ झाल्या होत्या तेव्हा लेखनासंबंधिही त्याची निश्चित अशी भूमिका असावी त्या भूमिकेचाच आविष्कार ' लेखनकल्पतरू'सारख्या ग्रंथातून स्पष्ट होतो.

तु. शं. कुलकर्णी

**हानाजीबाळाकृत लावण्या : संपादक : शाळीग्राम, शंकर तुकाराम. प्रकाशक : श्रीशिवाजी छापखाना, पुणे, १८७९.** 'होनाजीबाळाकृत लावण्या' या पुस्तकाची तिसरी आवृत्ती, १९२४ साली प्रसिद्ध झाली. या संग्रहात लावण्या व पोवाडे या दोहोंचा समावेश आहे. पोवाड्यांची संख्या चार-पाच इतकीच आहे. सवाई माधवरावांचा 'रंगाचा समारंभ' आणि 'खर्ड्याची लढाई' या प्रसंगावरील पोवाडे होनाजीकडून भर दरबारात गाऊन घेण्यात आले होते. शृंगारिक लावण्यांखेरीज होनाजीने इतर शाहिरांप्रमाणेच ईशस्तुतीपर, पौराणिक कथानकावर, क्षेत्रवर्णनपर व सामाजिक विषयांवरही लावण्या रचल्या आहेत. श्रीकृष्णाच्या बाळलीला त्याच्या लावण्यांतून वर्णिल्या आहेत. "घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला...." ही त्याची विख्यात भूपाळी रचनादृष्ट्या व आशयदृष्ट्या अत्यंत हृद्य झालेली आहे. होनाजीची ही भूपाळी त्याचे नाव काव्याच्या इतिहासात अजरामर करणारी आहे.

लटपट लटपट तुझं चालणं ग मोठ्या नखऱ्याचं । बोलणं ग मंजुळ मैनेचं ।। या लावणीतील नायिकेच्या विभ्रमाच्या व तिच्या बारीकसारीक हालचालींच्या वर्णनांतून तिचं एक मनोरम चित्र होनाजीने उभे केले आहे.

रामजोशींप्रमाणेच त्याची भाषाही संस्कृतप्रचुर आहे. असे असले तरी होनाजीची रचना बोजड वाटत नाही. अनेक प्रसंगांची शब्दचित्रे त्याने आपल्या लावण्यांतून मार्मिकपणे रेखाटली आहेत.

तु. शं. कुलकर्णी

**ज्ञानप्रबोध : बाळापूरकर, विश्वनाथ.** विश्वनाथ बाळापूरकरांचा 'ज्ञानप्रबोध' आणि नारोबास बहाळिये यांचे 'ऋद्धिपुरवर्णन' ही जुळी भावंडे असल्याप्रमाणे आहेत. त्यांचे स्वरूप भिन्न असले तरी त्यांची रचना परस्परसापेक्ष झाली असे त्यांचा इतिहास सांगतो. महानुभावांच्या 'सातीग्रंथां'पैकी हे दोन अखेरचे ग्रंथ ठरतात. 'ज्ञानप्रबोध' ही गीतेवरील मराठी टीका आहे. पण या ग्रंथाच्या एकूण सुमारे १२०० ओव्यांपैकी गीताटीकापर ओव्या केवळ १५८ म्हणजे मूळ ग्रंथाच्या एक-अष्टमांश आहेत. उरलेला भाग स्वतंत्र असला तरी त्यावर त्यापूर्वी सव्वाशे वर्षापूर्वी लिहिलेल्या 'ज्ञानेश्वरी'चा भाषा व शैली या बाबतीत प्रभाव पडलेला स्पष्ट दिर ा.

शं. गो. तुळपुळे

**ज्ञानेश्वरी : ज्ञानदेव.** ज्ञानेश्वरीला ऐतिहासिकदृष्ट्या मराठीचा आद्य ग्रंथ म्हणता आले नाही तरी नंतरच्या सर्व मराठी संत साहित्याचा प्रेरणादायी मूळ स्रोत म्हणून आद्यपूजेचा मान या ग्रंथाला देण्यात येतो. मराठी मनावरची या ग्रंथाची मोहिनी सात शतके उलटून गेली तरी कायम आहे ! असा हा अलौकिक ग्रंथ संत ज्ञानेश्वरांनी शके १२१२ मध्ये (इ. स. १२९०) प्रवरा नदीच्या काठी नेवासे येथे महालसा मंदिरात सांगितला व सच्चिदानंद बाबांनी तो लिहून घेतला.

'ज्ञानेश्वरी' ही भगवतगीतेवरील टीका आहे. गीतेच्या मूळ सातशे श्लोकांवर ज्ञानदेवांनी सुमारे नऊ हजार ओव्यांचे हे काव्यमय प्रवचन केले आहे.

धर्म, तत्त्वज्ञान, काव्य, साहित्य या सर्वांचे अद्‌भुत रसायन म्हणजे 'ज्ञानेश्वरी'. अनेक रसज्ञांनी व संतांनी ज्ञानेश्वरीबद्दल धन्योद्‌गार काढले आहेत. विनोबा म्हणतात—"ज्ञानेश्वरीच्या रूपाने मराठी भाषेचा वेदक त्यांनी (ज्ञानेश्वरांनी) निर्माण केला आहे. मराठी भाषेतून ज्ञानेश्वरी वजा केली तर मराठी साहित्य ज्ञानेश्वरीशून्य." असेच लिहावे लागेल.

आपल्या ग्रंथलेखनासाठी मराठी भाषेचा अवलंब करून ज्ञानेश्वरांनी ज्याप्रमाणे मराठी भाषा समृद्ध केली त्याप्रमाणे केवळ संस्कृत भाषेच्या चौकटीत अडकून पडलेले ज्ञान सामान्य जनांच्या आटोक्यात आणले ही घटनाही भावी काळातील मराठी माणसाच्या व मराठी समाजाच्या जडणघडणीच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची होय.

यशवंत कानिटकर

**ज्ञानेश्वरीतील विदग्ध रसवृत्ती : वाळिंबे, रा. शं. प्रकाशक : प्रसाद प्रकाशन, पुणे प्रथमावृत्ती, १९५३.** रा. शं. वाळिंबे हे विदग्ध सौंदर्यमीमांसक व समीक्षक म्हणून मराठी रसिकांना परिचित आहेत.

'ज्ञानेश्वरीतील विदग्ध रसवृत्ती' या विषयावर सखोल संशोधन करून वाळिंबे यांनी पुणे विद्यापीठाची पीएच.डी. ही पदवी १९५३ साली प्राप्त केली. या संशोधन प्रबंधाचे ग्रंथरूप म्हणजे प्रस्तुत 'ज्ञानेश्वरीतील विदग्ध रसवृत्ती' हा ग्रंथ होय.

या ग्रंथात एकूण वीस प्रकरणे आहेत. 'कविपोषक' या पहिल्या प्रकरणात ज्ञानेश्वरांचे कवी म्हणून व्यक्तीमत्त्व कसे आहे, याचे सोदाहरण विश्लेषण आले आहे. दुसऱ्या प्रकरणात 'शब्दाचे व्यापकपण' सांगताना शब्द आणि अर्थ, ध्वनीत अर्थ यांची चर्चा आली आहे. याशिवाय प्रकरण १५ ते १८ मध्ये ज्ञानेश्वरीत आलेल्या अलंकारांची तपशिलवार चर्चा आली आहे. प्रकरण एकोणिसाव्या 'ओवी' या छंदाची ज्ञानेश्वरीच्या अनुषंगाने चर्चा आली आहे. याशिवाय या ग्रंथाला सात परिशिष्टे आणि तीन सूची, संदर्भग्रंथांची यादी जोडली आहे.

डॉ. हे. वि. इनामदार यांनी वाळिंबे यांच्या ज्ञानेश्वरीवरील संशोधनाविषयी पुढील सार्थ अभिप्राय व्यक्त केला आहे— "ग्रंथगत विवेचनात ते (डॉ. वाळिंबे) अथपासून इतिपर्यंत विलक्षण रंगून गेले असल्यामुळे समरसतेतील सौंदर्य त्यांच्या लेखनात सहजतेने उतरले आहे."

डॉ. वाळिंबे यांचा सूक्ष्म संशोधनवृत्तीचा निदर्शक म्हणून प्रस्तुत ग्रंथाचा उल्लेख करता येईल.

**वि. दा. वासमकर**

**ज्ञानोपासना व भारतीयांचे कर्तव्ये : बनहट्टी, श्री. ना. प्रकाशक : नवभारत ग्रंथमाला, नागपूर, १९३१.** जगातील ज्ञानविषयक प्रगतीचा आढावा घेऊन भारतीयांच्या ज्ञानोपासनेचे स्वरूप थोडक्यात विशद करणे, हा ग्रंथनिर्मितीचा हेतू. या ग्रंथाचे स्थूलमानाने चार विभाग पडतात.—(१) ज्ञानाची व्याख्या-स्वरूप यांची माहिती. (२) शास्त्राची संकल्पना, शास्त्र, विद्या, कला व वाङ्मय यांचे स्वरूप, शास्त्राचे वर्गीकरण व परिणयन. (३) भारतीयांची ज्ञानोपासना हा महत्त्वाचा पोटविषय—लेखकाच्या मते अवघड व नाजूक विषय—भारतीयांच्या ज्ञानोपासनेविषयी पाश्चात्त्य विद्वानांचा दृष्टिकोन व भारतीयांचे समर्थन यांचा तौलनिक व सापेक्ष परामर्श, ज्योतिषशास्त्र-सांख्यन्याय, वैशेषिक तत्त्वप्रणालींचा परिचय, कौटिल्याचा अर्थशास्त्रावरील ग्रंथ इत्यादींची चर्चा व माहिती.

ग्रंथाचे स्वरूप संकल्पनात्मक असल्याने तपशिलवार विवेचन नाही. वाचकांची चौकस बुद्धी, बहुश्रुतता व ज्ञानाची लालसा वृद्धिंगत होण्यास साह्य व्हावे ही अपेक्षा मात्र पूर्ण होते.

**वि. शं. चौघुले**

